


# चांदोबा


संस्थापक : 'चक्रपाणी'

संचालक : नागिरेड्डी


आपले अस्तित्व टिकविण्यासाठी माणूस निरनिराळ्या मार्गानि धनार्जन करतो. परंतु स्वत: कष्ट करून पैसा मिळवण्यात तो आनन्द व संतोष प्राप्त होतो त्याचे महत्व काही वेगळेच आहे. दुसऱ्याचे श्रम व धन नष्ट होताना माणूस थंडपणे पाहू शकतो. परन्तु स्वत:चे श्रम, धन नष्ट झाले तर माणूस ते दु:ख सहन करू शकत नाही. 'श्रमाचे मूल्य' नावाची गोष्ट हे सत्य निदर्शनास आणून देईल.

## अमरवाणी

**लुब्धमर्थेन गृह्णीयात, स्तब्धमंजलि कर्मणा,**
**मूर्खं छन्दानुरोधेन, याथातथ्येन पंडितम् ।।**

[धनाची लालूच दाखवून कंजूस व्यक्तीला, विनयाने वागून कठोर-हृदयी व्यक्तीला, प्रशंसा करून मूर्खाला आणि सत्य-वचनाने पंडित व्यक्तीला वश करून घेता येते.]


वर्ष : ३९ जानेवारी १९८९ अंक : ७

एक प्रत : ३-०० :: वार्षिक वर्गणी : ३६-००

# चांदोबातील नवलाई



## मंगळावर प्राणी रहातात?

वॅकिंग खगोलशास्त्र विभागाने जे फोटो घेतले आहेत. त्यातील काही फोटो प्रश्न चिन्ह बनून राहिले आहेत. त्या फोटोंमध्ये मंगळ ग्रहाच्या पृष्ठभागावर विशाल पिरॅमिडसारख्या आकृति दिसत आहेत. आता प्रश्न असा की या आकृति स्वयंभू आहेत की कोणी निर्माण केल्या आहेत.

## जगातला सर्वात धनवान माणूस



जपान-निवासी योशियाकी त्सुटसुमी हा अनेक रेल्वे-कंपन्यांचा मालक आहे. एका सर्वेक्षणानुसार असे सिद्ध झाले आहे की या वर्षाचा सर्वात धनवान माणूस हाच होय.

## गोगलगायींची शर्यत



स्पेनमध्ये नुकतीच एक गोगलगायींची शर्यत घेतली गेली. या शर्यतीत ७९ गोगलगायींनी भाग घेतला. शर्यत इतकीच होती की त्यांना बांधलेली दोरी खेचून घेऊन जायचे. हर्क्युलिस नावाच्या गोगलगायीने या स्पर्धेत प्रथम पारितोषिक मिळवले २४० ग्रॅम वजनाचा दगड ही गोगलगाय दहा मिनिटांच्या अवधीत ४२.५ सें. मी. दूर ओढून घेऊन गेली!

## चीनच्या बालिकेचा नवा उच्चांक



चीनच्या पानलनमेय नावाच्या १५ वर्षे वयाच्या बालिकेने वजन उचलण्यात जगातील नवीन उच्चांक स्थापित केला आहे.

# शंकानिवारण

गौतमी नावाच्या एका गृहिणीच्या मनात एकदा एक शंका आली की, जगात लोक भांडणे का करतात? तिने अनेकांना ही शंका निवारण करण्याबद्दल विनन्ती केली, पण कोणीही संतोषजनक उत्तर देऊ शकले नाही. एके दिवशी कोणी एक बैरागी तिच्या घरी भिक्षा मागायला आला. गौतमीने त्याला विचारले–"साधूमहाराज, या जगात भांडणे का होतात?"

"मी तुझ्याकडे भिक्षा मागायला आलो आहे, अन् तू मला फालतु प्रश्न काय विचारतेस?" बैराग्याने चिडूनच विचारले.

"मी काय फालतु प्रश्न विचारला? अरे दारोदार भीक मागणाऱ्या दुष्ट माणसा, तुझी इतकी हिम्मत? इतका घमेंड आलीय तुला?" असे म्हणत गौतमी त्याच्याशी भांडायला उठली.

"बाई ग, मी तुझ्याशी जरासा कडक शब्दात बोललो, तर तुला केवढा राग आला! माणसा-माणसात भांडणे होण्याची अनेक कारणे आहेत. त्यातलं मुख्य कारण म्हणजे आपल्या जिभेवर ताबा नसणे! ही गोष्ट तुला अनुभवानेच शिकवावी म्हणूनच मी असं बोललो. क्षमा कर मला!" बैरागी म्हणाला.





# अद्भुत पेय

धर्मगिरीचा राजा हा भद्रावतीचा राजा भानुचन्द्र याचा सामंत होता. एकदा शेजारच्या जयंतपुरच्या राजा विजयवर्माने धर्मगिरीवर हल्ला केला व ते राज्य आपल्या ताब्यात घेतले. थोड्या उशिरानेच ही बातमी भानुचन्द्राला मिळाली.

राजा भानुचन्द्र मोठी सेना घेऊन विजयवर्मावर चालून गेला. त्याने विजयवर्माला हरवले अन् राज्य पुन्हा आपल्या सामन्ताच्या हाती सोपवले. त्यावेळी सामन्ताने भानुचन्द्राला एक खूप मोठे पीप भेट म्हणून दिले आणि म्हणाला–'महाराज, या पिपात एक अद्भुत् असे पेय आहे. आपण व आपल्या परिवाराने ते प्यावे अशी माझी इच्छा आहे. खूप आनन्द होईल मला त्यामुळे.'

पिपातले पेय राजा भानुचन्द्र व त्याच्या सैनिकांनी प्यायले व नंतर नाचून, धांगडधिंगा करून ते सर्व बेहोश होऊन पडले.

दुसऱ्या दिवशी सूर्योदयानंतर सामन्ताला बोलावून घेऊन भानुचन्द्राने विचारले–"तू आम्हाला जे पीप भेट दिलेस ते तू कोठून मागवले होतेस?"

राजाचा प्रश्न ऐकून सामन्ताला अतिशय आनन्द झाला आणि तो म्हणाला–"महाराज, हे पेय तर धर्मगिरीतच बनवले जाते. येथील एका विशेष प्रकारच्या वनस्पती पासून ते बनवले जाते."

"ओहो, असं होय?" डोके हलवत भानुचन्द्र म्हणाला. त्याने पुढे विचारले–"हे पेय काय तुमच्या वाडवडिलांपासूनच धर्मगिरीत तयार केले जात आहे?"

"नाही महाराज! दोन वर्षा पूर्वी एका परदेशी व्यापाऱ्याने हे अद्भुत् पेय मला नजर केले होते. मी ते प्यायले अन् मला



फारच आनन्द अन् आल्हाद वाटला. म्हणून मीच त्या व्यापाऱ्याकडून ते बनवण्याची विद्या शिकून घेतली." सामंताने मोठ्या अभिमानाने माहिती पुरवली.

राजा भानुचन्द्र क्षणभर गप्प राहिला अन् त्याने म्हटले–"तुम्ही दोन वर्षांपूर्वीची गोष्ट सांगत आहात मला. पण मी तर त्याच्या नंतरची हकीकत ऐकायला उत्सुक आहे, नीट सविस्तर सांगा बरं?"

यावर सामन्त राजाने अशी हकीकत सांगितली–

परदेशी व्यापाऱ्याकडून मिळालेले अद्भुत पेय प्यायल्यावर सामन्ताच्या मनात आले- असं अपूर्व सुख देणारं पेय आपल्या प्रजेला मिळवून देऊन प्रजाजनांचा दुवा घ्यावा. हा विचार मनात आल्याबरोबर सामन्ताने लगेच आपल्या मन्त्र्याला बोलवून घेऊन म्हटले–"मंत्री महोदय, हे पेय मी माझ्या प्रजेला वाटू इच्छितो. आपण त्यासाठी आवश्यक इतकी सामग्री आणि नोकरवर्ग यांची जुळवाजुळव करा."

एका आठवड्यानंतर राज्यातल्या प्रमुख केन्द्रातून मोफत पानगृहे उघडली गेली आणि त्या अद्भुत् पेयाचे वितरण सुरू झाले. ही योजना कार्यवाहीत आणण्यासाठी नोकरांचे पगार-भत्ते, पिपांची ने-आण करण्यासाठीचा खर्च इत्यादि मिळून दरमहा शंभर सुवर्णमुद्रांपेक्षा अधिक खर्च वाढला.

या अधिक खर्चाची अडचण दूर करण्यासाठी सामंत निरनिराळ्या कल्पना करू लागला. तेवढ्यात आणखी एक अडचण उपस्थित झाली–आपल्या मागणी प्रमाणे पेय न मिळाल्यामुळे चिडलेल्या जनतेने एके दिवशी पानगृहाच्या दोन नोकरांची हत्या केली!

सामन्ताने या विषयावर मन्त्र्याशी चर्चा केली. मन्त्र्याने तावडतोब या पेयावर बन्दी आणण्याचा उपाय सुचवला. परंतु सामन्ताने विचार केला की, थोडीशी किमत घेऊन हे पेय विकले तर खजिन्यात भरही पडेल अन् केवळ श्रीमन्तच ते पेय विकत घेऊन पितील. अशा प्रकारे नोकरांच्या हत्याही थांबतील.

त्यानुसार दुसऱ्याच दिवशी पेयाची किमत ठरवली गेली. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे पेय फुकट मिळत असताना पिपांची संख्या जी रोजी पंचवीस हजार होती, ती आता पेय विकले जाऊ लागल्यावर पन्नास हजार पिपांपर्यंत वाढली. राज्याची द्रव्याची एकूण प्राप्तिही वाढली.

आता या अधिक प्राप्तीतून सामन्ताने समाज-कल्याणासाठी निरनिराळ्या योजना आखायला सुरुवात केली. त्याच्या योजनांचे स्वरूप असे-पहिल्या सहा महिन्यांची प्राप्ति अनाथ मुलांवर खर्च करावी आणि नंतरच्या सहा महिन्यांची प्राप्ति सैनिकांच्या पगारवाढीसाठी खर्चावी. प्रथम अनाथ मुलांच्या माहिती बद्दल एक टिपण तयार झाले. या मुलांची संख्या एकूण दहा हजार होती.

पहिली समाज-कल्याण योजना राबवल्यानंतर अनाथ मुलां संबंधीचे आणखी एक माहितीपत्रक तयार झाले, ते सामन्ताने नीट तपासून पाहिले असता अशा मुलांची संख्या पंचवीस हजार दाखवलेली आढळली! त्याला फार आश्चर्य वाटले आणि तो एके दिवशी वेष पालटून नगर-संचाराला निघाला. नगरातल्या अनेक गल्ल्यातून भीक मागणारी खूपशी अनाथ मुले त्याने पाहिली. सामन्ताने त्यांना विचारले–





"कारे बाबांनो, तुम्ही भीक का मागता?"

"महाराज, या देशाचा राजा जे पेय विकतो, ते पिऊन आमच्यातल्या काही जणांचे पालक मरून गेले; तर काही भयानक रोगाने तडफडत आहेत. म्हणून त्यांनी आम्हाला घराबाहेर घालवून दिले आहे." बिचाऱ्या अनाथ मुलांनी आपले रडगाणे गायले.

यानंतर सामन्ताने सैनिकांचे पगार दुप्पट केले आणि सहा महिन्यांनंतर पुन्हा त्यांची माहिती मन्त्र्याकडे मागितली.

मन्त्री म्हणाला–"महाराज, सैनिकांच्या बायकामुलांनी जी पंचवीस हजार तक्रार-पत्रे आपल्याकडे पाठवली आहेत, ती अवलोकन केलीत की आपणाला सत्य-परिस्थिती समजून येईल. पुन्हा नवीन माहितीपत्रक बनवायची जरूरच पडणार नाही." असे उत्तर देऊन मन्त्र्याने तावडतोब तक्रार-पत्रे मागवून घेतली.

दोन-चारच पत्रे वाचून पाहिल्यावर सामन्ताला कळून चुकले की आपले सैनिक या पेयाचे दास बनून आपल्या पगारातील एक कवडीही घरखर्चासाठी शिल्लक ठेवत नाहीत!

खरी हकीकत जाणून सामन्ताला फार दुःख झाले. त्याने मन्त्र्याला विचारले–"मी जनतेच्या सुखासाठी हे पेय तयार करवले अन् त्याचा असा कुपरिणाम कसा काय झाला?"

मन्त्री विनयपूर्वक म्हणाला–"महाराज, सध्या तुरुंगात कैद्यांची संख्या पूर्वीप्रमाणे तीन हजार नव्हे, पन्नास हजार झाली आहे. त्यातल्या निम्म्या लोकांनी या पेयासाठी पैसा नसल्यामुळे अपराध केले, तर बाकी निम्म्या लोकांनी पेयसेवनानंतर नशा चढून अपराध केले आहेत."

ही स्थिति जाणून व्याकुळ होऊन सामन्त म्हणाला–"आत्ता माझं मन फारच दुःखी झालंय. तुम्ही जाऊन दरबारी गायक कपिल शर्मा याच्या गायनाच्या मैफलीची व्यवस्था करा."





कपिल शर्मा तर अगदीच गळून गेला होता! तरीही राजाचे आमंत्रण मिळाल्याने तसाच येऊन गाऊ लागला. त्याचा आवाज अगदीच चिरका येत होता. खरे पाहता पूर्वी कपिल शर्मा गाऊ लागला की लोक भान विसरून ऐकत रहात.

परंतु आता आश्चर्याने सामन्ताने मन्त्र्याला विचारले–"मंत्री महाशय, या कपिल शर्माला झालंय तरी काय?"

"हा तर त्या पेयाचा प्रभाव! या पेयाने असंख्य कलाकारांचा सर्वनाश करून टाकलाय महाराज!" मन्त्री उत्तरला.

हा वृत्तान्त ऐकून धर्मगिरीच्या सामन्ताने मान खाली घातली!

हा सर्व समाचार सामन्ताच्या तोंडून ऐकल्यावर भानुचन्द्र म्हणाला–"राज्याची अशी दुर्दशा आहे तर! म्हणूनच जयंत-पुरच्या राजा विजयवर्मांला इतक्या सहज-पणे तुमच्यावर विजय मिळाला! तुम्ही ज्या अद्भुत् पेयाबद्दल बोलत आहात, त्या पेयावर आत्ता, या क्षणापासून बन्दी घाला. सामन्ताला अशा प्रकारे आज्ञा देऊन भानुचन्द्र आपल्या देशात निघून गेला.

परंतु एक महिन्याच्या आतच विजय-वर्माने पुन्हा धर्मगिरीवर अधिकार प्रस्थापित केला! ही बातमी मिळूनही यावेळी भानुचन्द्राने त्याला हाकलून देण्याचा मुळीच प्रयत्न केला नाही; उलट काही उपाय सुचून तो गप्प राहिला. त्याने जयन्तपुर राज्यात फक्त आपला गुप्तहेर पाठवला. त्या गुप्तहेराने सहा महिन्यांनंतर परत येऊन भानुचन्द्राला सांगितले–"महाराज, धर्मगिरीच्या सामंताचे अद्भुत पेय आता विजयवर्माच्या राज्या-तही पसरलं आहे, आणि त्या राज्यातही अराजकता निर्माण झाली आहे."

राजा भानुचन्द्राने तावडतोब जयंत पुरच्या राज्यावर हल्ला करून अगदी सहज-पणे त्यावर विजय मिळवला आणि 'अद्भुत् पेय' या नावाने प्रचलित असलेल्या त्या विनाशकारी पेयावर कडक बन्दी-हुकूम बजावला.





# वरदात्री देवी

दुर्गापुर नावाच्या गावात कालीदेवीचे एक मन्दिर होते. गावातले सर्व लोक या देवीला अत्यंत महिमासंपन्न देवी मानून मोठ्या भक्तिभावाने तिची पूजाअर्चा करीत. भक्तांच्या नवसाला पावून देवीही त्यांची इच्छा पुरी करत असे. त्या गावचे शेतकरी शेतावर कामाला जाताना आपल्या पिकाचे रक्षण करण्याबद्दल देवीला विनवत अन् मोठ्या श्रद्धेने तिला नमस्कार करत. दरवर्षी जत्रेच्या वेळी सर्वजण आपापल्या प्राप्तीनुसार देवीपुढच्या पेटीत पैसे टाकत असत. कालीदेवीच्या कृपाशीर्वादाने गाव नित्य समृद्ध असे. लोकांना धन-धान्याची कधी ददात पडली नाही. पाऊस वेळेवर पडे. शेतकऱ्यांना काळी आई भरपूर पीक देत राहिली. गावातील लोक कुठल्या ही व्यसनांच्या नादी लागले नाहीत.

एके वर्षी सूरजसिंह नावाचा एक खताचा व्यापारी त्या गावात रहायला आला. त्याने कालीमातेचा महिमा पूर्वीच ऐकला होता; म्हणून मन्दिरात जाऊन त्याने नवस केला—"आई काली, मी या गावात व्यापार करायला आलो आहे. या गावातल्या शेतांसाठी माझ्या खतांची जास्त जरूर पडेल असं काही केलंस तर मी तुला चांदीचं कवच अर्पण करीन."

त्याची प्रार्थना ऐकून कालीदेवी फार खूष झाली. खरे तर दरवर्षी काही खतं न वापरताच त्या गावातल्या शेतांत पिके चांगली येत, पण यावर्षी जास्तीत जास्त खतं वापरूनही पिके आली नाहीत. 'जमीनीची उत्पादन-शक्तीच कमी झाली असावी?' या विचाराने बिचारे शेतकरी चिन्तेत पडले. अशा प्रकारे शेतकऱ्यांची प्राप्ति कमी झाली, पण सूरजसिंहाचे उखळ पांढरे झाले!

पुढल्या वर्षी रामप्यारे नावाचा आणखी एक नवा व्यापारी दुर्गापुरला आला. शेतांसाठी कीटकनाशक औषधे विकण्याचा त्याचा धन्दा होता. त्यानेही देवीचा महिमा ऐकला होता, म्हणून तोही देवळात जाऊन कालीच्या पाया पडला आणि नवस बोलला—"कालीमाते, या गावात माझी कृमिनाशके जास्त विकली गेली तर मी तुझ्यासाठी सोन्याचा कंबरपट्टा बनवून देईन."

कालीने रामप्यारेवरही अनुग्रह केला. परिणामस्वरूप त्या वर्षी दुर्गापुरच्या पिकांना कीड लागली! आता शेतकऱ्यांनी खतां बरोबरच भारी किंमतीची कीटकनाशकेही खरीदली! रामप्यारे ने मोठ्या आनंदाने देवीला सोन्याचा कंबरपट्टा अर्पण केला. कालीला आणखीच आनन्द वाटला!

परन्तु एक आठवड्याने एका रात्री वेणुमाधव नावाचा एक शेतकरी आपल्या बायकामुलांसह गाव सोडून जाताना दिसला. त्या गावच्या इतर शेतकऱ्यांसारखा तो वेणुमाधवही कालीचा भक्त होता.

देवीने त्याचे गाव सोडून जायचे कारण शोधायचे ठरवले आणि एका म्हातारीचा वेष करून ती वेणुमाधवच्या बैलगाडीपुढे उभी



राहिली. तिने विचारले—"अशा मध्यरात्री बायका-पोरांना घेऊन कुठे जातोस रे बाबा?"

"आई, मी शहरात मोल मजुरी करायला निघालो आहे. शेतीवाडीत तर दिवसेंदिवस नुकसानच होत चाललंय. आपलं शेत विकून गाव सोडून चाललो आहे मी!" वेणुमाधव उत्तरला.

हे उत्तर ऐकून देवीला वाईट वाटले. पण आपला कंबरपट्टा पाहून ती गप्पच राहिली. हळूहळू गाव सोडून जाणाऱ्या कुटुम्बांची संख्या वाढत चालली. एक महिना होता होता अर्धे गाव रिकामे झाले! अन् त्याबरोबरच कालीला नमस्कार करायला

वि. सि. पाटील











येणारांची संख्याही कमी झाली. तरी काली-देवी संतुष्टच होती. परंतु एक दिवस सूरजसिंह अन् रामप्यारेही ते गाव सोडून निघालेले दिसले तेव्हा मात्र तिला आश्चर्य वाटले. ती त्यांची वाट अडवून उभी राहिली.

सूरजसिंह आणि रामप्यारे तिला म्हणाले–"देवी, आम्ही कोण हे तुला माहीतच आहे. या गावात आमचा व्यापार बरोबर चालत नाहीसा झालाय, म्हणून आम्ही दुसऱ्या एका गावी जात आहोत."

त्यांचे उत्तर ऐकून देवी एकदम कोपली आणि त्यांना म्हणाली–"अरे दुष्टांनो, खोटं बोलायला लाज नाही वाटत तुम्हाला? जमिनीची उत्पादन-शक्ती कमी करणं अन् पिकांना कीड लागणं वगैरे अडचणी मी तुमच्यासाठीच ना उपस्थित केल्या?"

यावर देवीला वाकून भक्तिपूर्वक नमस्कार करीत ते दोघे म्हणाले–"माते, तुझं म्हणणं बरोबर आहे. पण तुझं आमच्यावर जे अपार प्रेम आहे त्यामुळे तू गावच्या शेतकऱ्यांची उपेक्षा केलीस. त्यांचं बिचाऱ्यांचं शेतीवाडीत नुकसान होत आहे. आम्ही आता आमची खतं अन् औषधं कुणाला विकणार? म्हणूनच आता आम्ही शेजारच्या गावच्या विन्ध्यादेवीला नमस्कार करून तिथंच रहायचं ठरवलं आहे."

मोठमोठ्या नवसांच्या लोभाला बळी पडून आपण गावाचे कसे नुकसान केले हे आता कुठे कालीदेवीला कळून चुकले! आपण या दोघांवर केलेली कृपा अशा प्रकारे व्यर्थ होईल याची तिनं कल्पनाच केली नव्हती!

यानंतर कालीदेवीला फारच पश्चात्ताप झाला, पुन्हा तिने जमिनीची उत्पादन-क्षमता पहिल्यासारखी करून टाकली आणि किडयांचे रोग थांबवून पिके वाचवली, हे पाहून गाव सोडून गेलेले लोकही हळूहळू परत आले. गाव पुन्हा वसला अन् वरदात्री कालीचे मंदिरही भक्तांमुळे सुशोभित दिसू लागले.





# सोन्याची दरी

[१२]

[विनोद ज्ञानभूमीच्या मार्गाने 'सोन्याची दरी' राज्यात पोचला. त्यानं आपल्या हातातली अंगठी काढून सुवर्णप्रतिमेच्या बोटावर चढवली. त्याबरोबर त्या मूर्तीत प्राण-संचार होऊन ती विनोदच्या बाजूला येऊन उभी राहिली आणि तिने विनोदला सांगितले की–"आता आपल्या दोघांचा विवाह झालेला आहे." ते ऐकून विनोदला अत्यानंद झाला.]

विनोद थोडा वेळ गप्प राहिला आणि म्हणाला–"या मानवांच्या दुनियेच्या पलिकडे मी एक युवराज्ञी पाहिली होती. तू तर पूर्णपणे तिच्याच सारखी दिसते आहेस!"

"तू जिला गाणं शिकवलंस आणि जी गाता गाता तुझ्या समोरच अदृश्य झाली- त्याच युवराज्ञीबद्दल तू बोलतो आहेस ना?" त्या तरुणीने विचारले.

"हो, पण तुला कशी तिच्याबद्दल माहिती?" विनोदने आश्चर्य प्रकट केले.

"निर्जीव मूर्तीत जर प्राण-संचार झाला, तर तो प्राण कुठून तरी यायला हवा न? तू ज्या युवराणीला अदृश्य होताना पाहिलेस, तिचाच प्राण आता माझ्यात आला आहे. कळलं?" तरुणी म्हणाली.

"ओहो, असं आहे होय?" आनंदाने विनोद म्हणाला.



"तू जर हे कमलपुष्प हुंगून पाहिलंस तर तुला ही स्वतःचं खरं स्वरूप कळून येईल." असे म्हणत तिने आपल्या हातातले कमल विनोदपुढे धरले.

विनोदने कमळाचा वास घेतला अन् दुसऱ्याच क्षणी पहाडावर असणाऱ्या राजमहालात स्वर्ण प्रतिमा घडवत असलेल्या एका युवराजाचे दृश्य विनोदच्या अंतर्दृष्टीला दिसू लागले! त्याने ओळखले की तो युवराज म्हणजे आपण स्वतःच आहोत! पूर्वायुष्यांतल्या त्याच्या स्मृति एकदम ताज्या झाल्या! विनोदला आता स्पष्टपणे कळून चुकले की ती सुवर्णप्रतिमा तर आपणच घडवली होती!

"आपण फार वेळ इथे रहाणं ठीक नव्हे. राजाचे सोंग घेतलेला तो दुष्ट मांत्रिक जे जे अन्याय करीत आहे ते तुला अजून माहीत नाही. राजा फार लोभी आहे, माझ्याशी विवाह करण्याच्या आशेने माझ्या मूर्तीत प्राणसंचार करवण्यासाठी तो कित्येक यातना भोगत आहे. परंतु त्या दुष्ट मान्त्रिकाने तर सोनं मिळवण्यासाठी सुवर्णप्रतिमाच उखडून काढून ती वितळवण्याचे कारस्थान रचले आहे! त्याचे नोकर आता थोड्याच वेळात इथे येतील. ते येण्यापूर्वीच आपण येथून गेलेले बरे! अन्यथा काय संकट येईल कोण जाणे? चल, आपण लवकरच इथून अन्यत्र कुठे तरी जाऊं." युवराज्ञी म्हणाली.

यानंतर विनोद व युवराज्ञी त्या पहाडाच्या उंच शिखरावर जाऊन पोचले. त्याच वेळी पूर्व दिशेला सूर्योदय होत होता.

"ओह, ही पृथ्वी काय सुन्दर आहे! अशी नयनरम्य भूमि मी पूर्वी कधी पाहिली नव्हती. येथील हवामान ही फार सुरेख आहे. मला इथं रहायला खूप आवडेल!" युवराज्ञी म्हणाली.

"असं?" विनोद पुढे काही बोलणार, इतक्यात त्या डोंगराखालून काही गडबडगोंधळ चालल्याचा आवाज ऐकू आला. दोघांनीही आवाजाच्या दिशेने नजर वळवली. राज-सैनिक आपसात तर्क-कुतर्क करीत होते–" अरे, इथली सुवर्णप्रतिमा कुठे गेली? झालं काय त्या पुतळ्याचं? रोज जी मूर्ति आपण इथे पहात होतो ती दिसत कशी नाहीं? कोण बरं घेऊन गेलं असावं?" पिसाळलेल्या कुत्र्यासारखे ते इकडे तिकडे धावू लागले.

थोड्याच वेळात राजाच्या वेषातला तो मान्त्रिक ही तिथे येऊन पोचला. त्याला तर असह्य असा धक्काच बसला! रागाने पिसाळून तो ओरडू लागला, "मी तुम्हा सर्व नोकरांना मारून टाकीन, मूर्ति गेलीच कशी इथून?"

थोडा वेळ सैनिकांकडे पहात तो गर्जत राहिला आणि नंतर खऱ्या राजाला ठेवलेल्या गुहे कडे त्याने नजर वळवली. आपणच राजाला फसवून तिथे डांबून ठेवलंय ही गोष्ट ही तो रागाच्या भरात विसरून गेला. अजून कोणाला त्याबद्दल काही माहीत नाही हे विसरून तो जोराने ओरडला, "त्या दुष्ट राजानेच ती मूर्ति चोरली असली पाहिजे. मला याची कल्पना होतीच! या राजाला त्या मूर्तीचा फार मोह होता. त्याचीच ही सर्व कारवाई दिसते आहे."

त्याचे हे बोलणे ऐकून तिथे जमलेले मंत्री आणि महाज्ञानी आश्चर्यात पडले. नंतर मान्त्रिक सेवकांना घेऊन गुहेत शिरला आणि त्यांना आतील भिंत पाडायची आज्ञा त्याने दिली.





सेवकांनी काही मिनिटात भिंत पाडून पलिकडे असलेल्या राजाला बाहेर आणले.

राजा अगदीच बारीक झाला होता आणि दाढी वगैरे वाढून एकाद्या भुतासारखा दिसत होता. एकाच उडीत तो पुढे झाला आणि त्याने राजा-वेषधारी मान्त्रिकाच्या कमरेला लटकलेल्या म्यानातून झटकन तलवार खेंचून काढली. विकट हास्य करीत त्याने मान्त्रिकाचे शीर धडावेगळे केले.

राजाच्या वेषातल्या मान्त्रिकाचे अंगरक्षक हे पाहून पुढे सरसावले, पण खऱ्या राजाचा आवाज ऐकताच ते जागीच खिळल्यासारखे उभे राहिले.

राजाने मन्त्री व महाज्ञानी वगैरे सर्वांना त्यांच्या नावाने बोलावून त्यांना आज्ञा दिली की, "तुम्ही सर्वजण तावडतोब घरी जा, अन् माझ्यासाठी चांगले रुचकर पदार्थ घेऊन या."

राजाचा आवाज, त्याचे नेहमीचे वागणे पाहून राजाच्या नोकरांनी त्याला आपला खरा राजा म्हणून ओळखले.

नंतर समोरच रक्ताच्या थारोळ्यात पडलेल्या मान्त्रिकाच्या प्रेताला प्रत्येक जण लाथ मारू लागला. अशा प्रकारे लाथ मारण्यासाठी धडपडणाऱ्या लोकांची रांग लावता लावता मंत्री बेजार झाला!

"मूर्खांनो, उगीचच त्या दुष्टाच्या प्रेताला लाथ मारून तुम्हाला काय मिळणार आहे? त्यापेक्षा सोन्याला लाथ मारा सोन्याला!" राजा ओरडला.

सर्वजण आश्चर्याने राजाकडे पाहू लागले.

"सोन्याच्या मूर्तीच्या चौथऱ्याखाली सोन्याच्या पाण्याने भरलेला खूप मोठा तलाव आहे. त्या गुहेत बन्द असताना एका फटीतून दिसत असे मला तो! या या, इथे खणून पहा. पण एक गोष्ट लक्षात ठेवा हं! त्या तलावातलं सगळं सोनं माझंच होणार! हां, थोड्या दिवसांनी मी तुम्हा सर्वांना एक एक कळशीभरून त्यातलं



सोन्याचं पाणी देईन वाटलं तर! अरे, तुम्ही लोक नुसतेच तोंडाकडे काय पहात राहिलात मूर्खांनो! पाणी बाहेर तर काढा! आत्ताच्या आत्ता खोदायला सुरुवात करा इथे; अन् माझ्यासाठी लाडू आणा बरं लवकर."

या अगोदर जे राजसेवक मान्त्रिकाच्या आज्ञेने मोठ्या उत्साहाने ती मूर्ति उपटून काढायला कुदळी घेऊन आले होते, तेच आता चौथऱ्याखालील दगड फोडायला लागले.

अचानक वज्रपात व्हावा, तसा आवाज झाला. जो दगड ते तोडायला निघाले होते, तोच दगड एकदम उसळून नक्षत्रासारखा मोठ्या वेगाने आकाशात उडाला आणि त्याचे हजारो तुकडे झाले. तो दगड गुहेत ज्या जागी होता त्या जागेतून एक फवारा उडू लागला अन खाली असलेला सुवर्ण-द्रव भयंकर वेगाने वर उसळला! तिथे हजर असलेले सर्वजण भयाने आणि आश्चर्याने एकदम जोराने ओरडले. थोड्याच वेळात तो सुवर्ण-द्रव त्या भागात पसरू लागला. तो उकळता द्रव असल्याने त्याच्या केवळ स्पर्शानेच राजसेवक तडफडून तिथेच मरून पडले.

राजा, मंत्री व महाज्ञानी हे सर्वजण भिऊन जाऊन तेथून मागे हटायच्या प्रयत्नाला लागले. पण क्षणभरातच त्या फवाऱ्याची गति वाढत गेली आणि त्या प्रवाहाला जणू पूर आला! त्यामुळे ते सर्वजण त्या उकळत्या द्रवात बुडू लागले.

भयानक वाटणारा तो द्रव-पदार्थ मैदानाकडे वळताना पाहून त्या डोंगराखाली रहाणारी जनता घाबरून गेली. जीव मुठीत घेऊन ते सर्वजण आरडत-ओरडत सैरावैरा धावू लागले. परंतु कोणीही त्या सुवर्ण-द्रवाच्या तावडीतून स्वतःला वाचवू शकला नाही.

दुपारपर्यंत तो सोन्याचा प्रवाह प्रलयकारी होऊन पसरत राहिला, नंतर हळूहळू प्रवाहाची धार थांबली, चोहीकडे नीरव शांतता पसरली! पक्षीही जणू आपली किलबिल विसरून गेले!

"सोन्याची दरी वाला प्रदेश आता पूर्णतः निर्जन झाला नाही?" युवराणी निश्वास टाकत निराशेने म्हणाली.

"तूच तर थोड्या वेळापूर्वी म्हणाली होतीस ना, की ही पृथ्वी किती सुंदर अन् सुशोभित आहे! पण पहा, मानवप्राणी कसा कमनशिबी आहे! तो स्वतःच आपल्या हाताने ही पृथ्वी 'रहायला अयोग्य' अशी करत आहे." खोल श्वास घेत विनोद म्हणाला.

थोड्या वेळाने युवराणी विचारू लागली "आता आपण काय करायला हवं? कुठे जायला हवं? आपलं कर्तव्य काय राहील आता?"

"इथेच राहून आपण प्रार्थना करू या. आपली प्रार्थना सफल होईल नक्की! परितामतः पुन्हा लोक येऊन इथे राहू लागतील! त्यांचे नवे जीवन सुरू होताना आपण त्यांना मदत करू." विनोद आशेने म्हणाला.

"बघ, पहा! तो सुवर्ण-द्रव पुन्हा दगडात परिवर्तित होत आहे." युवराणी म्हणाली.

"बदलू दे, त्याचे पुन्हा सोने होईल. माणसांची मनें जेव्हा सोन्यासारखी होतील, तेव्हा पुन्हा दगडांचेही सोने होईल! बघ, त्या छोट्या सरोवरात केवळ चिखल आहे. तरीही सूर्यप्रकाशामुळे त्यात किती सुन्दर कमळं फुलली आहेत! निसर्गातच जर इतके अद्भुत परिवर्तन शक्य आहे तर देवाच्या कृपेने माणसातच खऱ्या मानवतेचे महान् परिवर्तन का बरं नाही होणार?" विनोद म्हणाला.

"अवश्य होईल, का नाही होणार?" युवराणी म्हणाली.

दोघेही एकमेकांकडे पाहून हसले. त्या हास्यात विश्वास प्रतिबिंबित होत होता. (समाप्त)



# कायदा आणि न्याय

एका राज्यातली जनता वस्त्र-प्रावरणांच्या बाबतीत जरा अतिक्रमणच करू लागली होती. यासाठी राजाने एक कठोर कायदा लागू केला की सर्वांनी पूर्ण अंग झाकेल असाच पोशाख केला पाहिजे.

एके दिवशी राजाच्या शिपायांनी तीन माणसांना पकडून आणून राजासमोर उभे केले. त्यापैकी एक अगदी जंगली आणि नाठाळ होता. त्याने केवल लंगोटीच घातली होती. दुसरा एक सर्वसाधारण माणूस होता, तो अर्धनग्न होता. तिसरा होता योगी, तो मात्र पूर्ण नग्नावस्थेत होता.

राजाचा प्रधान जवळच उभा होता. त्याने जंगली माणसाला सुधार-गृहात भर्ती होण्याची आज्ञा दिली. सामान्य माणसाला दहा फटके मारायची शिक्षा त्याने सुनावली आणि त्या साधूच्या अंगावर मात्र शाल पांघरून त्याची रवानगी केली.

प्रधानाचे हे वागणे पाहून राजाने आश्चर्याने प्रधानाला विचारले.

प्रधानाने यावर नम्रपणे उत्तर दिले–"महाराज, ही गोष्ट खरीच की या तिघांनी ही कायदा मोडला होता. परंतु पहिला माणूस अगदीच जंगली व नाठाळ आहे. त्याला आपणच सुधारण्याची जरूरी आहे. दुसरा सर्वसाधारण पातळीचा माणूस आहे म्हणून त्याला शिक्षा करूच योग्य मार्गावर आणायला हवे. योगी माणसाने ही कायदा मोडला, पण तो आपल्या कायद्यापलीकडील पंथाचा माणूस आहे; आपण त्याला आपल्या कायद्याच्या बेडीत अडकवू शकणार नाही."

हे स्पष्टीकरण ऐकून राजाला समजून चुकले की–कायदा आणि न्याय यात चांगलाच फरक असतो.



# साप आणि माणूस

दृढनिश्चयी विक्रमादित्य त्या झाडाकडे परत आला. झाडावरून प्रेत उतरवून त्याने खांद्यावर घेतले; आणि नेहमीप्रमाणे मौनव्रत स्वीकारून तो मुकाट्याने स्मशानाकडे जाऊ लागला. तेव्हा प्रेतात असणाऱ्या वेताळाने त्याला विचारले–"राजा, या चराचर जगतात परस्पर विरोधी स्वभाव आणि बुद्धि असणारी माणसे रहात असतात. अनेक प्रकारची वैषम्यें आणि फसवाफसवी वगैरेंच्या आधारे त्यांचा जीवन-संघर्ष चालू असतो हे सत्य तुला नीट माहीत असेल तर हरकत नाही, नाहीतर तुझे सर्व श्रम, कष्ट वाया जातील. उदाहरणादाखल मी तुला सिद्धेन्द्र नावाच्या साधूची गोष्ट सांगतो, ती ऐक. तुला आपले कष्ट ही विसरायला होईल त्यामुळे."

वेताळ गोष्ट सांगू लागला, विंध्याचलावर एका गुहेत सिद्धेन्द्र नावाचा एक साधू



तपस्या करीत असे. थोड्या दिवसांनी त्याला असे जाणवले की आपल्याला दिव्य-ज्ञान प्राप्त झाले आहे. तेव्हा हे आपले ज्ञान जगातील लोकांना वाटावे, त्यांच्या-साठी त्याचा उपयोग करावा असा सत्संकल्प करून साधु एकान्तवास सोडून समाजाकडे निघाला.

वाटेत एका ठिकाणी त्याला एका विहिरीतून कुणाच्याशा कण्हण्याचा आवाज ऐकू आला. सिद्धेन्द्राने विहिरीजवळ जाऊन आत डोकावून पाहिले तो त्याला डोळे दिपवील असा एक तेजस्वी नाग दिसला!

साधूला पाहिल्या बरोबर आपला फणा उचलून त्याने स्वतःला वाचवण्यासाठी विनवले. दोरीच्या मदतीने साधूने नागाला बाहेर काढले.

सात्त्विकी नावाच्या त्या नागाने साधूला आपली हकीकत सांगितली—महाराज, थोड्या दिवसांपूर्वी मी आपल्या पिल्लांसह एका चांदण्या रात्री चंद्रप्रकाशात इथल्या केतकीवनात आनंदाने विहार करीत असता, अचानक तेथून जाणाऱ्या एका माणसाने माझ्या शेपटीवर पाय दिला. मी जोरात फुत्कार करून चावणार, इतक्यात त्या माणसाने दोन्ही हात जोडून मला साष्टांग नमस्कार केला.

मीही त्याला चावायचा विचार सोडून पुढे निघालो; पण त्याने माझा रस्ता अडवून मला विनंति केली की मी त्याचा पाहुणचार स्वीकारावा. नंतर त्याने एक घडाभर दूध आणून आमच्यापुढे ठेवले अन् मी आणि माझ्या पिल्लांनी मोठ्या आनंदाने ते दूध पिऊन टाकले! परंतु दुसऱ्याच क्षणी मी एकदम बेशुद्ध पडलो. मी शुद्धीवर आलो तेव्हा या विहिरीत होतो! माझ्या बच्चांना त्या दुष्टाने पकडून नेले असले पाहिजे!"

सापाचे ते बोलणे ऐकून सिद्धेन्द्रस्वामीने आपल्या दिव्य दृष्टीने त्या दुष्ट माणसाचा पत्ता काढायचा प्रयत्न केला, तेव्हा त्याला असे कळून आले की त्या गावच्या सीमेवर







रहाणाऱ्या महेन्द्र नावाच्या गारुड्याची ही करणी आहे. साधू सरळ महेन्द्राच्या घरी गेला. सापाच्या तोंडून ऐकलेली हकीकत त्याला सांगून साधूने विचारले—"तू असा विश्वासघात का म्हणून केलास?"

महेन्द्र मोठ्या विनयाने उत्तरला—"महाराज, साप पकडणं हा तर माझा धन्दाच आहे! तरीसुद्धा मोठा साप मला चावला नाही म्हणून मी त्याला जिवन्त सोडून दिले आणि त्याचे बच्चेही माझ्या-जवळ सुरक्षितच आहेत. त्यांचं विष पिळून ते विकून आपलं पोट भरायचा माझा विचार होता; परंतु आपणाबद्दल माझ्या मनात निर्माण झालेल्या श्रद्धेने प्रेरित होऊन मी आपणासमक्ष त्यांना सोडून द्यायला तयार आहे."

महेन्द्राच्या या बोलण्याने संतुष्ट होऊन सिद्धेन्द्र साधू त्याला सात्त्विकीच्या बिळा-जवळ घेऊन गेला. महेन्द्राचे हृदयपरिवर्तन झालेले पाहून सात्त्विकीने आपल्या मस्तका-वरील सुंदर मणि त्याला बक्षिस दिला आणि साधूने केलेल्या उपकारांबद्दल त्याने त्याचे आभार मानले.

साधू तेथून पुढे गेला आणि अनेक गावे फिरत सदुपदेश देत तो फिरत राहिला. असे करत असताना पुन्हा एकदा त्याच रस्त्याने जात असता साधु सात्त्विकीला भेटायला गेला. पण त्याला सात्त्विकी फारच चिन्ताग्रस्त आणि दुर्बल झालेला दिसला.

त्याच्या चिन्तेचे कारण विचारल्यावरून सात्त्विकीने सविस्तर आपली करुण-कहाणी सांगितली.

नागमणि घेऊन गेल्याच्या दुसऱ्याच दिवशी महेन्द्र पुन्हा सात्त्विकीकडे जाऊन म्हणू लागला कि—'आता इथून पुढे आपण कधीही साप पकडणार नाही आणि सिद्धेन्द्र साधूसारखेच सन्मार्गाने चालत आपले जीवन सार्थकी लावणार!' महेन्द्रच्या पोशाखातही झालेला बदल पाहून सात्त्वि-कीने त्याच्या या बोलण्यावर विश्वास



ठेवला. त्या दिवसापासून महेन्द्र खूपदा सात्त्विकी आणि इतर सर्प रहात असलेल्या वारुळांकडे जाऊ-येऊ लागला.

एके दिवशी महेन्द्र तेथल्या वारुळात रहाणाऱ्या सापांना चांदण्यात विहार करण्यासाठी बोलावून घेऊन गेला. सर्व साप जेव्हां केतकी-वनात फिरू लागले तेव्हा आपल्या पूर्वयोजने प्रमाणे महेन्द्रने चारी बाजूंना आग लावली आणि सर्वांना जाळून खाक केले!

नंतर तेथले सर्व मणि वेचून ते विकून तो मोठा लखपति बनून गेला! आगीतून कसावसा वाचून सात्त्विकीच फक्त आपल्या बिळाकडे येऊ शकला! परंतु आपल्या जातिबांधवांच्या नाशाला आपणच कारण झालो या विचाराने तो विचारा खंगत चालला.

हे ऐकून सिद्धेन्द्रला क्रोध आला आणि तो सरळ महेन्द्रच्या घरी पोचला. त्यावेळी महेन्द्र आपल्या घरासमोर बांधलेल्या नागाच्या देवळातल्या नागमूर्तीची पूजा करीत होता.

साधूने त्याच्या जवळ जाऊन त्याला मोठ्याने हाक मारली आणि म्हटले— "दुष्टा, तू अगदी विश्वास देऊन अनेक सर्पांचा सर्वनाश केलास, अन् आता कशाला हे पूजेचं ढोंग? लाज नाही वाटत तुला?"

यावर महेन्द्र मोठ्या विनयाने म्हणाला— "स्वामी महाराज, यात माझा काय बरं दोष? उपकार करणाऱ्यावर मी ही प्रथम प्रत्युपकार केलाच ना? पण मी आपणाला असं कुठे वचन दिलं होतं की अपकार करणाऱ्यांवर सुद्धा मी उपकारच करीन? माणूस सापाची पूजा करतो, पण सापाला तो घाबरतोच याचं कारण म्हणजे साप विषारी असतात. त्याच प्रमाणे माणसांनी सापांची भले पूजा केली, तरीही साप माणसावर कधीही विश्वास ठेवत नाहीत! कारण त्यांनाही माहीत असतं की माणूस आपल्यापेक्षा नक्कीच अधिक बुद्धिमान आहे. अशा स्थितीत आता आपणच सांगा कि सापाने माणसावर विश्वास ठेवला तर चूक कोणाची?"

हे बोलणे ऐकून सिद्धेन्द्र अतिशय रागाने म्हणाला—"तू दयाळूपणा विसरून भोळ्या सापांना मारून टाकलं आहेस; तेव्हां तू ही असाच एक साप बनून रहा." परंतु साधूच्या या शापाचा महेन्द्रवर काहीच परिणाम झाला नाही. सिद्धेन्द्रलाही मोठं आश्चर्य वाटले; आणि खाली मान घालून तेथून तो निघून गेला.

इतकी गोष्ट सांगून वेताळाने विचारले— "राजा इतक्या तपोसंपन्न सिद्धेन्द्र योग्याचा शाप खोटा का ठरला? न्याय आणि धर्म काय यावेळी महेन्द्रच्या बाजूचे होते, म्हणून? या प्रश्नाचे उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होऊन जातील."

विक्रमादित्य यावर उत्तरला—"साधूचा शाप खरा न होण्याचे एक विशेष कारण आहे. प्राण्यांचा स्वभाव हा नैसर्गिक असतो. कोणतीही शक्ति त्यावर नियंत्रण करून स्वभाव बदलू शकत नाही. इतका तपोसम्पन्न साधूही या साध्या निसर्गधर्माचे रहस्य जाणू शकला नाही. साप आणि मनुष्य यांच्यात सह-जीवन अशक्य आहे ही गोष्ट महेन्द्रने आपल्या पद्धतीनं समजावून देण्याचा प्रयत्न केला, पण तरीही रागात असलेल्या साधूला ते रहस्य कळलेच नाही. विंचवाचे वीष त्याच्या नांगीत, सापाचे वीष त्याच्या दाढेत आणि दुष्ट व्यक्तीच्या साऱ्या शरीरभर वीष भरलेले असते-ही गोष्ट दुनियादारीचे ज्ञान असणाऱ्या विद्वानांनी कधीच नमूद करून ठेवलेली आहे, आणि ही गोष्ट महेन्द्रच्या बाबतीत शंभर टक्के खरी आहे. अशा व्यक्तीला सात्त्विकी आणि अन्य नागांच्या बिळांकडे घेऊन जाण्यात सिद्धेंद्रचीच चूक आहे. तोच त्यांच्या नाशाला कारणीभूत आहे. अन् म्हणूनच त्याचा शाप व्यर्थ झाला."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन लटकू लागला. (कल्पित)





# स्वयंसेवक

एका गावात जगन्नाथ नावाचा एक गृहस्थ रहात असे. त्याने आपल्या मुलीचा विवाह शेजारच्या गावातील एका चांगल्या हुद्देदार माणसाची करून दिला होता.

जगन्नाथची मुलगी पहिल्या बाळंत-पणासाठी आपल्या माहेरी आली आणि तिला एक मुलगा झाला. काही महिने गेले आणि अमूक एका दिवशी 'जगन्नाथचा जावई आपली पत्नी व बाळाला घेऊन जाण्यासाठी येत आहे' असा निरोप जावयाकडून आला.

जगन्नाथ तसा काही कोणी मोठा धनाढ्य माणूस नव्हता. तो आपलं अंथरूण पाहून पाय पसरणारा माणूस होता म्हणून कुठे काही फारसं कमी पडू न देता आपल्या कुटुम्बाचा उदरनिर्वाह चालवत असे. कामासाठी घरगडी ठेवण्याइतकी त्याची ऐपत नव्हती. परंतु जावई चांगला संपन्न माणूस असल्यामुळे तो येईल त्या दिवशी एका दिवसासाठी का होईना, एक नोकर मिळवता आला तर छान होईल—असे त्याला वाटले.

जावई ज्या दिवशी येणार होता त्या दिवशी सकाळीच जगन्नाथाच्या घरी पक्वान्नं वगैरे बनवली जाऊ लागली. नोकर शोधण्यासाठी सकाळपासून जगन्नाथने गावात बऱ्याच चकरा मारल्या आणि शेवटी घरी येऊन तो बायकोला म्हणू लागला—"माझी इतकी पायपीट वाया गेली बघ! एखाद्या गोष्टीची गरज लागली अन् जावयाने नोकराला हाक मारली, तर आपली अब्रू जाणार बघ!"

घरातल्या पक्वान्नांच्या वासाने दिंडी-दरवाज्याशी घोटाळत असलेल्या एका भिकाऱ्याने पतिपत्नींमधले हे बोलणे ऐकले. त्याच्या मनात आले की छानसं जेवण आणि पक्वान्नांवरही इथे हात मारता येईल.

बाहेर ओसरीवर कोणी नाही असे पाहून तो भिकारी चटकन विहिरीकडे गेला. तेथे वाळत पडलेल्या कपड्यांपैकी फाटकासा एक शर्ट अन् अशीच जुनी वस्त्रे घेऊन त्याने आपल्या अंगावरच्या चिंध्या उतरवून कोपऱ्यात ठेवल्या अन् कपडे बदलून डोक्याला एक पंचा गुंडाळला. इतके करून तो घरासमोर येऊन हात बांधून उभा राहिला.

नेमक्या त्याच वेळी एक टांगा येऊन घरासमोर उभा राहिला आणि त्यातून जगन्नाथाचा जावई खाली उतरला. भिकाऱ्याने पटकन पुढे होऊन गाडीतून ट्रंक उतरवली आणि ती आपल्या हातात घेऊन जावयाच्या मागेमागे तो ही घरात आला.

घोडागाडी थांबल्याची चाहूल लागून जगन्नाथ घरातून बाहेर आला आणि जाव-याला खुशाली वगैरे विचारली. जावयामागे आलेल्या भिकाऱ्याला त्याचा नोकर समजून जगन्नाथ फार खूष झाला. पण जावई मात्र त्याला सासरचा गडी समजला होता.

जावयाचा नोकर म्हणून जगन्नाथ आणि त्याच्या बायकोने भिकाऱ्याला फारच चांगले वागवले. त्याच्या कडून लहान-सहान कामे करून घेता ना सुद्धा ती गोड बोलून करून घेतली.



घरांत इतर माणसांचे जेवण चालू असताना त्याच वेळी जगन्नाथने भिकाऱ्याला ही ओसरीवर बसवून जेवण दिले. मेजवानीचे जेवण पोटभर जेवून भिकारी संतुष्ट झाला.

भोजनानंतर जगन्नाथने जावयाला नवीन कपडे वगैरे भेट दिले. इकडे त्याच्या बायकोने थोडी मिठाई बांधून भिकाऱ्याच्या हातात देत म्हटले–"हे तुझ्या बायकापोरांसाठी घेऊन जा हं!"

दुपारपर्यंत आराम करून जावई, बायको व नूतन बालकासह गावाला जायला निघाला. भिकाऱ्याने तत्परतेने जाऊन भाड्याची गाडी ठरवून आणली आणि सर्व सामान वगैरे नीट गाडीत ठेवून दिले. सर्वात शेवटी जावई गाडीत शिरला आणि सासरचा नोकर म्हणून भिकाऱ्याच्या हातावर त्याने एक रुपया ठेवला.

गाडी चालू लागली तेव्हा जगन्नाथच्या मुलीने नवऱ्याला विचारले–"तुम्ही याला पैसे देऊन का पाठवलंत! तो तुमच्या-बरोबर इथे नाही आला?"

"नाही! अरे! मला तर वाटलं की तो तुमच्या घरचा नोकर आहे!" जावई म्हणाला.

"माझ्या आई-बाबांना तर वाटलं की तो तुमच्याबरोबर आलेला नोकर आहे!" बायको म्हणाली, आणि दोघंही हसू लागले.

इकडे जगन्नाथच्या बायकोने नवऱ्याला विचारले–"अरे हे काय? पहा बरं! जावयाचा नोकर त्यांच्या बरोबर न जाता दुसरीकडेच कुठे तरी चालला आहे! तो तर त्यांचा नोकर नव्हेच मुळी!"

"मग, कोण आहे तो?" जगन्नाथने आश्चर्याने विचारले. "हा तर जावयाचा नोकर नाही न् आपलाही नाही! कोणीतरी वाटेवरचा वाटसरू असावा तो; अन् आपण मात्र त्याला वाजवीपेक्षा जास्त मान दिला!" असे म्हणत स्वतःच स्वतःवर रागवत आणि त्या भिकाऱ्याला तोंडभर शिव्या देत जगन्नाथाने धाडकन् दरवाजा लावून घेतला!





# ज्ञानाचा खजिना

## या महिन्याचे इतिहासप्रसिद्ध व्यक्तित्व



### शहाजहान

जहांगीरचा मुलगा शहाजादा खुर्रम याचा जन्म ५ जानेवारी १५९२ रोजी झाला. हा पुढे शहाजहान या नावाने दिल्लीचा पाचवा मोगल बादशहा बनला.

१६२७ मध्ये जेव्हा जहांगीर मृत्यु पावला तेव्हा शहाजहान दक्षिणेत होता. जहांगीरची बेगम नूरजहान हिची आपला धाकटा मुलगा शहरियार याला गादीवर बसवायची इच्छा होती. परंतु शहाजहानने राजधानीस पोचून आपला महापराक्रमी सासरा आसफखान याच्या मदतीने सिंहासन बळ-कावले. त्याने इतिहास प्रसिद्ध मयूर-सिंहासन बनवले; आग्र्याची जुम्मा मशीद आणि दिल्लीचा लालकिल्ला यांसारखी मोठमोठी स्मारके बांधली. परंतु त्याने बांधलेल्या इमारतींमधील सर्वात प्रमुख म्हणजे आपली राणी मुमताजबेगम हिच्या कबरीवर त्याने निर्मिलेला आग्र्याचा ताजमहल! १६५७ मध्ये शहाजहान आजारी पडला आणि त्याचे मुलगे दारा, शुजा, औरंगजेब व मुराद यांच्यात वारसा-हक्कासाठी युद्ध सुरू झाले. या युद्धात औरंगजेबचा जय झाला व तो १६५८ मध्ये गादीवर बसला. अखेर औरंगजेबच्या कैदेत १६६६ मध्ये शहाजहान मृत्यु पावला.

## तो कोण?

एका राजाने आपल्या सर्व मुलांना व पुतण्यांना एका देवळासमोर एकत्र जमायला सांगितले होते. आपल्यानंतर आपल्या गादीचा वारस होऊ शकणाऱ्या सर्व तरुणांना एकदा भेटायची त्याची इच्छा होती. सुयोग्य राजाची बरोबर निवड करण्यात सल्ला घेता येईल अशा विचाराने त्याने काही अनुभवी अधिकाऱ्यांनाही बरोबर घेतले.

"तुमच्यापैकी कोणाला आज सकाळी सर्वात उत्तम न्याहरी मिळाली? इथे येताना तुमच्यापैकी कोण सर्वात उत्तम वाहनातून आला? अन् कोणाला बसायला सर्वात उत्तम बैठक मिळाली?" राजगुरुने त्यांना सर्वांना उद्देशून विचारले.

खरोखरच त्यांच्यातले काही राजपुत्र उत्तम अशा रथात बसून आले होते, तर काही देखण्या घोड्यांवर विराजमान झालेले होते. काही जण नोकरांनी वाहून आणलेल्या रत्नजडित पालखीत वा दिवाणांवर बसलेले होते.

अनेक राजपुत्रांनी आपापली उत्तरे दिल्यानंतर त्यांच्यातला एक तरुण राजपुत्र उठून उभा राहिला व म्हणाला–"आज मलाच सर्वात उत्तम न्याहरी मिळाली, कारण ती माझ्या आईने मला बनवून दिली होती. मी सर्वात उत्तम वाहनाने–आपल्या पायांनी चालत–इथे आलो आणि सर्वात उत्तम आसनावर–जमिनीवर–मीच बसलो आहे."

या गोष्टीतील हे उत्तर देणारा तो बाणेदार मुलगा कोण?

.........पान आठवर पहा

# हस्तांतरण



**सूचना :**
एका सहा फूट लांबीच्या दोरीचे एक टोक एका खुर्चीच्या पाठीला बांधा आणि दुसरे टोक दुसऱ्या खुर्चीच्या पाठीला बांधा. नंतर दोन दोन फूट लांबीच्या दोन दोऱ्या घेऊन त्या या आडव्या दोरीला सारख्या अंतरावर बांधा. या लहान दोऱ्यांच्या दुसऱ्या टोकांना दोन सारखी वजने अशा बेताने बांधा की ती जमिनी पासून सारख्याच अंतरावर लोंबत राहतील. (चित्र पहा) इतके झाल्यावर एका वजनाला अशा प्रकारे झोका द्या की त्याचा दुसऱ्या न हलणाऱ्या वजनाला स्पर्श होणार नाही. पहा काय घडते.

### काय होते आणि का ?

काही सेकंदातच दुसरे वजनही हळूहळू झोके घेऊ लागलेले दिसेल. थोड्याच वेळाने पहिले वजन झोका घेण्याचे थांबेल. आणखी एकाद्या मिनिटाने दुसरे वजन थांबून पहिले वजन पुन्हा झोका घेऊ लागेल ! अशा प्रकारे एक वजन दुसऱ्याला गति देत अदलून बदलून अनेकदा झोके घेत राहील. थोड्या वेळाने झोका कमी कमी होत दोन्ही वजने आपोआप झोका घेणे थांबवतील !

आडव्या दोरीवर नीट लक्ष दिले तर आपल्या असे लक्षात येईल की झोके घेणाऱ्या वजनाच्या दाबामुळे ही दोरी हलते. असे झाले की या आडव्या दोरीच्या हलण्यामुळे दुसऱ्या वजनाच्या दोरीला ताण बसतो आणि पहिल्या वजनाचे काही झोके घेऊन होता होता दुसरे वजनही झोके घेऊ लागते. अशा तऱ्हेने थोड्याच वेळात दोन्ही वजने झोका घेऊ लागून आडव्या दोरीला विरुद्ध दिशेने खेचत रहातात. यामुळेच गतिचे हे हस्तांतरण अदलून बदलून झोके घेत सतत चालू रहाते.

आडवी दोरी अशा प्रकारे बाजूला हलू शकली नाही तर एका वजनाची गति दुसऱ्या वजनाकडे संक्रमित होऊ शकणार नाही, म्हणूनच एकादी काठी किंवा गज आडव्या दोरीऐवजी वापरला तर तो दोरीप्रमाणे हलू न शकल्याने एका वजनाच्या गतिचे हस्तांतरण दुसऱ्या वजनाकडे करू शकणार नाही. तुम्हाला काय वाटते, करू शकेल ? पहाच तर करून.





# ऱ्होड्स्चा प्रचण्ड पुतळा

ऱ्होड्स् बंदराच्या प्रवेशद्वाराशी सूर्य-देव अपोलोचा एक प्रचण्ड पुतळा उभा केला गेला होता. हा पुतळा काश्याचा बनवलेला होता. चार्ल्स नावाच्या एका दैवी व कल्पक शिल्पकाराने १२ वर्षे खपून तो पुतळा घडवला होता.

खात्रीपूर्वक सांगता येणार नाही; पण लोकांचा असा विश्वास होता की हा पुतळा आपले पाय फाकवून उभा असे. आणि जहाजे त्याच्या दोन पायांमधून इकडून तिकडे जा-ये करीत असत. मार्गदर्शनासाठी पुतळ्याच्या हातात एक कंदील पेटता ठेवलेला असे. इ. स. पू. तिसऱ्या शतकात भूकंपामुळे हा पुतळा उध्वस्त झाला.



भूतकाळातील महान् घटना



# ट्रॉयची लढाई

इ. स. पू. १२ व्या शतकात ग्रीक व ट्रोजन-किंवा ट्रॉयचे लोक-यांच्यात दीर्घ मुदतीचे एक युद्ध झाले. दहा वर्षेपर्यंत हे युद्ध चालू होते आणि ट्रॉय शहराचा पूर्ण विध्वंस करूनच ते थांबले!

त्याचे असे झाले–त्या काळात हेलन हीच सर्वांत सुन्दर स्त्री गणली जाई. तिने ग्रीसच्या स्पार्टा नावाच्या एका प्रांताचा राजा मिलेनस याच्याशी विवाह केला. नंतर ट्रॉयचा राजपुत्र पॅरिस याने तिला पळवून नेले. त्यामुळे सर्व ग्रीक नेते एकत्र आले व ते जहाजे घेऊन ट्रॉयच्या किनाऱ्यावर पोचले आणि ट्रॉयच्या राजधानीवर हल्ला केला. युद्धात जयाचे पारडे कधी ग्रीकांकडे तर कधी ट्रोजन लोकांकडे झुके. प्राचीन ग्रीसचा महाकवि होमर याने आपले महाकाव्य इलियड ('इलियन' लोकांसंबंधी-असा त्याचा अर्थ) मध्ये या लढाईचे वर्णन केले आहे.



शेवटी ग्रीक लोकांनी ट्रोजन लोकांविरुद्ध एक कारस्थान रचले. त्यांनी लाकडाचा एक प्रचण्ड घोडा बनवला. आणि त्यांच्या सैन्यातले अत्यंत पराक्रमी असे काही योद्धे त्या घोड्याच्या पोटात लपून बसले. हा घोडा इलियनच्या वेशीबाहेर उभा करून ग्रीक लोक तेथून निघून गेले–"आपल्या देशाकडे सुखरूप पोचण्यासाठी ग्रीक लोकांनी हा घोडा देवी अथेनाला अर्पण केला आहे." असा मजकूर त्यावर कोरलेला होता.

ग्रीक लोक जवळच्याच एका बेटापर्यंत मागे परतून तिथे थांबले. ट्रोजन लोकांना खरोखरीच असे वाटले की शत्रू परत गेला. त्यांनी तो घोडा ढकलून शहरात नेला व रात्री त्यांनी आपला विजयोत्सव साजरा करायला सुरुवात केली! बरोबर याच वेळी ग्रीक सैन्य परत आले. घोड्याच्या आत बसलेले योद्धे बाहेर पडले व त्यांनी वेशीचा दरवाजा उघडला; आणि सर्वांनी मिळून ट्रॉयचा विनाश केला. मिनेलसला हेलन परत मिळाली.

असे मानण्यात येते की ही लढाई खरोखरच झाली होती. एक जर्मन पुरातत्त्ववेत्ता हेन्रिच स्कलीमन याने होमरने वर्णन केलेले प्राचीन इलियन शहर शोधून काढले. त्याच्या शोधावरून असे कळून येते की एक अतिविकसित अशी संस्कृति तेथे अस्तित्वात होती.

## प्राचीन भारतात भटकन्ती



१. भारतातील कोणत्या दोन शहरांची नावे तेथील सरोवरांवरून पडलेली आहेत ?
   (अ) त्यांच्या पैकी कोणते शहर जुने आहे ?
   (ब) त्या सरोवराची व शहराची स्थापना कोणी केली ?
   (क) दुसरे शहर कोणी निर्मिले व केव्हा ?

२. एका भारतीय राज्याच्या राजधानीच्या मूळ नावाचा अर्थ आहे– "पवित्र शाश्वत नगरी." त्या शहराचे आधुनिक नाव कोणते ?
   (अ) मूळ नावाचा एक दुसरा ही अर्थ होतो. तो अर्थ कोणता ?
   (ब) किती टेकड्यांवर हे शहर बनविले गेले आहे ?
   (क) १९४७ पूर्वी हे शहर ज्या राज्याची राजधानी होते, त्या राज्याचे नाव काय ?

३. एका जमातीच्या नावाचा अर्थ आहे "डोंगरातील माणूस", आणि त्या जमातीवरूनच राज्याला ही ते नाव मिळाले. ते राज्य कोणते ?

४. १७ व्या शतकात दिल्लीचे एक तात्पुरते नाव होते. ते नाव कोणते ?

५. कोणते भारतीय शहर सन् १९८९ मध्ये आपला ३५० वा जन्म-दिन साजरा करणार आहे ?

## विज्ञान, आविष्कार आणि शोधांची दुनिया

१. अॅटलॅंटिस हे काय आहे व त्याचा उल्लेख कोणी केला आहे ?
२. एल्डोराडो कोठे आहे ?
   (अ) त्याचा अर्थ काय ?
   (ब) त्याला ते नाव का मिळाले ?
३. पॉलीथिनचे उत्पादन केव्हा आणि कोठे केले गेले ?
४. टेबल-टेनिसचा शोध कोणी लावला आणि केव्हां ?
५. काळ्या जिभेचा कुत्रा कोठे आहे का ?
६. हिरा अॅसिड मध्ये विरघळू शकतो का ?
७. हिऱ्याचा नाश काय केल्याने होऊ शकतो ?
८. पृथ्वीचा किती भाग पाण्याने आच्छादित आहे ?

पृष्ठ ८ पहा......





## साहित्य सोनियाचिया खाणी

१. प्रचलित भारतीय परंपरेतील तीन महान् विनोदी पुरुष कोणते ?
   (अ) ते देशाच्या कोणत्या भागांतील होते ?
   (ब) परंपरेनुसार त्यांचे आश्रयदाते कोण कोण होते ?
   (क) त्यांच्यापैकी कोण राज-घराण्याशी संबंधित होता ?
२. दक्षिण भारतातील कोणत्या ग्रंथाला पाचवा वेद म्हणतात ?
   (अ) त्याचा लेखक कोण ?
   (ब) त्या पुस्तकाची भाषा कोणती ?
   (क) त्या लेखकाचे वास्तव्य कोठे होते आणि केव्हां ?
३. राजा दशरथाचा जावई असणारा ऋषि कोणता ?
   (अ) त्याच्या बायकोचे नाव काय ?
   (ब) त्याची विशेषता काय होती ?
४. नारदाच्या वीणेचे नाव काय ?

........पान आठवर पहा

### सर्व भारतीय भाषांचा एक शब्द शिकू या !

**आसामी :** रातिपुवा ; **बंगाली :** सकाल ; **इंग्रजी :** मॉर्निंग ; **गुजराती :** सावर ;
**हिन्दी :** सवेरा ; **कानडी :** मुंजाने ; **काश्मीरी :** सुबह् ; **मल्याळी :** राविले ;
**मराठी :** सकाळ ; **उडिया :** सकाला ; **पंजाबी :** सवेरा ; **संस्कृत :** प्रभात ;
**सिंधी :** सुबुह् ; **तमिल :** काले ; **तेलुगु :** पगलु ; **उर्दू :** सुबह.

## तुम्ही विश्वास ठेवाल ?

* कि कॅन्सर कधी बरा होत नाही.
* कि सर्व प्रकारचा बर्फ वितळू शकतो.
* कि इन्द्रधनुष्य संपूर्ण वर्तुळाकार कधी ही दिसू शकत नाही.

**अंहं, मुळीच नाही !**

* केवळ अमेरिकेत (यु.एस.ए.) १.५ मिलियन कॅन्सरचे रोगी बरे झाले आहेत. आता त्यांच्यात कॅन्सरची मुळीच लक्षणे नाहीत.
* 'सुका बर्फ' वितळत नाही. त्याचे वायूत रूपान्तर होते.
* दिसू शकेल, विमानातून.

# उत्तरावली

### तो कोण ?

सम्राट अशोक.

### इतिहास

१. भोपाळ आणि अमृतसर. 'भोज पाल' सरोवरावरून पडले. अमृतसर त्याच नावाच्या सरोवरावरून.
(अ) भोपाळ, ११ व्या शतकात उल्लेख सापडतात.
(ब) राजा भोज.
(क) चौथा शीख गुरु, रामदास.
२. त्रिवेन्द्रम. मूळचे नाव आहे तिरु-अनन्त-पुरम्.
(अ) अनन्त नावाच्या पवित्र सर्पाचे शहर.
(ब) सात टेकड्या.
(क) त्रावणकोर.
३. मिझोराम. 'मि' म्हणजे मनुष्य, 'झो' म्हणजे टेकडी वा डोंगर.
४. शहाजहानाबाद. शहाजहानने सन १६४८ मध्ये हे नाव दिले. ते फार दिवस टिकून राहिले नाही.
५. मद्रास.

### विज्ञान

१. एक काल्पनिक बेट- जिब्राल्टरच्या पलीकडे ते होते असे म्हणतात. प्लेटोने त्याचा उल्लेख केलेला आहे.
२. लोकांचा विश्वास आहे की दक्षिण अमेरिके पलीकडे कोठे तरी ही सुख-समृद्धिपूर्ण भूमि आहे.
(अ) याचा अर्थ 'श्रीमंत माणूस'.
(ब) असे समजले जाते की एल्डोराडोचा राजा सुवर्ण-कणात स्नान करीत असे.
३. सन १९३३ मध्ये, नॉर्थविच चेशायर या ठिकाणी.
४. सन १८८८वा १८७९ मध्ये इंग्लंडच्या जेम्स गिबने. एका व्यापारी मंडळीने सन १८९८ मध्ये त्याचे संच बनविले.
५. अन्य सर्व कुत्र्यांच्या जिभा गुलाबी असतात, फक्त चाऊ जातीच्या कुत्र्यांची जीभ काळी असते.
६. नाही.
७. फक्त अत्यंत प्रखर उष्णता करू शकेल.
८. सुमारे शेकडा ७०.

### साहित्य

१. तेनाली राम, बिरबल, गोपाल भांड.
(अ) क्रमशः आंध्र प्रदेश, राजपुताना, बंगाल.
(ब) कृष्णदेवराजा, अकबर आणि राजा कृष्णचन्द्र.
(क) बिरबल. तो राजपूत सरदार होता. अकबराने त्याला राजा ही पदवी बहाल केली.

२. तिरुक्कुरळ.
(अ) तिरुवल्लुवर.
(ब) तमिळ.
(क) सुमारे २ हजार वर्षांपूर्वी मैलापुर येथे. (मैलापुर आजच्या मद्रासचा एक भाग आहे.)

३. ऋष्यशृंग.
(अ) राजकुमारी शान्ता.
(ब) तो पर्जन्याला आमंत्रण देत असे.
४. कच्छपि.





महाकाव्य कथा :

## जडावाचे नूपुर- ३

पुम्पुहार नगरीतील युवक व्यापारी कोवलनने कण्णगीशी विवाह केला. परंतु लग्नानंतर थोड्याच दिवसात कण्णगीला सोडून नर्तकी माधवीच्या प्रेम-पाशात अडकला. तरी पण कण्णगी सर्व दुःख शांतपणे सहन करीत राहिली.

एकदा पुम्पुहार नगरीत एक उत्सव साजरा केला गेला. कोवलन आणि माधवी शहरातील रस्त्यांवरून जाणारी मिरवणूक बराच वेळ पहात राहिले. नंतर त्यांनी या उत्सवातील मनोरंजनाच्या कार्यक्रमात भाग घेण्याचा विचार केला.





कोवलन घोडयावर व माधवी बैलगाडीत बसून निघाले. त्यांचे सेवक मागे पायी चालू लागले. शहरातील सर्व मार्ग ओलांडून ते उत्सवाच्या प्रमुख मंडपापाशी आले.



समुद्र किनाऱ्यावर एक सुंदर एकान्त स्थान निवडून सेवकांनी एक सुरेख निवास-स्थान बनविले. चारी बाजूंना सुंदर रंगी-बेरंगी पडदे लावले व कोवलन विश्रांती साठी मऊ मऊ गाद्या घातल्या. यानंतर माधवी आपल्या कोकिळ-कंठातून सुस्वर गाणे गाऊं लागली.

का कोणास ठाऊक आज कोवलनला माधवीच्या गीतात श्लेषार्थांचा भास झाला. खरं म्हणजे माधवीचं कोवलन-च्या शिवाय दुसऱ्या कोणावर प्रेम नव्हतं. पण कोवनला वाटलं माधवी अन्य कोणा व्यक्तीचे स्मरण करून गीत गात आहे. तो ताबडतोब उठून बाहेर गेला.





कोवलन आपणास सोडून गेल्याची वार्ता थोड्याच वेळात माधवीला समजली. अत्यन्त दुःखी अंतःकरणाने ती आपल्या घरी गेली आणि रडू लागली. आपल्या एका सखीच्या हस्ते कोवलनकडे तिने एक पत्र लिहून पाठविले.

सखी कोवलन कडे गेली नि माधवीचे पत्र व तिने दिलेली पुष्पमाला त्याच्या हाती देऊ लागली. पण कोवलनने ते स्वीकार करण्यास नकार दिला. कोवलनचे मन आपली पत्नी कण्णगीच्या स्मृतीने भरून आले. त्याला अत्यन्त दुःख झाले नि तसा चिंतातुर अवस्थेत तो घरी जायला निघाला.





घरी परत आलेल्या आपल्या पतीचे कण्णगीने अश्रूंनी स्वागत केले. कोवल-नला आपण जे काही केले त्याचा पश्चात्ताप झाला. त्याने कण्णगीची क्षमा मागितली.

ज्या नगरीत अत्यन्त वैभवपूर्ण जीवन कोवलने घालविले होते, तेथे दरिद्रा-वस्थेत दिवस घालविण्याची त्याची इच्छा नव्हती. म्हणून त्याने अन्यत्र कोठे तरी जाऊन नवे जीवन जगण्याचा निश्चय केला. एखादा व्यापार करायचा म्हटलं तर जवळ भांडवल नव्हतं. कण्णगीने आपले मूल्यवान नूपुर कोवलनला आणून दाखविले.





पायात घालण्याचे ते नूपुर पाहून कोवलनला खूप आनन्द झाला. तो कण्णगीला म्हणाला-"सकाळ उजडण्या पूर्वीच आपण प्राचीन नगरी मदुरेकडे वाटचाल करू लागू. तेथे पोचल्यावर तुझ्या पायातील हे नूपुर विकून जे पैसे येतील त्यातून एक नवा व्यापार सुरू करू आणि आपले नवे जीवन सुरू होईल. येथून पुढे आयुष्यात मी अशी चूक कधी करणार नाही."

त्या सुसंपन्न पुम्पुहार नगरीत जन्म घेऊन लहानाचे मोठे झाले, ती नगरी व तेथील आपले घर सोडून नवरा-बायको मदुरे कडे जाण्यास निघाले.






मदुरा शहर अजून खूप दूर होतं. ते दिवसा प्रवास करीत आणि रात्र एकाद्या देवळात किंवा धर्मशाळेत घालवीत. जंगलं, डोंगर व नद्या पार करीत करीत कण्णगी व कोवलन मदुरेच्या दिशेने प्रवास करीत राहिले

(शेष भाग पुढील अंकात)



# श्रमाचे मोल

गंगापुरच्या जमीनदाराच्या कचेरीत एक सोनार काम करीत असे. त्याचे नाव वेंकटाचारी. त्याचे पूर्वज वर्षानुवर्षे गंगापुरच्या जमीनदारांसाठी दागिने व अन्य आवश्यक वस्तु बनवून देत व सुखाने आपले दिवस घालवीत. जमीनदाराने त्यांना राहण्यासाठी एक घर व थोडी जमीन ही दिली होती.

वेंकटाचारीला एक मुलगा होता. त्याचं नाव वरदाचारी. तो एक नंबरचा आळशी होता. श्रम करणे त्याला आवडत नसे. आपण जिवंत असतानाच आपल्या मुलाने कुशल कारागीर व्हावे यासाठी वेंकटाचारी प्रयत्न करीत असे. पण त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेले. वरदाचारी कच्चाच राहिला.

वेंकटाचारी मरण पावला, तेव्हा वरदाचारी पंधरा वर्षांचा किशोर होता. त्याने आपला वंशपरंपरागत व्यवसाय एकदम सोडून दिला. वडिलांनी ठेवलेल्या संपत्ति वर तो चैन करू लागला.

एकदा वरदाचारीला जमीनदारांकडून बोलवणे आले. जमीनदार काही दागिने बनविण्याचे काम त्याला सांगणार होते. वरदाचारी तेथे गेला, पण काहीं तरी सबब सांगून घरी परत आला.

हे सर्व समजल्यावर वरदाचारीच्या आईला फार वाईट वाटले. ती म्हणाली– "बेटा, जमीनदाराच्या कचेरीतील काम म्हणजे परमेश्वराचं वरदान. जमीनदांनी देऊ केलेलं काम खरं म्हणजे तू स्वीकारायला पाहिजे होतंस!"

वरदाचारीने उत्तर दिले– "पण आई, मला तर दागिने घडवण्याचं काम नीट येत नाही हे तुला माहीतच आहे. अशा स्थितीत ते काम आपल्या अंगावर घेऊन मी कसं बरं पार पाडू शकेन?"

रत्ना बाई



"हे बघ, ज्यांना हे काम करता येतं, त्यांच्याकडून नाही का करवून घेता येणार? जमीनदाराकडून जी मजुरी मिळेल, त्याचा काही भाग कलाकारांना देऊन बाकीचा तुला राहिला नसता का?" आईने सल्ला दिला.

वरदाचारी लगेच जमीनदाच्या कचेरीत गेला. जमीनदाराला भेटून त्याने सांगितलं की तो दागिने बनवून देईल. कशा प्रकारचे दागिने बनवायचे आहेत ते जमीनदाराने वरदाचारीला समजून सांगितलं. आणि विचारले–"आता सांग, या दागिन्यांसाठी किती सोनं नि रत्नं तुला पाहिजेत?"

आपल्याला दागिने बनविता येत नाहीत हे जमीनदारा पुढे प्रगट करणं वरदाचारीला इष्ट वाटले नाही. थोडा विचार करून तो म्हणाला–"प्रभु, उद्या सकाळी येऊन आपल्याला सर्व माहिती देतो." असं म्हणून दागिन्यांचं वर्णन एका कागदावर लिहून घरी आला.

नंतर वरदाचारी आपल्या वडिलांच्या एका घनिष्ट सुवर्णकार मित्राकडे गेला आणि जमीनदाराच्या दागिन्यांसाठी आवश्यक सोनं व रत्नं यांची माहिती मिळविली. वरदाचारीत एकदम हा बदल झालेला पाहून मित्राला मोठं आश्चर्य वाटलं आणि खूप आनन्द ही झाला.

जमीनदाराने कचेरीतून आवश्यक सोनं आणि रत्नं वरदाचारीला देवविले. ते सोनं नि रत्नं घेऊन वरदाचारी आपल्या वडिलांच्या एका विश्वासू मित्राकडे गेला आणि दागिने तयार करण्याचे काम सुरू झाले.

जमीनदाराने काही आगाऊ मजुरी दिलेली नव्हती. त्यामुळे वरदाचारीला स्वतःच्या पैशातून मजुरी द्यावी लागली. वरदाचारीला स्वतः दागिने बनविता येत नाहीत हे जेव्हां कारागीरांना समजलं तेव्हां ते चार दिवसांचं काम सात दिवस पर्यंत करीत राहिले. यामुळे वरदाचारीला दुप्पट मजुरी मोजावी लागली.



दागिने तर तयार झाले, पण सोनं थोडं कमी पडलं. हे सोनं जमीनदाराला मागणं योग्य नव्हतं. पदरचे पैसे खर्च करून वरदाचारीने दागिने बनविण्याचे काम पूर्ण केले.

आता वरदाचारी तयार दागिने घेऊन जमीनदाराकडे गेला. जमीनदाराने दागिने बनविण्यातील कौशल्याची तोंड भरून तारीफ केली आणि मजुरी म्हणून दहा मुद्रा वरदाचारीला दिल्या.

त्या मुद्रा पाहून वरदाचारीला आश्चर्य वाटलं. मजुरी आणि कमी पडलेलं सोनं या सर्वांसाठी त्याने जवळ जवळ शंभर मुद्रा खर्च केलेल्या होत्या. आणि जमीनदाराने केवळ दहाच मुद्रा त्याला दिल्या!

जमीनदाराने वरदाचारी कडे अमळ निरखून पाहिलं आणि म्हणाला–"असल्या कामासाठी तुझ्या वडिलांना आजपर्यंत मी आठच मुद्रा देत आलो आहे. पण तुझी कारागिरी मला फार आवडली म्हणून तुला दोन मुद्रा जास्तीच दिल्या आहेत."

जमीनदाराने वरदाचारीला पुन्हा काही दागिने बनवायचे काम दिले. वरदाचारी घरी आला आणि आईला सर्व वृत्तान्त कथन केला. त्यावेळीं त्याच्या डोळ्यांत अश्रू आले. आईने सर्व-शान्तपणे ऐकले.

वरदाचारीचे सान्त्वन करीत आईने उपदेश दिला–"बेटा, आपल्या वडिलांकडून थोडेसे काम तर तू शिकलासच आहेस. आता हे कारागीर जेव्हा दागिने घडवतात,



त्यांचे हस्तकौशल्य तू पहातच आहेस. स्वत: थोडी मेहनत करून हे दागिने तू कां नाही तयार करीत? त्या सोनारांना जी मजुरी द्यायची ती नाही का वाचायची?"

वरदाचारीला आईचा सल्ला पटला. तो रात्रं दिवस परिश्रम करून दागिने घडविण्याचे काम करू लागला. जमीनदाराने जे सोनं दिलं होतं, त्यांतलं एक रत्ती भर सुद्धा कमी झालं नाही. दागिने पण पहिल्या पेक्षा अधिक चांगले नि सुंदर बनले. दागिने पाहून वरदाचारीच्या आईला खूप आनन्द झाला. तिने त्याला आशीर्वाद दिला—"बेटा, तू लवकरच एक कुशल कारागीर होशील यात शंका नाही!"

आता वरदाचारी दागिने घेऊन जमीनदाराच्या घरीं गेला. त्याची कारागिरी पाहून जमीनदार खुष झाला आणि त्याने त्याला दोन मुद्रा दिल्या.

यावर वरदाचारीला अत्यन्त राग आला. तो जमीनदाराला म्हणाला—"मालक, आपण श्रमाचे मूल्य जाणत नाही. जर असंच काम मी अन्यत्र कोठे केलं असतं तर छान आरामात जीवन जगता आलं असत. आता आपण मला आज्ञा द्यावी हे बरं!"

जमीनदार मोठ-मोठ्याने हसत म्हणाला—"तर याचा अर्थ असा की तू हे दागिने स्वत:च्या हाताने बनविले आहेस!"

वरदाचारी आश्चर्याने जमीनदाराकडे पहातच राहिला. त्याच्या खांद्यावर हात ठेवीत जमीनदार म्हणाला—"आज पर्यंत मी तुला दिलेली मजुरी तुला कधी कमी वाटली नाही. तुझे स्वत:चे थोडे पैसे खर्च झाले असतील जरूर, पण तुझ्या श्रमाचे मोल तुला मिळालें, त्यात तुझे नुकसान झाले नाही. आता तुला श्रमाचं खरं मोल समजलं! ते तुला समजावं एवढीच माझी इच्छा होती. आज तुझ्या वडिलांची इच्छा पूर्ण झाली. आजपासून तू माझ्या कचेरीचा प्रमुख स्वर्णकार आहेस."

जमीनदाराने वरदाचारीला एक हजार मुद्रा दिल्या आणि त्याचा सत्कार करून त्याला रवाना केले.






बलराम जो पोशाख करून गोकुळात गेला होता, त्याच पोशाखात तो मथुरेला परत आला आणि सरळ कृष्णाच्या घरी गेला. बलरामाला नमस्कार करून कृष्णाने त्याचे स्वागत केलें आणि दोघे भाऊ मिळून नंतर वसुदेवाच्या घरी गेले. वसुदेवाने बलरामाला आलिंगन देऊन त्याचे कुशल विचारले. बलरामाने गोकुळात जे महान् कार्य केले होते त्याचा वृत्तान्त वसुदेवाला सांगितला. वसुदेवाला तो वृत्तान्त ऐकून अत्यंत आनंद झाला. केलेल्या कार्याबद्दल वसुदेवाने बलरामाचे मन:पूर्वक अभिनन्दन केले. ते सर्व ऐकून बलरामाचा आनंद ही गगनात मावेना. त्याने आदरपूर्वक वसुदेवाचा आशीर्वाद ग्रहण केला.

एके दिवशी बलराम एका जागी बसला होता. त्याने कालिन्दीला हाक मारून तिला आज्ञा केली की "मी बसलो आहे, तिथपर्यंत येऊन मला स्नान घडव." परन्तु कालिन्दीने त्याची आज्ञा मानली नाही. याबद्दल रागावून बलरामाने आपल्या नांगराचा फाळ लांब करून तो कालिन्दीपासून लांबवर ओढत नेला. अशा प्रकारे वृन्दावनापर्यंत कालिन्दीचा एक कालवा तयार झाला आणि त्यामुळे गोपालांवर मोठाच उपकार घडला. कालिंदीच्या या कालव्यामुळे आसपासच्या लोकांची पाण्याची मोठी सोय झाली. आतां त्यांना पाण्यासाठी अधिक दूर जाण्याची आवश्यकता राहिली नाहीं, त्यांच्या बागेंतील वृक्ष-वल्ली अधिक



हिरण्यागार दिसू लागल्या. काही दिवस गेले, आणि एके दिवशी कृष्णाने यादवांच्या सभेत एक प्रस्ताव मांडला–

"हल्ली आपण राहतो त्या मथुरा नगरी इतकी सुन्दर नगरी अख्ख्या दुनियेत कुठे नाही. आमचं पालनपोषण गोकुळात झालं हे खरंच, पण आमचा जन्म तर इथेच झाला न? आम्ही पुन्हा इथे परत येऊन सर्व प्रकारचे वैभव प्राप्त करून घेतले. परंतु इथे शत्रूचे भय दिवसेंदिवस वाढतच आहे. जरासन्धाशी हातमिळवणी करून पृथ्वीवरच्या सर्व राजांनी कसा अत्याचार केला हे आपण सर्वांनी पाहिलेच आहे. आणि तो धोका अजून कायमच आहे. आपल्याजवळ मानवबळ आहे; हत्ती, घोडे, रथ वगैरे सर्व काही आहे. पण उपयोग काय? शत्रु आपल्यावर जेव्हा अचानक हल्ला करतो तेव्हा आपलं नुकसान होतंच, आणि नेमकी हीच गोष्ट असह्य आहे. त्यापेक्षा, मला वाटतं, आपणच इथून निघून दुसरीकडे कुठे रहायला गेलो तर बरं होईल; मथुरेचं नुकसान टळेल. मी आपल्या राहण्यासाठी दुसरा एखादा प्रदेश निवडीन, अन् तिथे जाऊन आपण सुखाने कालक्रमण करू. मग आपल्याला शत्रूपासून वारंवार होणारा त्रास होणार नाही. आपण अन्य काही कामे सुखानं करू शकू. युद्धात निष्कारण आपली शक्ती व्यय करण्यात काय अर्थ आहे?"

कृष्णाचा हा प्रस्ताव यादवांना बरोबर वाटला. जरासन्धाचा वध करणे अशक्य आहे; त्याच्याजवळ अपार सैन्यबळ आहे. त्याच्याशी आपण युद्ध करू शकू, परंतु त्या युद्धाचा कधीच शेवट होणार नाही. इतकंच होईल की दोन्हीं पक्षांचा सर्वनाश होईल. तेव्हा यादव-नेत्यांनी विचार केला कि, कृष्ण जर एकादं सुरक्षित असं स्थान दाखवत असेल तर तिथेच जाऊन रहाणं उत्तम!"

कृष्णाने सर्वांना एका विशिष्ट ठिकाणी घेऊन जाण्याचा निश्चय केला अन् सर्वांना



प्रवासाची तयारी करण्याबद्दल सूचना दिली.

'याच वेळी बातमी आली की, कालयवन मोठी सेना घेऊन मथुरेवर चालून येत आहे आणि जरासन्धही त्याच विचारात आहे. ही बातमी मिळताच कृष्णाने यादवांना सांगितले–"आपण आजच इथून प्रस्थान करू. आजचाच दिवस शुभप्रद आहे. आपण आणखी येथे थांबलो की शत्रूचे सैन्य पुन्हा येथे येणार नि आपणास युद्धास तयार व्हावें लागणार. युद्ध म्हणजे नाश!"

वसुदेव, उग्रसेन, कृष्ण-बलराम, त्यांचे वृष्णि व अंधक वीर, आपले परिवार, असंख्य हत्ती, घोडे, रथ व आपली संपत्ति घेऊन मथुरा सोडून पश्चिम दिशेकडे निघाले. अनेक दिवस प्रवास करून ते सर्वजण पश्चिम-समुद्राच्या किनाऱ्यावर येऊन पोचले. अनेक वनांनी युक्त असा तो रेताड प्रदेश होता. याच प्रदेशात प्राचीन काळी एकलव्याने द्रोणाचार्यांची पूजा केली होती.

स्थान निश्चित करून इथे घरे बांधली गेली, बगीचे लावले गेले, पाण्याची व्यवस्था केली गेली अन् खूप विचारपूर्वक एक नगर निर्माण करून तिचे नाव 'द्वारावती' किंवा 'द्वारका' असे ठेवले गेले. सर्व लोकांना रहाण्यासाठी उत्तम घरांची व्यवस्था झाली. यादव शत्रुभयातून मुक्त



झाले आणि ते निश्चिन्त होऊन सुखपूर्वक काळ घालवू लागले. परंतु द्वारकेच्या निर्मितीपूर्वीच एक मोठी घटना घडून गेली होती, तिची गोष्ट अशी :–

एके काळी वृष्णि व अंधक घराण्यांचा गर्ग नावाचा एक गुरु होता. त्याने आजीवन ब्रह्मचर्यव्रत स्वीकारले होते. एकदा गर्ग यादवांकडे गेला असताना कोणी तरी त्याचा उपहास करून म्हटले, 'गर्ग पुरुष नसून स्त्री आहे.' हे चिडवणे ऐकून ही असे बोलणाऱ्याला कोणत्याही प्रकारे विरोध न करता यादव गप्पच राहिले.

या गोष्टीचा गर्गाला अतिशय राग आला आणि त्याने जंगलात जाऊन बारा



वर्षे लोहचूर्ण खाऊन घोर तपस्या केली आणि साक्षात् शिवाला प्रसन्न करून घेतले. त्याने शिवाकडून 'वृष्णि व अंधक कुलांना निर्वंश करील असा पुत्र आपणाला व्हावा' असा वर मागून घेतला. ही वार्ता कळताच पुत्रहीन यवनेश्वर त्याला बोलावून घेऊन गेला व त्याने आपल्या गायींच्या खिल्लारांच्या मधे त्याची रहाण्याची व्यवस्था केली

अशा प्रकारे गर्ग गायींच्या खिल्लारात आरामात दिवस घालवीत असता, एकदा एक अप्सरा गोपिकेच्या रूपात त्याच्याकडे आली. ईश्वराच्या आज्ञेप्रमाणे ही गोपिका गर्भवती झाली आणि तिने कालयवनाला जन्म दिला. या मुलाला यवनराजाने आपलाच मुलगा मानून मोठा केला. कालयवन अत्यन्त तेजस्वी आणि पराक्रमी निपजला. तो कुणाचीही पर्वा करीत नसे.

एकदा नारद यवनराजाकडे आला असता कालयवनाने त्याला विचारले– "जगातील सर्वात महान् वीर कोण ?"

"आजकाल यादवांशिवाय महान् वीर जगात दुसरा कोणी नाही." असे उत्तर देऊन नारदाने यादवांची खूप स्तुति केली. नारदाचे बोलणे ऐकून कालयवनाच्या मनांत यादवांबद्दल अत्यंत ईर्ष्या उत्पन्न झाली. शकवंशी राजे व हिमालयात वास करणारे दस्यु त्याच्या इशाऱ्याप्रमाणे नाचत असत. म्हणून त्याने त्या सर्वांना एकत्र करून सैन्य बनवले. नंतर असंख्य हत्ती, घोडे व गाढवे बरोबर घेऊन कालयवन मथुरेवर हल्ला करायला निघाला.

हा वृत्तान्त नारदाच्याच तोंडून ऐकून कृष्णाने तत्कालीन स्थितीचा गंभीर विचार करून मथुरा सोडून जाण्याचा निर्णय घेतला. हा निर्णय अंमलात आणायची सूचना त्याने यादवांना दिली.

याबरोबरच कृष्णाने आणखीही एक काम केले. त्याने एका भांड्यात काळसर्प ठेवला व भांड्याचे तोंड कपड्याने बांधून ते भांडे त्याने एक दूताकरवी कालयवना-



कडे पाठवले व बरोबर संदेश दिला– "कृष्णाचा पराक्रम या भांड्यात ठेवलेल्या कालसर्पासारखा आहे."

संदेश ऐकून कालयवनाने ताबडतोब काहीही उत्तर दिले नाही. उलट त्याने कालसर्पवाल्या त्या भांड्यात काही मुंगळे सोडले व त्यावर पुन्हा कपडा बांधून ते भांडे कृष्णाकडे परत पाठवले. त्या मागे कालयवनाचा असा आदेश होता की– "तू कितीही बलवान असलास तरी अनेक लोकांच्या मधे तू एकटा सापडलास की तुझे बळ निरर्थक होईल." हा आदेश समजून घेऊनच कृष्ण यादवांना घेऊन मथुरा सोडून निघून गेला. नंतर निःशस्त्र होऊन तो एकटाच द्वारकेहून आपल्या शत्रूच्या नगरात गेला. तेथे सर्वांनी कृष्णाला ओळखले व एकदम ओरडाओरडा केला–"कृष्णाला पकडा; धरा त्याला चांगला!" या अवधीत कालयवनालाही कृष्णाच्या आगमनाची खबर मिळाली अन् तोही कोणतेही आयुध न घेता पायी चालतच कृष्णापर्यंत पोचला. परन्तु कृष्णाने आपला हात लांबवून झटक्यात त्याला ओढले व त्याने पटकन एका गुहेत प्रवेश केला. त्या गुहेत मुचकुन्द नावाचा माणूस झोपलेला होता. खरे म्हणजे मुचकुन्द हा मांधाताचा पुत्र. देव आणि असुर यांच्या



युद्धात मुचकुन्दाने बराच काळपर्यन्त लढून देवांना विजय मिळवून दिला. नंतर श्रमपरिहारासाठी त्याने झोप घ्यायचे ठरवले. परंतु झोपण्यापूर्वी त्याने एक वर मिळवला–'जो त्याची झोपमोड करील त्याला मुचकुंद आपल्या दृष्टीनेच भस्म करून टाकील.' ही गोष्ट कृष्णाला माहीत होती.

गुहेत प्रवेश केल्याबरोबर कृष्ण मुचकुन्दाच्या उशाकडे लपून राहिला. कालयवन कृष्णाच्या मागे गुहेत शिरला व त्याने झोपलेल्या मुचकुन्दाला पाहिल. त्यालाच कृष्ण समजून कालयवनाने लाथ मारली आणि उपहासाने म्हणाला–"ऊठ, दाखव



मुचकुन्दाने कृष्णाला पाहून विचारले–"महाराज, आपणं कोण आहात? कोणत्या कार्यासाठी आपण इथे येणं केलं? माझी झोपमोड करणारी व्यक्ती कोण? मी इथे केव्हापासून झोपलेला आहे? आपणाला काही माहिती असेल तर सांगण्याची कृपा करावी."

कृष्ण म्हणाला–"चंद्राशीच ज्याची तुलना होऊ शकेल अशा नहुष राजाचा पुत्र होता ययाति. ययातिला पाच पुत्र होते. त्यातल्या ज्येष्ठ पुत्र यदुला झालेल्या पुत्रांपैकी एक वसुदेव. त्या वसुदेवाच्या देवकी नामक पत्नीपासून माझा जन्म झाला. त्यांच्याच दुसऱ्या पत्नीपासून-रोहिणीपासून बलरामाचा जन्म झाला. मी बलरामाचा धाकटा भाऊ. मला वासुदेव म्हणतात. आपल्या क्रोधाग्नीत भस्मसात झाला, त्याचे नाव कालयवन. तो वरदानामुळे जन्मला आणि इतर कोणत्याही रूपात त्याचा मृत्यु अशक्य होता. तो माझा शत्रु होता. मी ऐकलं होतं की आपला जन्म त्रेतायुगात झाला आणि आता कलियुग समीप येत आहे."

मुचकुन्दाने गुहेतून बाहेर येताना पुन्हा राज्य करण्याचा विचार केला होता. परंतु पृथ्वीवर रहाणाऱ्या माणसांची दुर्बुद्धि, अल्पायुष्य आणि दु:साहस वगैरे पाहून राज्य करण्याचा त्याचा विचार नाहीसा होत

तुझा पराक्रम काय तो! असा निजून राहून आपलं मरण टाळू पहातोस काय?"

अशा प्रकारे निद्राभंग झाल्याबरोबर मुचकुन्द उठून बसला व त्याने कालयवनाकडे क्रोधाने पाहिले मात्र! दुसऱ्याच क्षणी वज्रपात झालेल्या वृक्षाप्रमाणे कालयवनाची जळून राख झाली!

कृष्ण यानंतर मुचकुन्दासमोर आला व म्हणाला–"महाराज, नारदाकडून मला कळले की आपण इथे झोपलेले आहात. आपणामुळे माझे कार्य साध्य झाले; मी संतुष्ट आहे. आता आपण मला इथून जायची परवानगी द्यावी."

गेला आणि तपस्या करण्याचा विचार करून तो हिमालयात निघून गेला.

आपला मुख्य शत्रू अशा तऱ्हेने नाहीसा झाल्यावर कृष्णाने कालयवनाच्या सैन्यातील काही प्रमुख वीरांचा आपल्या दिव्य अशा अस्त्रांनी विनासायास संहार केला आणि बाकीची सेना आपल्या ताब्यात घेतली. नंतर शीघ्रगतीने जाऊन तो पुन्हा आपल्या वंशवाल्या यादवांना मिळाला.

या घटने नंतरच द्वारावती निर्माण केली गेली.

द्वारावतीच्या निर्मितीसाठी विश्वकर्म्याचे सहाय्य मिळवण्याचे ठरवून कृष्णाने त्याचे स्मरण केल्यावरोबर त्याच्या समोर प्रकट होऊन विश्वकर्म्याने विचारले—"आपण माझे स्मरण कोणत्या हेतूने केले? माझ्याकडून आपल्याला काय काम करून घ्यायचे आहे?"

"स्वर्गात इन्द्राची अमरावती जशी श्रेष्ठ आहे तशीच पृथ्वीवर एक नगरी मला तू बनवून दे." कृष्ण उत्तरला.

"या सर्व लोकांना वसण्यालायक नगर बनवायचं असेल तर ही इतकीच भूमि पुरेशी होणार नाही. समुद्र जर थोडा मागे हटला तर इथे एक सुन्दर नगरी निर्माण करता येईल." विश्वकर्मा म्हणाला.

यावर कृष्णाने समुद्राची प्रार्थना केली, आणि समुद्र प्रत्यक्ष त्याच्या समोर आला; आणि चारी बाजूंना बारा योजने इतकी भूमि सोडून तो मागे हटला. यानंतर विश्वकर्म्याने त्या स्थानावर एक दिव्य नगरी निर्माण केली. सोनेरी किल्ले, गगनचुंबी रत्नजडित गोपुरे, उंच उंच महालांच्या ओळी, अत्यंत अद्भुत अशा विशाल इमारती, सुन्दर राजपथ, चैत्य-सभा-भवन, विशाल मण्डप, तोरणे, बुरुज, विहिरी, सरोवरे त्या जागी अवतरित झाली. यानंतर राजमहालात कृष्ण एका उच्चासनावर विराजमान झाला. सर्व प्रमुख यादवांची सभा बोलवून त्यात कृष्णाने विश्वकर्म्याचा समुचित सत्कार केला आणि त्याला पुन्हा इंद्रलोकात पाठवून दिले.





# वनदेवीचा इशारा

एका गावात चमटक नावाचा एक व्यापारी रहात असे. एकदा त्याला व्यापारात खूप नुकसान आले, त्याची सर्व संपत्ति नष्ट झाली नि तो भिकारी बनला.

आता त्याला आपल्या गावात राहणे अपमानजनक वाटू लागले. म्हणून तो आपली बायको व मुलांना घेऊन दुसऱ्या गावी जायला निघाला. रस्त्यात त्याला एक साधु भेटला. साधु त्याला म्हणाला—"तुझं नाव चमटक न? कोणे एके काळी तुझी सांपत्तिक स्थिति चांगली होती, तेव्हा तू श्रद्धापूर्वक भक्तिभावाने साधु-संतांचा सत्कार करीत होतास. आताची तुझी स्थिति पाहून वाटतय तुझ्यावर काही संकट आलंय. सांग बरं, काय झालं?"

चमटकने साधुला आपल्या दुर्भाग्याची कहाणी ऐकवली. साधूने चमटकला उपदेश केला—"तुझ्या सारख्या चांगल्या माणसावर खरं म्हणजे अशी आपत्ति न यावी. तू आता पर्यंत स्वतः मेहनत केली नाहीस, दुसऱ्यांच्या परिश्रमांवर तू सुख मिळवलेस! काही दिवस स्वतः शारीरिक श्रम करून जीवन जग. पुन्हा तुझे चांगले दिवस परत येतील. त्यावेळी ही शारीरिक परिश्रम करायचं सोडू नकोस."

चमटकने नम्रतापूर्वक साधूला आश्वासन दिले—"स्वामीजी, मी अवश्य आपला सल्ला मानीन. जिथं मी चांगले वैभवसंपन्न दिवस घालविले, तिथं गरीबीत दिवस काढणे मला शक्य नाही. म्हणून मी आपलं गाव सोडून अन्यत्र निघालो आहे. आपण मला कृपा करून सांगा की नव्या गावी मी जीवन कसं जगावं?"

साधूने अमळ विचार केला, आणि मग म्हणाला—"आजपर्यंत तू सुखात जीवन काढलेस, तेव्हा श्रम करणे तुला थोडे कठिण

"वसुंधरा"



होईलच. म्हणून मी तुला एक वर देतो– श्रमपूर्वक करावयाचे कोणते ही काम तू सहज करशील. इतरांना जे काम करायला दहा तास लागतील ते तू एका तासात करशील."

चमटकने प्रसाद मानून साधूचे वरदान स्वीकारले. साधूला विनम्रपणे प्रणाम केला आणि बायको-मुलांसह शेजारच्या गावी जायला निघाला.

त्या गावात त्याने एक कुऱ्हाड मिळविली आणि जवळच्या जंगलात लाकडे तोडण्यासाठी गेला. परंतु त्या गावात लाकुडतोड्याचे काम करणारांची संख्या बरीच होती. सर्व लाकुडतोडे चमटकला विरोध करू लागले. चमटकची बायको म्हणाली–"अशा स्थितीत तुम्हाला कोणी तरी जोडीदार पाहिजे. जिवंत रहायचं असेल तर सर्व जण बरोबर जगू, नाही तर तर आपण सर्व जण बरोबर आपली जीवन-लीला समाप्त करू."

थोडं पुढे जाऊन चमटकने एक चांगलं झाड निवडलं. त्या झाडावर प्रहार करण्यासाठी त्याने पहिली कुऱ्हाड उचलली मात्र, इतक्यात त्याला एक भयानक हास्य ऐकू आलं. दुसऱ्याच क्षणी एक भयंकर आकृति त्याला दिसली. ती आकृति म्हणाली–"तू मला त्रास देऊ नकोस, नाहीतर मी तुला अन् तुझ्या कुटुम्बाला खाऊन टाकीन!" हे शब्द ऐकून चमटक एकदम आश्चर्यचकित झाला.

"निघून जा इथून लवकर! नाही तर गिळून टाकीन सर्वांना!" त्या भयंकर आकृतीने पुन्हा दटावले.

इतक्यात चमटक भानावर आला आणि म्हणाला–"तुला मला अन् माझ्या कुटुम्बाला खायचेच असेल तर माझी हरकत नाही. मी इथे फक्त लाकडं तोडायला आलो आहे. मी काही कोणता अपराध नाही केला. स्वतः श्रम करून जगू इच्छिणाऱ्या माणसाला अडवणं हा तुझा अपराध नाही का?"

हे ऐकून दुसऱ्याच क्षणी ती आकृति एका महावृक्षात परिवर्तित झाली. ही अद्भुत घटना पाहून चमटकला आश्चर्य वाटले, तरीही त्याने पुन्हा आपली कुऱ्हाड वर उचलली.

"थांब चमटक!" हे शब्द ऐकून तो थांबला.

एक देवी तेथे प्रकट होऊन म्हणाली–"चमटक, मी वनदेवी आहे. मी या वनाचे अन् त्यातल्या जनावरांचे रक्षण करते. इथे असणाऱ्या प्रत्येक झाडाच्या आश्रयाने कित्येक प्राणी जगत असतात. तू आम्हाला विनाकारण सतावू नकोस. तुझ्या हातात विशेष शक्ति असणारी कुऱ्हाड आहे, म्हणूनच इथली रानटी श्वापदे तुला अन् तुझ्या कुटुम्बातील कुणाला कसलीही इजा करू शकली नाहीत. त्या झाडाने राक्षसाच्या आकृतीने तुला धमकावले, पण तू त्याला भ्यायला नाहीस; म्हणूनच मी स्वतः इथे प्रकट झाले. तू माझा सल्ला मान आणि हे वन सोडून निघून जा. तू सल्ला मानला नाहीस तर तुलाच त्याचे फळ भोगायला लागेल. योग्य वेळी सावध हो. तुझ्या भल्यासाठी हा सल्ला देत आहे मी!"

चमटक आश्चर्याने म्हणाला–"देवी, तुझे म्हणणे खरे आहे, पण माझ्याबरोबर माझे कुटुम्बही आहे. त्याचं पोट भरणं हे माझं कर्तव्य आहे. मग तूच सांग मी आता काय करावं?"

"तू जे करायला हवेस त्याबद्दल तुझ्या देशचा राजाच तुला काय ते सांगेल





राजाज्ञेपुढे माणसालाच काय, पण देवांना-सुद्धा झुकावे लागते. त्याने सांगितले तर मी ही तुला झाड तोडायला मना करणार नाही." वनदेवीने त्याला समजावून सांगितले.

"ठीक आहे, मी राजाला भेटेन. पण कुणास ठाऊक ती भेट होण्यास किती दिवस लागतील!" चमटकने शंका प्रदर्शित केली.

यावर वनदेवीने त्याला डोळे मिटून घ्यायला सांगितले. चमटकने तसे केले.

पुन्हा डोळे उघडले तेव्हा त्याला आढळून आले की आपण आपल्या परिवारासह राजाच्या दरबारात उभे आहोत! भरल्या दरबारात अचानक उपस्थित झालेल्या त्या कुटुम्बाला पाहून राजा व इतर सर्वजणांना मोठे आश्चर्य वाटले! चमटकने त्यांना आपली हकीकत सांगितली.

राजा चमटकला म्हणाला–"तू माझ्या राज्याचा नागरिक आहेस, तुझे रक्षण करण्याची जबाबदारी माझी आहे. तुझ्या लायकीची एकादी नोकरी मी तुला देईन. तू आरामात इथे आपले जीवन व्यतीत कर."

परंतु चमटकने यावर आक्षेप घेऊन म्हटले–"साधूने मला म्हटले आहे की हातात कुऱ्हाड घेऊन मी कष्ट करीन तरच मी केलेल्या चुकीचे परिमार्जन होऊ शकेल! झाडं कापायला मला रोखणारी वनदेवी कोण? मला न रोखण्याबद्दल आपण तिला आज्ञा द्यावी!"

राजाला चमटकाचे बोलणे योग्य वाटले; म्हणून चमटकच्या हातची कुऱ्हाड घेऊन राजा एकटाच त्या वनाकडे निघाला.

पुन्हा वनदेवी राजासमोर प्रकटली. राजाची शंका ऐकून ती म्हणाली–"राजा, तू जसे आपल्या प्रजेचं रक्षण करतोस तसेच मी या वनाचे रक्षण करते. या वनात जितक्या जातीचे वृक्ष आहेत तितक्या सर्व वृक्षांची रोपटी तू दुसऱ्या एकाद्या जागी लाव, त्यांचे असेच एक वन तयार झाले की तिसऱ्या वनाचे उद्घाटन करून मगच हे पहिले वन तू सरपणासाठी तोड. याचा अर्थ असा की एक वन जेव्हा नष्ट होते त्यावेळी तसेच दुसरे वन तयार असते अन् तिसऱ्या एका वनाचा शुभारंभ झालेला असतो. जर तू या गोष्टीचे पालन केलेस, तर तुझे अन् तुझ्या प्रजेचे कल्याण होईल, नाहीतर तुझ्या राज्याचा सर्वनाश होऊन जाईल."



राजा मुकाट्याने वनातून परत आला आणि चमटकला म्हणाला–"तुला कुऱ्हाड चालवून वृक्षारण्य तोडायचे असेल तर त्यासाठी तुला कित्येक वर्षे प्रतीक्षा करावी लागेल, या देशात लाकुडतोड्यांची संख्या अगोदरच जास्त आहे. त्यांनाच कापण्या-साठी पुरेसे वृक्ष या राज्यात नाहीत. मी आता आपल्या देशासाठी लागणारे सरपण शेजारच्या देशातून खरेदी करीन. तेव्हा तू दुसरा एकादा उद्योग पहा."

हे ऐकून चमटक आपल्या कुटुंबीयांसह शेजारच्या देशात निघून गेला, तिथे वृक्ष कापण्यावर कोणतेही बन्धन नव्हते. साधू कडून मिळालेल्या वराच्या प्रभावामुळे चमटक पन्नास माणसे तोडू शकतील इतके लाकूड एकटाच तोडू शके. एक एक मोठा वृक्ष चमटक एका दिवसात जमीनदोस्त करी. सर्व लाकूड विकून त्याच्या हाती अमाप पैसा येई. त्यामुळे तो पुन्हा चांगला संपन्न झाला. आपल्या स्वतःच्या देशात अपार वृक्ष संपदा असूनही अधिक किंमत देऊन लाकूड खरीदणाऱ्या आपल्या राजाच्या मूर्खपणाला चमटक मनातल्या मनात हसे.

काही वर्षे अशीच निघून गेली. चमटक रहात असलेल्या राज्यात एका वर्षी कडक दुष्काळ पडला. पाऊस न पडल्यामुळे पाण्याच्या एकेका थेंबासाठी प्रजा तडफडू लागली. पाणी नसल्याने पिकेही आली नाहीत. भुकेने लोक तडफडून मरू लागले, दुष्काळ दूर करण्यासाठी राजाने पुष्कळ यज्ञयाग वगैरे केले, पण काहीही उपयोग झाला नाही.



अशीच आणखी काही वर्षे गेली अन् त्या राज्याची परिस्थिती खालावतच गेली. तिथली जनता इतर संपन्न देशात रहायला जाऊ लागली. दारिद्र्यामुळे चोऱ्या, लूटमार, डाके वगैरेंचा सुळसुळाट झाला. सामान्य जनतेला संरक्षण नाहीसे झाले.

अशा स्थितीत चमटकनेही आपल्या देशात परत जायचा निर्णय घेतला. पण त्याच वेळी त्याला कसलासा रोग झाला. त्याच्या चेहऱ्यावर डाग पडले. वैद्य सुद्धा रोगनिदान करू शकला नाही. काय करावे हे चमटकला सुचेनासे झाले. तोंडाची सतत आग होई. रात्री झोप येईना. खाल्लेले अन्न पचेना. जीवन जगणे असह्य झाले. भरीत भर म्हणून आणखी एक संकट येऊन कोसळले. राजसेवक येऊन त्याला घेऊन गेले. चमटकला एक आठवडा कैद झाली. पण कोणत्या अपराधासाठी ही शिक्षा हे ही त्याला कळेना! परंतु तुरुंग मात्र त्याच्याचसारख्या तोंडावर डाग पडलेल्या लोकांनी भरून गेलेला होता! चमटकला याचे मोठेच आश्चर्य वाटले.

एका आठवड्याने सर्व कैद्यांना एकत्र आणून राजाने म्हटले–"सज्जन माणसांनो, मी तुमच्याशी फार क्रूरपणे वागलो आहे, माफ करा मला! वनदेवीने मला इशारा दिला होता की वनांचा नाश करण्यापूर्वीच नवी वने तयार केली पाहिजेत. परंतु तत्कालिक फायद्याच्या मोहाने मी तिने दिलेल्या इशाऱ्याची उपेक्षा केली. खरे म्हणजे वनांमुळेच कोणत्याही देशाचे हवामान संतुलित रहाते, वेळच्या वेळी पाऊसही पडतो. माणसाचा जीवनक्रम कोणत्याही कारणाने विचलित न होता शांतपणाने, सुखाने चालायला हवा असेल तर तेथील वनांचे रक्षण होणे अत्यावश्यक आहे. ही गोष्ट शेजारच्या देशाच्या राजानें उत्तम प्रकारे ओळखली आहे, म्हणूनच त्यांचा देश संपन्न व सुशोभित राहिला आहे.

जे झाले, ते झाले! आज आपल्या देशात जंगलं तोडणारांना कठीण शिक्षा दिली जात आहे. वनदेवीने स्वप्नात येऊन मला सांगितले की, जंगलावर अत्याचार करणाऱ्या लोकांच्या चेहऱ्यावर डाग पडतील." असे म्हणून त्याने आपल्या चेहऱ्यावर झाकलेला मुखवटा दूर केला.

आपल्याप्रमाणेच राजाच्याही चेहऱ्यावर डाग असलेले पाहून चमटकने आश्चर्याने डोळे विस्फारले!

त्याला समोर वनदेवी दिसली. ती स्मित करीत म्हणाली–"चमटका, तू स्वतःच पाहिलंस ना, माझा इशारा न मानता कोणी वनाचा नाश करू पाहील तर त्याची काय स्थिति होते ते? त्याच्यावर किती संकटे येतात दिसली ना? माझा इशारा न मानणारे काही राजेही आहेत. त्यांचे देश तर आज केवळ वाळवंटे बनून राहिली आहेत."

यावर चमटकने हात जोडून वनदेवीला नमस्कार केला. आणि त्याने विचारले–"देवी मला आज्ञा दे, मी आता माझ्या कुटुंबाच्या पोषणासाठी कोणता उद्योग पत्करू?"

"चमटक, तुझ्याजवळ विशेष शक्ति असणारी कुऱ्हाड आहे. म्हणून केवळ झाडे तोडूनच गुजराण करायची गरज नाही तुला. तुला तर साधूने वरही दिला आहे न? तू हाती नांगर धरून शेत नांगरलंस तरी तू इतरांपेक्षा दसपट अधिक पीक मिळवू शकतोस, समजलं का?" वनदेवी म्हणाली.

यानंतर चमटक आपल्या गावी परतला. तेथे ओस पडलेली शेतीयोग्य बरीच जमीन होती. तेथेच चमटकने शेतीवाडी सुरू केली. शेतीच्या कामात त्याला अपूर्व यश मिळाले. त्याला आपल्या शेतीतून भरघोस पीक मिळू लागले. त्याला काळी आई पावली! थोड्याच दिवसात तो दारिद्र्याच्या दुःखातून मुक्त होऊन बायकामुलांसह सुखाने कालक्रमणा करू लागला.





# घराब

पोलंड देशातल्या रहिवाशांची अशी समजूत होती की त्या देशाच्या खाणीतून मानवां सारखीच भुते रहातात. त्या भुतांना ते लोक 'घराब' असे म्हणत.

हे घराब खालील भुयारातून कधीही जमिनीवर येत नसत. खाणीत काम करणाऱ्या श्रमिकांबरोबर हे घराबही काम करत. सर्वसाधारण माणसांपेक्षा ते बुटके असत. चांगल्या स्वभावाच्या माणसांना ते अनेक प्रकारे मदत करीत. कमी लोहयुक्त जमिनीवर काम करणाऱ्या माणसांना ते जास्त लोह असणारी स्थाने दाखवून देत.

परंतु दुष्ट लोकांचे वागणे मात्र त्यांना मुळीच सहन होत नसे. घराब अशा लोकांवर जर रागावले तर कित्येकदा ते खाणीतले लोखंड नाहीसे करून ते अधिक खोलवर घेऊन जात; किंवा कधीकधी अशी काही योजना करत की वरची माती अशा लोकांवर कोसळून ते गाडले जात!

एकदा एका मिठाच्या खाणीत एक मिस्त्री काम करत असे. त्या खाणीत काम करत असलेला एक मजूर जेव्हा मेला, तेव्हा त्याच्या बायकोला त्या मिस्त्र्याने नुकसान-भरपाई दिली नाही; अन् उलट असा आरोप केला की त्या मेलेल्या मजुराचीच ही बायको आहे याचा काहीही पुरावा उपलब्ध नाही. इतर मजुरांनी ती स्त्रीच त्या मजुराची बायको असल्याबद्दल साक्षी दिल्या, पण मिस्त्र्याने त्याची काही दखलच घेतली नाही. या घटनेनंतर एका आठ-वड्याने तो मिस्त्री एका भुयारातून जात असताना अचानक वरचे छत कोसळून तो ठार झाला.

पोलंडमध्ये अतिशय प्राचीन व विशाल अशी एक खाण होती. तिथे या घराबांची संख्या खूप होती. त्यांना अनेक भाग वाटून दिले गेले होते. आणि प्रत्येक भागात एक एक घराब काम करत असे. त्यांचे काम म्हणजे त्या त्या विभागात काम करणाऱ्या मजुरांवर देखरेख ठेवणे. त्या मजुरांनाही असा विश्वास वाटे की आपणा-वर काही अन्याय झाला तर हे घराब आपल्याला योग्य न्याय मिळवून देतील!

एक म्हातारा कर्मचारी होता. तो मेहनत न करता उलट नेहमी मद्याच्या नशेत चूर झालेला असे. त्यामुळे त्याला कोणत्याही चांगल्या खाणीत काम मिळत नसे. एक दिवस त्याने सकाळपासून संध्याकाळपर्यंत खूप मेहनत केली पण त्याला रत्तीभर ही लोखंड मिळाले नाही; म्हणून एका दगडावर बसून तो विचार करू लागला—"मी कसा अभागी आहे! मला कुणाची मदतही नाही. असल्या ठिकाणी ढोर मेहनत करून उपयोग काय?"

इतक्यात एका घराबाने त्याला हाक मारून विचारले—"तुला काय खाणीच्या याच भागात काम करायला सांगितलंय?"

"यापेक्षा बरी जागा मला कोण देणार?" तो म्हातारा दीनवाणे उत्तरला.

"माझ्याबरोबर चल, मी तुला चांदी सापडणारी ज[illegible]गा दाखवतो, माझं ऐकलंस तर चांगला नफा मिळेल बघ तुला!" घराब त्याला म्हणाला.



तो म्हातारा त्या घराबाबरोबर कोणत्याशा एका जागी पोचला. तेथे घराब त्याला म्हणाला—"हे बघ, इथे खोदलंस तर तुला चांदी मिळेल. तू तिचे वजन करव. त्यातून तुला जो वाटा मिळेल तो घेऊन आपण प्रथम जिथे भेटलो तिथे ये. तिथेच आपण त्या धनाची वाटणी करून घेऊ."

मोठ्या प्रसन्नतेने तो म्हातारा मजूर आपल्या इतर मजूर दोस्तांकडे जाऊन त्यांना म्हणाला—"ऐका रे, एका जागी खूपशी कच्ची चांदी आहे. ती खोदून काढू या; चला माझ्या बरोबर!"

"हॅं :! या खाणीत जस्त सोडून दुसरा कुठला धातू सापडणारच नाही. चांदी तर

पोलंडमधील लोक कथा



केव्हाच नाहीशी झाली. इथे चांदी आहे अशी तुझी समजूत असेल तर तूच घे ना ती सारी चांदी खोदून!" असे म्हणून त्या सर्वांनी त्याची टिंगल केली.

परंतु तो म्हातारा मात्र मद्य प्यायचे सोडून देऊन एक महिनाभर रोज कच्ची चांदी खोदत राहिला. अशा प्रकारे आपल्या मजुरीच्या बदल्यात त्याला कित्येक हजार नाणी मिळाली! ती सर्व नाणी एका थैल्यात घालून तो प्रथम जिथे तो षराब भेटला होता, त्या जागी पोचला. षराब तिथे म्हाताऱ्याचीच वाट पहात बसला होता.

दोघांनी ती नाणी सारखी वाटून घेतली आणि शेवटी एक नाणे उरले.

षराबाने विचारले—"आता हे नाणं कुणी घ्यायचे?"

"तुम्हीच ठेवा न आपल्यापाशी ते, महाराज." मजूर म्हणाला.

"ओहो, म्हणजे याचा अर्थ असा की तुला धनाचा लोभ नाहीय! मग तर हे सर्व धन तूच घे. पण दान-धर्म करायला चुकू नकोस हां!" असे म्हणून षराब तेथून निघून गेला.

तो मजूर जन्मभर दान-धर्म करीत राहिला आणि मद्य पिणे सोडून देऊन त्याने मोठ्या सुखात आपले आयुष्य घालवले.

त्याच खाणीत एकदा याहूनही एक आश्चर्यकारक गोष्ट घडली. अन् ती सुद्धा एका एकट्या मजुराच्या बाबतीत!

एकदा षराबाने त्या मजुराला एकटा पाहून विचारले—"तू एकटाच का काम करतो आहेस. मलाही आपला वाटेकरी बनव ना!"

"या जमिनीत धातूचे प्रमाण कमी आहे. इथे काम करून एका माणसाचंही पोट भरणं कठीण, तिथे तुला वाटेकरी बनवून खाणार काय माती?" तो मजूर म्हणाला.

"मी तुला एक छान जागा दाखवतो. चल माझ्याबरोबर" असे म्हणून षराब त्या मजुराला एका निराळ्याच भागात घेऊन गेला. तेथे कच्चा धातु अपार होता.



तो कर्मचारी मोठ्या उत्साहाने तेथे खोदू लागला. थोड्या वेळाने षराब त्याला जमिनीत आणखी खोलवर घेऊन गेला.

मजूर बिचारा थकून गेला होता म्हणून त्याने थोडा आराम करायची इच्छा प्रकट केली. नंतर त्याच्याजवळ जेवढी रोटी शिल्लक होती ती खाऊन तो झोपला.

तो झोपेतून उठेपर्यंत षराब तेथेच बसला होता. त्याने मजुराला विचारले—"किती वेळ तू झोपला होतास, माहीत आहे तुला?"

"बहुधा दोन तास!" मजूर म्हणाला.

षराब गप्प राहिला आणि दुसऱ्याच मार्गाने त्याला पहिल्या जागी घेऊन गेला. त्याच्या हातावर थोडे पैसे देऊन षराब त्याला म्हणाला—"तू गावात जाऊन रोटी विकत घेऊन ये."

मजूर जेव्हा जमिनीवर पोचला, तेव्हा तिथे काम करणाऱ्या चार मजूर स्त्रिया त्याला पाहून घाबरल्या अन् आपले काम सोडून तिथून पळून गेल्या. मनातल्या मनात त्यांना शिवी देऊन तो मजूर गावात शिरला, परंतु गावात तर खूपच बदल झाला होता; शेवटी तो आपले स्वतःचे घर आणि आपली गल्ली ही सापडू शकला नाही! तो एका दुकानात गेला आणि आपल्या बरोबर आणलेले पैसे दुकानदाराला



देऊन त्याने रोटी मागितली. दुकानदार म्हणाला—"अरे, ही नाणी चालणार नाहीत." त्या दुकानाजवळच एक सुशिक्षित अन् वयस्क माणूस उभा होता. त्याने ती नाणी तपासून पाहून म्हटले—"ही नाणी तर शंभर वर्षांपूर्वीची आहेत!"

आता मजुराने ओळखले की आपण कमीत कमी शंभर वर्षे तरी झोपलो असलो पाहिजे! तो पुन्हा खाणीत शिरला आणि षराबाला म्हणाला—"मला असं वाटतंय की मी शंभर वर्षं झोपलो होतो. आता काय होईल माझं?"

"काही हरकत नाही. तू पुन्हा आपल्या गावी परत जा. तू जास्तीत जास्त दोन

वर्षापेक्षा काही अधिक नक्कीच नव्हता झोपलास. नीट लक्षात ठेवून बरोबर एक वर्षाने पुन्हा मला भेट. मी इथेच असेन." असे म्हणून त्या धराबाने मजुराच्या हाती थोडेसे सोने दिले.

यावेळी मात्र तो मजूर सरळ आपल्या घरी गेला. त्याने आपला विचित्र अनुभव आपली बायको, मुले व दोस्तांना सांगितला. परंतु कोणीही त्यावर विश्वास ठेवला नाही.

एक वर्षाने मजूर पुन्हा खाणीत उतरून त्या धराबाला भेटला.

"या वेळी मी तुला नक्की खजिना दाखवतो. माझ्याबरोबर चल." असे म्हणून तो त्या मजुराला अशा रस्त्याने घेऊन गेला कि जिथे त्यापूर्वी रस्ताच नव्हता! ओसाड असणाऱ्या बोगद्यातून जात जात तो मजुराला खूप दूर घेऊन गेला. शेवटी ते अशा जागी पोचले की जिथे अपार असा खजिना पडलेला होता!

"ऐक, ही जागा कोण्या एका काळी जमिनीजवळच होती. मजूर अगदी सहजपणे यातलं धन खोदून घेऊन जात असत. परंतु असं मेहनत न करता धन मिळू लागलेलं पाहून माणसं माजली, त्यांना गर्व चढला धनाचा! त्यासाठी शिक्षा म्हणून तो सर्व खजिना खोल जमिनीत घुसला. तू जितकं उचलू शकशील तितकं धन यातून उचलून ने आणि आपलं आयुष्य सुखाने घालव." धराब त्याला म्हणाला.

"मी या खजिन्याच्या बाबतीत इतर लोकांनाही सांगू?" मजुराने धराबकडे परवानगी विचारली.

"सांगायचं असलं तर सांग खुशाल! आणि त्यांना असंही सांग की पाहिजे तर फावडी कुदळी आणून ते हा खजिना खोदूनही नेऊ शकतील." धराब म्हणाला.

परंतु अचानक मजुराच्या हाती जी संपत्ति आली ती पाहूनही त्या लोकांचा मजुरावर विश्वास बसेना! त्यांना वाटे. हे कसे शक्य आहे? पण खरी गोष्ट अशी की त्यानंतर कोणीही तो खजिना शोधू शकले नाही.



# लांब दाढा

पश्चिम आफ्रिकेतील गाबून वायपर नावाच्या सापांना १, ३/४ इंच लांबीच्या दाढा असतात!



## 'मसेल' ची चाल



मसेल नावाची गोगलगाय अगोदर पाया-सारखी दिसणारी नस (ही नस सामान्यतः शंखाच्या आत असते.) पुढे सरकवून मग शंखासह आपले शरीर पायापर्यंत पुढे नेते.

## नैसर्गिक आश्चर्ये :

## तिसरा हात



मध्य व दक्षिण अमेरिकेत राहणाऱ्या काही विशिष्ट जातीच्या माकडांना तिसऱ्या हातासारखे काम देणारी लांब शेपूट असते. शेपटाच्या टोकाला केस नसतात. तिथे फक्त नसा असतात. त्या टोकाने माकड झाडाच्या फांद्या वाकवून पकडून ठेवते.



# जेम्स बॉण्ड

























## लहान लहान माकडं

घोडे आणि वाघांकरिता प्रसिद्ध असलेल्या भुवनेश्वर जवळील प्राणी-संग्रहालयासाठी अमेरिकेहून दोन मरमोसाट जातीची माकडं मागविण्यात आली आहेत. ही माकडं सहा इंच उंचीपर्यंत वाढतात.

## खूप वृद्ध जोडपं

सोविएट रशियाचे रहिवासी इलियस जपारोव यांचे वय १२२ वर्षे आहे. त्यांची बायको खातियन ११८ वर्षांची आहे. भाकूच्या जवळ राहणाऱ्या या वृद्ध जोडप्याने गेल्या सप्टेंबर महिन्यात आपल्या लग्नाचा एकशे तिसरा वाढदिवस साजरा केला. या समारंभात या जोडप्याचे मुलगे व मुली आणि सर्व नातवंड मिळून सुमारे २०० जण हजर होते.





## संकट-काळी एकता

गेल्या सप्टेंबर मध्ये असाम राज्यात भयंकर पुराचा प्रकोप झाला. त्यावेळी सोनिकपुरच्या आश्रय-केन्द्रात जंगली हत्ती, विषारी साप यांनी शांतिपूर्वक सह-निवास केला. त्यावेळी या जनावरांच्या जवळून जाणाऱ्या माणसांना ही त्यांनी काही त्रास दिला नाही.

## तेल अवीव मध्ये दिसलेल्या वस्तु काय आहेत?

तेल अवीवच्या नागरिकांनी संत्र्याच्या रंगाच्या दोन थाळ्या आकाशात उडताना पाहिल्या. अजून वैज्ञानिकांना हे नीट समजलेलं नाही या थाळ्या काय आहेत आणि कोठून आल्या?



# मौनाचे

मंगापुरचा जमीनदार फार बडबड्या होता. तसाच तो रागिट ही होता. म्हणून त्याला कोणी काही समजून सांगण्याचे धाडस करीत नसे.

एक दिवशी तो एकटाच बाहेर फिरायला निघाला. गावच्या जवळ एक छान डोंगर होता. जमीनदाराला डोंगरावर चढावंस वाटलं. डोंगराच्या पायथ्याशी त्याला एक धनगर दिसला. जमीनदाराने त्याला ही बरोबर घेतलं आणि तो चालू लागला.

धनगर मुकाट्याने झर-झर डोंगर चढू लागला. जमीन्दार काही ना काही तरी बोलत मागे राहिला. थोड्या वेळात तो थकला आणि दगडावर बसला.

बिचारा भोळा धनगर म्हणाला–"मौन धारण केलं तर न थकता डोंगरावर चढता येतं !"

आता जमीनदाराला समजलं की केवळ डोंगर चढण्यासाठीच नव्हे, पण जीवनात यशस्वी होण्यासाठी सुद्धा फार बडबड करणं योग्य नाही. त्याला मौनाचं महत्त्व समजलं. मग तो मितभाषी राहू लागला.





# चांगल्याशी जग चांगलं !

केवटपुर एक भलं मोठं गाव होतं. तिथं एक कोंडिबा नावाचा माणूस रहात असे. त्याला वडील नव्हते. त्याची आई जिवन्त होती. तो मोठा कष्टाळू होता, पण त्याचा स्वभाव थोडा रागीट होता. त्याची आई त्याला नेहमी समजाऊन सांगे–"बाळ, म्हण आहे, 'आपण चांगले तर जग चांगले!' तू दुसऱ्याशी चांगला वागलास तर त्याचं फळ चांगलंच मिळेल, नाही तर त्याचे दुष्परिणाम तुला भोगावे लागतील."

पण तो म्हणायचा–"मी भरपूर कष्ट करून आपलं पोट भरतो. मी दुसऱ्या कोणाचं बोलणं का म्हणून ऐकून घ्यावं?"

एके दिवशी गांवच्या तलाठ्याने कोंडिबाला बोलवलं नि म्हणाला–"ऐक, माझे वडील आता थकले आहेत. त्यांच्याकडे रात्रं दिवस लक्ष देण्यासाठी मला एकादा माणूस पाहिजे. जर काही दिवस तू माझ्या वडिलांची देख-रेख नि सेवा-सुश्रूषा केलीस तर मी तुला महिन्याला पांचशे रुपये पगार देईन. समजलं?"

कोंडिबा दिवस भर काबाड कष्ट करी, तरी पण त्याला महिन्याला दोनशे रुपयांहून अधिक कमाई होत नसे. त्याच्या जवळ एक धष्ट-पुष्ट बैलांची जोडी होती. तो नांगर चालवी आणि वजनदार ओझी त्यांच्याकडून वाहून नेई. म्हणून दुसऱ्याच्या घरी नोकरी करून अधिक पगार मिळवणं त्याला पसंत नव्हतं !

त्याने तलाठ्याला सांगितले–"जरा माझं ऐकाल? वडिलांची सेवा करण्याची चांगली नामांकित संधि आपणास मिळालेली आहे. ती आपण का गमाऊ इच्छिता?" असं म्हणून कोंडिबा तेथून झटक्यात बाहेर पडला.



कोंडिबा शेजारच्या गावच्या सीमेवर पोंचला होता, इतक्यात एका पैलवानाने येऊन गाडी थांबविली, आणि कोंडिबाला गाडीतून उतरायला सांगितलं.

कोंडिबा त्या पैलवानाशी दोन हात करणार होता, पण थोडया अंतरावरून एक माणूस ओरडला–"मी या गावचा प्रमुख आहे. तो कोण हे तुला माहित नाही? आता मुकाटयाने घरची वाट धर झालं!"

पैलवान गाडी घेऊन निघून गेला. बिचारा कोंडिबा अगतिक होऊन पाय आपटत आपल्या मामांकडे गेला आणि घडलेला सर्व प्रकार सांगितला.

"तो बहुतेक पैलवान मल्लवर्मा असावा. हल्ली त्याच्या कारवायांना काही मर्यादा राहिली नाही!" एक दीर्घ श्वास घेऊन कोंडिबाचे मामा म्हणाले.

"कोंडिबा मोठया दीनवाणीने मामांना म्हणाला–"काही करा, माझी गाडी आणि बैलजोडी मला परत मिळवून द्या."

कोंडिबाच्या मामांनी स्पष्टपणे सांगून टाकलं–"हे बघ, हे काम माझ्याच्याने होणे अशक्य! मल्लवर्मा मोठा भयंकर माणूस आहे. तसा तो या गावातल्या लोकांच्या वाटे सहसा जात नाही. पण त्याच्या तोंडी लागण्याचा परिणाम काय होईल कोण जाणे!"

यानंतर गावच्या जमीनदाराने कोंडिबाला पाणी भरायला सांगितलं, वैद्याने औषध कुटायला सांगितलं. एका श्रीमंत माणसाने कोंडिबाला आपल्या घराचं परसू स्वच्छ करायला सांगितलं. कोंडिबाने सर्वांना फाड-फाड उत्तरे दिली आणि घरी येऊन बसला.

तेव्हा कोंडिबाच्या आईने त्याला समजून सांगितलं–"हे बघ, तुझ्या मामांनी निरोप पाठविला आहे की त्यांना आपली बैल-जोडी पाहिजे आहे. आताच बैल गाडीला जुंप आणि मामांच्या गावी जा."

कोंडिबाने ताबडतोब गाडीला बैल जुंपले आणि मामाच्या गावी निघाला.

"या गावात कोणी अनुभवी वडीलधारी माणसं नाहीत का? कुणावर अन्याय झाला तर त्याचे निराकरण कोणी करीत नाही?" कोंडिबाने अमळ आवेशात येऊन विचारलं.

"नाहीत असं नाही. पुष्कळ लोक आहेत. खरी गोष्ट अशी आहे की मल्ल-वर्मा उद्दण्ड असला तरी या सर्व लोकांशी त्यांचे वागणे चांगले आहे. 'त्यांचं म्हणणं तो मानतो. त्यामुळे त्याचं सर्व काही चालतं. गावातील वडीलधारी माणसं त्याचीच बाजू उचलून धरतील." कोंडिबाच्या मामांनी समजाऊन सांगितलं.

"याचा अर्थ असा की मला माझी गाडी आणि बैल परत मिळणार नाहीत!" व्याकुळ होऊन कोंडिबाने विचारले.

"का नाही? एक उपाय आहे बघ. आमच्या गावातली अनुभवी माणसं आमच्या सारख्या सामान्य लोकांच्या दु:खांकडे लक्ष देत नाहीत. पण वडीलधाऱ्या माणसांवर ते अन्याय होऊं देणार नाहीत. तुझ्या गावातली काही ज्येष्ठ मंडळी इथे आली आणि त्यांनी तुझी बाजू मांडली तर काम होऊ शकेल." कोंडिबाच्या मामांनी उपाय सांगितला.

कोंडिबा एकदम निराश झाला. आपल्या गावातील वडीलधाऱ्या लोकांशी आपले संबंध कसे आहेत ते कोंडिबाने मामांना सांगितले.

मामा आश्चर्याने म्हणाले–"कोंडिबा, तू असं का केलंस? बघ, मल्लवर्मा





उद्दण्ड स्वभावाचा असला तरी आपल्या गोड वाणीने तो सर्वांना प्रिय झाला आहे. तुझ्या सारख्या कष्टाळू तरूणाला तर सर्वांनी मानलं पाहिजे. आता मला केवळ एकच उपाय दिसतो आहे. तू आपल्या गावी जाऊन सर्वांची क्षमा माग अथवा मल्लवर्माचे पाय धर. तुझं काम होऊ शकेल!"

"पायच धरायचे असतील तर मी आपल्या गावातल्या वडिलधाऱ्यांचे धरीन." असे म्हणून कोंडिबा तडक आपल्या गावी परत आला नि प्रथम तलाठ्याचे घरी गेला. तलाठ्याने डोळे वटारून विचारले—"का रे, आता तुझं इथं काय काम? जा, आलास जसा परत जा. तेव्हा मस्तीत होतास नाही का?"

कोंडिबाने तलाठ्याला लोटांगण घातले. म्हणाला—"आपण मला क्षमा करावी. माझी चूक झाली त्यावेळी! आपणा सारख्यांची मी काही सेवा केली तर पुण्यच पदरी पडेल. आपल्या परमपूज्य पिताजींची सेवा करण्याची चालून आलेली संधि मी माझ्या मूर्खपणाने गमावली. आपण मला पगार देण्याची आवश्यकता नाही. आज पासून मी आपल्या वडिलांची सेवा करायला तयार आहे."

तलाठी आता शांत झाला होता. तो म्हणाला—"कोंडिबा, तू हे काय म्हणतो आहेस? सकाळी तू जे काही बोललास, त्याने माझे डोळे उघडले. संपत्तीच्या गर्वात मी आपले कर्तव्यच विसरलो होतो. खरं म्हणजे माझ्या वडिलांची सेवा मी स्वतःच नको का करायला? त्यांची सेवा दुसऱ्या कोणाकडून करून घेणं ही मोठी चूकच आहे!"

कोंडिबा अशाच प्रकारे पाटील, जमीनदार, वैद्य आणि त्या श्रीमंत माणसाकडे गेला आणि त्याने सर्वांची क्षमा मागितली. सर्व जण केवळ आपला राग विसरून गेले असं नव्हे, तर त्यांना ही गोष्ट ही पटली की चूक त्यांचीच आहे.



यानंतर एक आठवडा भर कोंडिबा सर्व गावकऱ्यांशी अत्यन्त प्रेमाने वागला. कोंडिबातील हा बदल पाहून सर्वांना संतोष झाला, ते त्याची तोंड भरून स्तुति करू लागले. कोंडिबामधील हा बदल म्हणजे सोन्यात सुगंध!

आता कोंडिबा सरळ शेजारच्या गावी जाऊन मल्लवर्माच्या घरी गेला. तो बाहेरूनच म्हणाला—"मित्रा मल्लवर्मा, मी आपली बैलांची जोडी घेऊन जाण्यासाठी आलो आहे तुझ्याकडे! चल, पटकन् गाडीला बैल जुंपून दे बरं!"

मल्लवर्मा घरांतून बाहेर आला नि कोंडिबाला ओळखून म्हणाला—"तू कोणा बरोबर बोलतो आहेस माहीत आहे न? गाडी पाहिजे असली तर माझ्याशी कुस्ती करायला ये. मला हरव, अन् घेऊन जा मग तुझी गाडी आणि बैल."

"अरे, तुला हरवण्यासाठी कुस्ती कशाला पाहिजे?" असं म्हणत कोंडिबाने मल्लवर्माच्या छातीवर नि तोंडावर जोरदार ठोसे मारले, पाठीत गुद्दे घातले—झालं, मल्लवर्मा चारी मुंडे चित्!

यानंतर कोंडिबाने मल्लवर्माची मानगुट पकडली आणि हात पिरगळत धमकी दिली—"अरे, रोज काबाडकष्ट करणारा मी, तुझ्यासारख्या आळशी माणसाची ताकत ती काय माझ्यापुढे? चल हट...." असे म्हणत कोंडिबा आपल्या गाडीवर जाऊन बसला आणि आपल्या मामाकडे



जाऊन त्यांना सर्व हकीगत सांगितली. "अरे, मी तर तुला गावातल्या वडिलधाऱ्या माणसांना घेऊन यायला सांगितलं होतं! तू एकटाच कसा आलास?" मामाने विचारले.

"मल्लवर्माला धडा शिकवायला मी एकटाच पुरेसा आहे, मामाजी! गावातल्या ज्येष्ठ मंडळींना उगाच कशाला त्रास द्यायचा?" हंसत हंसत कोंडिबाने मामांच्या प्रश्नाचं उत्तर दिलं.

"जर कुस्तीत तू मल्लवर्माशी सामना करू शकत होतास, तर हे काम अगोदरच का नाही केलंस?" मामाने शंका व्यक्त केली.

मल्लवर्माला गावच्या वडिलधाऱ्या माणसांचं सहकार्य आहे. माझी स्वतःची ताकत आजमावण्यापूर्वी मला ही आपल्या गावातील श्रेष्ठ मंडळींचं सहकार्य मिळवायचं होतं. आता ते काम मी करून आलो. आता आपल्या गावची ज्येष्ठ मंडळी माझ्या गावी पोंचली आणि माझ्याबद्दल तक्रार करू लागली तरी न्याय माझीच बाजू घेईल." कोंडिबाने गर्वाने मामांना आश्वासन दिलं.

मामा अभिमानाने बोलू लागले— "आपल्या तोंडावर नियंत्रण असलं तर कोणी ही आपल्याला सहानुभूतीने समजून घेईल. ज्याची बाजू न्यायाची असते, त्याला न्याय मिळविण्यासाठी तोंडावर काबू ठेवावा लागतो. आपल्या भाषेतली म्हण आहे—'आपण चांगले तर जग चांगले!' आता हे सत्य तुला चांगलं समजलं म्हणायचं. तू आता अधिक कुशल बुद्धिचा झाला आहेस! मी लवकरच तुझ्या लग्नाचा मुहूर्त निश्चित करून तुला कळवितो. आता मला खूप आनन्द झाला आहे."

कोंडिबा घरी आला आणि आईला घडलेलं सर्व सांगितलं. ती पण खुष झाली. मामाच्या मुलीशी कोंडिबाचं लग्न झालं आणि ते दोघे सुखपूर्वक जीवन जगू लागले.





# वैद्याची जबाबदारी

**पर्वत** राज्यात उत्तम शास्त्री नावाचा एक वैद्य रहात असे. कुशल वैद्य असल्यामुळे तो चांगलाच लोकप्रिय होता. त्या राज्याच्या शेजारी पुष्प देश होता, पण या दोन देशात चांगलेच शत्रुत्व होते. पुष्प देशचा राजा होता व्याघ्रसेन. त्याने दोनदा पर्वत देशावर आपले आधिपत्य स्थापण्याचा प्रयत्न केला, पण दोन्ही वेळी पर्वत देशाचा राजा शिवप्रभु याने त्याच्या वर मात केली. व्याघ्रसेनला पळून जावे लागले.

दोन्ही राज्यांच्या सीमा-प्रदेशात राहणारे लोक आजारी पडले की उपचारासाठी उत्तम शास्त्रीकडे येत.

एक दिवशी राजा शिवप्रभूने वैद्यराज उत्तम शास्त्रीकडे निरोप पाठवला—"शत्रु देशातील प्रजेची सेवा करणे जर आपण बंद केले नाही तर आपल्याला कठोर शिक्षा भोगावी लागेल!"

तरी पण उत्तम शास्त्रीने पुष्प राज्यातील प्रजेला औषधोपचार करणे सोडले नाही. राज्यकारभाराच्या कामात गुंतल्यामुळे शिवप्रभु काही काळ ते सर्व विसरून गेला.

सुमारे एक महिन्यानंतर शिवप्रभु शिकारीसाठी जंगलांत गेला. शिकार करून झाल्यावर आपल्या रथात बसून तो राजधानीकडे यायला निघाला. रस्त्यात एका ठिकाणी त्याला उत्तमशास्त्री दिसला. आपल्या दोन शिष्यांसह वैद्यराज जडीबुटीच्या शोधात होते.

राजाला आपण वैद्याला दिलेला आदेश आठवला. राजाने आपल्या बरोबरच्या घोडेस्वारांना विचारून हे जाणून घेतले की वैद्यराजांनी अजून शत्रुच्या देशांतील प्रजेला औषधोपचार करण्याचे आपले व्रत सोडलेले नाही.

शरद जोशी

एवढ्यात उत्तम शास्त्री आपल्या शिष्यांसह राजा जवळ पोचला आणि त्याला नमस्कार केला. शिवप्रभुने रागा-रागाने सांगितले—"आपण एक कुशल वैद्य आहात हे मी जाणतो. पण माझ्या आज्ञेचे पालन न करता आपण शत्रुच्या देशातील जनतेची पण सेवा करीत आहात. हा देशद्रोह आहे, व मी याबद्दल आपणास शिक्षा देणार आहे." राजाने सैनिकांना हुकुम दिला की उत्तम शास्त्रीला बंदी बनवून राजधानीत घेऊन जाण्यात यावे. आणि राजा राज-महालाकडे जायला निघाला.

थोडे दूर गेल्यावर राजाच्या रथाच्या एका चाकाचा खिळा निसटून खाली पडला. रथाचे चाक सुटे होऊन जवळच्या झाडीत जाऊन पडले. रथ आडवा होणार होता, पण सारथ्याने शिताफीने रथातून उडी मारली व रथ सावरण्याचा प्रयत्न केला. तरी पण राजा रथातून खाली पडला. त्याला खांद्यावर व गुडघ्यांवर जखमा झाल्या. ते दृश्य पाहून उत्तम शास्त्रीनी सैनिकांना सल्ला दिला—"तुम्ही राजाला घोड्यावर बसवून माझ्या घरी पोचविण्याची व्यवस्था करा." उत्तम शास्त्री आपल्या शिष्यांसह पुढे झाला. राजा वैद्याच्या घरी पोचताच त्याने जखमा धुवून स्वच्छ केल्या आणि औषध लावून राजाची मलम-पट्टी केली. एवढे करून वैद्य घरात निघून गेला.

शिष्य म्हणाला—"महाराज, वैद्य औषधोपचार करताना मित्र-शत्रु ओळखत नाही."

उत्तम शास्त्रीच्या शिष्याच्या विधानातील सत्य राजाला समजले. आपल्या घराबाहेर निघालेल्या उत्तम शास्त्रीला पाहून राजा म्हणाला—"वैद्यराज, आपण आपले व्रत चालू ठेवावे. रोग्याची चिकित्सा करताना तो मित्र आहे की शत्रु हे पाहण्याची आवश्यकता नाही. या कामी आपणास काही मदत लागली तर मला निरोप पाठवावा." असं सांगून राजाने आपला कंठहार काढून उत्तम शास्त्रीला भेट दिला आणि राजा आपल्यां सहकाऱ्यांसह राजधानीकडे परतला.





## पाच प्रश्न

फार प्राचीन काळी सुसंपन्न कौशांबी राज्यावर राजा सूर्यसेन राज्य करीत होता. खूप वर्षांनंतर त्याला एक मुलगी झाली. राजा फार आनंदला! राजकुमारीचे नाव सुलोचना असे ठेवले, अन् राजा तिचे फार प्रेमाने लालनपालन करू लागला. राजाला तरीही काळजी होतीच की आपल्याला मुलगा नाहीं; मग आपल्यामागे राजकन्येचा संभाळ कोण करील? शेवटी याच चिन्तेने झुरून झुरून राजा मृत्युमुखी पडला!

लावण्याची खाणच अशा अनुपम सुंदर सुलोचनेशी विवाह करायला अनेक राजपुत्र पुढे आले; परन्तु तिला त्यापैकी कोणीच पसन्त पडेना. विवाहाच्या इच्छेने आलेले सर्वच राजपुत्र केवळ तिच्या सौन्दर्याला अन् अतुल संपत्तीला भाळून आले होते. अशा लोभी राजपुत्राशी विवाह केला तर प्रजेचे कल्याण होणे अशक्य आहे अशी सुलोचनेची खात्री होती. म्हणूनच तिने निश्चय केला की विवाह करायचा तर शासन कार्यात दक्ष, विवेकी, अत्यंत साहसी व पराक्रमी आणि परोपकारी अशाच तरुणाशी करायचा!

याच काळात राजकुमारीला सर्व तऱ्हेचे शिक्षण देणारे तिचे गुरु दरबारी पंडित सुधाकर आपली तीर्थयात्रा आटोपून राज्यात परत आले. सुलोचनेने त्यांना बोलावून घेऊन विवाहाच्या बाबतीतला आपला निर्णय त्यांना सांगितला; आणि योग्य



अशा राजकुमाराची निवड करण्यासाठी त्यांची मदत मागितली.

आचार्यांनी तिला सांगितले–"मी तुला पाच प्रश्न देतो. त्या सर्वांची उत्तरे जो बरोबर देईल त्याच्याशी तू लग्न कर. तथास्तु !"

गुरुजींच्या आदेशानुसार सुलोचनेने दवंडी पिटवली अन् देशोदेशीचे राजकुमार विवाहाच्या आशेने कौशांबीला येऊन पोचले. परन्तु त्यापैकी एकाही राजकुमाराला पहिल्याच प्रश्नाचे बरोबर उत्तर देता आले नाही अन् बिचारे एवढेसे तोंड करून आपापल्या देशी परत गेले!

एके दिवशी नेपाळचा राजपुत्र धीरसिंह सुलोचनेला भेटायला गेला अन् त्याने तिला आपला पहिला प्रश्न ऐकवण्यास सांगितले.

"गेल्या काही वर्षांत या राज्यात नेहमीच हे शब्द ऐकू येत असतात–"एकदा मी पाहिले, पुन्हा पहायची माझी इच्छा आहे" हे शब्द कोठून ऐकू येत असतात? त्यांचा अर्थ काय? हाच माझा पहिला प्रश्न." सुलोचना म्हणाली.

धीरसिंहाने यावर विनंती केली–"राजकुमारी मला एका आठवड्याचा अवधि मिळाला तर मी या प्रश्नाचे उत्तर देऊ शकेन."

सुलोचनेने ही गोष्ट मान्य केली.

आपल्या जीवनात साहस व पराक्रमालाच महत्व देणाऱ्या धीरसिंहाने तावडतोब मोठ्या उत्साहाने घोड्यावर मांड ठोकली आणि तो पूर्व दिशेकडे प्रयाण करून अखेर एका जंगलात पोचला. तेथे दोन कोल्हे रडत असलेले त्याला दिसले. धीरसिंहाला पशु पक्ष्यांची भाषा कळत असे. तो लगेच घोड्यावरून उतरला व रडणाऱ्या त्या कोल्ह्यांकडे जाऊन त्याने विचारले–"तुम्ही का रडत आहात?"

"येथून थोड्याच अंतरावर एका गुहेत एक गेंडा राहतो. तो आमच्या पिल्लांना नेहमीच पायाने तुडवून मारून टाकतो.





त्यामुळे आम्ही संतानसुखाला वंचित राहिलो आहोत." कोल्ह्यांच्या त्या जोडप्याने आपले रडण्याचे कारण सांगितले.

धीरसिंह तावडतोब त्या गुहेकडे निघाला. त्याने नर-कोल्ह्याला रस्ता दाखवण्यासाठी बरोबर घेतले. गुहेत गेंडा आरामात शांत झोपला होता! 'झोपलेल्या प्राण्यावर तलवार चालवणें योग्य नव्हे' असा विचार करून धीरसिंह जवळच्याच एका झाडावर चढून बसला. थोड्या वेळाने गेंडा झोपेतून जागा झाला आणि गुहेबाहेर आला. त्याला पाहून धीरसिंहाने एकदम झाडावरून त्याच्या अंगावर उडी मारली आणि कुऱ्हाडीने खचाखच वार करून गेण्डयाचे मस्तकच त्याने फोडून टाकले. गेंडा तडफडून मरून गेला.

धीरसिंहाचा हा पराक्रम पाहून कोल्ह्याचे जोडपे खूष झाले. कोल्हा म्हणाला–"राजपुत्रा, तुझे हे उपकार आम्ही जन्मात विसरणार नाही. सांग, तू या जंगलात कशासाठी आला होतास? कारण कळलं तर आम्हीही यथाशक्ति तुला मदत करू."

धीरसिंहाने आपल्या आगमनाचे कारण त्यांना सांगितले.

'आम्ही ही त्या आवाजाबद्दल ऐकले आहे. परंतु ते शब्द कोठून ऐकू येतात याबद्दल आम्हाला स्पष्ट अशी काहीच कल्पना नाही. तरीही मला वाटतं, की तुझ्यासारख्या वीराला अशक्य असे काहीच नाही. हे जंगल ओलांडून तू डावीकडे वळ. तू नक्कीच विजयी होशील." इतके बोलून कोल्ह्याच्या जोडप्याने धीरसिंहला निरोप दिला.

जंगल पार करून धीरसिंह पायीच झाडाझुडुपांनी भरलेल्या एका सपाट प्रदेशात पोचला. आराम करण्यासाठी तो एका झाडाखाली बसला. तेथे त्याला दोन साप दिसले. त्यातला मोठा सर्प छोट्या सापाला खाऊ पहात होता. छोट्या सापाचे रक्षण करण्याच्या हेतूने धीरसिंहाने म्यानातून तलवार उपसली. इतक्यात



दोन्ही साप अदृश्य होऊन त्या जागी दोन गन्धर्व दिसू लागले!

धीरसिहाने त्यांना विचारले–"तुम्ही लोक कोण आहात? एकमेकांना का सतावत होता?"

छोटा गन्धर्व म्हणाला–"मी लहानपणी याच्या बाबतीत काही चूक केली होती; तेव्हापासून त्याचा बदला घेण्याच्या प्रयत्नात असतो हा! अन् संधी मिळेल तेव्हा मला त्रास देत असतो."

"अनवधानाने कोणी काही चूक केली तर मोठया माणसांनी त्यांना नेहमी क्षमा करावी. म्हणून मला वाटतं, तुम्ही आपलं जुनं शत्रुत्व सोडून एकमेकांशी प्रेमाने वागावे; यातच तुमचं कल्याण आहे", असे सांगून धीरसिहाने त्यांना यासंबंधी बरेचसे दृष्टान्तही दिले.

धीरसिहाचे बोलणे ऐकून दोन्ही गन्धर्व प्रसन्न होऊन म्हणाले–"आमचं जुनं शत्रुत्व घालवून तू आम्हा दोघात मैत्री घडवून आणलीस, हा तुझा उपकार आम्ही कधीही विसरणार नाही. तुला आमच्याकडून काही मदत हवी असेल तर सांग, आम्ही जरूर करू. त्या निमित्ताने आम्ही तुझे थोडेसे उतराई होऊ शकू."

धीरसिहाने आपले त्या भागात येण्याचे कारण त्या गन्धर्वांना सांगितले.

"आम्हीही ते बोलणे ऐकले आहे. इथून थोडा पुढे गेलास आणि उजवीकडे वळलास की तुला एक तलाव दिसेल. अन् नंतर काय करायचे हे तुला तिथे पोचल्यावर आपोआपच कळेल. तू नक्कीच विजयी होशील आपल्या कार्यात!" असे म्हणून धीरसिहाला आशिर्वाद देऊन गन्धर्व अदृश्य झाले!

गन्धर्वांनी सांगितलेल्या मार्गाने जाऊन धीरसिह तलावापर्यन्त पोचला. विश्रांती घेण्यासाठी तो तलावाकाठी एका खडकावर बसला. त्याच वेळी तलावातून एक मत्स्य-कन्या बाहेर आली आणि धीरसिहाचा हात पकडून त्याला ती पाण्याच्या आत घेऊन गेली. तलावाच्या आत एक विस्तृत बगीचा होता. दूर काही झरे खळखळ आवाज करत वहात होते. विविध झाडे-वेली फळा-फुलांनी भरून जाऊन सुंदर दिसत होत्या! तळची जमीन इतकी छान हिरवीगार दिसत होती की जणू काही खाली पाचूच जडवले आहेत! उद्यानाच्या मध्यावर एक विशाल भवन होते. मत्स्य-कन्या धीरसिहाला त्या भवनात घेऊन गेली आणि एका विशाल मंडपात असणाऱ्या रत्नखचित सिहासनावर तिने त्याला बसवले. धीरसिहाला तिने पेला भर दूध दिले. मंडपाच्या चारी बाजूंना चार सुंदर रमणींची चित्रे क्रमाने लावलेली होती, परन्तु एक स्थान रिकामे होते. मत्स्य-कन्येने चटकन एक चित्र काढून ते रिकामे स्थान भरून टाकले.

धीरसिह त्या निर्जन महालातून बाहेर निघून आला. भुकेने व्याकुळ झालेल्या धीरसिहाने फळे तोडून खाल्ली, परन्तु त्याची भूक भागेना; झऱ्याचे पाणी तो प्यायला, पण त्याची तहान मिटेना!

सूर्यास्त होऊन चोहीकडे अन्धार पसरला, म्हणून धीरसिह परत त्या मंडपात गेला. त्याने मंडपात पाऊल ठेवल्याबरोबर तिथले सारे दिवे आपोआप पेटले. भितीवर असलेल्या चित्रातल्या पाचही तरुणी सजीव होऊन धीरसिहाला चारी बाजूंनी घेरून नाचू व गाऊ लागल्या! रात्रभर नाच-गाणे करून सकाळ झाल्याबरोबर त्या





पाचही जणी पुन्हा चित्रे बनून भिंतीवर लटकू लागल्या.

धीरसिंहाला अतिशय आश्चर्य वाटून तो, तो मंडप नीट निरखून पाहू लागला. त्याला असे आढळून आले की एका छिद्रातून मुंग्यांची एक रांग बाहेर येत आहे! त्याने त्या जागी भिंतीवर ठोकून पाहिले तर त्याला असे वाटले की भिंत नक्कीच आतून पोकळ असली पाहिजे. त्याने तावडतोब ती भिंत त्या जागी तोडली. त्यात त्याला एक कोनाडा दिसला. कोनाड्यात एक किल्ली ठेवलेली होती. ती किल्ली घेऊन त्या मंडपातल्या बन्द खोल्यांचे दरवाजे उघडायचा प्रयत्न त्याने केला. परंतु एकाही खोलीचा दरवाजा ती किल्ली उघडू शकली नाही. शेवटी एक खोली राहिली अन् आश्चर्य म्हणजे नेमक्या त्याच खोलीचा दरवाजा त्या किल्लीने उघडू शकला! त्या खोलीत एक छोटीशी लोखंडी पेटी ठेवलेली त्याला दिसली, पण पेटीला कुलूप लावलेले होते. त्या कुलुपाच्या किल्लीसाठी त्याने संपूर्ण खोली धुंडून पाहिली; पण काही उपयोग झाला नाही! तो अजूनही खोलीत इकडेतिकडे फिरत होता, तितक्यात अचानक त्याचा पाय एका खुंटीवर पडला. ती खुंटी जमिनीत समपातळीतच बसवलेली होती. ती कळ दाबली जाताच मोठा आवाज करत ती पेटी फटकन उघडली गेली. त्या पेटीत एक ताम्रपट होता. ताम्रपट हातात घेऊन धीरसिंहाने तो वाचून पाहिला. त्यावर लिहिलेले होते—"इथे सर्वत्र जादू भरलेली आहे. या उद्यानाच्या मध्यावरील सुवर्णवृक्ष जो समूळ उपटू शकेल, त्यालाच ही सर्व जादू कळेल."

धीरसिंह मोठ्या उत्साहाने उद्यानात गेला. ताम्रपटावर लिहिल्याप्रमाणे त्याला उद्यानाच्या मध्यावर एक सुवर्णवृक्ष दिसला, परंतु खूप प्रयत्न करूनही धीरसिंह तो वृक्ष जरासा सुद्धा हलवू शकला नाही! थोड्या वेळात त्याची दृष्टी मोठ्या वृक्षा जवळच असेलेल्या छोट्या स्वर्ण-रोपट्यावर पडली. त्याने ते रोप उपटून काढले अन् दुसऱ्याच क्षणी कडाकड आवाज करीत तो मोठा स्वर्ण वृक्ष धराशायी झाला! तो आवाज सहन न होऊन धीरसिंह बेशुद्ध होऊन खाली पडला. थोड्या वेळाने तो शुद्धीवर आला अन् त्याने डोळे उघडले, परन्तु ते उद्यान अन् तो मंडप वगैरे सर्व कोठे होते! सर्वच नाहीसे झाले होते. परंतु रात्री त्याला दिसलेल्या स्त्रिया आता धावतच त्याच्याजवळ आल्या अन् त्याला वेढून उभ्या राहिल्या.

धीरसिंहाने त्यांना विचारले—"तुम्ही सर्वजणी कोण आहात? ही सर्व कसली जादू आहे?"

"इथून दहा कोसावर असलेल्या मायावती नगरच्या आम्ही राजकन्या. उपवर झाल्यावर आमचे विवाह करून देण्याबद्दल आम्ही आमच्या पित्याजवळ आग्रह धरला. आमच्या अशा घाई करण्यावरून पित्याने रागवून आम्हाला या जादूमहालात कैद केले. आम्ही आमच्या अपराधाबद्दल क्षमा मागितली, तेव्हा ते म्हणाले—"जो वीर पुरुष तुम्हाला या जादूतून मुक्त करील तोच तुमचा पति बनेल." खूप काळानंतर ही जादू तोडणारे आपणच आहात; तेव्हा आता आपणाला आमच्याशी विवाह केला पाहिजे." पाचही मुली एका स्वरात म्हणाल्या.

"मी आत्ता एक विशेष समस्या सोडवण्यासाठी इकडे आलो आहे. लग्नाचा



विचारही करायला सध्या मला सवड नाही. मी आत्ता तुमची इच्छा पूर्ण करण्याच्या परिस्थितीत नाही, माफ करा मला." असे म्हणून धीरसिंह तेथून पुढे निघाला.

तो थोडासाच पुढे गेला असेल नसेल इतक्यात त्याला शब्द ऐकू आले–"एकदा मी पाहिले, पुन्हा पहायची माझी इच्छा आहे!" धीरसिंह एकदम जागीच उभा राहिला थोडा वेळ! अन् मग तो त्या दिशेने पुढे निघाला. त्याला एका झाडाखाली बसलेला एक दुर्बळ आणि हाडांच्या सापळ्यासारखा दिसणारा एक राजकुमार दिसला.

धीरसिंहाने त्याच्या जवळ जाऊन त्याला विचारले–"तू कोण आहेस अन् असा का हीन-दीन अवस्थेत इथे बसला आहेस?"

राजकुमार उत्तरला–"इथल्या जवळच्याच जादू-महालात प्रवेश करणाऱ्या अनेक राजकुमारांपैकीच एक मीही आहे. तेथल्या राजकुमारी पैकी एकीला पाहून मी वेडावलो अन् तिच्याशी विवाह करावा असे माझ्या मनाने घेतले; पण मी जेव्हां त्या भवनातून बाहेर आलो तेव्हापासून पुन्हा त्यात आत जाण्याचा रस्ताच मी विसरलो! मला ज्या राजकन्येशी विवाह करायची इच्छा होती, तिला मी एकदाच पाहिले; पण पुन्हा एकदा तिला पहायची माझी इच्छा तशीच राहून गेली."

ते ऐकून धीरसिंह त्या राजकुमाराला घेऊन त्या महालात गेला आणि त्याने त्या राजकन्येशी त्याचा विवाह लावून दिला.

यानंतर धीरसिंह कौशांबीला पोचला आणि सुलोचनेला भेटून त्याने तिला सर्व हकीकत सांगितली. तिच्या पहिल्या प्रश्नाचे उत्तर त्याने बरोबर दिले.

सर्व हकीकत ऐकून सुलोचना म्हणाली–"होय, माझ्या पहिल्या प्रश्नाचे उत्तर बरोबर आहे. ते शब्द ही आता ऐकू यायचे बन्द झाले आहे. दुसरा प्रश्न मी उद्या विचारीन." असे म्हणून सुलोचनेने धीरसिंहाचा निरोप घेतला.



# प्रतिज्ञा-भंग

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाकडे परत आला. झाडावरून त्याने प्रेत उतरवून खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन तो स्मशानाकडे चालू लागला. प्रेतात रहाणारा वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू बहुधा एकाद्या असमर्थ आणि धूर्त माणसाच्या तावडीत सापडून भूते प्रेते रहात असलेल्या या स्मशानात अशा मध्यरात्री संचार करत असला पाहिजेस–या विचाराने मला तुझी फार दया येत आहे. त्याला तू असं वचनही दिलं असावंस की तू त्याचं काम नक्की बरोबर करून देशील. पण अनेकदा श्रेष्ठ नीतिज्ञ आणि विवेकी माणसं ही काही वेळा विशिष्ट परिस्थितीत स्वार्थाच्या आहारी जाऊन दिलेला शब्द पाळत नाहीत–प्रतिज्ञाभंग करतात. याचे उदाहरण म्हणून मी तुला वज्रदेहाची गोष्ट सांगतो. आपले श्रम विसरण्यासाठी तू ही गोष्ट ऐक."

## वेताळाच्या गोष्टी



वेताळ गोष्ट सांगू लागला–सिंधूर देशाचा राजा सिंहभूपाल याला सुचित्रा नावाची एकुलती एक मुलगी होती. ती अत्यंत लावण्यवती होती. सिंहभूपाल आपल्या या कन्येच्या लग्नाच्या प्रयत्नात आहे अशी बातमी कळली तेव्हा अनेक राजकुमारांनी आपापल्या दूताकरवी आपण तिच्याशी विवाह करण्यास इच्छुक असल्याबद्दल संदेश पाठवले.

परंतु सुचित्राने आपल्या पित्याच्या कोणत्याही निवडीकडे लक्ष न देता प्रतिज्ञा केली की–"स्वत:ला पराक्रमी आणि वीर सिद्ध करून दाखवणाऱ्या तरुणाशीच मी विवाह करीन."

त्या देशाचा मंत्री भानुवर्मा याला चन्द्रवर्मा नावाचा मुलगा होता. मंत्री धूर्त आणि स्वार्थी होता, तर त्याचा हा मुलगा असमर्थ आणि भित्रा होता. चन्द्रवर्माच्या मनात विचार आला, कि काहीतरी उपाय करून आपण राजकन्येशी विवाह करावा. आपला हा विचार त्याने आपल्या पित्याला बोलून दाखवला.

मन्त्री भानुवर्मा ने थोडा विचार करून म्हटले–"मग एक छोटंसं साहस कर. आपल्या राज्याच्या पूर्व सीमेवर एक वाघ हल्ली माणसांचा संहार करीत आहे. तू त्या वाघाला मारायचा प्रयत्न कर; जर तू त्याला मारू शकलास तर युवराणीशी तुझा विवाह झालाच असे समज!"

चन्द्रवर्मा वाघ रहात असलेल्या जंगलात तर जाऊन पोचला. पण जंगलात आतवर घुसायचे धैर्य काही त्याला करवेना! त्याच वेळी एक भीमकाय माणूस एका भल्या मोठ्या वाघाला खांद्यावर टाकून येत असलेला त्याला दिसला!

त्याला पाहून चन्द्रवर्मा चकितच झाला! त्याने विचारले–"जरा इकडे ये रे बाबा, या भागातल्या माणसांना मारून खाणारा वाघ हाच काय? तुजजवळ तर काही हत्यार दिसत नाही! विन हत्याराने मारलंस तरी कसं याला?"



यावर तो भीमकाय माणूस हसून म्हणाला–"माझं नाव वज्रदेह. 'इथून पुढे असमर्थ अन् भित्र्या प्राण्यांवर कधीही हत्यार चालवणार नाही'–अशी प्रतिज्ञा करूनच धवलगिरीच्या बाहेर पडलो आहे. जंगलातल्या वाटेवर या वाघाने मला अडवले म्हणून माझ्या मुठीच्या एकाच बुक्क्यात त्याला खलास केलं अन् आपल्या खांद्यावर टाकून त्याला घेऊन आलो आहे."

हे ऐकून चन्द्रवर्माने एकदम वज्रदेहाच्या पायांवर लोळण घेतली आणि त्याला विनन्ती केली–"महाराज, हा मुडदा जर आपण मला देऊन टाकलात तर तो राजाला दाखवून मी त्याच्याकडून काही ना काही बक्षिस मिळवीन. मी भित्रा आहे, स्वत:च तलवार चालवण्याचे धाडस नाही माझ्यात."

चन्द्रवर्माकडे घृणेने भरलेल्या नजरेने पहात वाघाचे धूड तिथेच जमिनीवर टाकत वज्रदेह तेथून निघून गेला.

चन्द्रवर्मा नंतर ते वाघाचे प्रेत घेऊन राजासमोर येऊन पोचला आणि म्हणाला–"महाराज, मी हा वाघ मारला आहे. आपणच सांगा, माझ्यासारखा साहसी आणि पराक्रमी वीर कोणी असू शकेल?"



राजाने आपल्या बोटातली हिऱ्याची अंगठी काढून चन्द्रवर्माला बक्षिस देत म्हटले–"तू जर वाघ मारून स्वत:ला पराक्रमी समजत असशील, तर ज्या लोकांनी कित्येक राज्ये जिंकली अन् अनेक राक्षसांचा वध केला, त्यांना काय नाव द्यावं बरं?"

राजाचे बोलणे ऐकून चन्द्रवर्माचा चेहरा पांढरा पडला! त्यानंतर घरी जाऊन त्याने सारी हकिकत आपल्या वडिलांना ऐकवली. त्याचे सर्व बोलणे ऐकून मन्त्र्याने आपल्या मुलाला सल्ला दिला की–"तू ताबडतोब गुप्तहेर पाठवून वज्रदेहाला शोधून काढ आणि त्याच्यावर चांगली पाळत ठेव;



नाहीतर तुला राजकुमारीची प्राप्ति होणार नाही.

चन्द्रवर्माने गुप्त हेरांमार्फत वज्रदेहाचा पत्ता काढला आणि त्याच्यावर पाळत ठेवण्यासाठी त्याने दोन गुप्त हेर नेमले.

एके दिवशी वज्रदेह एका डोंगराळ भागातून चालला असता त्याला एका गुहेतून शब्द ऐकू आले–"माझ्या गुहेवरून पुढे जाण्याची हिम्मत कोण करत आहे? थांब तिथेच!"

वज्रदेहाने गुहेकडे नजर टाकली, तेव्हा गुहेतून गजबल नावाचा राक्षस हातात कुऱ्हाड घेऊन येत असलेला त्याला दिसला. त्याने एकदम झेप घेऊन राक्षसाच्या हातातील कुऱ्हाड हिसकून घेतली आणि सपासप वार करून त्याचे हात पाय कापून टाकले! इतके झाल्यावर तो पुढे चालू लागला.

हे सारे दृश्य गुप्तचर दुरून पहात होते. त्यांनी तावडतोब राजधानीत जाऊन चन्द्रवर्मा व भानुवर्मा या दोघांना हे वृत्त कळवले. भानुवर्माने तावडतोब आपल्या मुलाचे कपडे फाडले आणि त्याच्या अंगावर इकडे तिकडे थोड्या जखमा करून त्याला राजाकडे पाठवून दिले.

राजाकडे जाऊन चन्द्रवर्मा म्हणाला–"महाराज, मी गजबल नावाच्या दुष्ट राक्षसाशी भिडलो अन् घनघोर युद्ध करून शेवटी मी त्याचे हातपायच कापून टाकले. आता मला 'असामान्य वीर' म्हणायला हे काम पुरेसे आहे ना?"

राजा हसून उत्तरला–"तुझ्या असल्या नुसत्या गोष्टीवर मी कसा विश्वास ठेवू? एकदा तू आमच्याबरोबर जंगलात शिकारीला आला होतास आणि नुसत्या एका अस्वलाला पाहूनच घाबरून झाडावर चढून बसलास! मला चांगलं आठवतंय सर्व! ठीक आहे–तू सांगितलंस त्याच्या सत्यासत्यतेचा पडताळा मी पाहीन. दोन दिवस थांब."

त्यानंतर राजाने आपले गुप्तहेर पाठवून गजबलाबद्दलची खरी बातमी आणायला



त्यांना सांगितले. दोन दिवसांच्या आतच गुप्तचरांनी खरी गोष्ट जाणली.

वज्रदेहाचे शारीरिक सौष्ठव, पौरुष आणि त्याचे शालीनतापूर्ण वागणे पाहून राजाने ओळखले की हा नक्कीच एक पराक्रमी आणि साहसी वीर आहे. राजाने आता सुचित्रेचा विवाह वज्रदेहाशी करून देण्याची तयारी सुरू केली.

परंतु दुसऱ्याच दिवशी राजसभेत मन्त्री भानुवर्मा राजाला म्हणाला–"महाराज, आपला हा निर्णय मला जरा अधिक घाईने घेतला गेला असावा असं वाटतं. आपल्या राज्यातच याच्याहूनही पराक्रमी वीर असू शकतील की! तेव्हा पक्का निर्णय करण्यापूर्वी आपण काही क्षत्रियोचित अशा स्पर्धा घ्याव्या."

मन्त्र्याच्या या म्हणण्याला सर्वांनीच दुजोरा दिला. राजानेही मग तशा आशयाची दवंडी पिटवली.

दुसऱ्या दिवशी त्या स्पर्धा पहाण्यासाठी लोकांची खूप गर्दी लोटली. परंतु गजबलासारख्या राक्षसाला लोळवणाऱ्या वज्रदेहाशी लढायला कोणीच पुढे येऊ धजेना!

जवळजवळ एक तास असाच निघून गेला आणि लोकांच्या गर्दीतून वाट काढीत चन्द्रवर्मा अचानक तलवार उपसून पुढे आला आणि वज्रदेहाशी भिडला! हे पाहून



राजा, युवराणी आणि तिथे उपस्थित असलेले सर्वच लोक आश्चर्यचकित झाले!

वज्रदेहाने चन्द्रवर्माकडे एकवार तुच्छतेने पाहिले आणि आपल्या तलवारीने चन्द्रवर्माच्या तलवारीवर असा वार केला की ती त्याच्या हातातून सुटून दूर जाऊन पडली आणि उपस्थित सर्वांनी वज्रदेहाचा उत्साहाने जयजयकार केला!

ही गोष्ट सांगून झाल्यावर वेताळ म्हणाला–"राजा, अत्यंत साहसी अन् पराक्रमी अशा वज्रदेहाच्या पराक्रमाबाबत आणि अत्यंत भित्र्या अशा चन्द्रवर्माबाबतही माझ्या मनात कित्येक शंका उत्पन्न होत आहेत. असमर्थ आणि भित्र्या लोकांबद्दल

घृणा असणाऱ्या वज्रदेहाने चन्द्रवर्माचा भित्रेपणा माहीत असूनही त्याच्यावर तलवारीचा वार का केला? हा त्याचा प्रतिज्ञाभंग नव्हे का? त्याच्या मनात सिंधूर राजकन्या सुचित्रेशी विवाह करून तेथला राजा बनण्याचा मोह तर उत्पन्न नाही झाला? त्याचप्रमाणे वज्रदेहाचे धाडस आणि सामर्थ्य यांची पुरेपूर जाणीव असूनही चन्द्रवर्मा त्याच्याशी लढायला उभा कसा राहिला? राजकुमारीशी विवाह करण्याचा निश्चय मनात असल्यामुळेच त्याच्या हातून दुस्साहस आणि वीरतेची अशी चुणुक दिसली का? या शंकाचे उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझे मस्तक फुटून त्याचे तुकडे तुकडे होतील."

यावर विक्रमादित्याने असे उत्तर दिले– "वज्रदेह आणि चन्द्रवर्मा यांच्या वागणुकीबद्दल शंका घेण्याचे काही कारणच नाही. दोघांनीही आपल्या नैसर्गिक प्रवृत्तीला अनुसरूनच वर्तणूक केली आहे. वज्रदेहाच्या मनात भित्रेपणा आणि असमर्थता यांबद्दल जी घृणा होती तिच्या प्रेरणेमुळेच राजपरिवाराची प्रतिष्ठा आणि देशाचे भवितव्य यांचा विचार करून त्याने चन्द्रवर्मावर आक्रमण केले. त्याचे हे करणे स्वार्थाचे मुळीच नव्हे आणि त्याने प्रतिज्ञाभंगही केलेला नाही. आता राहिली चन्द्रवर्माची गोष्ट! तो आपल्याच पित्याच्या कारस्थानाला बळी पडला. चन्द्रवर्माला वाटले होते की वज्रदेहाच्या मनात भित्र्या माणसांबद्दल घृणा असल्याने आपल्याला पाहून आपल्याशी न लढताच स्वतःचीच तलवार फेकून देईल, अन् लोक आपल्यालाच पराक्रमी समजतील; आपल्याला राजकुमारीचा लाभही होईल! बस, इतकेच त्याचे खरे कारण, अचानक उत्पन्न झालेले दुस्साहस अन् वीरता वगैरे काहीही नाही!"

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासुद्धा अदृश्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन बसला! (कल्पित)





# खोटी स्तुति

शिवगिरी राज्याचा राजा विजयशील याच्या दरबारात रमानन्द नावाचा माणूस राजधानीच्या कोतवाल-पदावर काम करीत असे. आपल्या स्तुतिपाठकांवर राजा विजयशीलची खास मर्जी असे. ही गोष्ट माहीत असलेला हा कोतवाल संधी मिळेल तेव्हा राजाची अमाप स्तुति करी आणि अशा प्रकारे त्याने राजाची विशेष मर्जी संपादन करून घेतली.

रमानन्द पैशाचा लोभी होता. राजाशी असणाऱ्या आपल्या निकट संबंधाचा फायदा घेऊन तो व्यापारी लोकांना कायद्याची भीती दाखवून आणि धमक्या देऊन त्यांच्याकडून मोठमोठ्या रकमा वसूल करी, तर काही अपराध्यांकडून लाच घेऊन त्यांच्या शिक्षा माफ करी. या सर्व गोष्टी राजाच्या मंत्र्यांच्या लक्षात येत, पण राजाचे रमानन्दवर विशेष प्रेम असल्याने त्याच्याविरुद्ध काही कारवाई करायला तो धजत नसे.

एकदा दसऱ्याच्या उत्सवाच्या निमित्ताने राजधानीत नाटके करून दाखवण्याची योजना आखली गेली. नाटकात भाग घेणाऱ्या अनेक प्रमुख अधिकाऱ्यात रमानन्दही होता. त्याने राजाची भूमिका करून आपले चांगलेच अभिनय कौशल्य दाखवले. राजा प्रसन्न झाला.

नाटक संपल्यावर रमानन्दला बोलावून राजाने विचारले–"तू राजाच्या पात्राचा अभिनय इतका सहजसुंदर आणि छाप पाडील असा कसा काय केलास?"

यावर रमानन्द उत्तरला–"एकाद्या व्यक्तीच्या निकट संबंधात राहून त्याची वागणूक, त्याच्या आवडीनिवडी वगैरेंचा नीट बारकाईने अभ्यास केला तरच त्या व्यक्तीचा अभिनय अगदी हुबेहूब करण

आनन्द देशपांडे

शक्य होते; म्हणूनच एकाद्या आदर्श राजाचा व्यवहार कसा असतो याचे प्रत्यक्ष ज्ञान मिळवून मी हा अभिनय सफलतेने करू शकलो."

हे उत्तर ऐकून तर राजाचा आनन्द गगनात मावेना आणि त्याने आपला हार काढून रमानन्दला बक्षिस दिला!

जवळच उभे राहून हा सर्व तमाशा पहाणारा मंत्री मात्र बिचारा विवश होऊन गप्पच राहिला.

दुसऱ्या दिवशी जे नाटक दाखवले गेले त्यात रमानन्दने एका दरोडेखोराची भूमिका केली. हा अभिनयही राजाला अद्भुत वाटला. नंतर याही वेळी राजाने त्याला म्हटले–"रमानन्द, तू डाकूचाही अभिनय करून आपले अभिनयातले अद्भुत कौशल्य प्रकट केलेस. हे कसे काय शक्य झाले तुला?"

या प्रश्नाचे रमानन्द नीट उत्तर देऊ शकला नाही. जरा विचारातच पडला तो! मंत्र्याला मात्र रमानंदचे खरे स्वरूप प्रकट करण्याची चांगलीच संधी चालून आली.

त्याने राजाला म्हटले–"महाराज, काल आपल्या अभिनय-कौशल्याच्या रहस्याबद्दल रमानन्द काय बोलला हे आपल्या लक्षात असेलच. त्याच आधारे मला तर असं वाटतं की रमानन्दची एकाद्या डाकूशी गाढ मैत्री असली पाहिजे. नाहीतर आजच्या या नाटकातल्या डाकूचा अभिनय हा इतक्या स्वभाविकपणे, हुबेहूब करूच शकला नसता!"

मंत्र्याचे बोलणे ऐकून राजाच्याही मनांत शंका आली आणि त्याने तीक्ष्ण दृष्टीने रमानन्दकडे पाहिले. ती नजर पाहून रमानन्द गर्भगळितच झाला. थरथर कापू लागला तो आणि त्याने मान खाली घातली.

ही एक प्रकारची कबुलीच समजून राजाने रमानन्दला कैद केले. नंतर राजधानीत नीट तपास केला तेव्हा रमानन्दची लाचखोरी आणि अनैतिकता चांगलीच उघडकीस आली.







# ज्ञानाचा खजिना

## या महिन्याचे इतिहासप्रसिद्ध व्यक्तित्व



### श्री चैतन्य महाप्रभु

श्री चैतन्य महाप्रभु यांचा जन्म बंगालमधील नवद्वीप या गावी फेब्रुवारी १४८६ मधे झाला. यांना गौरांग या नावानेही संबोधले जात असे. ते मोठे प्रज्ञावान पंडित होते; पण वयाच्या चोविसाव्या वर्षीच घरदार सोडून ते संन्यासी बनले. हजारो लोकांच्या मनात कृष्णभक्तीची आवड आणि प्रेम उत्पन्न करीत ते वृन्दावन आणि त्यासारख्या इतर स्थानी फिरत राहिले. परंतु आपल्या आयुष्याचा अधिकांश काळ त्यांनी भगवान जगन्नाथाच्या पवित्र स्थानी जगन्नाथपुरीतच व्यतीत केला. धर्म आणि जातींच्या भेदाभेदावर त्यांचा मुळीच विश्वास नव्हता. त्यांच्या संपर्कात येणारा प्रत्येक जण त्यांच्या व्यक्तित्वामुळे प्रभावित होत असे. कठोर हृदयी माणूस मृदु बने आणि नास्तिक माणूस आस्तिक बने. ओरिसाचा राजा प्रतापरुद्र देव या संताला फार मान देत असे.

वैष्णव धर्माचा प्रसार करत आणि भगवान् विष्णुला समजून घेण्याची प्रेरणा देतदेतच वयाच्या ४८ व्या वर्षी हा महात्मा एके दिवशी अचानक अदृश्य झाला.

## तो कोण?

काही मुले नदीत आंघोळ करीत होती, तर काही पोहत होती. उन्हाळ्यातला एक मोठा रम्य दिवस होता तो! पाणी थंड होते अन् नदीचा प्रवाह ही शांत, गंभीर अन् आल्हादक होता.

एकाएकी नदीचे पाणी जोरात उसळले आणि मुलांना एका मगरीचे शेपूट दिसले! दुसऱ्याच क्षणी "अरे, मगरीने माझा पाय धरला!" असे ओरडणारा एक मुलगा त्या मुलांनी पाहिला.

नदीच्या किनाऱ्यावर उभी असलेली दोन मुले, त्या मुलाच्या आईला ही बातमी सांगण्यासाठी तिच्या घराकडे पळत सुटली, बिचारी घाबरून गेलेली अन् भांबावलेली आई धावतच नदी किनारी आली.

"आई, मला यातून वाचवण्याचा एकच उपाय आहे–मला तू देवाला अर्पण कर! करतेस आई?" मुलाने आईला ओरडून विचारले.

"करते रे बाळा, करते तुला देवाला अर्पण. देवा वाचव रे माझ्या बाळाला!" आईने ओरडून कबुली दिली.

अन् काय आश्चर्य! मुलाचा पाय सोडून मगर निघून गेली.

कोण बरं हा मुलगा?

पृष्ठ ८ पहा......

# आश्चर्यकारक डबा

**सूचना :**

पत्र्याचा झाकणाचा एक मोठासा डबा घ्या. त्याचे झाकण आणि तळ या दोन्हींच्या मध्यभागी दोन दोन भोके पाडा. नंतर रबराचा एकच एक लांब असा धाग्यासारखा तुकडा कापा. हा धागा झाकणाच्या आणि तळाच्या दोन्ही भोकातून ओवून घ्या.

झाकणाच्या बाहेर रबरी धाग्याच्या टोकांची गाठ मारण्यापूर्वी डब्याच्या आतील दोन धाग्यांपैकी एका धाग्यात एक जड असा नट किंवा गळ ओवून ठेवा (चित्र पहा). नट असा असावा की डबा जमिनीवरून घरंगळत सोडला तर हे वजन डब्याला आतून घासत रहाणार नाही. आता झाकण घट्ट बसलेले आहे आणि वजन आत लोंबत आहे अशा अवस्थेत डबा हळूच जमिनीवर घरंगळत सोडा.



**काय होते आणि का ?**

डबा थोडे अंतर घरंगळत जाईल, थांबेल आणि पुन्हा घरंगळत आपोआप परत येईल. असे अशामुळे घडते की एका धाग्यावर लोंबत असलेले वजन डबा घरंगळत असताना दुसऱ्या धाग्याभोवती लपेटून त्याला पीळ पडतो. डबा घरंगळायचा थांबला की वजन खाली ओढ घेत असल्यामुळे पीळ सुटू लागतो व डबा उलट घरंगळत येतो.

नेमके काय घडते हे कळत नसणारांना हा 'आश्चर्यकारक डबा' कोड्यात टाकेल. आपल्या मित्राला हे करूनच दाखवा न ?

हा डबा हातातल्या हातात अशा तऱ्हेने फिरवा की तो खाली जमिनीवर ठेवल्याबरोबर आपोआप घरंगळत तुमच्यापासून दूर जाऊ लागेल. करू शकाल असे ? पहा बरं करून ?

'व्हिम' चा मोठा पुठ्ठ्याचा किंवा तसा कुठलाही कागदाचा वजनाने हलका डबा घेतल्यास ही क्रिया यापेक्षा जास्त सहजपणे घडेल का ? घडायला पाहिजे. कारण ह्या कमी वजनानेही डबा घरंगळू शकेल.



## जगातील आश्चर्ये

# झिअसचा पुतळा

ख्रिस्तपूर्व ५ व्या शतकात ग्रीस देशात सुवर्णयुग नान्दले! महामुत्सद्दी पेरिक्लिस त्यावेळी सत्तारूढ होता.

ग्रीसमधील महान् शिल्पकार फिडियस याच काळात आपले नाव कमावून गेला. त्याचे पहिले महान् शिल्प म्हणजे अथेना देवीचा पुतळा! हा ४० फूट उंच पुतळा हस्तिदन्त व सोने यांपासून घडवलेला होता. अथेन्स शहराच्या मध्यभागी असणाऱ्या टेकडीवरील सुप्रसिद्ध पॅर्थेनॉन मन्दिरात ही मूर्ति विराजमान झालेली होती.

फिडिअसचे यानंतरचे व सर्वात महान् असे शिल्प म्हणजे सोने व हस्तिदंत यांपासून बनवलेला झिअसचा पुतळा! हा पुतळा एकाद्या धडधाकट व सशक्त अशा माणसाच्या सातपट मोठा होता! ही मूर्ति अत्यन्त आकर्षक होती व प्राचीन काळातील माणसे तिला 'जगातील सात आश्चर्यांपैकी एक' असे मानत.



# कार्थेजचा विध्वंस

इ. स. पू. तीनशे वर्ष या काळात सीरियाच्या किनाऱ्यावर रहाणाऱ्या फिनिशिअन नावाच्या वंशाच्या लोकांनी एक विशाल नगर निर्माण केले. ते कार्थेज नावाने प्रसिद्धीस आले. कार्थेज शहर व्यापार व उद्योगाचे फार मोठे केन्द्र होते.

कार्थेजपासून खूप दूर, पण जवळजवळ समोरच रोम शहर विकसित झाले. आणि ही दोन्ही शहरे एकमेकांची प्रतिस्पर्धी बनली. त्यांच्यात नेहमीच लढाया होत असत. या लढाया 'प्युनिक-युद्धे' म्हणून इतिहासात प्रसिद्ध आहेत.

प्युनिक युद्धात प्रथम कार्थेजचा पराभव झाला. त्यातून जरा ठीकठाक झाल्यावर त्यांनी हनिबाल नावाच्या निर्दय अशा सेनानीच्या आधिपत्याखाली सैन्य पाठवले. हनिबालने रोमन लोकांचा पराभव केला आणि नंतर तेथील नव्वद हजार स्त्री-पुरुषांची मोठ्या क्रूरपणे कत्तल केली. मूर्तिमंत मृत्यूच असा हा हनिबाल नंतर काही काळ तेथेच हुकुमशहा बनून राहिला. परंतु काही काळानंतर त्याच्या मातृभूमिच्या लोकांनी—कार्थेजिअन लोकांनी त्याला पैसे व अन्य जीवनावश्यक वस्तु पाठवणे बंद केले. नंतर आपल्या देशात एक चांगला अधिकारी म्हणून आपले भव्य स्वागत होईल अशी आशा मनात बाळगून तो कार्थेजला परतला. परंतु कारण काही असो त्याची ही आशा पूर्ण झाली नाही आणि निराश होऊन त्याने शेवटी आत्महत्या केली!



इकडे रोमने आपले पुनर्वसन सुरू केले आणि लवकरच सिपिओ नावाच्या सेनाधिपतीचा उदय झाला. त्याने आपले सैन्य घेऊन जाऊन कार्थेजला वेढा दिला. आणि त्या शहराचा इतर जगापासून सर्व प्रकारचा संबन्ध तुटला! अनेक दिवस-पर्यंत तेथील नागरिकांची उपासमार झाली. नंतर सिपिओने शहरात प्रवेश केला आणि त्याने तेथील सात लाखांपैकी साडे-सहा लाख लोकांची कत्तल केली! उरलेल्या अर्धा लाख लोकांना गुलाम म्हणून रोमला नेले गेले! नंतर रोमन लोकांनी कार्थेज शहराचा संपूर्ण विध्वंस केला! हा विनाश त्यांनी इतक्या मर्यादेपर्यंत केला की त्यांनी तेथे एकही इमारत, एकही खांब किंवा एकही भिंत उभी शिल्लक ठेवली नाही. नंतर त्यांनी शहराच्या अवशेषांवरून आपले नांगर फिरवले!

माणसांनी आपल्या हातांनी इतक्या मोठ्या प्रमाणावर केलेल्या विनाशाचे इतिहासातील हे पहिलेच उदाहरण होय; आणि एका हिंसेतून दुसऱ्या हिंसेला जन्म दिल्याचेही हेच उदाहरण होय.



## प्राचीन भारतात भटकन्ती



१. 'कर्नाटक' या शब्दाचा अर्थ काय ?

२. भारताबाहेरच्या कोणत्या देशाच्या राजधानीने 'अयोध्या' हे नाव धारण केले आहे ?

३. कोणते शहर एका किल्ल्याभोवती वसवले गेले ?
   (अ) त्या किल्ल्याचे नाव काय ?
   (ब) तो बांधायला सुरवात कोणी केली ? केव्हा ?
   (क) ती जमीन त्याला कोणी दिली ?

४. कलकत्त्यात इंग्रजांनी बांधलेल्या किल्ल्याचे नाव काय ?

५. कोणत्या मोगल बादशहाला त्याच्याच सेनापतीने कैद केले ?
   (अ) तो सेनापती कोण ?
   (ब) त्या बादशहाची सुटका कोणी केली ?

६. विक्रम शक कोणत्या इसवी सनापासून मोजले जाते ?

७. शालिवाहन शक वर्ष कोणत्या इसवी सनापासून मोजले जाते ?

८. गुप्त शक कोणत्या इसवी सनापासून मोजले जाते ?

## घटना, विज्ञान, आविष्कार आणि शोधांची दुनिया

१. चिनी सम्राटाच्या दरबारात कोणता युरोपियन माणूस उच्च अधिकारी बनला ?
   (अ) कोण होता हा सम्राट ?
   (ब) युरोपियन माणसाची ही साहसे उजेडात कशी आली ?

२. ब्रह्मपुत्रा, सिन्धु व सतलज या नद्यांचे उगम शोधून काढणारा युरोपियन कोण ?

३. माणसापेक्षाही हजारो वर्षांपूर्वी कागदासारखा पदार्थ कोण बनवत असे ?

४. कोणता प्राणी आपले पोट आतून बाहेर उलटवू शकतो ?

५. पाण्याच्या ग्लासातला बर्फाचा तुकडा विरघळला तर पाण्याची पातळी वाढेल काय ?

६. विमानाचा पहिला नमुना कोणी बनवला ?

७. चन्द्राचा पहिला फोटो केव्हा काढला गेला ?




१. विक्रमादित्याच्या दरबारातील नवरत्ने कोणती ?

२. 'नायमार' कोणाला म्हटले जाते ?

३. 'अल्वार' कोणाला म्हटले जाते ?

४. भारतातील पहिले ग्रन्थ कोणते ?
   (अ) ते किती आहेत ?
   (ब) ते कोणी रचले ?
   (क) ते एकत्रित कोणी केले ?
   (ड) वेदांचे दुसरे नाव काय ?
   (इ) त्यांना हे नाव का मिळाले ?

५. वेदांनंतर कोणत्या ग्रंथांची निर्मिती झाली ?
   (अ) ते किती आहेत ?
   (ब) त्यापैकी जास्त महत्वाचे किती ?

.....पान आठवर पहा

## सर्व भारतीय भाषांचा एक शब्द शिकू या !

**आसामी** : संधिया ; **बंगाली** : संध्या ; **इंग्रजी** : इव्हिनिंग ; **गुजराथी** : सांज ; **हिन्दी** : शाम ; **कानडी** : सांजे ; **काश्मिरी** : शाम ; **मल्याळी** : वैकुन्नेरम् ; **मराठी** : संध्याकाळ ; **उडिया** : संध्या ; **पंजाबी** : लोटावेला ; **संस्कृत** : संध्या ; **सिन्धी** : शाम ; **तमिळ** : मालै ; **तेलगु** : सायंकालम् ; **उर्दू** : शाम

## तुम्ही विश्वास ठेवाल ?

* कि ज्यूलियस सीझर एक रोमन सम्राट होता ?
* कि आकाशाचा रंग निळा असतो ?
* कि फक्त भारतातच हिन्दु बहुसंख्यांक आहेत ?

**अंहं, मुळीच नाही !**

* त्याची खूप इच्छा असली तरी ज्यूलियस सीझर 'सम्राट' पद कधीच जिंकू शकला नाही.
* आकाशाला कोणताच रंग नसतो. पृथ्वीच्या वातावरणातून सूर्यप्रकाश जात असताना त्याच्या परिणामाने आकाश निळे आहे असे भासते.
* नेपाळमधेही हिन्दूच बहुसंख्यांक आहेत.

# उत्तरावली

### तो कोण ?

आद्य शंकराचार्य

### इतिहास

१. कुरुनाडु या शब्दापासून बनलेल्या कर्नाटक या शब्दाचा अर्थ आहे—भव्य धरती

२. थायलंडची राजधानी.

३. आजचे मद्रास शहर.
(अ) सेंट जॉर्ज किल्ला.
(ब) ईस्ट इंडिया कंपनीतला फ्रान्सिस.
(क) चन्द्रगिरिचा राजा.

४. १६७६ ते १७१५ या काळात बांधला गेलेला फोर्ट विल्यम.

५. जहांगीर बादशहा.
(अ) महाबतखान.
(ब) बेगम नूरजहानच्या कौशल्याने.

६. इ.स.पू. ५८ पासून.

७. इ.स. ७८ पासून.

८. इ.स. ३१९-२० पासून.

### विज्ञान

१. मार्को पोलो.
(अ) कुब्लाखान.
(ब) इटलीला परत आल्यानंतर, मार्को पोलोला एका लढाईत पकडून कैद केले गेले. तुरुंगात असताना त्याने आपल्या आठवणी सांगितल्या.
(क) त्याचे वडील निकोलो पोलो.

२. स्वेन अँडर्स हेदिन (१८६५-१९५२)

३. गांधिलमाशी.

४. स्टार फिश.

५. नाही.

६. लिओनार्दो द व्हिन्सी.

७. १८४१ मधे.

### साहित्य

१. कालिदास, वेतालभट्ट, घटकर्पर, वराहमिहिर, क्षपणक, अमरसिंह, वररुचि, शंकु आणि धन्वन्तरी.

२. प्राचीन तमिळ प्रांतातले शैव-साधु.

३. प्राचीन तमिळ प्रांतातले वैष्णव-साधु.

४. वेद.
(अ) चार.
(ब) जुन्या जमान्यातल्या अनेक साधु संतांनी.
(क) वेद व्यास.
(ड) श्रुति.
(इ) कारण ते लिहिले गेले नव्हते, त विद्वान पंडितांच्या पिढ्यांनी पाठ करून ठेवले होते. ('श्रुति' म्हणजे जे ऐकले गेले ते.)

५. उपनिषदे.
(अ) एकशे आठ.
(ब) सोळा.



महाकाव्य कथा :

# जडावाचे नूपुर - ४

पुंपुहार नगरचा व्यापारी कोवलन नर्तकी माधवीच्या संगतीत अधिक वेळ घालवीत राहिला. नंतर त्याला जेव्हा चूक कळून आली, तेव्हा तो पत्नीकडे परत आला. कण्णगी आणि कोवलन पुंपुहार नगर सोडून उद्योगाच्या शोधार्थ मदुरा नगरीत पोचले.



कोवलनला वाटलं आपल्या बायकोने दिलेला एक नूपुर विकून मिळणाऱ्या पैशातून एक नवा व्यापार सुरू करावा. कोवलनने दरबारी सोनाराला नूपुर दाखविला. असा मूल्यवान नूपुर कोवलन जवळ पाहून सोनाराला मोठे आश्चर्य वाटले.





त्याच सुमारास राणीच्या पायातील एक नूपुर चोरीस गेला. सर्वांच्या मनात संशय आला की सोनारानेच नूपुर चोरला असला पाहिजे. कोवलन जवळील तो मौल्यवान नूपुर पाहून तो राणीचाच असला पाहिजे अशी सोनाराने कल्पना केली आणि राजाला चोर पकडून देण्यात मदत करण्याचे आश्वासन दिले.



राजाने सोनाराच्या सांगण्यावर विश्वास ठेवला आणि घाई-घाईत आपल्या शिपायांना आज्ञा दिली की राणीचा नूपुर चोरणाऱ्या त्या चोराचा वध केला जावा.

शिपायांनी सोनारा बरोबर जाऊन कोवलनला पाहून घेतलं. सोनाराने सांगितलेला नूपुर कोवलन जवळ पाहून त्यांनी त्याला कैद केले आणि राजाच्या आज्ञेनुसार त्याचा वध केला.





इकडे कण्णगी घरी पतीची वाट पहात होती की तो पैसे घेऊन लवकरच येईल. पण तिला आपल्या पतीच्या मृत्युची बातमी मिळाली. तिला मोठे आश्चर्य वाटले. व्याकुळ होऊन रडत रडत ती शहराकडे जाता जाता ओरडू लागली–"परमेश्वर नाहींच का? या नगरीत कोणी इमानदार माणूस शिल्लक उरला नाहीं?"

कण्णगीचा क्रोधावेश पाहून नागरिक तिच्या भोवती जमा झाले. तिची व्याकुळ अवस्था पाहून लोकांना वाटलं की तिच्या नवऱ्याच्या बाबतीत खरो-खरीच काही तरी घोर अन्याय झालेला असला पाहिजे. सर्व लोक भयभीत झाले.





कण्णगीने राजदरबारात प्रवेश केला आणि आवेशाने ती म्हणाली– "महाराज, पहा–माझ्या नूपुरात मोती नाहीत. माणिक जडवलेले आहेत." असं म्हणून तिने आपला नूपुर राजा-पुढे जमिनीवर भिरकावला. त्यातले माणिक चारी बाजूंना विखरून पडले. ते दृश्य पाहून राजाला आपण जे केले त्याचा पश्चात्ताप झाला. अत्यन्त दुःखात राजाचा अंत झाला.

राजाच्या मृत्युचा राणीवर गंभीर आघात झाला. दुःख सहन न होऊन ती बेशुद्ध झाली. खरं म्हणजे राजाच्या मृत्युचे कारण होते की त्याने एका निरपराधी माणसाला मृत्युदंड दिला होता. राजाच्या मरणाच्या आघाताने तळमळून राणीने प्राण सोडला.





इतके झाल्यानंतर ही कण्णगीचा राग शमला नाही. तिने तिनदा नगर-प्रदक्षिणा केली. तिला वाटलं राजा अत्याचारी असला म्हणजे त्याच्या नगरीत सर्वत्र दुष्टांचा सुळसुळाट असतो. भावनेच्या भरात कण्णगीने शाप दिला की सर्व मदुरा नगरी बेचिराग होऊन जाईल.

एकाएकी संपूर्ण मदुरा शहर अग्निज्वालात लपेटले. पवित्रात्मे, उत्तम स्त्री-पुरुष, वृद्ध, मुले, विकलांग आणि पशूंचे मात्र संरक्षण करण्याची कण्णगीने अग्निदेवाला विनंती केलेली होती, त्यामुळे हे सर्व अग्निच्या प्रकोपातून वाचले.





असं म्हणतात की कण्णगी व कोवलन यांना एका उत्तम रथावर आरूढ होऊन स्वर्गाकडे जाताना काही पुण्यात्म्यांनी पाहिलं होतं. त्या दिवसापासून कण्णगीची केवळ एक आदर्श पत्नि म्हणूनच नव्हे तर एका आदर्श देवीच्या स्वरूपांत पूजा केली जाते. धर्म आणि सदाचाराची प्रतीक म्हणून आज ही कण्णगी शोभायमान आहे.



# पिशाचिनीची शंका

विद्याधरपुर आणि वैशाली नगर यांच्या मधे असलेल्या दाट जंगलातल्या एका पायवाटेच्या बाजूला असलेल्या वडाच्या झाडावर दोन खोडकर पिशाचिनी रहात असत.

त्यांच्यातली एक म्हातारी होती आणि दुसरी होती तरूण. पायवाटेवरून जाणाऱ्या-येणाऱ्या वाटसरूचे चेहरे पाहून त्यांच्या मनाचा नेमका कमकुवतपणा काय आहे हे ओळखण्याच्या कलेत म्हातारी पिशाचिनी निपुण होती, अन् एकदा एकाद्याचा दुर्बळपणा कळला की त्याला आपल्याकडे आकृष्ट करून घेऊन आपल्या मनाप्रमाणे नाचवण्यात तरूण पिशाचिनी तरबेज होती.

एके दिवशी दोघीजणी झाडावर बसून गप्पा मारत होत्या. त्यावेळी त्यांच्यापुढे प्रश्न उभा राहिला की माणसाच्या मनाची सर्वात मोठी दुर्बलता कोणती?

वृद्ध पिशाचिनीने शेवटी निर्णय दिला की–"ज्या दौर्बल्यामुळे संपूर्ण समाजालाच त्रास होतो त्यालाच आपण 'सर्वांत मोठे दौर्बल्य' असे म्हणू शकू."

परंतु त्या दौर्बल्याची बरोबर व्याख्या त्या दोघीही करू शकेनात. त्याच वेळी त्या पायवाटेवरून एक वाटसरू येताना दिसला.

म्हाताऱ्या पिशाचिनीने त्याचा चेहरा निरखून पाहिला, पण ती त्याची कमजोरी ओळखू शकली नाही. याचे कारण असे की त्या माणसाचा चेहरा अत्यंत गंभीर आणि निर्विकार होता.

वृद्ध पिशाचिनीला तर काही सांगता आले नाही, पण त्या तरूण पिशाचिनीने मोहोरांनी भरलेली एक थैली निर्माण केली आणि तिने ती पाउलवाटेच्या मध्यावर टाकून ठेवली. पण त्या वाटसरूने थैली उचलली नाही.

रवि भागवत



परंतु यावेळी तर हा वाटसरू धनाची पर्वाही न करता पुढे निघून गेला, हे पाहून तरुण पिशाचिनी आणखीनच हट्टाला पेटली! ती तावडतोब झाडावरून खाली उतरली आणि एक अपूर्व लावण्यवतीचे रूप घेऊन त्याच्या पुढे येऊन ठाकली!

परंतु वाटसरू तिला पाहूनही बेपर्वाईने पुढेच निघाला. ती तरुणी हे पाहून काटा मोडल्याचे निमित्त करून जोराने किंचाळली अन् एकदम खाली कोसळली!

हे पाहून वाटसरू परत मागे फिरला आणि त्याने तरुणीच्या पायातला काटा काढून टाकला. दुसऱ्याच क्षणी तिने त्याचा हात धरला आणि उठून ती त्याच्याशी प्रेमालाप करू लागली; म्हणाली–"कसं बरं सांगू! मला तुम्ही किती आवडलात! लग्न करा नं माझ्याशी?"

यावर चिडून तो म्हणाला–"मी तुझ्या पायातला एक छोटासा काटा काढला तर माझ्याच मागे लागलीस होय; दुसऱ्या कुणी काटा काढला असता तर त्याच्या मागे लागली असतीस! हे कसलं प्रेम. मला असल्या प्रेमाची अगदी घृणा वाटते!" असे म्हणून तो वाटसरू आपल्या वाटेने निघून गेला.

निराश होऊन परत आलेल्या तरुण पिशाचिनीला पाहून म्हातारी म्हणाली– "आता तू पहातच रहा, मी कसं बरोबर नाचवते त्याला!" आणि ती तेथून अदृश्य झाली.

वाटसरू आपल्या वाटेने चालला होता. त्याला एकदम बाजूच्या झाडीतून कोणाच्याशा कण्हण्याचा स्वर ऐकू आला– "मला कोणी पाणी द्या हो, तहान लागलीय् मला खूप! वाचवा!"

वाटसरूने एकदम थांबून झाडीत डोकावून पाहिले, तो तेथे राजाच्या वेषात असणारा एक माणूस पडलेला होता. त्याच्या अंगावर ठिकठिकाणी जखमा झाल्या होत्या. वाटसरूने तावडतोब आपल्या लोटयाने पाणी आणून त्याला पाजले.



थोड्याच वेळात तो माणूस चांगला सावध होऊन बसला आणि म्हणाला– "तू माझे प्राण वाचवलेस बघ. मी या देशाचा राजा आहे. शिकारीला इकडे आलो होतो आणि स्वतःच जखमी होऊन बसलो. तू माझ्याबरोबर राजधानीला चल. मी तुला चांगला अधिकारी करीन."

वाटसरू यावर हसून म्हणाला–"तहानेने व्याकुळ झालेल्याला पाणी पाजणं हा तर मानव धर्मच आहे. मी विशेष ते काय केले? मी कसल्या फळाची अपेक्षा करत नाही." इतके बोलून तेथूनही तो निघून गेला.

वाटसरू पुढे गेल्याबरोबर तरुण पिशाचिनी राजाच्या वेषातल्या वृद्ध पिशाचिनी जवळ जाऊन म्हणाली–"मला तर वाटतं की या वाटसरूला कशाचाच मोह नसावा!"

"ऐक, या जगात प्रत्येकाचीच काही न काही दुर्बलता असतेच. चल आपण आता मानवरूपाने त्याचा पाठलाग करून त्याचं दौर्बल्य ओळखून काढू." म्हातारी म्हणाली.

दुसऱ्याच क्षणी त्या दोघी बापलेकांचं रूप घेऊन चालू लागल्या. एका झाडाखाली आराम करत बसलेला तो वाटसरू त्यांना दिसला आणि त्या दोघीही आपण यात्रेकरू असल्याचं भासवत त्याच्याजवळ जाऊन बसल्या. तिघांच्या आता गप्पागोष्टी सुरू झाल्या.

थोड्याच वेळात वाटसरूने वाटेतले आपले अनुभव सांगायला सुरुवात केली.

सर्व हकीकत सांगून त्याने विचारले– "तुम्हीच सांगा. माझ्यासारखा धनाची लालूच नसणारा, रूपसौंदर्यावर न भाळणारा आणि यशाची आशा न धरणारा माणूस तुम्ही कुठे पाहिला आहात?"

"नाही, नाही. खरंच असा माणूस आम्हाला कधी दिसला नाही." दोन्ही पिशाचिनी म्हणाल्या.

हे ऐकून वाटसरू खूष झाला. आणि त्यांना आपल्या बालपणच्या गोष्टी सांगू



लागला. स्वतःच्या स्वभावातील विशेष गुण आणि त्यांच्या योगाने आपण आपले भविष्य कसे बनवत आहोत वगैरे गोष्टी विस्तारपूर्वक सांगितल्या.

दोघी पिशाचिनी बराच वेळ ते वर्णन शांतपणे ऐकत राहिल्या. परंतु वाटसरू आत्मप्रशंसा करतच राहिला. शेवटी त्या दोघींची सहनशक्ति संपत आली आणि त्यांच्या पोटातही गलबलल्यासारखे होऊ लागले. त्यांच्या मेंदूलाही मुंग्या आल्या-सारखे वाटू लागले. आणखी थोड्या वेळाने त्यांच्या कानांचे पडदे फाटू लागले. आणि डोळयातून पाणी येऊ लागले! तरीही वाटसरू आपली कहाणी सांगतच राहिला! शेवटी त्यांची सहनशक्ती अगदीच संपून गेली आणि त्या तेथून अचानक अदृश्य होऊन आपल्या वडाच्या झाडावर येऊन पोचल्या.

"बाप रे! काय माणूस होता हा! त्याने तर आपलं डोकंच खाऊन टाकलं!" तरुण पिशाचिनी म्हणाली.

यावर म्हातारी म्हणाली–"डोकं खाल्लं तर खाल्लं, काही विशेष नाही बिघडलं! पण आपल्या प्रश्नाचं उत्तर मात्र मिळालं!"

तरुण पिशाचिनी आश्चर्याने तोंडाकडे पाहू लागली.

आरामात फांदीला चिकटून बसत म्हातारी म्हणाली–"पाहिलंस ना! माण-साचा मोठा दुबळेपणा म्हणजे–आत्मप्रशंसा करणे. एकाद्या माणसात दुसरी कोणती दुर्बलता नसेल, अन् त्याला फक्त आत्म-स्तुति करण्याचीच सवय असेल, तरीही त्यामुळे त्याच्या इतर गुणांचे मोल रहात नाही. माणसाने दुसऱ्यांचे गुण ओळखायचा प्रयत्न करावा, पण आत्मस्तुति कधीच करू नये. पण ही गोष्ट ज्यांना कळत नाही त्या व्यक्तीचे महत्त्व इतरांच्या दृष्टीने शून्य! नेहमीच दुसऱ्यांना सतावणाऱ्या आपणाला हा माणूस मात्र सवाई भेटला. त्यानेच आपल्याला छान नाचवलं बरं का!"

वृद्ध पिशाचिनीचे हे बोलणे पटून तरुण पिशाचिनीने आपले डोके होकरार्थी हलवले!





# कृष्णावतार

एक दिवशी रात्री श्रीकृष्णाने आपले वडील घरी असताना एका अडचणी वर गंभीरपणे विचार केला. आपल्या वंशातील लोकांसाठी वैभवसंपन्न द्वारकानगरी तयार झाली. परंतु सुखाने जीवन जगण्यासाठी काही स्थायी व्यवसायांची व्यवस्था होऊ शकली नाही. म्हणून त्याने मनोमन शंखनिधिचे स्मरण केले. ताबडतोब शंख-निधि प्रगट होऊन तिने कृष्णाला नमस्कार केला व विचारले–"भगवन्, आपणास का बरे माझी आठवण झाली? आपण जसा आदेश द्याल त्याप्रमाणे मी त्याचे पालन करीन."

श्रीकृष्ण म्हणाला–"हे निधि देवी, गरीब माणूस हा मेल्याप्रमाणेच असतो. माझ्या कुळांतील अनाथ, दुःखी व दीन-दरिद्री लोकांची अवस्था माझ्याच्याने पाहवत नाही. तू काही व्यवस्था कर की कुटुंबे सुख-समृद्धिपूर्वक राहतील."

"जशी आज्ञा!" म्हणून शंखनिधि तेथून अदृश्य झाली आणि बाकीच्या आठ निधींना श्रीकृष्णाची इच्छा सांगितली. लगेचच द्वारका नगरी नव-निधींनी समृद्ध झाली. त्या नगरीत नावाला कोणी गरीब माणूस राहिला नाही. सर्वत्र सुख-समृद्धि नांदू लागली.

अशाच रीतीने श्रीकृष्णाने एकदा वायु देवाचे स्मरण केले. वायुदेव प्रकट होऊन श्रीकृष्णाला प्रणाम करून त्यांच्या समोर उभे ठाकले.

१६. रुक्मिणीच्या विवाहाचा प्रयत्न



कृष्णाने निवेदन केले–"वायुदेव, बल पराक्रमाच्या बाबतीत आपली बरोबरी करू शकणारा कोणी नाही. आपण माझ्यावर एक उपकार करावा. इन्द्रासाठी विश्वकर्म्याने सुधर्मा नावाचे एक सभा-भवन बनवून दिले आहे. आमच्या यादवांना ही सभा-सभारंभासाठी एकादे विशाल भवन आवश्यक आहे. म्हणून आपण जाऊन इन्द्राला माझा आदेश कळवावा व ते सभा-भवन इथे आणून स्थापित करावे."

वायुदेवाने श्रीकृष्णाच्या आज्ञेचे पालन केले नि तो इन्द्र लोकात गेला. देवतांना श्रीकृष्णाची इच्छा सांगितली. त्यांची स्वीकृति मिळवून वायुदेव सुधर्मा सभा-भवन द्वारकेत घेऊन गेला आणि तेथे त्याची स्थापना केली.

अशा रीतीने श्रीकृष्णाने सर्व लोकांतील उत्तमोत्तम वस्तु आणून द्वारका नगरीला सुशोभित बनविले. नंतर श्रीकृष्णाने आपल्या शासनाचे नीट परीक्षण करून प्रमुख पदांवर योग्य व्यक्तींची नियुक्ति केली. त्या नगरीचे राजपद उग्रसेनाला दिले. काश्यप नांवाच्या एका ब्राह्मणाला राज-पुरोहित नेमले. विकद्राला मंत्री-पद दिले आणि शासनाचे अन्य विविध विभाग संभाळण्यासाठी दहा प्रमुख यादवांची नियुक्ति केली. दारुकाला श्रीकृष्णाचा सारथी बनविण्यात आले. अस्त्र-शस्त्र विद्येत केवळ द्रोणाचार्यांची बरोबरी करू शकणाऱ्या सात्यकीला सेनापति पदावर नेमले.

अशा प्रकारे जनतेचे जीवन सुव्यवस्थित झाल्यावर द्वारकानगरी भूलोकावरील स्वर्गा-प्रमाणे शोभायमान झाली. रैवताला रेवती नावाची एक सुंदर मुलगी होती. तिच्याशी बलरामाचा विवाह संपन्न झाला, यानंतर श्रीकृष्णाचा विवाह झाला. त्याची कथा अशी–

विंध्याचलाच्या दक्षिणेला एक विदर्भ नावाचे राज्य होते. त्यात कुंडिन राज्यावर भीष्मक राजा राज्य करीत असे. त्याला एक मुलगा होता, त्याचे नाव रुक्मि. रुक्मि पराक्रमी वीर होता. द्रुम नावाच्या एका गुरुकडून त्याने अनेक अस्त्रे व परशुरामा-कडून ब्रह्मास्त्र मिळविले होते. तो प्रथम पासूनच श्रीकृष्णाचा द्वेष करीत असे.

रुक्मिला एक बहीण होती, तिचे नाव रुक्मिणी. ती मोठी सुंदर आणि तेजस्विनी होती. तिन्ही लोकी ती आपल्या सौंदर्या-बद्दल प्रसिद्ध होती. थोडक्यात तिची महानता सांगायची म्हणजे ती श्रीकृष्णाच्या प्रेमाला पात्र ठरली. मन्मथाने पुन: तिच्या पोटी जन्म ग्रहण केला. मुनींनी एका देवीच्या स्वरुपात तिची आराधना केली. याहून अधिक तिच्या विषयी काय सांगावे?

श्रीकृष्णाला रुक्मिणीच्या विशेष गुणांची माहिती आपल्या काही जवळच्या लोकांच्या तोंडून मिळाली. अशाच प्रकारे रुक्मिणीला पण आपल्या काही जवळच्या लोकांकडून श्रीकृष्णाचा महिमा कळला. दोघांच्या मनात एकमेकां विषयी प्रेम निर्माण झाले. दोघे ही एकमेकांसाठी व्याकुळ होऊन राहिले.

कृष्णाच्या मनात याबाबत पूर्ण विश्वास होता की त्याने मनोमनी ज्या युवतीला वरले आहे, तिच्यापासून त्याला दूर करण्याची क्षमता साऱ्या जगात कोणाजवळ नाही. रुक्मिणी नित्य कृष्णाचेच ध्यान करीत असे. पण रुक्मिला हे पसंत नव्हते.



त्याला वाटायचे की नंदगोपाकडे गुराख्याचे काम करणाराचा आपल्या वंशाशी संबंध कसा जोडायचा?

याच सुमारास मगध देशांतील गिरिव्रज-पुरचा राजा जरासंधाने रुक्मिकडे निरोप पाठविला की त्याने आपली बहीण शिशु-पालाला द्यावी. शिशुपाल जरासंधाचा पाळलेला मुलगा होता. त्याचे खरे वडील होते दमघोष. त्याची आई वसुदेवाची बहीण श्रुतश्रवा होती. दमघोष आणि जरासंध व्याही होते. म्हणून जरासंधाच्या मागणीनुसार दमघोषाने आपल्या चार मुलांपैकी थोरला मुलगा शिशुपालाला दत्तक दिला.



शिशुपालाचे दुसरे नाव होते सुनीथ. जरासंधाचा निरोप मिळाल्यावर रुक्मिणीचे वडील भीष्मक यांनी शिशुपाल बरोबर रुक्मिणीच्या विवाहास संमति दिली. खरं म्हणजे भीष्मकाला रुक्मिणीचे लग्न कृष्णाशी व्हावं असंच वाटत होतं. पण त्याला हे ही माहीत होतं की त्याचा मुलगा रुक्मि याचे कृष्णाशी वैर आहे. रुक्मिने ही आपली बहीण रुक्मिणीचा विवाह शिशुपालाशी व्हावा अशी इच्छा प्रकट केली. भीष्मकाला आपल्या मुलाला नाराज करायचं नव्हतं म्हणून त्याने अनिच्छेने ही संमति दिली.

आपली इच्छा पूर्ण झाल्यावर प्रसन्न होऊन जरासंधाने आपले नातेवाईक व मित्र-आप्तेष्टांना शुभ-विवाहाच्या निमंत्रण-पत्रिका पाठविल्या. अंग, वंग, कलिंग, पौंड्र, पाण्ड्य, काश, करूश इत्यादि अनेक राज्यांचे राजे लग्न-समारंभात सामिल होण्यासाठी निघाले. शिशुपाल बरोबरच्या लोकात करुश राजकुमार पौंड्रक वासुदेव, एकलव्याचा मुलगा वीर्यवंत, दंतावक्त्राचा मुलगा सुवक्र आणि आणखी अनेक राजकुमार होते. अशा प्रकारे सर्व लवाजम्यासह जरासंध कुंडिन नगरांत येऊन पोंचला.

रुक्मिने अनेक रथ, हत्ती आणि घोड्यांसह पुढे होऊन जरासंधाचे स्वागत केले. त्याचा यथायोग्य सत्कार करून निवासाची सर्व व्यवस्था केली.

राजपुरोहितांनी मुहूर्त शोधून काढून दुसऱ्याच दिवशी लग्न निश्चित केले. साऱ्या नगर भर दवंडी पिटवण्यात आली. सर्व राजांनी आपापले सैन्य सुसज्ज केले. शिशुपालाने वराची वस्त्रे परिधान केली. आपल्या मित्रमंडळीत तो अत्यन्त आनन्दी दिसत होता.

याच वेळी द्वारकेत नारद मुनि येऊन पोंचले. गोरे गोरे अंग, स्वर्णिम कांतीने चमचमणारा जटा-बंध, देहावर धारण केलेले मृगाजिन, डोक्यावर मयूर-पंखांचें छत्र आणि वायुच्या आघाताने छेडली जाणारी वीणा—अशा या व्यक्तीला पाहून द्वारकावासीयांना आश्चर्य वाटले. नारदाच्या आगमनाची वार्ता ऐकून महाराज उग्रसेन, वासुदेव, श्रीकृष्ण आणि बलराम व नगरांतील अन्य प्रमुख यादव यांनी पुढे होऊन नारदाचे स्वागत केले आणि आदरपूर्वक सुधर्म सभाभवनात एका सुवर्णासनावर त्यांना बसविले. त्यांनी नारदाची अर्घ्य पाद्य-पूजा केली.

श्रीकृष्णाने सर्वांना यथास्थानी बसविले नि स्वत: आपल्या आसनावर बसून प्रणाम करून नारदाला म्हटले—"नारद, आपण खुशाल आहात ना? सर्व जगातील लोक आणि देवता सकुशल आहेत ना? तुम्ही सर्व लोकात संचार करता. तुम्हाला सर्व ठिकाणच्या बातम्या कळतात. इथे येण्याचे काही तरी विशेष कारण असणारच! आमच्या यादव कुलाचे काही भले करण्यासाठीच आला असाल ना? तुमच्या आगमनाने आम्ही धन्य झालो, यात काही शंका नाही!"

श्रीकृष्णाने केलेली स्तुति ऐकून प्रसन्न होऊन नारद म्हणाले—"तुमचे केवळ स्मरण केले की प्राणी-मात्राचे शुभ होते. युगानुयुगे सतत आपल्या चरण-सेवेत जे रममाण झाले आहेत, त्यांचे कुशल-क्षेम विचारण्याची आवश्यकताच काय?"

असे म्हणून नारदाने आपल्या वीणेच्या तारा छेडल्या आणि श्रीकृष्णाला प्रसन्न करण्यासाठी वीणेतून मधुर आलाप काढले.





मत्स्य अवतारापासून रामावतारापर्यंत सर्व अवतारांचे यशोगान केले. त्यानंतर श्रीकृष्णाच्या बाल-लीला, साहस-पराक्रमा-च्या गाथा, कालियामर्दन, गोवर्धन-उद्धार, कंस-वध इत्यादींची संगीत-स्तुति केली. नारदाची गीते ऐकून सर्वांना संतोष झाला. नारदाने आपल्या गीतात आपल्या ज्या आराध्य देव श्रीकृष्णाची स्तुति केली, तो तर द्वारकावासियांचा मित्र व लोकप्रिय नेता आहे म्हणून त्यांना अत्यंत आनन्द झाला. नारदाने आपले संगीत संपवून वीणा एका बाजूला ठेवली. आता त्यांच्या तोंडून अनेक बातम्या ऐकायला लोक आतुर झाले.

श्रीकृष्णाने हंसत हंसत नारदाकडे पाहिले आणि म्हणाला–"नारदा, तुम्ही माझ्या सर्व लीलांचे वर्णन केलेत. बस, आता सांगा, इकडे कसं येणं झालं? अकारण तुम्ही थोडेच इकडे-तिकडे कोठे जाणार?"

यावर नारदाने उत्तर दिले–

"दक्षिणी समुद्राच्या किनाऱ्यावर गोकर्ण नावाचे एक पवित्र क्षेत्र आहे. तेथे भगवान शंकर आपल्या लिंगाकृती मध्ये आहेत. त्यांच्या समोर वीणा-वादन केले, संकीर्तन केले. शंकराची भक्ति-भावाने पूजा-अर्चना केली. तेथे कुबेरांना ही भेटलो आणि निघालो. वाटेत कुंडिनपूराचे राजा भीष्मक यांना भेटलो. भीष्मकाने माझा छान सत्कार केला, संतोष झाला. तिथे जरासंध आणि पृथ्वीवरील अनेक राजे एकत्र आलेले दिसले. मी भीष्मकाला विचारलं–'हे सर्व काय उद्देशाने इथे एकत्र आलेले आहेत?' यावर भीष्मकाने मला सांगितले–"मी आपली मुलगी रुक्मिणी हिचा विवाह चेदि देशाचा राजा शिशु-पालाशी ठरवला आहे आणि या विवाहाचा मुहूर्त उद्या सकाळचा आहे." ही बातमी तुम्हांला देण्यासाठी मी आता इथे आलो आहे."

नारदाने पुढे आणखी सांगितले–"श्रीकृष्णा, तुमच्या मनात रुक्मिणीशी

लग्न करण्याची इच्छा आहेच. परंतु भीष्मकाने तर तुमच्या शत्रुशी तिचा विवाह करण्याचा घाट घातलेला आहे. हा विवाह निर्विघ्नपणे पार पडेल. पण जरा नीट विचार करा, यात अपयश तुमच्या पदरी येणार. म्हणून लगबगीने एक काम करावे. ताबडतोब महाराजा उग्रसेन, सात्यकी आणि आणखी काही महायोद्धयांसह येथून निघावे. तेथे पोचून सर्व राजे व सैनिकांना पळवून लावून रुक्मिणीला आपल्या बरोबर घेऊन यावे. तुमच्या हाती सुदर्शन चक्र असल्यामुळे तुम्हाला कोणते ही काम अशक्य नाही. एक गोष्ट आणखी सांगतो. मी आकाश-मार्गाने अदृश्य स्वरूपात जात असताना असं पाहिलं की रुक्मिणी राजोद्यानात आपल्या सख्यांसह बसून रडत आहे. मला असं वाटलं की ती तुमचेच स्मरण करीत आहे, तुम्हाला भेटण्याची तिची इच्छा आहे आणि तुमच्याशी विवाह करायला ती आतुर आहे. ती सतत आपले ध्यान व स्मरण करीत आहे. याशिवाय तिला अन्य चिंता नाही. बिचाऱ्या रुक्मिणीची स्थिति अत्यंत दयनीय आहे. तिचे नाजुक गाल अश्रूंनी भिजलेले आहेत. गळयात केवळ एक एकपदरी माला आहे. तिचा भांग विस्कटलेला आहे. केस विखुरलेले आहेत. असं वाटलं की निश्वासा बरोबर एकाद्या वेळी प्राण तर जाणार नाहीत! तिचे शरीर कंपित आहे. सर्व सख्या उपचार करीत आहेत, पण कशाचाच काही फायदा नाही. रुक्मिणी असे म्हणत होती की तिच्या सख्यांनी तुमचे सोडून कोणाचे नाव घेतले तर ती मरून जाईल. ही अवस्था पाहून दगडाला ही पाझर फुटेल. तुम्ही तर स्वभावतः करुणासिंधु आहात. तिची आताची दशा पाहून गप्प बसणे योग्य होणार नाही. काही करून बिचाऱ्या रुक्मिणीचे प्राण वाचवा. आज हे तुमचे प्रमुख कर्तव्य आहे. आता मी आपली रजा घेतो, मला आज्ञा द्यावी."

सर्व वृत्तान्त कथन करून नारदाने आपल्या वाटेने प्रयाण केले.





# चोराला असं पकडलं!

रामकुमार नि श्यामकुमार बालपणचे मित्र होते. लंगोटीयार! लहानपणीच दोघांनी आपलं गाव सोडलं आणि कोटद्वार नावाच्या एक खेड्यात रहायला आले. तिथे रामकुमारने एक छोटेखानी दुकान उघडलं, श्यामकुमार एका सावकाराकडे नोकरी करू लागला.

एक दिवशी दुपारी श्यामकुमार रामकुमारच्या दुकानावर पोचला आणि म्हणाला—"राम, थोडी मदत मागायला आलो आहे मी."

"सांग, काय मदत करू?" रामकुमारने विचारले.

"त्याचं असं झालं—मला पत्र आलंय की मला मुलगी झाली आहे. मी तिला पाहण्यासाठी हा निघालो आहे सासुरवाडीला. इतक्यात मला असं कळलं की मला भेटण्यासाठी माझे आई-वडील गावाहून निघालेले आहेत. म्हणून आज रात्री तू माझ्या घरी येऊन झोप. सकाळपर्यंत मी परत येईन." असं म्हणून श्यामकुमारने घराची किल्ली रामकुमारच्या हाती दिली.

"श्याम, तू घराची काळजी करू नकोस. मी आज संध्याकाळी लवकर जेवण करून तुझ्या घरी झोपायला जाईन, झालं?" रामकुमारने आश्वासन दिले.

मग श्यामकुमार सासुरवाडीकडे जायला निघाला. रामकुमारने दुकान बंद केले आणि घरी पोचला तर काय! बायको पांघरूण घेऊन कुडकुडत पडलेली आहे. चांगलाच ताप भरला होता तिला.

रामकुमार तिला ताबडतोब वैद्याकडे घेऊन गेला. वैद्याने काही गोळया दिल्या आणि सकाळ पर्यंत तीन गोळया घ्यायला सांगितलं. आता रामकुमारला श्याम-

मीना परांडे

कुमारच्या घराची आठवण झाली. बायकोला एकटीला घरी ठेऊन तो श्यामकुमारच्या घरी झोपायला जाऊ शकत नव्हता.

तो विचार करू लागला की आता काय करावं? इतक्यांत त्याला आदित्य नावाच्या एका माणसाची आठवण झाली. आदित्य नुकताच श्यामकुमारच्या घरासमोर भाडेकरू म्हणून रहायला आला होता. तो ब्रह्मचारी होता.

रामकुमार त्याच्या घरी गेला आणि म्हणाला–"मित्रा, मी तुला थोडा त्रास द्यायला आलो आहे. समोर श्यामकुमारचे घर आहे. आज रात्री तू तिथं जाऊन झोपूं शकशील?"

रामकुमारचा प्रस्ताव जाणून आदित्य म्हणाला–"शेजार-धर्माचं पालन केलंच पाहिजे! त्यात त्रास कसला?" रामकुमारने श्यामकुमारच्या घराची किल्ली आदित्याच्या हाती दिली.

दुसऱ्या दिवशी सकाळ पर्यंत रामकुमारच्या बायकोचा ताप उतरला. आदित्याकडून किल्ली घेण्यासाठी रामकुमार श्यामकुमारच्या घरी गेला. दरवाज्यावर थाप मारली. दार एकदम उघडलं गेलं. घरातलं दृश्य पाहून रामकुमारच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही.

आदित्याला एका खांबाला बांधलं गेलं होतं. घरातलं सामान अस्त-व्यस्त पडलेलं होतं. आदित्याच्या तोंडात कोंबलेला बोळा



रामकुमारने काढला. दोरी सोडून आदित्य मोकळा झाला तो धाडकन खाली पडला!

जरा शुद्धीवर आल्यावर रामकुमारने विचारपूस केली.

आदित्याने जे घडलं ते सांगितलं–"रात्री १-२ च्या सुमारास कोणी तरी दारावर थाप मारली. मला वाटलं श्यामकुमाराचे आई-वडील आले असावेत. दार उघडलं नि हातात सुरा घेऊन एक डाकू घरात शिरला. पुढे येऊन त्याने सुरा माझ्या छातीवर ठेऊन मला खांबापाशी नेऊन जाम बांधून टाकलं. मी ओरडू लागताच त्याने माझ्या तोंडात बोळा कोंबला. घाबरून मी जवळ जवळ बेशुद्ध झालो."

हे सर्व वृत्त ऐकून रामकुमारला आश्चर्य वाटलं. डाकूने काय काय चोरून नेले असावे त्याचा तो विचार करू लागला. इतक्यात श्यामकुमार तेथे हजर झाला आणि विचारलं–"मित्रा, काय झालं बरं?"

रामकुमार काही उत्तर देणार एवढ्यात श्यामकुमारने आत जाऊन पाहिलं. पेटी उघडी पडलेली आहे. तो म्हणाला–"पाचशे रुपये आणि सारी चांदीची भांडी चोराने नेलेली दिसताहेत." डोळ्यात अश्रू आणून तो रामकुमारच्या जवळ आला.

रामकुमारने श्यामकुमारला आदित्याशी ओळख करून दिली नि सर्व हकीगत सांगितली. सगळं ऐकून श्यामकुमार





म्हणाला—" मित्रा, तुझा काही दोष नाही. माझं भाग्य धड नाही, दुसरं काय ?"

यानंतर रामकुमारच्या मनात नेहमी असा विचार येई की जे काही झालं त्याची जबाबदारी आपली आहे. तो सतत आपल्या बायकोला म्हणे—" माझ्या असावधानीमुळे श्यामकुमारचं सुमारे दोन हजार रुपयांचं नुकसान झालं. मी त्याला काही-ना-काही दिले पाहिजे. त्याशिवाय माझ्या मनाला शांति मिळणार नाही."

याच काळात रामकुमारचा एक दूरचा नातेवाईक त्या गावी पोलिस-अधिकारी बनून आला. एक दिवशी रात्री रामकुमारनें त्याला जेवण्याचं आमंत्रण दिलं. गप्पागोष्टी करीत असताना श्यामकुमारच्या घरी झालेल्या चोरीची गोष्ट निघाली.

अधिकारी जनार्दनने सगळं ऐकून घेतलं आणि मग विचारलं—" आदित्य खरोखर विश्वासपात्र माणूस आहे याची तुला खात्री आहे का ?"

" तो नुकताच श्यामकुमारच्या समोरच्या घरात भाडेकरी म्हणून रहायला आला. तशी त्याच्याबद्दल मला अधिक माहिती खरं म्हणजे नाही." रामकुमारने उत्तर दिलं.

जनार्दनने थोडा वेळ विचार केला आणि पुन्हा एक प्रश्न केला—" डाकूनें आदित्याला दोरीने बांधलं होत नाही का ? त्या दोरीची गाठ मागे होती की पुढे ?"

रामकुमारने सांगितलं—" मला चांगलं आठवतंय, दोरीची गाठ आदित्याच्या पोटावर होती."

" बस, रहस्याचा उलगडा झाला. खरा चोर आदित्यच असला पाहिजे. त्यानेंच आपल्याला दोरीने बांधून घेतलं. म्हणून दोरीची गाठ पुढच्या बाजूला आली. जर हे काम डाकूनें केले असते तर त्याने गाठ मागे मारली असती. आणि दुसरी गोष्ट अशी की डाकू जर बाहेरचा माणूस असता तर दार नुसतं लोटून गेला नसता. बाहेरून कडी घालून तो गेला असता." जनार्दन हंसत हंसत म्हणाला.

" तुझं म्हणणं बरोबर आहे. पण खरा चोर आदित्य आहे हे सिद्ध कसं करायचं ?" रामकुमारने आपली शंका प्रगट केली.

जनार्दनने रामकुमारला एक उपाय सांगितला आणि तो आपल्या घरी निघून गेला.

दुसऱ्या दिवशी रामकुमार आदित्याला भेटला आणि सांगितलं—" मित्रा, रात्री गस्त घालणाऱ्या शिपायांनी एका चोराला पकडलं आहे. तो वेड्यासारखा काही अभिनय करतो आहे. पोलिसांना अशी शंका आहे की तो सगळं ढोंग करीत आहे. तू चल आणि त्या चोराला ओळख."

आदित्य रामकुमार सह पोलिस-कचेरीत गेला. तिथं एका बावळट माणसाला पाहून म्हणाला—" यानेंच त्या दिवशी मला सुरा दाखवून घाबरवलं आणि मला खांबाला बांधून घरात लुटालूट केली. शेवटी चोराला पकडलं !"

वेड्याचं सोंग केलेल्या जनार्दनने आदित्याचं मानगुट पकडलं आणि म्हणाला—" चोर हाती आला हे तर खरं ! पण तो चोर दुसरा कोणी नसून तूच ! बोल, तुला विंचवांच्या खोलीत कोंडू की सापाच्या खोलीत, का खरं सांगून चोरीचा माल परत आणून देतोस ?"

जनार्दनचं बोलणं ऐकून आदित्याच्या अंगाचा थरकाप झाला. त्याने तत्काळ गुन्हा कबूल केला. यानंतर एका शिपाया-बरोबर आदित्य आपल्या घरी गेला आणि सर्व चोरीचा माल पोलिस-कचेरीत घेऊन गेला. चांदीची सर्व भांडी सुरक्षित होती. पाचशे रुपयांतले शंभर रुपये कमी झालेले होते.

यानंतर जनार्दनने शिपायांना हुकूम केला की आदित्याला तुरुंगाच्या कोठडीत डांबून ठेवा आणि श्यामकुमारला खबर द्या की त्याचा माल सापडला आहे.

आपला चोरी गेलेला माल मिळाल्यावर श्यामकुमारला आनंद झाला आणि तो म्हणाला—" हा सगळा माझ्या मुलीच्या जन्म-कुंडलीचा योग दिसतोय !"





# तांब्याची तीन नाणी

एका शहरात राजाराम नावाचा एक तंबाखूचा व्यापारी रहात असे. कावडीच्या दोन्ही पारड्यात तंबाखू ठेऊन तो गल्ल्या-बोळातून आरडत-ओरडत तंबाखू विकी. गर्दीने भरलेल्या गल्ल्यांतून रस्ता काढीत काढीत त्याला आपला माल विकावा लागे. गल्ल्या-बोळातून फारशी विक्री होत नसे. तरी ही तो आवडीने कष्ट करी आणि जो काही फायदा मिळेल त्यातून आपले पोट भरी. तो नेहमी संतुष्ट असे. 'संतोष म्हणजेच खरं धन!' असं तो नेहमी म्हणे.

एक दिवशी सकाळी राजाराम आपल्या खांद्यावर कावड ठेऊन गर्दीतून चालला होता. एक फाटके कपडे घातलेला बुढ्ढा त्याच्याजवळ आला आणि त्याला थांबवीत म्हणाला—"बेटा, माझ्या चिलमीत तंबाखू भरून देशील? दोन दिवस झाले चिलमीत तंबाखू भरली नाहीं. नेहमीच्या दुकानी गेलो तर ते दुकान बंद. तुझ्याच शोधात होतो. बरा सापडलास! देणार ना माझ्या चिलमीत तंबाखू?"

राजारामने इकडे-तिकडे पाहिले, पण कावड ठेवायला बरी जागा त्याला दिसली नाही. त्या वृद्ध माणसाने त्याला तांब्याची तीन नाणी दाखवली. एक चिलिम भर तंबाखूच्या मानाने ही किंमत जास्तच होती.

"आजोबा, या भयंकर गर्दीत मला आपली कावड खाली ठेवता येणार नाही. तुम्हीच आपल्या हाताने चिलिम भरून घेता?" राजाराम म्हणाला.

वृद्ध माणसाने आपल्या हाताने तीनदा तंबाखू काढली आणि चिलमीत भरली. राजारामला मोठं आश्चर्य वाटलं की इतक्या छोट्या चिलमीत एवढी तंबाखू कशी भरली गेली! आणि तरी ही चिलिम भरली नाहीच! वृद्धाने पारड्यातली सर्व तंबाखू आपल्या चिलमीत भरली.

राजारामला समजलं की आपली फसवणूक चालली आहे. थोडं त्या वृद्ध माणसाकडे आणि थोडं पारड्याकडे तो पहात राहिला.

वृद्ध माणसाने पारड्यांतील सर्व तंबाखू आपल्या चिलमीत भरली, पारड्यात तांब्याची तीन नाणी टाकली. चिलीम पेटवली आणि दम भरीत भरीत तो गर्दीत अदृश्य झाला. निराश होऊन राजाराम घरी यायला निघाला.

रस्त्यावरून चालत असताना त्याला भास झाला की आपली कावड जड होत चालली आहे. मनांतल्या मनात तो विचार करू लागला—म्हणतात की जी खरी श्रमाची संपत्ति नाही, ती व्यर्थ भारभूत होते. कावडीचं मागचं पारडं हळू हळू अधिक जड होत होत शेवटी नाइलाजाने त्याला कावड रस्त्याच्या कडेला खाली ठेवावी लागली.

कावड खाली ठेऊन त्याने मागच्या पारड्याकडे पाहिले. तांब्याची नाणीच नाणी त्याच्या नजरेस पडली. पाहता पाहता राजाराम जवळची तांब्याची नाणीं वाढतच होती. राजारामने दोन्ही हातांनी पारडं उचललं नि तो घरी आला.

घराच्या दरवाज्यापाशी पोचेपर्यंत नाणी भरून सांडू लागली. चारी बाजूंना नाणीच

चिनी लोककथा



नाणी! त्याने सर्व नाणी एकत्र केली आणि एका लाकडी पेटीत भरली.

राजाराम घराबाहेर पडला आणि जे काही घडलं त्याबाबत विचार करू लागला. थोड्या वेळात त्याला आतून काही आवाज ऐकू आला. त्याने आत जाऊन पाहिलं तर पेटीचं दार वर उचललं गेलं होतं आणि तांब्याची नाणी बाहेर सांडत होती. नाण्यांची संख्या बस वाढतच चालली.

राजाराम पुन्हा विचार करू लागला. त्याने एक मोठा रांजण आणला आणि त्यात नाणी भरायला सुरुवात केली. पाहता पाहता रांजण नाण्यांनी भरून गेला. अशा प्रकारे तीन रांजण भरले. राजारामला त्या दिवशी जरा ही फुरसत मिळाली नाही.

एवढं सारं धन मिळाल्यावर राजारामला खूप संतोष वाटला. आता तो श्रीमंत झाला होता. आता त्याला गल्ल्या-बोळांतून हिंडून तंबाखू विकण्याची जरूर नव्हती. त्याने गहाणवटीचा धंदा सुरू करण्याचा विचार केला. थाटात दुकानावर बसून लोकांच्या वस्तु गहाण ठेवून पैसे देण्या-शिवाय त्याला काही काम राहिलं नाही.

राजारामला या धंद्यात खूप यश मिळालं. त्याचे ग्रह उच्चीचे होते. आश्चर्य असं की त्याच्या खजिन्यांतील तांब्याची नाणी वाढतच चालली होती. किती ही पैसे काढले तरी खजिना भरलेला. त्यात वाढ होतच राहिली.

एक दिवशी त्याच्या दुकानात एक वृद्ध माणूस आला. त्याला आपल्या जवळच्या काही वस्तु विकायच्या होत्या. त्या काही मोठ्या मूल्यवान वस्तु नव्हत्या. राजारामने सर्व वस्तु बारकाईने पाहून विचारलं—"बोल, काय किंमत पाहिजे या वस्तूंची?"

वृद्ध माणूस म्हणाला—"मला फक्त तांब्याची तीन नाणी दे. बस!" राजा-रामने वृद्धाच्या हातावर तांब्याची तीन नाणी ठेवली. त्या क्षणापासून खजिन्यातील धन वाढणं संपुष्टात आलं!





# बला टळली!

एका शहरातील एका श्रीमंत कुटुंबात एक मोठी सुंदर मुलगी होती. भाग्याने तिला एक छान स्थळ सांगून आलं. मुलगा शेजारच्या राज्यातील होता, तो ही तसाच देखणा आणि श्रीमंत. वर आणि वधू यांनी एकमेकाना पसंत केले. त्यांच्या आईवडि-लांनी मोठ्या थाटामाटाने त्यांचे लग्न करून दिले आणि नववधूला आपल्या घरी रवाना केले. सुरवातीचे काही दिवस मौज-मजेत गेले. एक दिवशी अचानकपणे नवरा एक चरखा आणि टोपलीभर पेळू घेऊन आला आणि ते सर्व बायकोच्या पुढचांत ठेऊन म्हणाला—"ऐक, आज पासून तू रोज सूत कातायला सुरुवात कर. पण लक्षात ठेव धागा पातळ आणि मजबूत असला पाहिजे."

बायकोला मोठं आश्चर्य वाटलं. तिने विचारले—"मी रोज सूत काढीत बसू म्हणता?"

"होय, इथून पुढे तू कातलेल्या सुता-पासूनच मी माझी धोतरं आणि पंचे विणून घेणार आहे!" नवरा अभिमानाने बोलला.

"पण मी तर सूत कातलंच नाही?" बायकोने आपली अडचण सांगितली.

नवऱ्याचा या गोष्टीवर विश्वासच बसेना की घरांतली सर्व कामं कुशलतेने करणाऱ्या बायकोने म्हणावे की मला सूत कातता येत नाही. त्याला वाटलं ही आळशी आहे, आणि म्हणून काम टाळू पहाते आहे.

"थट्टा नको करुस. तुला रोज या चरख्यावर सूत कातलंच पाहिजे." असं सांगून नवरा बाहेर निघून गेला.

दुःखी अंतःकरणाने बायकोने चरखा पुढे घेतला आणि सूत कातण्याचा प्रयत्न करू लागली. सवय नसल्यामुळे सूत काही ठिकाणी



बायको मोठ्या विचारात पडली· कारण आपल्या माहेरी तिने चरखाच कधी पाहिला नव्हता. चांगलं सूत कातायला आपल्याला कसं जमेल? इकडे या भागात सर्वच बायकांना सूत कातता येतं. म्हणून नवऱ्याचं म्हणणं बरोबर होतं की मला जर सूत काढता आलं नाही तर माझी इज्जत जाईल!

नवरा घराबाहेर गेल्यावर ती ही बाहेर पडली आणि घरा समोरच्या मैदानावर गेली· आणि एका मोठ्या दगडावर जाऊन बसली.

थोड्या वेळात तिला कुठून तरी काही ध्वनि ऐकू आला. कुणी तरी गप्पा-गोष्टी करीत आहे आणि खदखदा हसत आहे असं वाटलं तिला. तिने चारी बाजूला नजर फिरवरी, पण तिला काही दिसलं नाही· तिने ध्यानपूर्वक ऐकायला सुरुवात केली तेव्हा तिच्या लक्षात आलं की या गप्पा-गोष्टी ती बसलेल्या दगडाच्या खालून तिच्या कानी येत आहेत.

ती दगडावरून खाली उतरली आणि मोठ्या कष्टाने तिने तो दगड ढकलला. आत जाणारा एक अंधारा रस्ता तिला दिसला. ती आत उतरली, तेव्हा तिला एक छोटी खोली दिसली. या खोलीत काही ठेंगण्या बायका बसलेल्या होत्या. पाच वर्षांच्या मुलीसारख्या त्या दिसत होत्या त्यांच्या समोर खेळण्यांसारखे काही चरखे होते. त्या हातात पेळू घेऊन वायु-वेगाने कोळ्याच्या जाळ्याच्या धाग्या-सारखं नाजूक सूत कातत होत्या. कातलेल्या सुताचा ढीग जवळ पडलेला होता. हे सर्व पाहून बायकोला मोठं आश्चर्य वाटलं. या बायांचे चेहरे एका बाजूला थोडे वाकडे झालेले तिला दिसले. शीघ्र गतीने धागा काढता काढता सुद्धाया आपापसात गप्पा-गोष्टी करीत होत्या आणि आपल्या वाकड्या चेहऱ्यानिशी हसत-खिदळत होत्या.

युवतीने त्यांना विचारले—"बायांनो, मी तुम्हाला ओळखत नाही, पण तुम्ही ज्या कुशलतेने सूत काढीत आहात ते पाहून मला आश्चर्य वाटते. तुमच्यात जी कुशलता आहे तिचा शंभरावा भाग जर माझ्या जवळ असता तर मी माझ्या चितेतून मुक्त झाली असते." इतकं बोलून आपल्या नवऱ्याची सारी कहाणी तिने त्यांना ऐकवली आणि रडू लागली.

त्या बायकांनी चरखे थांबवले आणि तिला विचारलं—"बाई, कशाची चिंता करीत आहेस? काय दुःख आहे तुझं?"

"नवरा परत येईपर्यंत जर टोपलीभर पेळू मी कातले नाहीत तर काय होईल कोण जाणे! माझे रक्षण परमेश्वर करणार!" युवती म्हणाली.

त्या स्त्रिया हसू लागल्या, म्हणाल्या—"बस, एवढ्याशा गोष्टीसाठी इतकी चिन्ता



पातळ, तर काही ठिकाणी जाड निघालं, जिथे तुटलं तेथे गाठ पडून गेली. संध्याकाळी नवरा शेताकडून घरी आला तर अगदी थोडं सूत कातून झालेलं त्याला दिसलं. जे काही कातलं होतं ते पाहून ही त्याला राग आला. त्याने बायकोला धमकावलं—"ही काय थट्टा चालवली आहेस? असंच केलंस तर मी काडीमोड घेऊन मोकळा होईन. सूत कातणाऱ्या दुसऱ्या एकाद्या बाईशी लग्न करीन! शेवटचं सांगतो—उद्या सकाळी मी बाहेर गावी जात आहे. दहा दिवसांनी परत येईन. तोपर्यंत हे टोपलीभर पेळू कातून झाले पाहिजेत. नाहीतर मी काय करीन ते माहीतच आहे आता तुला."

कसली करायची? सूत कातण्याचं तुझं काम आम्ही करून देऊ. ज्या दिवशी तुझा नवरा येणार आहे, त्या दिवशी आम्हाला बोलव, आम्ही तुझे सगळे पेळू कातून देऊ. तू मुळीच काळजी करू नकोस. पण त्या दिवशी तू आम्हाला जेवण दिलं पाहिजेस."

युवतीनं तसं करायचं ठरवलं. नवरा घरी येण्याच्या दिवशी त्या सर्व ठेंगण्या येऊन पोचल्या. त्यांनी सर्वांनी मिळून नाजुक धाग्याचा ढीग लावला. नवरा घरी आला नि त्या वाकडतोंडया स्त्रियांकडे पाहून विचारलं–"या सगळया पाहुण्या कोण कोठुनी आल्या?"

"या सगळया आपल्या शेजारणी आहेत. मला मदत करायला आल्या आहेत ह्या. मी बोलवलं म्हणून आल्या आहेत त्या!" बायकोने उत्तर दिलं.

यानंतर सर्व जण जेवायला बसले. नवऱ्याने त्या सर्वांच्या वाकडया तोंडांकडे निरखून पाहून विचारलं–"बायांनो, तुमचे सर्वांचे चेहरे एका बाजूला असे वाकडे दिसत आहेत. जन्मापासून ते असेच आहेत की त्याचं काही निराळं कारण आहे? सांगाल मला?"

"ऐका, सकाळ पासून संध्याकाळ पर्यंत आम्ही हे सूत काढण्याचं काम करीत असतो न! या मेहनतीमुळे आमचे चेहरे हे असे वाकडे झाले आहेत! याशिवाय दुसरं काही नाही." वाकडतोंडयांनी उत्तर दिलं. नंतर या बायका आपल्या घरी निघून गेल्या नवऱ्याने आपल्या बायकोच्या तोंडाकडे नीट पाहिलं, ती होती तशी सुंदर दिसली. तिच्यावर काही परिणाम झालेला नव्हता.

नवरा बायकोला म्हणाला–"अग ऐक, तू कातलं आहेस तेवढे सूत पुरेसे आहे. आता पुन्हा तू या फंदात पडू नकोस." असं म्हणून नवऱ्याने चरखा गच्चीवर नेऊन ठेवला. पत्नी एक दीर्घ सुस्कारा सोडून मनांतल्या मनांत म्हणाली–"बरं झालं, एकदाची बला टळली!"








मास्करीन बेटांत (राफिया पाल्म) असलेली ताडाची झाडे आणि अमेझान प्रदेशांतील (बाल पाल्म) बांबूच्या जातीची ताडाची झाडे यांना मोठ-मोठी पाने येतात.

गस्त घालण्याची जबाबदारी

घुशीच्या जातीतील एक जनावर 'मेर्मास्ट' गस्त घालण्याचे काम करते. त्यांना जेव्हा कळतं की त्यांची शिकार करण्यासाठी कोणी पक्षी हल्ला करीत आहे, तेव्हा पहाऱ्याठी काम करणारा मेर्मास्ट शिट्टी वाजवतो. शिट्टीचा आवाज ऐकताच बाकीची जनावरे बिळात घुसतात. धोका संपल्यावर पहारेकरी पुन्हा शिट्टी वाजवतो.



असं म्हणतात की गेल्या ६०० मिलियन वर्षांत पृथ्वी आणि अन्य छोटे ग्रह यांच्यात २००० वेळा तरी टक्कर झाली आहे.




चांदोबा
मार्च १९८९

## चांदोबातील नवलाई



### आयुष्य वाढवणारी झोप

सैबेरियातील सोन्याच्या खाणीत काम करणाऱ्या मजुरांना घनीभूत पाण्यात ९० वर्षांपासून झोपेत असणारा 'लिमोबिडे' नावाचा एक प्राणी आढळला. त्याच्या हृदनाचे वजन त्याच्या एकूण वजनाच्या एक-तृतीयांश इतके असते. सामान्यत: या प्राण्याचे आयुष्य केवळ दहा वर्षांचेच असते, परन्तु या सुदीर्घ निद्रेमुळे त्याचे आयुष्य इतके वाढले ! सापडल्या जागेतून काढून त्याला साध्या पाण्यात सोडताच तो सहजपणे झोपेतून जागा झाला !

### टॉलस्टॉयचा आवाज

अमेरिकेतील थोर शास्त्रज्ञ थॉमस अल्वा एडिसन याने १९०८ मध्ये लियो टॉलस्टॉय याच्या आवाजातल्या ज्या रेकॉर्डस् तयार करुन ठेवल्या होत्या त्यांचा नुकताच पत्ता लागला आहे ! त्या रेकॉर्डस् आता रशियात मागवल्या गेल्या आहेत. रेकॉर्डस् बनवणाऱ्या कंपनीच्या अमेरिकन स्टुडिओचे मॅनेजर वॉल्टर मिलर यांच्या घरी त्या सापडल्या. आजपर्यंत असेच मानले जात होते की, अमेरिकेच्या एडिसन सेंटरमधे १९१४ त जो अग्निप्रलय झाला त्यात या रेकॉर्डसुद्धी भस्मसात् झाल्या !





### माणूस आणि हत्ती

इंग्लंडचे रहिवासी मार्क शांड नावाच्या लेखकाने कोणार्कच्या सूर्यमन्दिरापासून बिहारमधील सोनेपूर पर्यंतचा १००० कि. मी. लांबीचा प्रवास फक्त हत्तीच्या पाठीवर बसून केला ! माणूस आणि हत्ती यांचे सम्बन्ध, माहुत हत्तीवर कसे नियन्त्रण ठेवतो, हत्तींना पाळीव कसे बनवले जाते इत्यादि ज्ञान प्रत्यक्षच मिळवण्यासाठी त्यांनी ही यात्रा हत्तीवरून केली !

### खरोखरीच ती प्राचीन आहे का?

येशु ख्रिस्ताला सुळी चढवल्यानंतर त्याच्या शरीरावर जी शाल (रोब) पांघरली ती म्हणे इटलीतील टुरीन चर्चमधे सापडली आहे ! त्यावर रक्ताचे डाग आहेत. परन्तु नुकताच ज्या तीन विश्वविद्यालयांनी त्यावर शोध केला, त्यांच्या अहवालावरून असे आढळून आले आहे की ते वस्त्र काही तितके प्राचीन नाही. ते १४ व्या शतकातले आहे !



# धन व दान

शिवपुरी गावात धर्मनन्दन नावाचा एक पंडित रहात असे. त्याची बायको रमादेवी महाकंजूष होती. पण एक पै ही खर्च न करता जास्तीत जास्त पुण्य जोडायची तिची इच्छा असे.

एक दिवस केरसुण्या विकणारी एक म्हातारी बाई तिच्या घरावरून जात होती. तिला हाका मारून रमादेवीने एक जुने पातळ तिच्यापुढे ठेवले अन् विचारले–"या पातळाच्या बदल्यात किती केरसुण्या देशील मला ?"

"दोन." म्हातारी उत्तरली.

"काय म्हणालीस ? एका पातळाच्या दोनच केरसुण्या ? छट् ! त्या पेक्षा हे पातळ एकाद्या गरीब बाईला दान दिलं तर पुण्य तरी मिळेल मला खूपसं ! बरं, आता सांग एक रुपयाच्या किती केरसुण्या देशील ?" रमादेवीने विचारले.

"चार." म्हातारी म्हणाली.

रमादेवीने एक रुपया देऊन चार केरसुण्या घेतल्या. पण म्हातारी तेथून निघाली, तेव्हा तिने ते पातळही आपल्या खांद्यावर टाकले.

रागाने रमादेवी म्हणाली–"अग वा ! पैसे घेऊन वर पातळही नेऊ पाहातेस होय ? बरीच दिसतेस की !"

म्हातारी यावर हसत म्हणते कशी–"माई, तुम्ही तर किती धर्मात्मा आहात ! माझ्यासारख्या गरीब बाईला पातळ देऊन तुम्ही केवढं तरी पुण्य जोडलंत ! पैसे देऊन तर तुम्ही केरसुण्या खरेदी केल्यात घरासाठी."

आश्चर्याने आ वासून रमादेवी म्हातारीकडे पहातच राहिली !





# जयाचा पराजय

रामनगरमधे महेश नावाचा एक तरुण शेतकरी रहात असे, तो स्वतः अतिशय बुद्धिमान व रसिक स्वभावाचा होता. त्याबरोबरच तो दिसायला सुंदर, संपन्न व हुशार होता, त्यामुळे अनेक गृहस्थ त्याला आपली कन्या द्यावी अशा विचारात होते; परन्तु महेशने मात्र त्यापैकी कोणाचीही मुलगी पसन्त केली नाही.

आपल्या नातवाची ही वागणूक त्याचे आजोबा रामनाथ यांना आवडली नाही. त्यांनी महेशला जवळ बोलावून म्हटले–"बघ बेटा, तू प्रत्येक मुलगी पाहून झाल्यावर अशी नापसन्त करीत राहिलास तर अशाने तुझं लग्न कसं होईल रे बाबा ? तुझ्या आईची कशी सुटका व्हावी मग ?"

महेश हसून म्हणाला–"जरा तरी तरतरीत व बुद्धिमान मुलगी असायला नको का ? अशी मुलगी आढळेल तेव्हाच लग्न करीन मी."

याच काळात एकदा, शेजारच्या गावी रहाणारे रामनाथचे वृद्ध मित्र गुरुनाथ, रामनाथला भेटायला त्यांच्या घरी आले. दोघांच्या गप्पा सुरू झाल्या. त्याच वेळी मोठ्या उत्साहाने इकडे तिकडे वावरणाऱ्या महेशला पाहून गुरुनाथने विचारले–"अरे रामनाथ, हा पोरगा म्हणजे तुझा नातू तर नव्हे ?"

"होय दोस्त, हा माझ्या थोरल्या मुलाचा मल्लिनाथचा मुलगा महेश." रामनाथने सांगितले.

"ओहो ! असं होय ? अरे हा तर चांगला मोठा झाला आहे. याच्या लग्नाचा काही विचार-बिचार आहे की नाही ?" गुरुनाथने विचारले. यावर रामनाथने आपल्या नातवाच्या पराक्रमाचा पाढा वाचून दाखवला.



"बाबा! खूपच छान! हाही माझी नात गौरी सारखाच चतुर आहे की!" गुरुनाथ म्हणाला.

"का तुझीही नात अशीच हुशार आहे?" रामनाथने विचारले.

"अरे, गुरुनाथची नात म्हणजे काय वाटलं तुला? तिच्या अकलेपुढे तुझ्या नातवाची अक्कल ती काय असणार?" गुरुनाथ गर्वाने म्हणाला.

गुरुनाथचे बोलणे ऐकून आता रामनाथ-लाही जोर चढला. तो म्हणाला–"मग तर माझा नातूच याचा निकाल देईल."

शेवटी असे ठरले की एकट्या महेशनेच गुरुनाथबरोबर त्याच्या घरी जावे आणि त्याला गौरी पसंत पडली तर आपण या दोघांचा विवाह घडवून आणू.

नंतर दोघंही तिथून निघाले. घरी पोचताच गुरुनाथने कुटुंबातल्या सर्वांना नावं घेऊन बोलावले अन् त्यांना सर्वांना महेशचा परिचय करून दिला–"हा मुलगा, माझा मित्र गुरुनाथ याचा नातू."

नंतर आपली नात गौरी हिच्याकडे बघत गुरुनाथ म्हणाले–"गौरी, माझ्या मित्राला, रामनाथला आपल्या नातवाच्या हुशारीचा फार अभिमान आहे बघ. मी तर अशी पैज लावून आलोय की माझी नातही काही तुझ्या नातवापेक्षा कमी नाहीय म्हटलं, अन् असं सांगूनच मी महेशला आपल्याकडे घेऊन आलोय बरंका!"

आपल्या आजोबांच्या बोलण्यातला विशेष भाव गौरीने ओळखला आणि तिचा चेहरा लाजेने लाल झाला. अतिशय आकर्षक व तरतरीत दिसणाऱ्या गौरीला पाहून महेशलाही वाटले की ही पोरगी चांगलीच बुद्धिमान अन् चतुर असावी.

गौरीला पाहून हसत महेश म्हणाला–"मला खूप तहान लागली आहे. पण भरल्याशिवाय, काढल्याशिवाय आणि माणूस सहज हात लावू शकणार नाही इतक्या उंचीवर असणारे गोड पाणी मला देऊ शकशील काय?"

गौरीही यावर हसत मान हलवून म्हणाली–"मी आत्ता क्षणभरात घेऊन येते. पण आपण ते पाणी तसंच पिणार की माणसाने निर्माण केलेल्या वस्तूच्या साह्याने पिणार?"

"तसंच नाही पिऊ शकणार मी. एकाद्या ग्लासात घेऊन ये." महेश उत्तरला. त्याच्या मनात आले–खरंच ही मुलगी चांगलीच चतुर दिसते आहे!

नंतर गौरी थोड्याच वेळात लोटाभर नारळाचे पाणी घेऊन आली. लोट्यात काय आहे हे सर्वांनी तिला विचारून घेतले. अन् सर्वांना तिच्या हुशारीचे आश्चर्य वाटले!

"तू हेच पाणी मागितलं होतंस बेटा?" असं विचारून गुरुनाथने गौरीची प्रशंसा केली.

यावर आव्हान देत महेश गुरुनाथला म्हणाला–"आपण आपल्या नातीला उत्तर द्यायला सांगा–अर्धवट मेलेल्यांसाठी पूर्ण-पणे मरणारांच्या साह्याने सुखपूर्वक आपलं जीवन चालवणारे कोण?"

गौरी तावडतोब हसत म्हणाली–"ठीक आहे, मी उत्तर देईन. पण अगोदर मला असं सांगा की अशा प्रकारे सुखपूर्वक जगणारे, किती दिवसांतून एकदा आपल्या घरी येतात?"

लगेच तोंड वाकडे करीत महेश म्हणाला–"शी, शी! ते लोक आमच्या घरी नाही येत कधी."





"हां, समजलं. अर्धवट मरणारा प्राणी म्हणजे गळाला लावलेलं आमिष! त्याच्या शोधात येऊन स्वतः पूर्ण मरतात ते मासे, ते विकून सुखाने जीवन जगतात ते कोळी!" गौरीने झट्कन उत्तर दिले.

आपल्या नातीच्या बुद्धिमत्तेवर खुश होत गुरुनाथ म्हणाला—"आता तुझं परीक्षा घेणं संपलं ना?"

"नाही, नाही! अजून एक प्रश्न राहिलाय!" महेश म्हणाला. त्याने गौरीला विचारले—"ऐक. पहिली वस्तु अशी आहे की जिचं सेवन न केलं तर आपण जगू शकणार नाही. दुसरी वस्तु नसेल तर गावात कुणाकडेही धोबी येणार नाही. तिसरी अन् चौथी वस्तु नसेल तर आपण जिवन्त राहू शकणार नाही. पण या वस्तुंचं प्रमाण वाढलं किंवा त्या एकमेकींना सहायक बनल्या तर सर्वनाश करतील. आता राहिली पाचवी वस्तु—ती तर अनन्त आहे! हं, आता सांग, या पाच वस्तु कोणकोणत्या?"

गौरी मृदुमन्द हसली. तिने मान खाली घातली आणि उत्तर द्यायला असमर्थ असल्याची खूण म्हणून मान आडवी हलवली.

आता विजय-गर्वाने महेशने गुरुनाथकडे पाहिले. आणि हसून तो म्हणाला—"मी अन् माझे आजोबा जिंकलो ना? पैजेची वस्तु कुठे आहे?" काय उत्तर द्यावं हे गुरुनाथना समजेना. ते विचारात पडले.

ते ओळखून महेश म्हणाला—"आम्हाला काही नको तुमच्याकडून. तुमची गौरी सून म्हणून पाठवा आमच्याकडे, बस!"

यानन्तर महिन्याभरात गौरी आणि महेश यांचा विवाह धुमधडाक्यात साजरा झाला.

गौरी सासरी पोचली. एक दिवस गौरी आपल्या पतीला म्हणाली—"ऐकलं का, तुम्हाला एक सांगायचंय!"

"अच्छा, सांग बरं काय ते!" महेशने विचारले.



"लग्नापूर्वी तुम्ही मला काही विचारलं होतं ना? तेच." असे म्हणून गौरी हसू लागली, अन् म्हणाली—"तुम्ही मला ज्या पाच वस्तुंबद्दल विचारलं होतं ना? त्या आहेत पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश ही पंचमहाभुते! पहिली वस्तु पृथ्वी. पृथ्वीची सेवा करून पीक काढूनच आपण जगतो. दुसरी आप म्हणजे पाणी. त्यावाचून धोबी कसा बरं कुणाकडे येईल? तिसरी अन् चौथी अग्नि आणि वायु. या दोन वस्तु अधिक झाल्या तर एकमेकींना सहायक बनून सर्वनाश करतील न? पाचवी वस्तु आकाश, ती तर अनन्त आहे!" गौरी उत्तरली.

बरोबर उत्तर ऐकून महेशने चकित होऊन विचारले—"बरोबर उत्तर माहीत असूनही लग्नापूर्वीच त्या दिवशी तू उत्तर का नाही दिलंस?"

"तुम्ही यापूर्वी जे दोन प्रश्न विचारलेत त्यांची बरोबर उत्तरं ऐकून चेहरा असा केलात की जसे काही तुम्ही हारले जात आहात. शेवटचा प्रश्न अशा थाटात विचारलात की कमीत कमी या शेवटच्या अस्त्राने तरी शत्रूला चीत करू. तो पर्यंत माझी खात्री होऊन चुकली होती की मी तुम्हाला पसन्त आहे. आणि तुम्ही नक्कीच माझ्याशी लग्न कराल. म्हणूनच मी शेवटी असा अभिनय केला की जसं काही तुमच्या प्रश्नाचं उत्तर मला देता येत नाही; आणि अशा प्रकारे मी तुम्हाला जय मिळवून दिला! आम्हा बायकांना नेहमी असंच वाटतं की आपला पती आपल्यापेक्षा वरचढ असावा." गौरीने आपली हुशारी सांगितली.

बायकोची बुद्धिमत्ता व चतुराई यांवर प्रसन्न होऊन महेश म्हणाला—"म्हणजे याचा अर्थ असा, की मीच हारलो! होय ना?"

"मला काय माहीत? तुम्ही जिंकून हारलात की हारून जिंकलात-तुम्हालाच माहीत ते!" गौरी लाजत म्हणाली.

महेश संतोषाने म्हणाला—"मी हारून ही जिंकलोच आहे. परीक्षेत हारलो पण तुला जिंकलं ना!"





# नेत्रलेपन

विश्वनाथ नावाचा एक वैद्य रोगनिदान आणि औषधोपचार करण्यात फारच प्रसिद्ध होता. 'फुलाची पाकळी' म्हणूनही तो रोग्यांकडून फारशी रक्कम घेत नसे. एके दिवशी माळ्यावरून त्याने आपल्या पूर्वजांचे ताडपत्रांचे ग्रन्थ खाली काढले. सहज चाळून पहात असताना 'नेत्रलेपन' नावाच्या औषधासंबंधीच्या मजकुराने त्याचे लक्ष वेधून घेतले. औषध बनवण्याची कृति त्याला आकर्षक वाटली, 'ते औषध डोळ्यात घातल्याने जमिनीच्या गर्भात असणाऱ्या वस्तु स्पष्ट दिसतात' असा उल्लेख त्यात होता.

कुतूहल म्हणून विश्वनाथने त्यात आवश्यक असणाची सर्व पाळं-मुळं जमवली आणि खलात कुटून त्याने तो नेत्र-लेप तयार केला. नंतर ग्रंथात लिहिल्याप्रमाणे रविवारी येणाऱ्या अमावास्येला त्याने तो लेप काजळाप्रमाणे आपल्या डोळ्यात घातला अन् गावाबाहेर शेतं होती, तिकडे तो निघून गेला. तिथे जमिनीतल्या सर्व वस्तु त्याला स्पष्ट दिसू लागल्या! एका जागी हिरव्या मैदानात पुरुषभर खोलीवर त्याला सोन्याच्या नाण्यांनी भरलेल्या हंडया दिसल्या! ही जमीन तिथला जमीनदार जगतसिंह याची होती. जगतसिंहाला ही खबर द्यायचा निश्चय करून खुणेसाठी त्या जागेवर एक काठी रोवून ठेवून विश्वनाथ घरी आला. त्या दिवशी रात्री त्याला हवेत तरंगत असलेलं एक भूत दिसलं!

विश्वनाथ प्रथम जरा घाबरलाच, पण पुन्हा आपलं धैर्य एकवटून त्याने विचारले— "कोण आहेस तूं? माझ्याशी तुझं काय काम आहे?"

त्याच्या कडे रोखून पहात भूत म्हणाले— "ओहो, तू जसा काही इतका भोळाभावडा आहेस की मी कोण आहे हे तुला कळतच नाही! हं, मी आहे भूत, साधंसुधं नव्हे अगदी अतिशय दुष्ट जातीचं भूत आहे मी! काय वैद्यशास्त्रा संबधी चर्चा करायला आलोय असं समजतोस की काय तू? या गावच्या सीमेवरच्या ओसाड जमिनीत आज एक काठी रोवून आला आहेस की नाही ते सांग?"

"मग काय, हा काय काही अपराध केला होय मी? सहज म्हणूनच काठी रोवली मी!" विश्वनाथने भोळेपणा पांघरत म्हटले.



हे उत्तर ऐकून विश्वनाथकडे डोळे फाडून बघत भूत म्हणाले—"तू काय फसवू बघतो आहेस काय मला? जमिनीत सोन्याच्या नाण्यांच्या हंडया लपलेल्या आहेत याचा तू कसातरी पत्ता लावला आहेस. पण लक्षात ठेव, तुला जो खजिना दिसला आहे, तो मी माझ्या वारसासाठीच जमिनीत गाडून ठेवला आहे. माझा नातू माधव यालाच ते धन मिळायला हवं. जर आणखी कोणी ते हडपू पाहील तर मी त्याचा सर्वनाश करून टाकीन, समजलास?" अशी दटावणी देऊन भूत अदृश्य झाले.

भुताची धमकी मिळाल्यावरही विश्वनाथ मुळीच घाबरला नाही. पण आता त्याच्यापुढे एक धर्मसंकट उभं राहिलं भुताच्या म्हणण्याप्रमाणे कोण्या एका काळी ती जमीन माधवच्या आज्या-पणज्यांची होती. पण आपली मालकी असल्या काळात त्यांनी सर्व स्थावर-जंगम इस्टेट विकून टाकली अन् ते कंगाल झाले! अशा प्रकारे आता ती जमीन जमीनदार जगतसिंह याच्या ताब्यात आली होती. तेव्हा आता तो खजिना जमिनीचा मालक जगतसिंहाला न देता माधवला देववणं न्यायाला धरून होणार नाही! काय करावं आता? रात्रभर बिचारा विश्वनाथ विचार करीत राहिला अन् शेवटी त्याने स्वतःशीच एक निर्णय घेतला.

वसंत मांडके

दुसऱ्या दिवशी सकाळी पाच शेर चणे, एक शिवलिंग, एक कुदळ व फावडे इतक्या वस्तु घेऊन तो त्या मैदानात पोचला. तिथे खोचलेल्या काठीपासून थोड्या अंतरावर त्याने दीड-दोन फूट खोल खड्डा खोदला; त्यात अगोदर खाली चणे घालून त्याने त्यावर शिवलिंग ठेवले अन् वरून माती लोटून खड्डा बुजवून जमीन सारखी करून टाकली आणि घरी निघून आला.

त्या दिवशी संध्याकाळपर्यंत शिवलिंगाचा अर्धा भाग जमिनीच्या बाहेर निघाला. ते पाहून एका माणसाने ती वार्ता गावात पोचवली. मग काय! मैदानात 'शिव-शंकराचे अवतरण झाले' असे म्हणत गावकरी तेथे जाऊन शिवलिंगाची पूजा करू लागले.

आपली योजना सफल होत आहे असे पाहून विश्वनाथला फारच आनन्द झाला. गावातल्या चार वडिलधाऱ्या लोकांना बरोबर घेऊन तो जमीनदाराकडे गेला. सर्व हकीकत ऐकून जमीनदारही फार खूष झाला. तो म्हणाला—"जेथे शंकराचे अवतरण झाले ती जमीन देवाचीच झाली असं मी मानतो. तेथे मन्दिर बांधण्यासाठी मी ते सर्व मैदान बक्षिस देऊन टाकतो. बांधकामासाठी पहिली वर्गणीही माझ्या-कडूनच घ्या." असे म्हणून भरपूर धन आणि जमिनीचा दस्तावेजही त्याने या लोकांच्या हवाली केला.

त्या वडिलधाऱ्या लोकांसमक्षच जिथे खजिना लपलेला होता त्याच जागी विहीर खोदवण्याची व्यवस्था विश्वनाथने केली. मजुरांनी खोदायला सुरुवात केली, तो काय? तिथे त्यांना खजिना सापडला! लोकांनीही 'ईश्वराची लीला' असेच मानले!

खजिन्यातून मिळालेल्या धनाच्या साह्याने दोन-तीन महिन्यातच तेथे एक सुन्दर शिवमन्दिर उभे राहिले! दूरवर एका चिंचेच्या झाडात राहणारे ते भूत हा सर्व तमाशा मुकाट्याने पहात राहिले! वैद्याच्या बुद्धिमत्तेने आश्चर्यचकित होऊन ते काहीच करू शकेना!





[२]

दुसऱ्या दिवशी धीरसिंह परत आला, तेव्हा सुलोचनेने त्याला बसायला आसन दिले, आणि ती म्हणाली—"इथून पश्चिम दिशेला तीस योजनांच्या अंतरावर एक नदी वहाते. त्या नदीचं पाणी नेहमीच रक्ताच्या रंगाचं असतं. ती नदी कुठे उगम पावते? आणि तिचं पाणी रक्तवर्ण का असतं?—हाच माझा दुसरा प्रश्न."

या प्रश्नाचे उत्तर देण्याकरता धीर-सिंहाने सुलोचनेकडून नऊ दिवसांची मुदत मागून घेतली आणि घोड्यावर स्वार होऊन तो दक्षिण दिशेला निघाला. जाता जाता तो एका जंगलात येऊन पोचला. त्या जंगलाच्या मध्यावरून वहाणारी रक्त-नदी त्याला दिसली! घोड्यावरून नदीकिनाऱ्याने तो उगमाकडे चालू लागला. सूर्यास्ताच्या वेळी अखेर तो एका डोंगरावरील सरो-वरापाशी येऊन पोचला.

त्याच्या असे लक्षात आले की या पाण्यातच रक्त झिरपत आहे! सरोवराच्या मध्यावर कसलेसे झाड उभे होते आणि झाडाच्या फांद्यांना स्त्रियांची असंख्य शिरे लटकत होती! त्या टांगलेल्या मुंडक्यातूनच मधून मधून रक्ताच्या धारा पाण्यात मिसळत होत्या!

आश्चर्यचकित होऊन धीरसिंह ते दृश्य पहातच राहिला; आणि तेवढ्यात भोव-ताली अंधार दाटला हे ही त्याच्या लक्षात



आले नाही. पण क्षणभरातच तो सारा आसमंत एका विचित्रशा प्रकारे भरून गेला! झाडाच्या फांद्यांवर लोंबणारी ती मुंडकी धीरसिंहाकडे पाहून खदाखदा हसू लागली! नंतर एक एक करत ती सर्व मुंडकी फांदीपासून सटकून पाण्यात पडली. सगळीच्या सगळी सर्व मुंडकी खाली पडल्यानंतर त्या सरोवरांतले रक्त अदृश्य झाले आणि तेथे एक अद्भुत महाल दिसू लागला! महालाच्या आत एका विशाल दालनाच्या मध्यभागी एक रत्नजडित सिंहासन होते. थोड्या वेळाने नक्षत्रांच्या मधे चंद्राप्रमाणे शोभणारी एक अनुपम लावण्यवती तरुणी आपल्या अनेक सख्यां-समवेत हळूहळू पावले टाकीत तेथे आली आणि सिंहासनावर बसली.

ताबडतोब काही दासी मिष्टान्नें भरलेली ताटे घेऊन आल्या आणि त्यांनी ताटे मांडली. त्या स्त्रियांनी धीरसिंहालाही भोजनासाठी बोलावले. धीरसिंह जवळ जाऊन एका आसनावर बसला. जेवता जेवता त्याने विचारले–"तुम्ही कोण आहात? ही सर्व काय जादु आहे?"

हा प्रश्न त्याने अनेकदा विचारला पण कोणीच त्याला उत्तर दिले नाही. जेवणानंतर त्या सर्व युवतींनी धीरसिंहाला घेरले आणि पहाटेपर्यंत त्यांनी नृत्य-गायन करून त्याला रिझवले. परंतु सकाळ होताच तो महाल अदृश्य झाला अन् त्याबरोबरच त्या सर्व स्त्रिया मुंडक्यांच्या रूपात रक्त-सरोवराच्या मध्यावर असलेल्या झाडाला लटकू लागल्या!

या रहस्याचा पत्ता लावण्याच्या उद्देशाने धीरसिंहाने चारी बाजूंना बारकाईने आपली नजर फिरवली. परंतु त्याच्या टप्प्यात त्याला एकही सजीव प्राणी आढळला नाही. आता तो पुन्हा सरळ पश्चिम दिशेकडे चालू लागला. अशा प्रकारे थोडे पुढे गेल्यावर त्याला एक गुहा दिसली त्याने गुहेत डोकावून पाहिले, तेव्हा एक मुनि डोळे मिटून ध्यान करीत बसलेले



त्याला दिसले. धीरसिंहाने आत शिरून साधु-महाराजांना भक्तिपूर्वक दण्डवत घातला.

डोळे उघडून मुनींनी धीरसिंहाची चौकशी केली, त्याच्या आगमनाचे कारण विचारले. धीरसिंहाने सविस्तर माहिती सांगितली आणि म्हटले–"आपली कृपा झाली तर माझं काम खूपच सुलभ होईल!"

"वत्सा, तू ज्या स्त्रिया पाहिल्यास त्यातली सर्वात सुंदर असणारी तरुणी सुनन्दिनी. ती अग्निकुम्भ नावाच्या एका जादुगाराची भाची होय. उपवर झाल्यावर सुनन्दिनीने एका तरुणाशी विवाह करण्याची इच्छा प्रदर्शित केली. परन्तु अग्निकुंभाला ते स्थळ पसन्त नव्हते अन् रागाने त्याने सुनन्दिनीला तिच्या सख्यांसह आपल्या मायाजाळात अडकवले. अग्नि-कुंभाच्या मृत्यूनंतरच सुनन्दिनीला त्या रक्त-सरोवरातील झाडाच्या फान्दीपासून मुक्ती प्राप्त होईल." मुनीमहाराज म्हणाले.

"मुनिवर, आपला आशिर्वाद मिळाला तर मी सुनन्दिनीला मुक्त करू शकेन." धीरसिंहाने इच्छा प्रदर्शित केली.

"अग्निकुंभाचा संहार करण्याची शक्ति तुझ्यात नक्कीच आहे बेटा! पण तो महाक्रूर आणि धूर्त मान्त्रिक आहे. त्याच्या इन्द्रजालाचा तुझ्यावर काही परिणाम



होऊ नये, म्हणून मी तुला एक मन्त्र देतो. तू काया, वाचा, मनाने आणि भक्तिपूर्वक तो मन्त्र जपलास की त्या जादूगाराचा सहज पराभव करू शकशील." असे म्हणून साधु महाराजांनी धीरसिंहाच्या कानात मन्त्रोपदेश केला.

धीरसिंहाने कृतज्ञतेने मुनींना पुन्हा साष्टांग प्रणिपात केला. मुनीने धीरसिंहाला डोळे मिटायला सांगून त्याच्या मस्तकावर आपल्या दण्डाचा स्पर्श केला. थोड्या वेळाने धीरसिंहाने डोळे उघडून पाहिले, तर आपण एका गगनचुम्बी पर्वताच्या पायथ्याशी उभे आहोत असे त्याला आढळले! सर्व पर्वत चित्रविचित्र फुलांनी



झाकल्यामुळे मोठा सुन्दर दिसत होता! धीरसिंहाने विचार केला–अग्निकुंभाच्या ज्या दुर्गाबद्दल मुनि बोलले होते तो दुर्ग बहुधा याच पर्वतावर असावा! धीरसिंह पर्वत चढू लागला. तोच वाघ-सिंह भयानक गर्जना करीत त्याच्यावर तुटून पडले. परंतु जराही विचलित न होता त्याने मुनींनी दिलेला मन्त्र तीनदा जपला. बस, त्यानंतर एकही जनावर त्याच्या वाटे गेले नाही.

आणखी थोडे पुढे गेल्यावर त्याचे पाय एकाएकी जमिनीला चिकटून बसले अन् सुटायचा प्रयत्न करूनही ते सुटेनात. त्याला वाटले हे काम जादूचेच असले पाहिजे, म्हणून पुन्हा त्याने मन्त्र जपताच पाय सुटले अन् तो परत नेहमीप्रमाणे चालू लागला.

त्या पर्वतावरील आपल्या दुर्गात बसलेल्या अग्निकुंभाने आपली ताडपत्रे उघडून पाहिली तेव्हा त्याने धीरसिंह आपल्या दिशेने येत असलेला पाहिला. धीरसिंह आपल्या किल्ल्यात प्रवेश करू शकला तर आपल्या जिवाला धोका आहे हे त्याने ओळखले व आपल्या मायाविद्येच्या शक्तीने त्याने एक खोटी सुनन्दिनी व तिच्या मैत्रिणी निर्माण केल्या.

स्मितहास्य करीत ही माया-सुनन्दिनी आपल्या सख्यांसमवेत धीरसिंहाला भेटायला गेली. तिला तिथे पहाताच धीरसिंह आश्चर्याने म्हणाला–"रक्त-सरोवरातल्या त्या विचित्र झाडावर लटकणाऱ्या तुम्ही साऱ्याजणी इतक्या थोड्या अवधीत इथे कशा काय पोचलात?"

"ही सर्व तर माझ्या मामाची कृपा! त्याने आमच्यावर कृपा करून आम्हा सर्वजणींना आपल्या मायाजाळातून मुक्त केले आहे. चल, आमच्याबरोबर येऊन भोजन कर." माया-सुनन्दिनीने हसत हसत आग्रह केला.

तिच्या बोलण्यावर विश्वास ठेऊन धीरसिंह तिच्या मागे चालू लागला. गोड गोड बोलत माया-सुनन्दिनीने धीरसिंहाला एक मादक पेय प्यायला दिले. ते पिताच तो बेहोष होऊन खाली पडला! सुनन्दिनीने त्याला ताबडतोब बन्दी केले. अन् त्याला घेऊन जाऊन अग्निसिंहाच्या हवाली केले.

अग्निसिंहाने ओरडून आपल्या सेवकांना आज्ञा दिली–"बांधा या दुष्टाचे हात-पाय अन् द्या त्याला ज्वाला-कूपात फेकून!"

इतक्यात धीरसिंह सावध झाला अन् आपल्याला फसवले गेले हे त्याच्या लक्षात आले! त्याने ताबडतोब मुनींचे स्मरण करून मन्त्र जपला आणि त्यामुळे धडधडून पेटत असलेल्या ज्वाला-कूपात पडूनही तो जिवन्त राहिला. एकाद्या पुष्पशय्येवरून उठून यावे, तद्वत् तो त्या ज्वाला-कूपातून चालत बाहेर आला!

यानंतर धीरसिंहाला कैद करून तुरुंगात डांबण्याची आज्ञा अग्निकुम्भाने आपल्या सेवकांना दिली. तुरुंगात गेल्यावर त्याच रात्री तिथला पहारेकरी करुणाकर याच्याशी त्याने मैत्री करून घेतली. बोलण्याच्या ओघात त्याला कळले की हा पहारेकरीही अग्निकुम्भाचा शत्रूच आहे. त्याला हे ही कळले की सुनन्दिनी खरे तर या करुणाकरशीच विवाह करू इच्छित होती! धीरसिंह पहारेकऱ्याला म्हणाला–"तू मला तुरुंगातून मुक्त केलेस तर मी अग्निकुम्भाचा संहार करून तुझा व सुनन्दिनीचा विवाह घडवून आणीन."

"तुला वाटतं तितकं हे काम सोपं नाही. अग्निकुम्भ अत्यन्त क्रूर अन् मायावी आहे.





या पर्वतावरचा हा सुरक्षित किल्ला हीच काही त्याची एकमेव जागा नव्हे! त्याने आपल्या मायाशक्तीने या पहाडापासून तीस हजार फुट उंचीवर एक मेघमण्डळ निर्माण करून ठेवलं आहे. जेव्हां जेव्हां त्याला काही धोका वाटेल तेव्हां तो या मेघमण्डळात जाऊन बसतो. अन् मग त्याच्याजवळ कोणी कसे पोचू शकेल?" करूणाकरने त्याला माहिती दिली.

"पण कुणाचा का होईना, दुष्टपणा फार काळ चालू शकत नाही. जी माणसं धर्मासाठी, न्यायासाठी लढतात, त्यांचा पराभव कधीही होत नाही. तू मला अगोदर तुरुंगाचं दार उघडून बाहेर काढ, नंतर इथून अग्निकुम्भाच्या किल्ल्याचा रस्ता दाखव; पुढलं काम माझं मी पाहून घेईन." धीरसिंह म्हणाला.

धीरसिंहाचे बोलणे ऐकून करुणाकर फार खुश झाला. त्याने तुरुंगाचे दार उघडले अन् धीरसिंहाला बरोबर घेऊन तो किल्ल्याची वाट चालू लागला. रस्त्यात त्यांना कित्येक वृक्ष दिसले. ते दाखवून करुणाकर म्हणाला—"हे काही खरेखुरें वृक्ष नव्हेत. अग्निकुम्भाशी सामना द्यायला जी जी माणसे आली, त्या सर्वांना त्याने आपल्या मन्त्र-शक्तीने वृक्षांचे रूप दिले."

यावर धीरसिंहाने मुनीचे स्मरण करून मनात इच्छा केली की 'अग्निकुम्भाची माया नष्ट होऊन हे सर्व वृक्ष पुनश्च आपले मूळ रूप धारण करोत.' आणि त्याने मन्त्र जपला, काय आश्चर्य! ताबडतोब ते सर्व वृक्ष माणसांच्या रूपात परिवर्तित झाले! ते सर्व मोठ्या उत्साहाने शिपायांसारखे धीरसिंहाच्या मागे मागे चालू लागले.

आपल्या दुर्गात ताडपत्रे पहात बसलेल्या अग्निकुम्भाने ओळखले की धीरसिंह सैन्य जमवून आपल्यावर हल्ला करायला येत आहे! त्याने आपल्या मंत्रसामर्थ्याने तिथला सारा आसमन्त अंधकारमय बनवून टाकला. त्याबरोबर तो सबन्ध पर्वत थरथरू लागला! हा अचानक झालेला बदल पाहून सैनिक घाबरून हाहा:कार करू लागले. धीरसिंहाने मन्त्र जपल्यावर पर्वत स्थिर झाला आणि हळूहळू अंधारही हटू लागला.

यानंतर अग्निकुम्भाने आपल्या मायाशक्तीने सैन्यात सर्पवृष्टि केली, आगीच्या ज्वाला निर्माण केल्या, पण धीरसिंहानेही दरवेळी आपल्या मन्त्राने परिस्थिति पुर्ववत् केली. शेवटी निरुपाय होऊन अग्निकुंभ दुर्गातून अदृश्य होऊन मेघमण्डळाकडे पळून गेला.

धीरसिंहाचे सैनिक त्याच्या किल्ल्यात पोचले. आत सोन्याचे महाल अन् सुन्दर बगीचे ठिकठिकाणी विखुरलेले होते. दुर्ग तसा निर्जन होता पण खाण्याचे पदार्थ मात्र अनेक ठिकाणी ठेवलेले आढळले. धीरसिंहाचे भुकेले सैनिक त्या पदार्थांवर तुटून पडले. परन्तु थोड्याच वेळात ते सर्वजण बेहोश होऊन पडले. धीरसिंहाने जवळच्या तलावातून पाणी आणून त्यावर मन्त्र फुंकला अन् ते पाणी सगळ्या सैनिकांवर शिंपडताच ते सावध होऊन उठून बसले—जणू काय आत्ताच झोपेतून उठून बसत आहेत!

यानंतर करूणाकरला बरोबर घेऊन धीरसिंह किल्ल्याच्या बाहेर आला आणि एका खडकावर बसून आकाशाकडे पहात तो 'अग्निकुम्भाचे मेघमण्डळ कोसळून पडावे' अशी इच्छा करून मन्त्र जपू



लागला. थोडयाच वेळात भयानक आवाज करीत मेघमण्डळ मोडून त्याचे हजारो तुकडे होऊन ते जमिनीवर कोसळले. त्याबरोबरच आपल्या अनुयायांसहित अग्निकुम्भही खाली कोसळून सर्वजण मरून गेले!

हे पाहून सर्वजण आनन्दाने नाचू-गाऊ लागले! यानंतर धीरसिंहाने काही सैनिकांची दुर्गाचे पहारेकरी म्हणून नियुक्ति केली आणि स्वतः करुणाकरला बरोबर घेऊन रक्त-सरोवराकडे निघाला. परंतु इतक्यात स्वतः सुनन्दिनीच आपल्या मैत्रिणींना बरोबर घेऊन दुर्गाकडे येताना दिसली. जादुगार अग्निकुंभाच्या मृत्यु-बरोबरच त्याची जादुही नाहीशी झाली होती.

सुनन्दिनी निकट येऊन पोचताच धीरसिंह तिला म्हणाला–"मुनींच्या आशिर्वादाने मी अग्निकुम्भाचा वध करण्यात सफल झालो आहे. त्यामुळेच रक्त-सरोवरातून तू मुक्त होऊ शकली आहेस. आता तू आपला इच्छित वर करुणाकर याच्याशी विवाह करून सुखाने रहा.

सुनन्दिनीने मोठ्या आनन्दाने धीरसिंहाचे म्हणणे मान्य केले. धीरसिंहाने मोठ्या थाटामाटाने सुनन्दिनीचा विवाह करुणाकरशी करून दिला. आणि नंतर तेथून निघून साधुमहाराजांकडे जाऊन त्याने त्यांना प्रणाम केला. त्यांचा निरोप घेऊन लगेच तो कौशांबीला पोचला.

कौशांबीला पोचल्याबरोबर सुलोचनेची भेट घेऊन तिला धीरसिंहाने रक्त-सरोवराबद्दलची सर्व हकीकत सांगितली. ते सर्व ऐकून सुलोचना म्हणाली–"आपण जे काही सांगितलेत ते सर्व खरेच आहे. कारण मला अशी वार्ता मिळाली आहे की त्या दुष्ट मान्त्रिकाचा वध होऊन नदी पूर्ववत् स्वच्छ पाण्याने वाहू लागली आहे. आता आपण पुन्हा उद्या आलात म्हणजे मी आपणाला माझा तिसरा प्रश्न विचारीन." असे म्हणून सुलोचनेने धीरसिंहाला सन्मानाने रवाना केले.

(क्रमशः)



# शिक्षणाची योग्यता

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडापाशी परत आला; झाडावरले प्रेत उतरून त्याने खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाकडे चालू लागला. हे पाहून त्या शवात वास करणार वेताळ बोलू लागला–"राजा, अगदी मनापासून काम करताना खूप कष्ट सहन करण्याची शक्ती केवळ ज्ञानी आणि विवेकी माणसांच्यातच असते असे नव्हे. तशी शक्ती मूर्ख माणसातही असू शकते. तू या दोहोपैकी कोणत्या वर्गात मोडतोस याबद्दल मी साशंक आहे, 'ज्ञानी' म्हणून यश प्राप्त केलेल्या एका स्वार्थी इसमाची गोष्ट मी तुला सांगतो. तू गोष्ट ऐक म्हणजे तुला आपल्या कष्टांचा विसर पडेल."

वेताळ गोष्ट सांगू लागला–"विद्यानन्द योगी नावाच्या एका पंडिताने कोसल



राजधानीच्या सीमेवर आपला गुरुकुल आश्रम सुरू केला. त्याची अशी प्रसिद्धी होती की—त्याच्या शिकवणुकीमुळे एखादा मूर्ख ही ज्ञानी बनून जातो.

या कोसल राजाला दोन राण्या होत्या. थोरल्या राणीचा पुत्र विजय हा अतिशय बुद्धिमान मुलगा होता. सोळा वर्षांच्या वयातच तो सर्व प्रकारच्या विद्येत पारंगत बनला. परन्तु धाकट्या राणीचा अजय मात्र फार लाडावल्यामुळे कोणत्याही विद्येत कुशल बनू शकला नाही.

एके दिवशी धाकट्या राणीने राजाकडे तक्रार केली—"माझ्या लाडावण्यामुळेच अजय मूर्ख बनला आहे, ही गोष्ट मी मान्य करते. दरवेळी विजयशी तुलना करून माझ्या अजयचा अपमान केला जातो हे मला सहन होत नाही हो!" हे बोलताना राणीला रडू फुटले.

धाकट्या राणीचे बोलणे ऐकून कोसल-नरेश म्हणाला—"आपल्या करणीचे फळ प्रत्येकाला भोगावेच लागते. अजय एक नंबरचा बावळट आहे. शिक्षण कशाशी खातात हे ही त्याला माहीत नाही! मी त्याला आता कसं वरं सुधारू?"

जरा विचार करून राजा म्हणाला—"आपल्या राजधानीच्या सीमेवर विद्यानन्द-योगी नावाच्या आचार्यांचा गुरुकुल आश्रम आहे. अगदी मूर्खातल्या मूर्ख विद्यार्थ्याला ही ते चांगला शहाणा करून सोडतात अशी त्यांची कीर्ती माझ्या कानावर आली आहे. पण त्या आश्रमाचे नियम भारी कडक असतात; सर्व प्रकारच्या, सर्व जातींच्या विद्यार्थ्यांना तेथे समान वागणूक दिली जाते. राजा, रंक इत्यादि सर्व भेद विसरून सर्वांना आश्रमाच्या नियमांचे सारखेच पालन करावे लागते. यासाठीच मी विजयलाही त्या आश्रमात पाठवायचा विचार कधी केला नाही. आपणच काय, पण आपल्या राजधानीतल्या संपन्न परिवारां-पैकी कोणीही आपल्या मुलांना त्या आश्र-मात यासाठीच पाठवत नाहीत. तुला काय



वाटतं, आपला अजय त्या आश्रमाचे नियम पाळू शकेल?"

"महाराज, आपण अजयबरोबर विजय-लाही त्या आश्रमात पाठवावे. मोठ्या भावाकडे पाहून तोही विनयशील बनेल. असं केल्याने त्याला असं ही वाटणार नाही की आपण नालायक आहोत, म्हणून आपल्यालाच फक्त या आश्रमात पाठवण्यात आलं आहे." राणीने सुचवले.

राणीची ही सूचना मान्य करून राजाने आपले दोन्ही पुत्र विद्यानन्द योगींच्या गुरुकुलात पाठवून दिले.

थोडे दिवस गेल्यावर एक दिवस मुलांची प्रगति पाहण्यासाठी दोन्ही राण्यांना बरोबर घेऊन राजा गुरुकुलात गेला. तिथे अजयला मोठ्या आनन्दात असलेला पाहून राजा-राणी आश्चर्यात पडले. राजाने प्रेमाने अजयला विचारले—"बेटा, गुरुकुलातलं जीवन तुला कसं काय वाटतं?"

"विद्यानन्द योगी महान् ज्ञानी आहेत. त्यांच्या सान्निध्यात राहून मला शिक्षणाची गोडी वाटू लागली आहे. इतर विद्यार्थी अनेक वर्षे घालवून जी शास्त्रे शिकतात ती सर्व शास्त्रं दररोज एक या हिशोबाने मी शिकून घेतली. मी सर्व शास्त्रांचं अध्ययन केवळ दोन आठवड्यात संपवलं!" अजयने आनंदाने उत्तर दिले.



धाकट्या राणीने प्रसन्न होऊन म्हटले "तू जी शास्त्रं शिकलास त्यांचं सार थोडक्यात सांग ना बेटा!"

"आई, तुला ती शास्त्रं कळायची नाहीत. गुरुजीकडून शिकलेल्या उपनिषदा-तल्या गोष्टी मात्र मी तुला फुरसतीच्या वेळी सांगेन. प्रत्येक गोष्टीत एक एक तात्पर्य आहे." असे म्हणून अजयने लगेच काही गोष्टी सांगितल्या. त्या सर्व गोष्टी स्वतःला फार शहाणे समजल्यामुळे इतरां-कडून अपमानित व्हावे लागलेल्या मूर्ख माणसांच्या संबंधातल्या होत्या!

गोष्टी ऐकून उद्विग्न झालेल्या मोठ्या राणीने अजयला विचारले—"अरे, तुझा

दादा दिसत नाही कुठे तो? त्याचं शिक्षण कसं काय चालू आहे?''

''आत्ता मी ज्या गोष्टी सांगितल्या ना, त्या गोष्टी माझ्याबरोबरच गुरुजींनी दादाला सुद्धा सांगितल्या. मला असं कळलं की नव्या नव्या आलेल्या सर्वच विद्यार्थ्यांना गुरुजी या गोष्टी सांगतात; पद्धतच आहे त्यांची तशी! पण त्या ऐकून दादा मात्र अगदी निराश झाला! त्याला म्हणे असं जाणवलं की–आपल्याजवळ तर काहीच ज्ञान नाही–खूप शिकायला हवं अजून आपल्याला! त्यामुळे तो नेहमी अभ्यासातच गढलेला असतो तेव्हापासून!'' अजयने विजयची माहिती दिली. अजयचे उत्तर ऐकून राजाला आश्चर्य वाटले आणि त्याने विजयला बोलावणे पाठवले. विजयला यायला जरा वेळच लागला. त्याचा उदास चेहरा पाहून राजाने विचारले, ''तू तर काळजीत दिसतोस बेटा! काय झालं? आम्ही आलेलं कळूनही तू आम्हाला भेटायला का नाही आलास?''

आपल्या पित्याला प्रणाम करून विजय म्हणाला–''पिताजी, राजवाड्यात अंतःपुरात राहून आपल्या गुरूंकडून मी जे काही शिकलो तेच ज्ञान सर्व असं समजून मला जणू गर्व झाला! मला तर अजून खूप शिकायला हवं. लवकरच राज्याचा भार सांभाळायचा आहे. त्यामुळे मिळेल त्या वेळाचा उपयोग करून मला सर्व विद्या शिकायच्या आहेत! मी त्यामुळे आजकाल आपल्या मूल्यवान् वेळाचा एक क्षणही वाया घालवत नाही!''

एवढ्यात विद्यानन्द गुरुजी तिथे पोचले. ते म्हणाले–''महाराज, आपल्या आगमनाची वार्ता मला जरा उशीरानेच मिळाली. मी पूजाअर्चा करण्यात मग्न होतो म्हणून उशीर झाला यायला! क्षमा असावी! माझ्या शिष्यांकडून आपल्या आदरसत्कारात काही उणीव तर नाही ना राहिली?''

आचार्यांना अभिवादन करून राजाने आपल्या मुलांची हकिकत सांगून म्हटले–''मला वाटलं होतं त्यापेक्षा ही स्थिति अगदीच निराळी आहे! यांच्या शिक्षणाबद्दल आपलं म्हणणं काय आहे?''

''महाराज, विजय दोन वर्षे माझ्याजवळ राहिला तर तो सर्व शास्त्रात पारंगत झाल्याचं प्रमाणपत्र मी देऊ शकेन. हे प्रमाणपत्र बाळगणारा विद्यार्थी भक्ति, वेदान्त व व्यावहारिक ज्ञानातही दक्ष आहे असे सर्वत्र मानले जाते.''

''मग अजयबद्दल काय?'' राजाने विचारले.

''वा! अजयची प्रज्ञा तर असामान्य आहे! विद्याभ्यासासाठी त्याला कोणाही गुरूची आवश्यकता नाही. त्याला शिकवायला माझी बुद्धिमत्ता तर अगदीच तोकडी आहे! आपण त्याला आजच घरी घेऊन जाऊ शकता!'' विद्यानन्द योगींनी राजाला उत्तर दिले.












विद्यानन्दयोगींना आणखी काही विचारावे असे राजाला वाटले, पण तो गप्पच राहिला आणि अजयला घेऊन राजधानीला परतला."

इतकी गोष्ट सांगून वेताळाने विचारले—"राजा, सगळ्या लोकांकडून प्रशंसा मिळवलेला हा विद्यानन्द योगी स्वार्थी वाटतो की नाही? अजयला महान ज्ञानी अन् एकपाठी वगैरे म्हणण्यात काही तरी गोम असावी. माझा संशय आहे की अजयला त्याने आणखी काही दिवस आपल्याजवळ ठेवले असते तर विद्येच्या बाबतीत त्याने भावी राजा विजय याला मागे सारले असते; पण आचार्यांच्या मनात भविष्यात राजगुरू म्हणून खूप यश मिळवायची स्वार्थभावना प्रबळ झालेली होती; म्हणूनच त्यांनी अजयला पुढे शिकवायला नकार दिला नं?—या शंकेचं उत्तर माहीत असूनही दिलं नाहीस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होऊन पडतील."

विक्रमादित्याने यावर उत्तर दिले—"एका राजपुत्राला त्याच्या पित्यासमोर मूर्ख म्हणून उघडे पाडणे अनुचित होय! म्हणूनच ही गोष्ट विद्यानन्दयोगींनी राजा त्याला समजेल अशा बेताने युक्तीने मांडली. अजय कदाचित एकपाठी असेलही, परन्तु जन्मापासूनच तो मूर्ख आहे. त्याला मूर्ख लोकांच्या गोष्टी सांगितल्या. पण त्या ऐकूनही अजयला कळले नाही की—आपणही त्या मूर्खांपैकीच एक आहोत! दोन आठवड्यात सर्वशास्त्र—पारंगत झाला तर तो इतरांना सतावू शकतो. तो राजपुत्र आहे म्हणूनच त्याचा अहंकार इतरांच्या त्रासालाच कारणीभूत होईल. म्हणून विद्या शिकण्याची त्याची पात्रताच नाही. तेव्हा अत्यन्त निस्वार्थ बुद्धीने आणि राज्यकल्याणाचा विचार करूनच विद्यानन्द योगींनी अजयला विद्यादान करण्याचे अमान्य केले आहे."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्या झाडावर जाऊन बसला.

(कल्पित)





# गायींची वाटणी

एका गावात धर्मदास नावाचा एक धनवान माणूस रहात असे. आपला अंतकाळ जवळ आलेला ओळखून त्याने आपले मुलगे शिवराम व नारायण यांना बोलावून म्हटले—"हे पहा, माझ्या मृत्यू नन्तर मुतळीच्या तोड्यासकट ही सर्व संपत्ति तुम्ही दोघे सारखी वाटून घ्या."

पित्याच्या मृत्यू नंतर त्या दोघांनी सर्व संपत्तीचे अगदी सारखे दोन भाग केले. सर्व इस्टेट सारखी वाटली गेली; पण आता तेरा गायी राहिल्या. त्या कशा सारख्या वाटून घ्याव्या हे काही त्यांना कळेना!

त्यांच्या अडचणीची माहिती झाल्यावरून गंगाधरशास्त्री नावाचा एक ब्राह्मण त्यांच्या घरी गेला आणि म्हणाला—"मुलांनो, मला वाटतंय की तुम्ही आपल्या वडिलांच्या श्राद्धानिमित्त गोदान कराल. तुम्ही एक गाय मला दान दिलीत तर तुमच्या वडिलांच्या आत्म्याला शान्ति मिळेल. गायींच्या वाटणीची तुमची अडचणही दूर होईल!"

शिवराम अन् नारायण यांनी ब्राह्मणाची सूचना अमान्य करीत म्हटले—"दान-बीन देण्यावर काही आमचा विश्वास नाही. आम्हाला वाटतं की तुम्ही कष्ट करून पैसा मिळवावा."

गंगाधरशास्त्री म्हणाले—"मी जर केवळ दानावरच आशा लावून बसलो असतो तर तुमच्यासारखे अधिकांश अश्रद्ध लोक रहात असलेल्या या गावात मला जगणंच अशक्य झालं असतं. मी आपल्या बुद्धीच्या जोरावर लोकांच्या अडचणी सोडवून त्याचा मेहनताना मिळवत असतो. मोबदला मिळणार असेल तर तुमची गायींच्या वाटणीची अडचणही मी सोडवून देईन."

"सांगा काय हवा मोबदला तुम्हाला?" शिवराम अन् नारायणने विचारले.

"एक गाय." गंगाधरशास्त्री म्हणाले.

"अहाहा! तुम्हाला एक गाय दिली की हिशोब बरोबर होईलच मुळी! यात तुमची बुद्धिमत्ता ती काय?" दोघंही म्हणाले.

"मी तुमच्याकडून अगोदर गाय न घेता वाटणी करून देईन आणि मगच आपला मेहनताना घेईन. मग तर झालं?" गंगाधरशास्त्रींनी आपली अट सांगितली.

आता शिवराम आणि नारायणचं कुतुहल वाढलं. दोघा भावांनी खूप डोकं खाजवलं, पण गंगाधरशास्त्री काय युक्ति करणार हे काही त्यांच्या लक्षात येईना! ते म्हणाले–"ठीक आहे. मेहनताना म्हणून तुम्हाला गाय दिल्यावरही आम्हाला दोघांना गायी सारख्या-सारख्या मिळाल्या पाहिजेत."

"मान्य आहे मला. आता माझी गाय तुमच्या गायींच्या संख्येत मिळवा. चौदा गायी झाल्या एकूण? म्हणजेच तुम्हा दोघांना प्रत्येकी सात-सात गायी मिळतील. आता वाटणी बरोबर झाली न?" गंगाधरशास्त्रींनी विचारले.

"थांबा, तुम्हाला आता एक गाय दिली की आमची वाटणी सारखी कशी होईल?" दोघांनी एका स्वरात विचारले.

"मला एक गाय दिल्यावर तुमच्याजवळ बाराच गायी राहतील ना! आता अडचण काय?" गंगाधरशास्त्री म्हणाले.

"मग तुम्ही जी गाय दिली तिचं काय?" दोघांनी आपली अडचण मांडली.

"मी तुम्हाला माझी गाय देऊन नाही टाकली काही! केवळ वाटणीच्या सोयीसाठी मी तिला तुमच्या गायींत मिसळले." गंगाधरशास्त्री म्हणाले.

गंगाधरशास्त्रींचा हा निवाडा ऐकून दोघेही भाऊ जोरजोरात हसू लागले. गंगाधरशास्त्रींना एक गाय देत ते म्हणाले– "ही गाय आम्ही तुम्हाला मेहनताना म्हणून नाही देत आहोत, तर तुमचे चातुर्य अन् बुद्धिमत्तेबद्दल बक्षीस म्हणून देत आहोत, समजलं?"

गंगाधरशास्त्री मोठ्या खुशीने गाय घेऊन घरी निघून गेले.



## चांदोबा पुरवणी - ५

# ज्ञानाचा खजिना

### या महिन्याचे इतिहासप्रसिद्ध व्यक्तित्व



### दारा शिकोह

बादशहा शाहजहाँ आणि बेगम मुमताजमहल यांचा थोरला मुलगा दारा शिकोह याचा जन्म २० मार्च १६१५ रोजी झाला. वडिलांचे या मुलावर फार प्रेम आणि तो तसा आपल्या काळातील मोठा विद्वान ही होता. सत्य ही काही कुठल्या ही एका धर्माची मिरासदारी नाही असं त्याला वाटे.

ई.स. १६५७ मध्ये शाहजहाँ जेव्हां आजारी पडला तेव्हा दारा त्याच्याजवळ होता. वडिलांच्या मृत्युनंतर तोच राज-सिंहासनावर बसणार अशी अपेक्षा होती. पण शाहजहाँचा धाकटा मुलगा औरंगजेब याने आपल्या दोन भावांना दारा विरुद्ध भडकावले. भाऊच त्याचे शत्रु झाले आणि त्यांच्याशी अनेक लढायांत त्याला हार खावी लागली. मग त्याने पर्शियाला जाण्याचा विचार केला. वाटेत तो जीवन मलिकाच्या आश्रयाला गेला. दाराने एकदा त्याचा जीव वाचवला होता. तरी पण मलिकने त्याला औरंगजेबाच्या सहकाऱ्यांच्या हवाली केले. औरंगजेबाने त्याला मौलानांच्या ताब्यात दिले. त्यांनी त्याला काफिर ठरवले आणि मृत्यूची शिक्षा दिली.



## तो कोण?

आपल्या देशात अनेक वर्षे भ्रमण केल्यानंतर एक विद्वान आपली नगरी प्रतिष्ठान येथे पोचला. त्याने शेकडो कथांचा संग्रह केला होता आणि आपल्या आश्रयदात्या राजाला त्या वाचून दाखविण्याची त्याची इच्छा होती. पण राजाला त्या ऐकण्यात काही स्वारस्य वाटले नाही. तो मुकाट्याने राजाच्या दरबारातून बाहेर पडला. एक एकान्त स्थान पाहून त्याने आपली सर्व हस्तलिखिते अग्नि-कुंडात जाळायला सुरुवात केली. जेव्हा राजाला हे समजले तेव्हा तो त्याला परावृत्त करण्यासाठी धावत आला. पण तोपर्यंत सात भागांपैकी सहा अग्नीच्या भक्ष्य-स्थानी पडले होते. सातवा भाग फक्त वाचला. मूलत: ज्या भाषेत या कथा लिहिलेल्या होत्या ती भाषा आता अस्तित्वात नाही. त्या कथांचे नंतर संस्कृत मध्ये केलेले भाषान्तर उपलब्ध आहे.

तो विद्वान कोण?

पृष्ठ ८ पहा......

**सूचना :**

स्वयंपाकघरात वापरल्या जाणाऱ्या एकाद्या पिष्ठमय पदार्थावर आयोडिनचे काही थेंब टाका आणि त्याला जो निळा-जांभळा रंग येतो तो पहा. ही पिष्ठमय पदार्थाची परीक्षा आहे. काय पहायचं हे समजून बटाटा, पावाचा तुकडा अथवा एकाद्या खाद्य पदार्थावर थोडे आयोडिन टाका. कशात पिष्ठमय पदार्थ आहे हे आता तुम्ही सांगू शकाल? कच्च्या बटाट्यासारखा ताजा पदार्थ असला, तर तो सुकेपर्यंत तुम्हाला थांबावं लागेल. मग याच-प्रमाणे तुमच्या वहीच्या कागदाचा तुकडा, वर्तमानपत्राचा एकदा कागद अथवा एकाद्या मासिकाच्या गुळगुळीत-चमकत्या कागदावर आयोडिन टाकून पहा.

# पिष्ठमय पदार्थांची परीक्षा




### काय होते आणि का?

बटाटा, पीठ व पिठाचे बनवलेले खाद्य पदार्थ (उदाहरणार्थ ब्रेड) तसेच वहीचा कागद व डिट्टो कागद यात पिष्ठमय पदार्थ आहे असे दिसते, पण वृत्तपत्राचा कागद आणि चमकत्या गुळगुळीत कागदात त्याचे अस्तित्व दिसत नाही. वृत्तपत्राचा कागद गुळगुळीत बनविण्यासाठी काही विशेष द्रव्याचा वापर केला जात नाही, पण चमकणाऱ्या कागदात मात्र अशा द्रव्याचा उपयोग केलेला असतो. वहीचा कागद अथवा डिट्टो कागदात पिष्ठमय पदार्थ असतो हे तुमच्या लक्षात येईल.

खाद्य-पदार्थांचे काही गुण वासाने अथवा चवीने लक्षात येतात. पिष्ठमय पदार्थांचे अस्तित्व अशा रीतीने कळू शकेल का? मक्याच्या पिठाचा वास घेऊन किंवा चाखून पहा तर खरं!

पिष्ठमय पदार्थ पचनापूर्वी साखरेच्या स्वरूपात बदलतात, आणि आपल्या तोंडात सुटणारी लाळ हा एक पाचक रस आहे. म्हणूनच पिष्ठमय पदार्थांचे कण तोंडात बराच वेळ राहिले तर त्यांची साखर बनते. तुम्ही पावाचा एक तुकडा तोंडात ठेवून पहा, काही मिनिटांनी तो थोडा गोड लागू लागेल. तुम्हाला असं जाणवलं का?



## जगातील आश्चर्ये

# डायना देवीचे मन्दिर

एशिया मायनरच्या पश्चिम किनाऱ्यावर एफेसस नावाचे वैभवसंपन्न नगर वसलेले होते. त्यात असलेल्या भव्य मन्दिरामुळेच या नगराला महत्त्व प्राप्त झाले होते. हे डायना देवीचे मन्दिर होते. (ग्रीक भाषेत तिला आर्टेमिस असे म्हणत असत.) असे म्हटले जाते की एफेससमधील कारागीरांच्या काही पिढ्यांनी मिळून २२० वर्षांत या मन्दिराचे बांधकाम पुरे केले. दुर्दैवाने रोम-सम्राट नीरो याने हे मन्दिर लुटले आणि इसवी सन २६५ मध्ये गॉथ लोकांनी त्याचा पूर्ण नायनाट केला!



# अलेक्झांडरच्या अभिमानाला आह्वान

मॅसिडोनियाचा राजा फिलिप याचा पुत्र अलेक्झांडर (सिकन्दर) स्वत:ला खरोखरच देवाचा पुत्र मानत असे. दुसऱ्या कोणीही मिळवले नाही असे काहीतरी आपल्या नशिबाने मिळणार आहे असा लहानपणापासूनच त्याला स्वत:बद्दल विश्वास वाटे.

अलेक्झांडरचा जन्म झाला त्याच दिवशी त्याच्या वडिलांना लढाईत मोठाच विजय मिळाला, त्यामुळे त्यांनाही वाटे की आपला हा मुलगा म्हणजे विशेष कोणीतरी आहे!

मानवतेचा गुरु म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या ॲरिस्टॉटलचा विद्यार्थी बनण्याचे भाग्य अलेक्झांडरला लाभले होते. अलेक्झांडर म्हणे–"वडिलांनी मला केवळ जीवनच दिले. परन्तु ते जीवन कसे जगावे हे मला माझ्या गुरूने-ॲरिस्टॉलनेच शिकवले!"

अलेक्झांडरला जगज्जेता बनायला ॲरिस्टॉटलनेच शिकवले-असे म्हणणे कठीण आहे. परन्तु, एवढे मात्र खरे की अलेक्झांडरच्या मनात काहीतरी मिळवण्याची भावना ॲरिस्टॉटलनेच जागवली; आणि अलेक्झांडरने ती भावना लढायांच्या द्वारे पुरी केली.

इ. स. पू. चौथ्या शतकातील ही गोष्ट आहे. त्यावेळी पर्शिया हा एक शक्तिशाली देश होता. डॅरियस राजा त्यावर राज्य करीत होता. या डॅरियसचा अलेक्झांडरने पराभव केला. या विजयाने प्रोत्साहन मिळून अलेक्झांडर आपले सैन्य घेऊन एका मागून एक देश पादाक्रान्त करीत चालला



आणि शेवटी इ. स. पू. ३२६ मधे तो हिन्दुस्तानात दाखल झाला.

इतके देश तो फिरला होता, पण इथल्यासारखी उत्तम संस्कृति त्याला कोठेही दिसली नव्हती. हिन्दुस्तानात पोचल्यावर प्रथम लढाई करण्यासारखा त्याला दिसला तो तक्षशिलेचा राजा. परन्तु या राजाने त्याचे इतक्या आपुलकीने स्वागत केले की अलेक्झांडर भारावूनच गेला! त्याच्यासाठी आयोजित केलेल्या स्वागत-समारंभाला अनेक राजे उपस्थित राहिले. परन्तु मुद्दाम अनुपस्थित राहिला तो राजा पुरु (पोरस)! पुरूचे राज्य झेलमच्या दुसऱ्या तीरावर होते. त्याने अलेक्झांडरला युद्धाचे आव्हान दिले!

पुरूच्या सैन्याला अपेक्षा नव्हती अशा एका वादळी रात्री अलेक्झांडरच्या सैन्याने नदी ओलांडली! या हल्ल्याला तोंड देण्यासाठी पुरूने ताबडतोब आपल्या सैन्याची हालचाल सुरू केली. या घनघोर युद्धात आपले जवळजवळ सर्वच सैनिक मारले जाईपर्यंत पुरु धर्याने लढला. त्याच्या या धैर्याचा अलेक्झांडरवर फारच चांगला परिणाम झाला. शेवटी जखमी पुरूला जेव्हा अलेक्झांडरसमोर आणले तेव्हा त्याने पुरूला विचारले–"मी तुला कशा प्रकारची वागणूक द्यावी अशी तुझी अपेक्षा आहे?" "एका राजाला जशी द्यावयास हवी तशी!" पुरु उत्तरला. अलेक्झांडरने पुरूला त्याच्या राज्यासकट स्वतन्त्र केले आणि ते एकमेकांचे मित्र बनले!

## प्राचीन भारतात भटकन्ती



१. एका तरुण भारतीयाने अलेक्झांडरला आपल्या धीट बोलण्याने जिंकले होते. हा तरुण कोण होता ?
२. या तरुणाने कोणत्या घराण्याची स्थापना केली ?
३. त्याचा सल्लागार व मन्त्री कोण होता ?
४. त्याने लिहिलेल्या सुप्रसिद्ध ग्रन्थाचे नाव काय ?
५. त्याचे वैशिष्ट्य कोणते ?
६. कनिष्कने आश्रय दिलेला सुप्रसिद्ध वैद्यशास्त्रज्ञ कोण ?
७. त्याने लिहिलेल्या ग्रन्थाचे नाव काय ?
८. कलकत्ता शहराची स्थापना कोणी केली ?
९. शहराच्या उद्‌घाटनाची तारीख कोणती ?
१०. कलकत्त्यातील सर्वात जुनी संस्था कोणती ?

## आपले सामान्यज्ञान

१. नुकतेच जन्मलेले कांगारू-शावक आकाराने केवढे असते ?
२. वयाच्या अवघ्या चौथ्या वर्षी सफल अशा संगीत नाटकाची रचना करणारा कोण ?
३. मुंगी किती ओझे वाहू शकते ?
४. ओरांग ओटांग म्हणजे काय ?
५. पृथ्वीवर सर्वात कोरडी अशी जागा कोणती ?
६. सूर्याच्या एकूण आकारमानात किती पृथ्व्या बसू शकतील ?
७. पृथ्वीवर पडलेल्या उल्कांपैकी सर्वात अधिक वजनाची उल्का कुठे आहे ?
८. मानवाच्या दोन्हीं किडन्यांमधील मिळून नसांची लांबी किती होईल ?
९. पावसाच्या पाण्यात व्हिटॅमिन असते काय ?
१०. २५ डिसेंबर हा दिवस ख्रिसमस म्हणून साजरा करण्याची पद्धत येशू ख्रिस्ताच्या जन्मापासूनच सुरू झाली काय ?

......पान आठवर पहा






१. रचनात्मक साहित्यासाठी ठेवलेल्या भारतीय राष्ट्रीय पुरस्काराचे नाव काय ?
२. हा पुरस्कार देणाऱ्या संस्थेचे नाव काय ?
३. याच प्रकारच्या दुसऱ्या दोन संस्थांची नांवे कोणती ?
४. भारताचे कोणते पंतप्रधान सुप्रसिद्ध लेखकही होते ?
५. त्यांचे तीन प्रमुख ग्रन्थ कोणते ?
६. रवीन्द्रनाथ टागोर यांना साहित्याबद्दल नोबेल पुरस्कार केव्हां मिळाला ?
७. कोणत्या पुस्तकासाठी त्यांना हे बक्षिस मिळाले ?
८. कोणत्या भारतीय-पोर्तुगीज तरुण कवीने इंग्रजीत सुरेख काव्यरचना केली ?
९. महान् राष्ट्रवादी पुढारी लोकमान्य टिळक यांनी लिहिलेल्या प्रसिद्ध पुस्तकाचे नाव काय ?

......पान आठवर पहा

## सर्व भारतीय भाषांचा एक शब्द शिकू या !

मराठी : हृदय

| | | |
|---|---|---|
| आसामी : हृदय | कानडी : हृदय | संस्कृत : हृदयम् |
| बंगाली : हृदय | काश्मिरी : दिल | सिन्धी : दिली, हियां |
| इंग्रजी : हार्ट | मल्याळी : हृदयम् | तमिळ : इदयम् |
| गुजराथी : हैयूं, हृदय | उडिया : हृदय | तेलगु : गुण्डे |
| हिन्दी : हृदय, दिल | पंजाबी : हिरदा, दिल | उर्दू : दिल, ज़मीर |

## तुम्ही विश्वास ठेवाल ?

* कि आईबाप दीर्घायुषी नसतील तर त्यांचे मूलही दीर्घायुषी होऊ शकणार नाही.
* कि आइस्क्रीम तब्येतीला थंड असते.
* कि स्वप्ने रंगहीन असतात.

**अंहं, मुळीच नाही !**

* दीर्घायुष्याच्या बाबतीतच बोलायचे, तर शोधकार्य असे सांगते की या दोन्हींचा काहीही संबंध नाही.
* आइस्क्रीममध्ये खूप कॅलरी असतात. त्यामुळे परिणामत: शरीरयंत्रणेला उष्णताच मिळते.
* ती रंगीत असू शकतात.

# उत्तरावली

### तो कोण ?

गुणाढ्य. त्याच्या ग्रंथाचे नाव बृहत्कथा. पुढे सोमदेवाने त्याचे संस्कृतमधे केलेले भाषांतर कथासरित्सागर या नावाने प्रसिद्ध आहे.

### इतिहास

१. चन्द्रगुप्त.
२. मौर्य घराणे.
३. कौटिल्य किंवा चाणक्य.
४. अर्थशास्त्र.
५. कायदा व समाजशास्त्र यावर पद्धतशीर लिहिला गेलेला जगातील पहिला ग्रन्थ.
६. चरक.
७. चरक संहिता.
८. जीन कारनॉक.
९. २४ ऑगस्ट १६९०.
१०. कालीघाटावरील कालीदेवीचे मन्दिर.

### विज्ञान

१. पाऊण इंच. परन्तु पूर्ण वाढ होईपर्यंत ते शावक आईच्या शरीराला असलेल्या पिशवीतच रहाते.
२. मोझार्ट. संगीत नाटक मिथ्रिडाइट्स.
३. स्वत:च्या वजनाच्या पन्नासपट.
४. प्राचीन जंगली मानव.
५. चिली देशातील कॅलम नावाचे स्थान. मानवाच्या आठवणीत आजपर्यंत तेथे कधीही पाऊस पडलेला नाही.
६. एक मिलियन पृथ्वीपेक्षा जास्तीच.
७. आफ्रिकेत. तिचे वजन साठ टनांपेक्षा जास्तीच.
८. जवळजवळ ४० मैल.
९. होय. व्हिटॅमिन बी.
१०. नाही. इसवी सन ४४० पासूनच.

### साहित्य

१. साहित्य अॅकॅडेमी पुरस्कार.
२. साहित्य अॅकॅडेमी.
३. संगीत नाटक अॅकॅडेमी आणि ललित कला अॅकॅडेमी.
४. जवाहरलाल नेहरू.
५. भारताचा शोध; जागतिक इतिहासाचे ओझरते दर्शन आणि आत्मचरित्र.
६. इसवी सन १९१३ त.
७. गीतांजली.
८. हेन्री डेरोझिओ.
९. गीतारहस्य.



# नेहरूंची गोष्ट



अठराव्या शतकात मोगल बादशहा फरुख बशीर जेव्हां काश्मीर मध्ये गेला, तेव्हां राजकौर नावाच्या एका ब्राह्मणाशी त्याचा परिचय झाला. ब्राह्मणाचे असामान्य पांडित्य पाहून ते खुष झाले. अशा प्रकारे राजाश्रय मिळाल्यावर हा परिवार काश्मीर सोडून दिल्लीत स्थायिक झाला. दिल्लीत एका कालव्याच्या किनाऱ्यावर त्यांनी आपले घर बांधले. कालव्याला हिन्दीत 'नहर' म्हणतात, म्हणून लोक त्यांना नेहरू म्हणू लागले. या परिवारातील एक गंगाधर नेहरू यांचा १८६१ मध्ये देहान्त झाला. त्यांच्या मृत्युनंतर मोतीलाल यांचा जन्म झाला. मोतीलालचे थोरले भाऊ नंदलाल यांनी मोतीलालचे पालन-पोषण करून त्यांना लहानाचे मोठे केले.



मोतीलाल परिश्रमपूर्वक शिकून वकील बनले. त्याच काळात अलाहाबादच्या हाय-कोर्टाची स्थापन झाली. मोतीलालने अलाहाबादला जाऊन आपली वकिली सुरू केली. थोड्याच काळात त्यांनी अमाप पैसा मिळविला. थोरले बंधु मरण पावल्यावर दोन्ही कुटुम्बे एकत्र राहू लागली आणि एकत्र कुटुम्बाची सर्व जबाबदारी मोतीलालने उचलली.

मोतीलालचं प्रथम अपत्य आणि त्यांचा एकमेव मुलगा जवाहरलाल याचा जन्म १४ नोव्हेंबर १८८९ रोजी झाला. जवाहरचे पिता दिवस भर काम करून संध्याकाळच्या वेळी आपल्या मित्रांसह हास्य-विनोद करीत बसत. त्यावेळी जवाहरलाल पडद्याच्या मागून सर्व काही पहात राही आणि मोठ्या लोकांच्या जीवनपद्धतीचे बारकाईने अवलोकन करी.





एकदा मोतीलाल लाल रंगाचे मद्य पीत असता जवाहरने पाहिले आणि धावत जाऊन आईला बातमी दिली–' आई ग, पिताजी रक्त पीत आहेत बघ !' मुलाचा भोळेपणा पाहून आई स्वरूपराणी मनातल्या मनात हंसली.

मोतीलाल सामान्यपणे अत्यन्त उदारपणे वागत असत. पण रागावले म्हणजे त्यांचे वर्तन निर्दयतेचे असे. एक दिवशी जवाहरने वडिलांच्या टेबलावर दोन पेन पाहिले. त्याला वाटलं वडील काही एकाच वेळी दोन पेनांनी लिहीत नाहीत. असा विचार करून त्याने एक पेन चोरले. जेव्हां चोरी उघडकीस आली तेव्हां मोतीलाल रागाने लाल झाले अणि त्यांनी जवाहरला चांगलेच चौदावे रत्न दाखविले.





मार खाल्यावर ही जवाहरच्या मनात वडिलांबद्दल थोडा सुद्धा दुर्भाव निर्माण झाला नाही. त्याने मनात विचार केला–वडिलांना न सांगता मी पेन चोरलं, तेव्हां त्यांनी मला केलेली शिक्षा योग्यच म्हटली पाहिजे. जवाहरची आई त्याच्याशी अत्यन्त प्रेमाने व आपुलकीने वागे. ती नेहमी आपल्या मुलाला रामायण व महाभारतातील गोष्टी सांगत असे.

दर वर्षी जवाहरचा वाढदिवस मोठ्या थाटात साजरा केला जाई. त्याच्या साठी नवे कपडे बनविले जात. एका मोठ्या तराजूच्या एका पारड्यात त्याला बसविले जाई आणि दुसऱ्या पारड्यात गहू अथवा उत्तम भाज्या घालून त्याचे वजन केले जाई. मग या वस्तु गरिबांना वाटल्या जात. छोट्या जवाहरला वाटे की हा वाढदिवस वर्षातून एकदाच का बरे येतो ?





जवाहरलाल आपल्या एका सैनिक मित्राच्या मदतीने घोड्यावर बसायला शिकला, एक दिवशी तो एकटाच घोड्यावर बसून बाहेर गेला आणि खाली पडला. घोडा एकटाच घरी परतला.

त्यावेळी मोतीलाल आपले नातेवाईक व मित्र-मंडळींसाठी एका मेजवानीच्या व्यवस्थेत गुंतलेले होते. जवाहरला न घेताच घोडा एकटा आलेला पाहून सर्व जण एकदम घाबरले. सर्व जण त्याच्या शोधार्थ चारी दिशांना धावत बाहेर पडले.





शेवटी छोट्या जवाहरला एकटाच पायी येताना पाहून सर्वांना खूप आनन्द झाला. जवाहरलाल नेहरू मोठे झाल्यावर जेव्हां या संबंधी चर्चा होई, तेव्हां ते म्हणत–"त्या दिवशी सर्वांनी माझी अशी प्रशंसा केली की मी जणू एकादे प्रचंड धाडस करून परत आलो आहे." (क्रमशः)



# कलेचा आदर

विदर्भ देशाचे राजा विचित्रसेन याचा स्वभाव मोठा विचित्र होता. एकदा एकदी गोष्ट त्यांच्या मनात आली की मग ते वेड्यासारखे तिच्या मागे लागत.

एकदा ते निरनिराळ्या रंगांचे मिश्रण करून एक चित्र रंगवीत होते, त्यावेळी त्यांचा उपसेनापति आपल्या काही व्यक्तिगत कामासाठी त्यांना भेटायला आला. राजाला खूष करण्याच्या विचाराने तो म्हणाला–"महाराज, आपली चित्रकलेची आवड मला चांगली माहीत आहे. पण आपण इतकी कलापूर्ण चित्रे रेखाटू शकता याची मला कल्पना नव्हती. ज्या अपूर्व प्रतिभेने आपण ही चित्रे रंगविता, ती केवळ अंतःपुरात रहावीत हे योग्य नाही."

उपसेनापतीचे बोलणे ऐकून राजाला खूप आनन्द झाला आणि म्हणाला–"मला वाटतं, या सर्व ललित कला श्रीमंत लोकांच्या उपयोगाच्या आहेत. सामान्य जनांना यांपासून काय फायदा होणार?"

यावर उपसेनापतीने आपला विचार सांगितला–"महाराज, कोणत्याही कलेचा अंतिम उद्देश असतो आत्मसंतोष! आपण जी चित्रे काढीत आहात. काही चांगल्या चित्रकारांकडून त्यांच्या प्रतिकृति बनवून घेऊन सामान्य जनतेला परवडेल अशा किमतीला त्यांची विक्री झाली पाहिजे. याचा परिणाम असा होईल की प्रजेत कलेविषयी आदर वाढेल, जनतेत अभिरुचि जागृत होईल."

उपसेनापतीच्या लक्षात आले की आपले म्हणणे राजाला पटले आहे. आणि मग कार्य-सिद्धीच्या आनंदात तो तेथून बाहेर पडला. आता विचित्रसेन आपली चित्रे सामान्य प्रजेला कमीत कमी किमतीत कशी उपलब्ध करून देता येतील याबाबत विचार करू

सुमन गर्ग



लागला. दुसऱ्या दिवशी राजाने आपला मंत्री माधव वर्माशी सल्ला-मसलत केली; त्याने आपला विचार सांगितला–"महाराज, भारी किंमतीची चित्रे साधारण जनतेला परवडतील अशा किंमतीत विकण्यासाठी आपल्या तिजोरीतून खूप खर्च करावा लागेल. पण याशिवाय मला शंका आहे ती अशी की सामान्य लोकांचे त्यात काय कल्याण होईल बरे? मला अशी भीति वाटते की या योजनेची अंमल-बजावणी केली तर आपल्या बाकीच्या अनेक योजना अपुऱ्या राहतील."

परंतु विचित्रसेनला मंत्र्याचा सल्ला रुचला नाही. एक आठवड्या भरात राजाने अनेक चित्रकारांची नियुक्ति केली. मूल्यवान लाकडी तक्त्यांवर आपल्या चित्रांच्या नकला तैल-रंगात बनवून घेतल्या आणि अत्यंत कमी किंमतीत त्यांच्या विक्रीची व्यवस्था केली.

अशा रीतीने एक वर्षाचा काल लोटला. एक दिवशी राजा मंत्र्याला म्हणाला– "मंत्री महाशय, मी चितारलेल्या चित्रांचा जनतेवर काय परिणाम होत आहे हे पाहण्याची माझी इच्छा आहे. आपण वेष पालटून व्यापाऱ्यांच्या रूपात आपल्या देशात भ्रमण करू या. कलात्मक वस्तूंची विक्री करणाऱ्या दुकानात अनेक कलाप्रेमी ग्राहक येत असतील. त्यांच्याकडून मला पाहिजे ती माहिती आपल्याला सहज मिळेल. आवश्यक वाटले तर आपण काही ग्राहकांशी बोलणे ही करू."

मंत्री अशा संधीची वाटच पहात होता. त्याने राजाची योजना एकदम मान्य केली. दोघे जण देशाटनाला निघाले.

ते राजधानीतल्या एका मोठ्या दुकानात पोचले. तिथे अनेक कलात्मक वस्तु आणि निरनिराळ्या चित्रकारांची चित्रे सुशोभित होती. विचित्रसेनच्या चित्रांचा एक ढीग एका कोपऱ्यात त्यांना दिसला.

त्याच वेळी प्रौढ वयाचा एक असामी दुकानात शिरला आणि म्हणाला–"मी एक



नवीन घर बांधलं आहे. आपल्या घराला दृष्ट लागू नये म्हणून एक चित्र मला खरेदी करायचं आहे. प्रत्येक दुकानदार अवाच्या सवा किंमत सांगत आहे. आपल्या राजा विचित्रसेनांची चित्रं आपण फार कमी किंमतीत देता असं मी ऐकलंय! म्हणून मला त्यांचं एखादं चित्र द्याल?"

हे ऐकून राजाला आपला अपमान झाल्यासारखं वाटलं. राजा तेथून निघालाच, एवढ्यात एका चित्रकाराने प्रवेश केला नि विचारलं–"राजा विचित्रसेनची दोन चित्रं मला द्याल?" असं म्हणून त्याने खिशातून पैसे काढले.

मंत्र्याच्या लक्षात आलं की हा कोणी तरी चित्रकार आहे. तो त्याला म्हणाला– "आपण थोर चित्रकार आमच्या राजेसाहेबांची चित्रे खरेदी करीत आहात हे पाहून मला खूप आनन्द झाला. मला असं वाटतं की आपण आपल्या विद्यार्थ्यांना चित्रकला शिकवताना आदर्श चित्र म्हणून ही दाखवीत असाल! आपल्या राजेसाहेबांची चित्रे खरोखरीच फार उच्च अभिरुचीची! आपल्या समाजांतील लोकांना ती निश्चित खूप आवडत असली पाहिजेत."

चित्रकार मंद स्मित करीत म्हणाला– "एका उत्तम चित्राच्या कलात्मक मूल्यांची



कशी हानि होते हे सोदाहरण दाखविण्यासाठी मी ही चित्रे खरेदी करीत आहे."

हे उत्तर ऐकून राजाचं डोकं भणभणू लागलं. तो तिथून बाहेर पडू पाहणार इतक्यात एक वृद्ध स्त्री दुकानांत आली राजाने चितारलेली चार चित्रं खरेदी करून जाऊ लागली.

तिच्या जवळ जाऊन मंत्र्याने विचारलं– "बाई. तुम्ही एकदम चार चित्रं खरेदी केलीत. जुन्या पिढीतल्या लोकात अजून कलांबाबतची अभिरुचि जिवंत आहे असंच म्हटलं पाहिजे!"

मंत्र्याचं विधान ऐकून म्हातारी लज्जित होऊन म्हणाली–"महाराज, कले

संबंधी अभिरुचि श्रीमंत लोकातच असू शकते. माझ्या सारख्या दरिद्री बाईच्या अंत:करणांत ती कशी असणार? मग मी ही चित्रे का खरीदली असं विचाराल? या चित्रासाठी जे लाकूड वापरले आहे, ते अत्यंत उत्तम दर्जाचे आहे. माझ्या जुन्या कौलारु घराच्या खिडक्यांच्या काही फळ्या मोडल्या आहेत. टीक खरेदी करणं मला शक्य नाही. म्हणून ही लाकडं घेऊन चालली आहे झालं!"

प्रमाणिकपणे वृद्धेने जे काही सांगितलं त्यावर मंत्री काय बोलणार? त्याने राजाकडे सहेतुकपणे पाहिले.

आता राजाच्या लक्षात आलं की चित्रकलेतील प्रतिभा आणि कला यांच्याविषयींच्या आपल्या प्रेमाचा सामान्य जनता कसा अर्थ लावीत आहे.

राजा आपल्या मंत्र्यासह राजमहालात परत आला आणि निराशेच्या सुरात म्हणाला–"मंत्रीजी, सामान्य प्रजेच्या मनात कलेसंबंधी अभिरुचि निर्माण करण्याचा जो प्रयत्न मी केला ती एक मोठी चूक होती. माझ्या चित्रांच्या प्रतिकृति निर्माण करणाऱ्या चित्रकारांना आजच सुट्टी देऊन टाका."

"महाराज, आपण रागावणार नसाल तर एक गोष्ट सुचवू इच्छितो. सामान्य जनतेत कलेसंबंधी अभिरुचि निर्माण करणे अत्यन्त आवश्यक आहे. पण या कार्यात उत्तम प्रतिभावन्त कलाकारांचे सहकार्य मिळविले पाहिजे. अशा कलाकारांना राजाश्रय मिळाला पाहिजे."

मंत्र्याची ही सूचना राजाला आवडली. पदरी असलेल्या चित्रकारांमधून काही प्रतिभासंपन्न कलाकारांना त्याने निवडले आणि त्यांच्या मार्गदर्शनाखाली एका चित्रकला-विद्यालयाची स्थापना केली.

चित्रकलेची आवड असलेले नवयुवक या विद्यालयात विद्यार्थी म्हणून दाखल झाले, सामान्य जनतेत हळू हळू चित्रकले बाबत अभिरुचि वाढत चालली.






नारदाने श्रीकृष्णाला दुसऱ्या दिवशी रुक्मिणीचा विवाह होणार असल्याची बातमी दिली नि तो निघून गेला. श्रीकृष्णाने आपल्या आप्त जनांना बोलवून सांगितले–आपल्या हितचिंतक नारदाने दिलेली बातमी तुम्ही सर्वांनी ऐकलीच! आता उशीर करणे नलगे! आपण कार्यारंभ करू या. आपण आताच कुंडिनपुराकडे जायला निघू. तुम्ही सर्व जण आपापली वाहने व सेना सज्ज करा. प्रस्थान करताना लक्षात ठेवा की सर्वात पुढे सात्यकी, मध्यभागी बलराम आणि शेवटी महाराजा उग्रसेन अशी रचना असेल. सर्व प्रकारची शस्त्रे घेऊन दारकासह मी सर्वप्रथम जातो आणि शिशुपाल, रुक्मि, जरासंध इत्यादींना चांगला धडा शिकवून रुक्मिणीला प्राप्त करतो.

सैन्याच्या प्रस्थान समयी दुंदुभीचा ध्वनि निनादला. सर्व यादवांनी निघण्याची तयारी केली. सर्वांचा उत्साह पाहून श्रीकृष्णाला अपार संतोष झाला. त्याने स्वत: सुरेख वेष-भूषा केली नि रथावर आरूढ होऊन निघाला.

श्रीकृष्ण नवरदेवाच्या थाटात प्रवास करून विदर्भ देशात पोचला. तो जेव्हां कुंडिनपुराच्या जवळ आला. तेव्हां रुक्मिणीचा पिता भीष्मक पुढे आला नि त्याने श्रीकृष्णाचा आदरसत्कार केला, गावा बाहेरच्या एका विश्रामगृहात त्याच्या निवासाची व्यवस्था केली. श्रीकृष्णाच्या



सेवेसाठी काही सेवक नेमले. त्यांना आज्ञा दिली की श्रीकृष्णाची कोणत्याही प्रकारे गैरसोय होणार नाहीं असे पहावे. सर्व पाहुण्यांना स्वादिष्ट भोजन देण्यात आले.

विवाह समारंभासाठी आलेल्या सर्व राजांनीं कृष्णाला आलेला पाहून निर-निराळे तर्क-वितर्क लढविले. काही जण म्हणाले—"शिशुपाल तर कृष्णाचा आते भाऊ आहे. म्हणून या लग्नासाठी श्रीकृष्ण येथे हजर झालेला दिसतोय. पण श्रीकृष्णाला निमंत्रण तर कोणी पाठविलेले नाही. अशा परिस्थितीत त्याने का बरे यावे. कोणी ही मानी पुरुष असा निमंत्रणा-



वाचून लग्न-समारंभात येणार नाही. खरे प्रेम आहे म्हणूनच आला असावा."

तर काही जणांनी शंका प्रदर्शित केली—"असं शक्य नाही. श्रीकृष्ण हा तर जरासंध व शिशुपालाचा शत्रु आहे. असं असतांना या सोहळ्यात श्रीकृष्ण का बरं आला असावा?"

सर्व यादवांसह श्रीकृष्ण येऊन पोंच-ल्याची वार्ता जेव्हां रुक्मिणी पर्यंत पोचली जेव्हां तिला कडक उन्हाळ्यात धरती वर शीतल वर्षा झाल्याचा भास झाला. तिला अत्यन्त आनंद झाला. ती मनातल्या मनात विचार करू लागली—"या संकटकाळी माझा उद्धार करण्यासाठीच श्रीकृष्ण येथे आला आहे, यात जरा ही संशय नाही. खरोखर माझा जन्म सार्थक झाला. माझी इच्छा पूर्ण झाली. पण मी त्याला प्रत्यक्ष केव्हां पाहू शकेन कोण जाणे?"

रुक्मिणी कृष्णाविषयी विविध कल्पना करू लागली. तिने आपल्या सख्यांना कृष्णाच्या कथा पुन: पुन्हा ऐकवल्या. आता तिच्या मनातील दैन्याची जागा उत्साहाने घेतली. तिकडे कृष्णाच्या मनात ही अन्य कोणते विचार नव्हते, तो केवळ रुक्मिणी-चेच स्मरण करीत होता. रुक्मिणीला आपण प्रत्यक्ष केव्हां पाहू शकू? तिचे हरण कसे करता येईल? आपल्याशी दोन हात





करायला येणाऱ्या शत्रूला कसे पराजित करता येईल? रुक्मिणीने मनोमन खरो-खरीच आपल्याला वरले आहे हे कसे जाणता येईल?"

श्रीकृष्णाने मनात विचार केला—"काही ही असो, जर रुक्मिणीचे माझ्यावर प्रेम असेल, तर सर्व देवतांनी जरी मला विरोध केला तरी मी निश्चित तिला प्राप्त केल्या-वाचून राहणार नाही."

होता होता दुसऱ्या दिवसाची सकाळ उजडली. भ्रमर कमलांवर गुंजारव करू लागले. चक्रवाकांचं अंधत्व संपलं, हंस सरोवरात पोहू लागले. कुमुद पुष्पे मलूल झाली. सूर्योदय झाला. कृष्णाने स्नानादि आटोपून अंगावर अलंकार चढविले. आणि आपल्या परिवारासह उल्हसित अंत:-करणाने विश्रामगृह सोडून तो रथावर आरूढ झाला. रुक्मिणीला पाहण्याची बलवती इच्छा त्याच्या मनात घर करून होती.

इकडे राजमहालात रुक्मिणीच्या सख्यांनी तिला शृंगारित केले. सर्व साज-सज्जा संपल्यावर रुक्मिणी सोन्याच्या पालखीत बसली. गावा बाहेर गौरी देवीच्या मंदिरात जाऊन गौरीची पूजा करण्यासाठी आपल्या सख्यांसह ती निघाली. मंदिराजवळ आल्या-वर ती पालखीतून खाली उतरली व



आपल्या मैत्रिणींसह तिने मंदिरात प्रवेश केला. गौरी देवीला प्रणाम करून तिने प्रार्थना केली—"माते, माझ्यावर कृपा कर. ते श्रीकृष्णच मला पति म्हणून मिळावेत असे कर, आतां तुझ्या कृपेवरच सर्व अवलंबून आहे."

गौरी मातेची पूजा करून रुक्मिणी मंदिराच्या बाहेर आली. बरोबर त्याच वेळी श्रीकृष्णाने तिथे प्रवेश केला आणि रुक्मिणीला पहिल्या प्रथम पाहिले. त्याला वाटलं साक्षात् क्षीरसागरातून लक्ष्मी अवतीर्ण झाली आहे! त्याला असं ही वाटलं की ब्रह्मदेवाच्या सृष्टीत असं अनुपम लावण्य तिन्ही लोकी सापडणं कठिण आहे!



श्रीकृष्णाने आता पर्यंत रुक्मिणी संबंधी जे काही ऐकलं होतं त्या आधारे तो आपल्या-वर नियंत्रण ठेवू शकला होता, पण आता प्रत्यक्ष डोळ्यांनी तिला पाहिल्यावर ते ही शक्य झाले नाही. मनात प्रणयाचा पूर भरून आला. दैवयोगाने रुक्मिणीला आपली बनविण्यासाठी योग्य स्थान व वेळ चालून आली. ही संधि हातची गमावणं म्हणजे निव्वळ मूर्खपणाच !

याच वेळी श्रीकृष्णाला रुक्मिणीने पहिल्यांदा पाहिलं. सख्यांनी तिला सांगितलं—हाच तो कृष्ण ! रुक्मिणीने डोळे भरून कृष्णाला पाहून घेतलं. आज पर्यंत ज्याचं केवळ ध्यान-चिंतन ती करीत राहिली, तो अचानकपणे डोळ्यांसमोर येऊन उभा ठाकला ! तिला आश्चर्य वाटले नि ती आनन्द-सागरात बुडू लागली. तिचं सर्व शरीर रोमांचित झालं आणि नयनांतून आनन्दाश्रू झरू लागले. समाधिस्थ योग्या-प्रमाणे ती आतल्या आत तन्मय झाली. तिची ही स्थिति पाहून सख्यांना भय वाटू लागले.

एवढ्यात बलराम येऊन श्रीकृष्णाला भेटला. श्रीकृष्णाने थोडक्यात आपली योजना बलरामाला समजाऊन सांगितली. श्रीकृष्णाने रुक्मिणीला आलिंगन दिले आणि तिला उचलून रथांत बसविले. रुक्मिणीच्या सख्या घाबरून गेल्या. जवळचे सेवक कृष्णावर तुटून पडले. बलरामाने एक मोठा वृक्ष उचलला आणि पुढे येणारे रथ, हत्ती, घोडे आणि सैनिकांना पळवून लावले.

ही सर्व गडबड पाहताच उग्रसेन, सात्यकी, शतद्युम्न, विदूरथ, प्रसेनजित, वृष्णि आदि वीर आपल्या दलासह बलरा-माला मदत करायला धाऊन आले. त्यांनी श्रीकृष्णाला समजावलं—"हे कृष्णा, रुक्मि-णीला घेऊन तू द्वारकेकडे प्रयाण कर. या लोकांचा समाचार आम्ही घेतो. काळजी नको."

इकडे दोन्ही पक्षांची लढाई चालू होती, तर तिकडे रुक्मिणीचे अंग-रक्षक व शिल्लक राहिलेल्या वीरांनी रुक्मिणीला पळवून



नेल्याची वार्ता भीष्मक, जरासंध, शिशुपाल व त्यांच्या बरोबर असलेल्या सर्व राजांना ऐकवली. ही बातमी ऐकून सर्वांनाच मोठे आश्चर्य वाटले. त्यांनी विचार केला–एवढे अतिरथी महारथी इथे असताना केवढे दु:साहस केले हे श्रीकृष्णाने! काय हा अहंकार?

जरासंधाचे डोळे रागाने लाल झाले आणि तो गर्जून उठला–"एका गोप-पुत्राने जगत्-विजेत्याच्या रूपाने यावे आणि माझा सर्व प्रयत्न हाणून पाडावा! हा मी चाललो आपली सर्व सेना घेऊन त्याच्यावर हल्ला करायला. चला तुम्ही सर्व जण माझ्या मदतीला."

"द्वारकेतील लोकांना समुद्र एखाद्या किल्ल्यासारखा झाला आहे. कृष्णाने त्यात जरी प्रवेश केला तरी त्याचा व त्याच्या साथीदारांचा संहार करून आणि सारी द्वारका उध्वस्त करून रुक्मिणीला परत आणलं तरच माझं नाव जरासंध!" अशी उच्च स्वराने त्याने प्रतिज्ञा केली.

यावर पौंड्रक वासुदेव जरासंधाला थांबवीत म्हणाला–"आम्ही आपले सेवक असताना आपण हे परिश्रम कशासाठी घेत आहात? मी स्वत: जाऊन त्या कृष्णाची खांडोळी करून टाकतो आणि जंगली पक्ष्यांना चांगली मेजवानी देतो! या पृथ्वी-तलावर दोन वसुदेव कसे राहू शकतील? ही चूक सुधारण्यासाठी आणि आपणास आनन्द देण्यासाठी काय नामी संधि चालून आलेली आहे! मला आणखी काय पाहिजे आहे?"

एवढ्यात शिशुपाल एक भारी गदा हाती घेऊन पुढे येत म्हणाला–"थांबा, कोणी ही इथून हलू नका. हा अपमान तर माझा आहे! रुक्मिणीशी लग्न करण्यासाठी मी इथे आलो, अन् इकडे हा प्रकार? हा अपमान मी कधी ही सहन करणार नाही. या गदेच्या एका ठोशा सरशी तो कृष्ण आणि त्याचे सर्व यादव यांचा संहार करून जरासंधाचा प्रिय सेवक म्हणून अपूर्व यश



मी प्राप्त करणार! कोण खरा क्षत्रिय दुसऱ्याच्या बायकोवर नजर ठेवतो? या कृष्णाची हीन वृत्ति तर पहा. नाते-गोते नसणाऱ्या पशूंच्या सान्निध्यात वाढलेला हा कृष्ण, त्याच्याकडून याहून काय अपेक्षा करायची? म्हणून कृष्णाचा वध करून रुक्मिणीला परत आणणे हे माझे आद्य कर्तव्य आहे."

यानंतर जरासंध व इतर राजे कवच धारण करून रथावर आरूढ होऊन युद्धाला सज्ज झाले. शंख-ध्वनि झाला, आणि वाजत-गाजत सर्व सेना थाटात द्वारकेच्या रोखाने निघाली.



थोड्याच वेळात हे सर्व लोक रुक्मिणीला घेऊन जाणारा कृष्ण आणि त्याच्या मागे धावणाऱ्या सैन्याजवळ येऊन ठेपले. बल-रामाने आपले यादव-वीरांचे सैन्य परत फिरविले आणि जरासंधाच्या सैनिकां बरोबर युद्ध सुरू केले. यादवांची सेना छोटी होती, तर जरासंधाचे समुद्रासारखे सैन्य! तरी पण थोड्याच वेळात जरासंधाचे बरेच सैनिक मृत्युमुखी पडले. दोन्ही बाजूच्या कसलेल्या वीरांनी द्वंद्व-युद्ध केले. सात्यकी आणि जरासंध यांच्यात तुंबळ युद्ध झाले. चक्रदेव नि अक्रूर यांनी मिळून दंतवक्त्राशी सामना केला. शिशुपालने एकाच वेळी तीन यादव वीरांशी युद्ध केले. कृतवर्मा आणि पौंड्रक वासुदेव यांच्यात भीषण युद्ध छिडले.

बलरामाने सर्वात अधिक शत्रूंचा संहार केला. जरासंधाने तर आपली सर्व शक्ति पणाला लावली. शेवटी गदायुद्धात बल-रामाने जरासंधाला बेशुद्ध करून सोडले. ताबडतोब जरासंधाच्या सारथ्याने त्याला रथात बसविले आणि दूर निघून गेला. हे दृश्य पाहून सैन्य ही पळून जाऊ लागले. पळपुट्या सैन्याचा सात्यकीने पाठलाग केला. सात्यकीने जोरात शंख-ध्वनि केला, तो ऐकून कृष्णाच्या लक्षात आलं की जरा-संध हरला. मग कृष्णाने आपला पांचजन्य फुंकला.

कृष्णाने रुक्मिणीचे हरण केल्याची वार्ता जाणून जरासंध वगैरे राजे जेव्हां आपल्या पडावातून बाहेर पडले, तेव्हां राज-महालात असलेल्या रुक्मिलाही ही बातमी समजली. क्रोधावेशाने त्याने आपले पिता व नातेवाईकां समक्ष शपथ घेतली–"युद्धात कृष्णाचा संहार करून रुक्मिणीला परत आणलं तरच या नगरीत पाऊल ठेवीन." मग गद, कौशिक इत्यादि वीरांना बरोबर घेऊन तो युद्धासाठी सज्ज झाला. दक्षिण देशांतील अनेक राजांसह त्याने द्वारकेकडे कूच केले.

त्यांना नर्मदा-तटाकीं समोरून येणारा श्रीकृष्णाचा रथ दिसला. सर्वांना मागे टाकून रुक्मिने अत्यन्त वेगाने आपला रथ पुढे काढला, कृष्णाच्या रथासमोर येऊन त्याने गर्जना केली–"अरे, दुसऱ्याच्या बायकोला पळवून नेणारा तू जाशील कोठे? मी विदर्भ राजाचा पुत्र रुक्मि! आपले प्राण वाचवायचे असतील तर ताबडतोब रुक्मिणीला मुक्त करून माझ्या स्वाधीन कर. नाहींतर हो युद्धाला तयार!" असे आवाहन करीत रुक्मिने कृष्णावर बाणांचा वर्षाव केला.

कृष्णाने लगेचच रुक्मींच्या सारथ्याला मारून टाकले आणि रुक्मिवर बाण सोडायला सुरुवात केली.

रुक्मीची केविलवाणी स्थिति पाहून दक्षिण देशच्या राजांनी आपल्या मित्राला घेरलं आणि श्रीकृष्णा बरोबर लढायला सुरुवात केली. हे सर्व राजे आणि श्रीकृष्ण यांच्या भयंकर युद्ध झालं. थोडयाच वेळात शुद्धीवर आल्यानंतर रुक्मि पुन्हा दुसऱ्या रथावर स्वार होऊन श्रीकृष्णाला भिडला. श्रीकृष्णाने त्याच्या छातीवर तीन बाण सोडले आणि तो पुन्हा बेशुद्ध झाला. जमिनीवर आपल्या भावाला बेशुद्धावस्थेत पडलेला पाहून रुक्मिणी विलाप करू लागली.

श्रीकृष्णाने रुक्मिणीला आलिंगन दिले आणि तिचे सान्त्वन केले. मग श्रीकृष्णाने आपला रथ द्वारकेकडे वळविला.






# योग्य इलाज

नजीबाबाद मध्ये ब्रह्मदत्त नावाचा एक तरुण रहात असे. तो आपल्या आजारी आईला घेऊन वैद्याकडे गेला, तेव्हा पुढची खोली अगोदरच आलेल्या रोग्यांनी जवळ जवळ भरून गेली होती.

ब्रह्मदत्त आता तसा चांगला २५ वर्षांचा झाला होता, पण पोटाचा एकही उद्योग स्वतः करण्याची अजून त्याच्यात पात्रता आली नव्हती. अभ्यासातही तो कच्चाच होता. काम करायचा त्याला आळस होता. त्यामुळे वाईट संगतीला लागून तो जुगार खेळे आणि लहानमोठया चोऱ्याही करी. अलिकडे काही दिवस जमेल तितक्या लवकर एकादा चांगलासा हात मारून एकदम श्रीमन्त बनायच्या विचारात तो होता.

आईला वैद्याकडे न्यावे लागले, त्याच्या आदल्या दिवशीच ब्रह्मदत्त गावाच्या एका टोकाला असलेल्या तलावाजवळ दबा धरून बसला होता. अंधार पसरण्याच्या वेळी एक माणूस नेमका त्या बाजूला आला. ब्रह्मदत्त चटकन झाडाआडून बाहेर आला अन् त्या माणसाच्या छातीवर सुरा टेकून दरडावून म्हणाला–"मुकाट्यानें तुझ्या हातातली थैली दे माझ्या हाती!"

घाबरून तो माणूस बिचारा कापू लागला. थैली एकदम खाली टाकून जिवाच्या भीतीने गावाकडे पळून गेला. त्या थैलीत चार हजार रुपये होते. इतक्या मोठ्या रकमेचं काय करावं हे न सुचल्यानें त्यातले शंभर रुपये काढून घेऊन बाकी रकमेसकट थैली त्याने तिथल्याच एका चिंचेच्या झाडाच्या ढोलीत दडवून ठेवली.

रात्री ब्रह्मदत्त घरी पोचला तर आई थंडीतापाने थरथर कापत होती! हातात पैसे होते म्हणून तो मोठ्या आत्मविश्वासानें

म्हणाला–"आई तुला चांगला औषधोपचार मिळायला हवा. वैद्याकडे घेऊन जाईन."

याच विचाराने तो दुसऱ्या दिवशी आपल्या आईला वैद्याकडे घेऊन आला. नन्तर आईला वैद्याकडे सोडून थोडा वेळ तो गावातल्या गल्ल्यांतून फिरत राहिला आणि नंतर वैद्याकडे परत आला. तोपर्यंत सर्व रोगी आपापल्या घरी निघून गेले.

त्याची आई आपले हातपाय झाडत होती आणि वैद्यबुवा तिची नाडी तपासत होते! "वैद्यमहाराज, काय झालं आईला माझ्या?" असे विचारत ब्रह्मदत्त पटकन आईच्या जवळ जाऊन बसला आणि त्याने तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेतले.

"तू या म्हातारीचा मुलगा होय? बरा वेळेवर आलास. तुझ्या आईच्या अंगात वायूच्या संचार झाला आहे. उलथनं विस्तवात तापवून तिच्या अंगाला डाग द्यायला हवा." वैद्य म्हणाला.

इतक्यात वैद्याचा नोकर तापलेलं उलथनं घेऊन आला. ब्रह्मदत्तने आपल्या आईचे हात आपल्या हातात घट्ट पकडून धरले. परन्तु वैद्याने आईच्या हातावर डाग द्यायच्या ऐवजी ब्रह्मदत्तच्या हातावरच डागले? त्याबरोबर वेदनेने ब्रह्मदत्त जोराने किंचाळला.

"अरेरे, कशी चूक झाली माझ्या हातून! नेमका आयत्या वेळी तुझाच हात मधे आला बघ. डाग बरोबर तुझ्या आईला हातावर बसला असता तर जगली नसती ती?" वैद्य म्हणाला.

हातावरचा डाग अन् आईचा मृत्यु यांमुळे ब्रह्मदत्त जणू वेडाच झाला. त्याने एकदम वैद्याची गर्दन पकडली आणि तो ओरडू लागला–"तू माझ्या आईला मारलंयस. तू वैद्य नाही, मारेकरी आहेस मारेकरी!"

कसेबसे ब्रह्मदत्ताला दूर सारीत वैद्य म्हणाला–"आतापर्यंत मला वाटत होतं की तू फक्त चोरच आहेस, पण आता मला कळून चुकलं की तू खूनीही आहेस. काल तू एका माणसाचं धन लुटलंस, ते धन बिचाऱ्या एका बापाने आपल्या लेकीच्या लग्नासाठी आपली जमीन विकून उभं केलं होतं! आता आपलं लग्न होणं अशक्य, हे ओळखून त्या पोरीने विहीरीत उडी मारून जीव दिला. तिचा अग्नि संस्कार करायला ही जवळ पैसे नसल्यामुळे तो बाप धाई-धाई रडत बसला आहे, कळलं? तू एक लग्न मोडलंस म्हणूनच तुझ्या हाताला हा डाग लागला अन हा डागच तुझ्या आईच्या मरणाला कारण झाला!"

वैद्याच्या तोंडून या गोष्टी ऐकून ब्रह्मदत्ताला आपल्या कृत्याचा पश्चाताप वाटू लागला. जी एक चोरी केली त्याच्या पश्चात्तापाने त्याचे हृदय जळू लागले!

त्याने पटकन उठून वैद्याचे पाय धरले आणि म्हणाला–"त्या मुलीच्या बापाच्या शापानेच माझ्या आईला मृत्युमुखात लोटलं. मी आता खूप मेहनत करून पैसे





कमवीन आणि तुमची फी घेऊन येईन. तेव्हाच माझ्या आईच्या आत्म्याला शांति मिळेल." इतके बोलून तो तेथून बाहेर पडला.

ब्रह्मदत्त बाहेर पडल्याबरोबर त्याची आई उठून बसली अन् वैद्याला म्हणाली–"महाराज, माझा मुलगा चोऱ्या करतो हे मला आत्तापर्यंत माहीतच नव्हतं! आपणच योग्य इलाज करून माझ्या पोराचं हृदय-परिवर्तन केलंत!"

"आपण जो इलाज केला त्याने याचं मन बदलेल की नाही याबद्दल शंकाच होती माझ्या मनात! त्या शंकेमुळेच मी त्याच्या हाताला चांगला चरचरून डाग दिला! आता त्या डागाचा इलाज मी फुकट करीन." हसत हसत वैद्य बोलला.

तोपर्यंत आतल्या खोलीत बसलेला वैद्याचा नातेवाईक बाहेर आला आणि वैद्याला म्हणाला–"हे बरं झालं की ब्रह्मदत्त आईला घेऊन तुझ्याकडे आला तेव्हा 'हाच माझं धन चोरणारा माणूस आहे' असं मी बरोबर ओळखलं. आपण तिघांनी मिळून बनवलेली योजनाही छान सफल झाली. पण ही लग्नाच्या मुलीच्या आत्महत्येची गोष्ट तू कशासाठी घुसडलीस?"

"ब्रह्मदत्तचं मन विरघळावं म्हणून मी ती कल्पित कथा रचली!" असं सांगून वैद्य हसू लागला.

पैशांची थैली घेऊन परत येत असलेल्या ब्रह्मदत्ताने त्यांच्या या गोष्टी ऐकल्या आणि त्यांच्या समोर येत तो म्हणाला–"सर्वांच्या दृष्टीने चोर म्हणून जगण्यापेक्षा मी मरण पत्करीन. माझ्या आईनं जिवन्त होऊन माझाही पुनर्जन्म घडवला. मी आजपासून आळशीपणा सोडून खूप मेहनत करून पैसा कमवीन." असं म्हणत पैशांची थैली त्याने वैद्याच्या नातेवाईकांच्या हाती सोपवली.

ब्रह्मदत्ताचं हृदयपरिवर्तन घडलेलं पाहून त्याची आई, वैद्य व त्याचा नातेवाईकही खूप खूष झाले. दोघांनीही हात उचलून त्याला मनापासून आशिर्वाद दिला.





# भाग्य

एका गावात दोन म्हातारे रहात असत. त्यांतला एक फार दुष्ट माणूस होता आणि दुसरा फारच सज्जन होता. एका नववर्षदिनी दोघांची भेट झाली.

"अरे, रात्री मी स्वप्नात पाहिलं की माझं भाग्य आकाशातनं माझ्यावर कोसळतंय!" सज्जन म्हातारा सांगू लागला.

"अरे, आश्चर्यच आहे! मीही रात्री माझ्या भाग्याबद्दल स्वप्न पाहिलं! पण माझं भाग्य मात्र जमिनीतून वर आलं!" दुष्ट म्हातारा म्हणाला.

"पाहू, कुणाचं नशीब कसं दिसतंय ते!" असं म्हणून सज्जन म्हातारा आपल्या घरी निघून गेला.

काही दिवस निघून गेले. थंडीचे दिवस संपत आले. सज्जन म्हाताऱ्याने विचार केला–"आजचा दिवस शुभ आहे. शेताचं काम आजच सुरू करावं!" अन् कुदळ-फावडं घेऊन तो आपल्या शेतात गेला आणि त्याने जमीन खोदायला सुरुवात केली. त्याला जमिनीत मोहोरांनी भरलेली कळशी दिसली.

"हा खजिना तर बिचाऱ्या त्या म्हाताऱ्याचा असणार!" असा विचार करून तो त्या दुष्ट म्हाताऱ्याच्या घरी गेला–"अहो महाराज, तुमचं भाग्य मला सापडलंय पहा! चांगल्या कळशीभरून मोहोरा अन् नाणी आहेत. माझ्या शेतात जाऊन आपला खजिना काढून घ्या बरं का!" असं त्याला सांगून सज्जन म्हातारा आपल्या घरी गेला.

घरी पोचल्यावर प्रथम त्याने सगळी हकीकत आपल्या बायकोला सांगितली अन् म्हणाला–"माझ्या शेतात तुझं धन सापडलंय असं जेव्हा मी त्याला सांगितलं ना, तेव्हा








तो फारच खूश झाला! एव्हाना त्यानं ती कळशी आपल्या घरी सुद्धा नेली असेल बघ!"

"हे तुम्ही फारच चांगलं केलंत हं!" बायकोने कौतुकच केले त्याचे!

इतक्या अवधीत तो दुष्ट म्हातारा सज्जन म्हाताऱ्याच्या शेतात गेला. नुकतीच बन्द केलेली ती जागा सापडायला त्याला कष्ट पडले नाहीत. वरची माती दूर करताच त्याला कळशी मिळाली. मोठ्या आतुरतेने त्याने झाकण काढले, तो काय! कळशीत मोहोरा अन् नाण्यांऐवजी वेटोळं घालून बसलेले साप त्याला दिसले!"

ते पाहून दुष्ट म्हातारा क्रोधाने थरथरू लागला!

"बदमाश, माझ्याशी दगाबाजी केली काय! मी आता चांगलाच धडा शिकवतो बच्चमजीला, जातोस कुठं!" असे म्हणून दुष्ट म्हातारा ती कळशी बन्द करून आपल्या घरी घेऊन गेला.

त्याच रात्री तो दुष्ट या सज्जनाच्या घरी पोचला, शिडी लावून त्याच्या घराच्या छतावर पोचला अन् त्याने धुराच्या चिमणीतून आत डोकावून पाहिले, सज्जन माणूस चुलीकडे पाठ करून अंग शेकत आडवा झालेला होता. आपल्याला फसवून आरामात अंग शेकत पडलेल्या म्हाताऱ्याला पाहताच दुष्टाचा राग पुन्हा भडकून उठला. त्याने हळूच कळशीचे झाकण काढून ती उलटी धरून धुराड्यातून आत सोडून दिली!

पण दुष्टाने विचार केला होता, तसं काहीच घडलं नाही! सापांऐवजी त्या सज्जन म्हाताऱ्याभोवती मोहोरा अन् नाण्यांचा वर्षाव झाला! त्याने मोठ्या खुशीने आपल्या म्हातारीला उठवून म्हटले— "पाहिलंस! माझं स्वप्न खरं झालं, माझं भाग्य आसमानातनं कोसळलं बघ माझ्यावर!"

यानंतर त्या सज्जन म्हाताऱ्याच्या जीवनात दारिद्र्याची छायाही कधी पडली नाही! मोठ्या सुखाने त्याने आपले उर्वरित आयुष्य घालवले.





# नोकराची युक्ति

एका गावात एक सामान्य शेतकरी रहात असे. तो ब्रह्मचारी होता, म्हणून त्याने घरकामासाठी एक स्वयंपाकी ठेवला. तो स्वयंपाक करण्यात कुशल होता.

एका वर्षी आंब्याचा सीझन आला. शेतकरी एकदा आपल्या कामावर जात होता, त्याला एक ओळखीचा माणूस भेटला. तो म्हणाला—"फार चांगल्या जातीचे आंबे मी मागवले आहेत. तुला पण दोन फळं देतो, घेऊन जा. खाऊन पहा, काय छान स्वाद आहे!" शेतकऱ्याच्या हाती दोन उत्तम आंबे आले. तो आपल्या घरी आला. स्वयंपाक्याच्या हातात आंबे देत म्हणाला— "ऐक, हे आंबे स्वच्छ करून कापून ठेव. मी थोड्याच वेळात परत येतो." मग तो आपल्या कामासाठी निघून गेला.

स्वयंपाक्याने काळजीपूर्वक आंबे धुऊन स्वच्छ केले, त्यांचे छान तुकडे कापले, आणि त्यांची गोडी चाखण्याच्या इराद्याने एक तुकडा आपल्या तोंडात घातला. आंब्याची चव अपूर्व होती. एकामागून एक त्याने काही तुकडे गट्टं केले.

"आंबे कोणी तरी चोरून नेले असं सांगितलेलं बरं!" असा विचार करून स्वयंपाक्याने शिल्लक राहिलेले तुकडे ही स्वाहा केले नि साली आणि कोया दूर फेकून दिल्या. ताट स्वच्छ करून आता तो मालकाची वाट पाहूं लागला.

एकढ्यात शेतकरी आपलं काम संपवून घरी परत येत असताना त्याला वाटेत एक साधु भेटला. साधूला पाहताच शेतकऱ्याच्या मनात विचार आला—आंब्याचे काही तुकडे साधुला ही खायला देऊ या. थोडे पुण्य लाभेल. या विचाराने त्याने साधूशी थोडे बोलणे केले. त्याने जाणून घेतले की साधु दुरून आलेला आहे. मग त्याने साधूला विनंती



केली–"स्वामीजी, माझं घर इथून जवळच आहे. आपण गरीबाच्या घरी याल? दहा मिनिटांहून अधिक आपला वेळ मी घेणार नाही!"

साधूने त्याची विनंती मान्य केली आणि तो शेतकऱ्याच्या घरी गेला. शेतकऱ्याने साधूला ओसरी वर बसवलं आणि आत जाऊन स्वयंपाक्याला विचारलं–"हे बघ, मी एका साधुला बोलवून आणलं आहे. तू आंबे कापून ठेवलेले आहेस न? त्यांना ही काही तुकडे देण्याची माझी इच्छा आहे."

"मी आंबे कापू तर कसे? ही जुनी-पुराणी सुरी पहा बरं, ठिकठिकाणी गंजली आहे." असं म्हणत स्वयंपाक्याने घरातली एक जुनी सुरी मालकाला दाखवली.

"ओह, असं झालं तर! आण, मी सुरीला धार लावतो. घरी आणलेल्या साधूला काही न देता कसं बरं परत पाठवायचं?" असं म्हणत शेतकरी सुरी घेऊन परसात गेला आणि एका दगडावर सुरीला धार लावू लागला.

इतक्यात स्वयंपाकी ओसरीवर आला नि साधूला कानात गुप्तपणे म्हणाला–"स्वामीजी, आपण आमच्या मालकांच्या तावडीत कसे सापडलात? आपण त्यांच्याबद्दल काही ऐकलं नाहीत का?"

"मी या गावात नव्याने आलो आहे. मला त्यांच्या बाबत काहीच माहिती नाही. तुझ्या मालकाला मी यापूर्वी कधीच पाहिलेले नाही!" साधुने उत्तर दिले.

"मग ऐका, आमचे मालक शक्ति-पूजक आहेत. आपणा सारखे साधु दिसले की त्यांना घरी बोलवून आणतात आणि त्यांचे दोन्ही कान कापून घेऊन शक्तिला नैवेद्य दाखवितात. अशा प्रकारे त्यांनी आतापर्यंत अनेकांचे कान कापून घेतले आहेत. जरा कान टवकारून ऐका, सुरीला धार लावत आहेत ते. कान कापत असताना आपणा सारख्यांना अधिक त्रास होऊ नये अशी त्यांची इच्छा आहे हे आपल्या लक्षात येईल." स्वयंपाक्याने साधूला आपल्या मालकाचा परिचय दिला.

हे सर्व जाणून साधु घाबरून तेथून निघाला. थोड्या वेळानंतर शेतकरी सुरी घेऊन आत आला आणि स्वयंपाक्याला म्हणाला–"बघ, आता मी सुरीला छान धार लावली आहे. झटकन आंबे काप. स्वामीजी बाहेर वाट पहात असतील बिचारे!"

स्वयंपाक्याने मालकाला वार्ता दिली–"आंबे कोठे आहेत नि साधु कोठे आहे? आपण इकडे परसात गेलात आणि तिकडे स्वामीजींनी घरात प्रवेश केला आणि दोन्ही आंबे आपल्या झोळीत टाकले नि धूम ठोकली!"

"काय म्हणतोस? साधूने दोन्ही फळं घेतली? एक ही माझ्यासाठी ठेवलं नाही? निदान चव तरी पाहिली असती मी!" शेतकऱ्याने आश्चर्य प्रकट केले.

स्वयंपाकी म्हणाला–"मी त्यांना खूप पुकारलं, पण त्याकडे मुळिच ध्यान न देता त्यांनी पळ काढला."

हे ऐकून शेतकरी तसाच हातात सुरी घेऊन साधूच्या मागे धावला. थोड्याच वेळात त्याला दुरून स्वामी दिसला.

"स्वामीजी, एक क्षण भर तरी थांबाल?" असे म्हणत शेतकऱ्याने आपला सुरीवाला हात वर केला. साधूने मागे वळून पाहिले, शेतकऱ्याच्या हातातील सुरी पाहून घाबरून जाऊन तो अधिक वेगाने पळू लागला.

शेतकऱ्याने ओरडून सांगितले–"स्वामीजी, मला दोन नकोत, कमीत कमी एक तरी द्या मला!"

हे ऐकून तर साधूच्या मनातील भीति अधिकच वाढली. त्याला वाटलं हा दुष्ट कमीत कमी एका कानाची मागणी करीत आहे. त्याच्या तावडीतून सुटण्यासाठी तो आणखी अधिक जोरात पळत सुटला. शेवटी शेतकरी निराश होऊन घरी परतला. आपली युक्ति सफळ झाल्याचे पाहून स्वयंपाकी ही मनातल्या मनात खुश झाला.





# गुन्ह्याचा धडा!

**रा**मस्वरूपचा एक लहानसा व्यापार होता. आपल्या गावापासून चार कोसांवरच्या एका शहरात आठवड्यातून एकदा बाजार असे. रामस्वरूप त्या बाजारातून माल आणून आपल्या दुकानात विकत असे. एकदा बाजारच्या दिवशी पैशांची थैली घेऊन बाजारासाठी निघाला. पण त्या दिवशीं त्याला निघायला उशीर झाल्याने बाजारसाठी जाणाऱ्या त्या गावच्या भाड्याच्या सर्व गाड्या आधीच निघून गेल्या होत्या! आता त्याला प्रश्न पडला की बाजारला पायी जावे की या आठवड्यात बाजारला जायचा विचार सोडून द्यावा?

रामस्वरूप विचार करू लागला—आज जर आपण बाजारात जायचं टाळलं तर पुढल्या संबंध आठवड्यात आपल्या दुकानात विकायला काही मालच नसेल; अन् त्यामुळे आपले तेवढे नुकसानही होईल! शेवटी काय व्हायचे ते होवो—आपण पायीच बाजारला जावे असा एकदा निर्णय घेतल्यावर त्याने पैशांची थैली कमरेला नीट बांधली आणि शहराच्या दिशेने चालू लागला.

थोडे पुढे गेल्यावर रामस्वरूपचे पाय दुखू लागले अन् वैतागून रस्त्याच्या बाजूच्या एका झाडाखाली तो विसावला!

थोडा वेळ असाच गेला अन् तिकडून एक अनोळखी इसम आला. त्याने विचारले—"कुणीकडे निघाला आहात तुम्ही?"

रामस्वरूपने सांगितले की आपण बाजारात माल खरेदी करायला निघालो होतो, पण दमल्यामुळे जरा झाडाखाली विश्रान्ति घेत आहोत.

त्या अनोळखी माणसानेही आपल्या डोक्यावरचं गाठोडं उतरवलं आणि तोही रामस्वरूपजवळ येऊन बसला. रामस्वरूपला आपादमस्तक एकदा नीट न्याहाळून पहात तो हसून म्हणाला—"माझं नाव गुरुप्रसाद भाई. आपण तर दोघंही व्यापारीच आहोत. फरक इतकाच की मी बाजारात माल विकायला निघालो आहे आणि तुम्ही खरेदी करायला निघाला आहात."

क्षणभर गप्प राहून गुरुप्रसाद म्हणाला—"या वयात असले चालायचे कष्ट न करता तुम्ही एखाद्या नोकराला का नाही बाजारला पाठवत?"

"वा, वा! सध्याच्या काळात नोकरावर विश्वास टाकून चालेल का? अरे, स्वतःच्या बायकामुलांवरही विश्वास ठेवत नाही कुणी आजकाल! मी नाही बाबा कोणावर विश्वास ठेवीत!" रामस्वरूप म्हणाला.

"वा, वा! तुम्ही तर खूप केलीत! या वयात इतकं चालल्यावर पाय का नाही दुखणार? तुम्ही तर मला वडीलधारे आहात. मी तुमचे पाय देऊ चेपून?" असं विचारत गुरुप्रसादने आपले हात पुढे केले.

पण आपले पाय पटकन आखडून घेत रामस्वरूप म्हणाला—"अरे अरे! त्याची काही जरूर नाही एवढी. थोडा वेळ आराम केला की माझा थकवा निघून जाईल."

"असं नका म्हणू तुम्ही! मला काही यासाठी पैसाबगैरे नकोय. मी पण एक



व्यापारी आहे ना! दमल्या-भागल्यांची सेवा केल्याने मला आनन्द वाटतो!" असं म्हणत रामस्वरूप 'नकोनको' म्हणत असतानाही गुरुप्रसाद त्याचे पाय दाबू लागला.

पाय दाबून घेताघेता 'आराम वाटतोय' म्हणून सुखाने रामस्वरूपही गप्प राहिला.

इकडे गुरुप्रसाद अनेक विषयांवर बोलता बोलता पाय दाबत हळूहळू क्रमाक्रमाने रामस्वरूपचे खांदे व डोकेही दाबू लागला. शेवटी मानेच्या शिरा दाबून त्याने रामस्वरूपला बेशुद्ध केले, त्याच्या कमरेचा पैशांचा कसा काढून घेऊन तो तिथून पळून गेला.

मीना परांडे

थोडया वेळाने रामस्वरूप शुद्धीवर आला. कंबरेला चाचपून पहातो, तो पैशांचा कसा कुठे आहे? वेड्यासारखा तो सरावैरा धावू लागला. शेवटी जरा दूरवर एका झाडाखाली बसलेल्या गुरुप्रसादला पाहून उडी मारून तो त्याच्याजवळ पोचला आणि म्हणाला–"अरे दुष्टा, दिवसाढवळ्या मला दगा देतोस काय? बोल कुठे आहे माझी पैशांची थैली?" असे म्हणत गुरुप्रसादने त्याचा गळाच धरला!

"आहो, थांबा थांबा! इतकी घाई नका करू. ही घ्या आपली थैली!" असे म्हणत गुरुप्रसादने तो पैशांचा कसा रामस्वरूपच्या हवाली केला!

रामस्वरूपने लगेच पैसे मोजून पाहिले. एक रुपयाही कमी नव्हता झालेला! आश्चर्याने रामस्वरूप म्हणाला–"हा काय खेळ केलास मग?"

"काही विशेष नाही, मी तुम्हाला एक प्रत्यक्ष धडा शिकवू इच्छित होतो! तुम्ही म्हणालात ना, कि जगात तुम्ही कुणावर विश्वास ठेवत नाही? पण आपण माझ्यासारख्या एका अनोळखी माणसावर विश्वास ठेवलात! होय, की नाही?" गुरुप्रसादने विचारले.

रामस्वरूपने मान हलवून होकार दिला. आता आपलं गाठोडं उचलून डोक्यावर घेत गुरुप्रसाद म्हणाला–"चला, आता निघू या आपण. बुद्धिमान माणसांनी जगातल्या सर्व माणसांकडे असं चोर अन् धोकेबाज म्हणून पाहू नये. तुम्ही म्हणत होता की नोकर आणि नातेवाईकांवरही तुम्ही विश्वास ठेवत नाही. पण अशा स्वभावाच्या तुम्ही माझ्यासारख्या एका परक्या माणसावर विश्वास ठेवून आपले जवळजवळ सगळंच धन गमवायच्या बेतात होता."

आता रामस्वरूपचा थकवा गेला होता. आपली चूक कबूल असल्याचं मानेने सुचवत रामस्वरूप गुरुप्रसादबरोबर शहराकडे चालू लागला.





## विषारी माशांची मागणी



माशांमध्ये सर्वात विषारी मासा पफरफिश. तरीही हा अतिशय स्वादिष्ट असतो. त्यामुळेच जपानमध्ये याची फार मागणी असते. यासाठी मोठ-मोठ्या हॉटेलांतून याचा विषारी भाग काढून टाकून पदार्थ बनवणारे विशेष प्रकारची कला असणारे स्वयंपाकी नेमले जातात. असे असूनही जपानमध्ये खाद्यपदार्थांतून विषबाधा होण्याचे मुख्य कारण बहुधा हे पफरफिशच असतात.

## २०,००० अण्डी



वाळवीतली राणीमुंगी दररोज २०,००० अण्डी घालते. या हिशोबाने आपल्या आयुष्यात ती जवळजवळ पन्नास हजार कोटी पिल्लं जन्माला घालते.




सहारा वाळवंटात रेतीची अनेक मोठमोठी टेकाडे आहेत. त्यातले एक टेकाड जवळजवळ १,४१० फूट उंच व तीन मैल लांब आहे.


Restore

127








# फोटो जोडनावे चढाओढ :: पारितोषिक रु. ५०

**या फोटोंची जोडनावे मे १९८९ च्या अंकात जाहीर केली जातील.**



Anant Desai



Anant Desai

★ या फोटोंची युक्त जोडनावे एकेकाच शब्दात किंवा छोटया वाक्यांत असली पाहिजेत. ★ जोडनावे मार्च महिन्याच्या २० तारखेच्या आंत आमच्या पत्त्यावर पोंचली झाली पाहिजेत. ★ आमच्याकडे आलेल्या जोडनावांत सर्वोत्तम ठरतील (दोन्ही जोडनावे धरून) त्यांना रु. ५० चे पारितोषिक दिले जाईल. ★ जोडनावे पोस्टकार्डावर लिहून **चांदोबा फोटो चढाओढ, वडपळणी,** मद्रास - २६ या पत्त्यावर पाठवावीत.

---

## जानेवारी महिन्याच्या चढाओढीचा निकाल

पहिला फोटो : **सबुल्या सबुल्या घाबरलास का ?**

दुसरा फोटो : **सोनुल्याच्या पुस्तकात दडलास का ?**

नांव : **कु. विद्या भावे,** मीनल अपार्टमेंट्स्, ए-८, ८८४/७, कर्वे रोड, पुणे - ४११ ००४

---


# चांदोबा

भारतापुरती मर्यादित चांदोबाची वार्षिक वर्गणी : रु. ३६-००

वार्षिक वर्गणी पाठविण्याकरिता खालील पत्ता :

**डाल्टन एजन्सीज,** चंदामामा बिल्डिंग्ज, वडपळणी, मद्रास-६०० ०२६

परदेशांसाठी वार्षिक वर्गणी संबंधी चौकशी करण्याकरिता खालील पत्त्यावर लिहा :

**चंदामामा पब्लिकेशन्स,** चंदामामा बिल्डिंग्ज, वडपळणी, मद्रास-६०० ०२६

# चांदोबातील नवलाई



## पुष्पक विमान

इटलीचे वैज्ञानिक डॉ. रॉबर्टो पिनोटी यांचे असे म्हणणे आहे की आपल्या पुराणात वर्णन केलेले पुष्पक विमान हे केवळ कवि-कल्पना नव्हे, तर सत्य गोष्ट आहे. बंगलोरच्या नुकत्याच आयोजित केल्या गेलेल्या आंतरराष्ट्रीय व्योमविज्ञान संगोष्ठीत भाषण देताना त्यांनी हा विचार मांडला की आपल्या प्राचीन ग्रंथांचे नीट परिशीलन केल्यास पुष्पक विमानाच्या निर्मिती-संबंधीचे शास्त्र प्रकाशात येऊ शकेल.

## आकाशात तेजो-वलय

इसवी सन २००० च्या वर्षापर्यंत आपल्याला आकाशात एक तेजोवलय दिसू लागेल. तिसऱ्या सहस्राब्दीत प्रवेश करताना एकता, परिपूर्णता आणि शान्ति यांची खूण म्हणून हे वलय निर्माण केले जाणार आहे.





## मंगल ग्रहावर माणूस !

इसवी सन २००१ ते २०१० च्या दरम्यान अमेरिका मंगळ ग्रहावर माणसांना पाठवणार आहे !

## अद्‍भुत बुद्धिमत्ता

विश्वविख्यात गणित शास्त्रज्ञ प्रोफेसर अर्नो रुबिन्स याने बनवलेल्या समस्या व कोडी अकरा वर्षांचा समीर मेहरा आणि त्याची बहीण नऊ वर्षांची कानिका यांनी अगदी सहजतेने सोडवून दाखवली. त्या समस्या तयार करणाऱ्या प्रोफेसर साहेबांना स्वतःला सुद्धा त्या सोडवायला खूप वेळ लागला होता. अशा या समस्या समीरने अवघ्या २५ सेकंदात, तर कानिकाने दोन मिनिटात सोडवल्या !



# कर-वसुली

रामापुर आणि विष्णुपुर ही तशी अगदी जवळ-जवळची गावे. पण ती दोन निरनिराळ्या राज्यात मोडत असत. त्या राज्यांच्या सीमेवर दोन्ही राज्यांचे अधिकारी व्यापाऱ्यांकडून सीमाशुल्क वसूल करत असत. अधिकारी माल लादलेल्या गाड्या मोजून प्रत्येक गाडीमागे पाच रुपये वसूल करत. एखाद्या व्यापाऱ्याने बऱ्याच गाड्या आणल्या असल्या, तर त्याला दर पाच गाड्यांपैकी एका गाडीचे शुल्क माफ केले जाई.

शिवगुप्त नावाचा एक व्यापारी पाच गाड्यांवर माल लादून विष्णुपुरहून रामापुरकडे निघाला. रामापुरच्या सीमेवर राजसेवकांनी गाड्या अडवल्या.

शिवगुप्तने आपला सहायक चंद्रिक याच्या हाती वीस रुपये देत म्हणाला—"या सगळ्या व्यापाऱ्यांना पैसे भरून रवाना व्हायला बराच वेळ लागेल. तेव्हा तू जाऊन आपली पाळी आल्याबरोबर हे कराचे पैसे जमा करून टाक."

चन्द्रिक पैसे घेऊन निघून गेला आणि दहाच मिनिटात परत येऊन ते वीस रुपये शिवगुप्तला देत तो म्हणाला—"आपलं काम झालं. आपल्याला कर भरायची काही जरूर नाही."

शिवगुप्तने आश्चर्याने विचारले—"अरे, आपल्या एकूण पाच गाड्या आहेत ना? मग आपल्या एकाही गाडीचा कर घेतला नाही त्यांनी?"

चन्द्रिक हसून म्हणाला—"आपल्या पुढे असणाऱ्या सर्व व्यापाऱ्यांची एकेकच गाडी आहे. मी त्यांना सुचवलं आपण सर्वांनी मिळून एकदम कर भरला, तर सर्वजण इथून लवकर सुटू शकू-यावर सर्वांनी आपापले पाच-पाच रुपये माझ्या हाती ठेवले. मी अधिकाऱ्यांकडे जाऊन आपल्या गाड्या सर्व मिळून एकूण गाड्यांची संख्या पंचवीस सांगितली. नियमाप्रमाणे अधिकाऱ्यांनी वीसच गाड्यांचा कर घेतला. पाच गाड्या फुकट!"

चंद्रिकच्या बुद्धिमत्तेवर खूष होऊन शिवगुप्तने त्याचा पगार दुप्पट केला!





# राजाची स्वप्नें

वत्सल देशावर राजा चन्द्रसेन राज्य करत होता. त्याच्या मनात अनेक प्रकारचे अन्ध-विश्वास असत. त्यापैकीच त्याचा एक पक्का विश्वास होता की, माणसाला जी स्वप्नं पडतात ती सर्व खरीच होतात.

एके दिवशी रात्री राजाला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याने पाहिले की—आपण गाढ झोपलेलो आहोत. त्याच वेळी शयनागारात कुठूनसा एक काळा नाग येऊन आपल्याला डसण्यासाठी पलंगावर चढत आहे. इतक्यात दारावर जोरात थापा मारून कोणी तरी आपल्याला उठवले आणि आत शिरून त्या नागाला मारून टाकले!

दुसऱ्या दिवशी आपल्या सवयीप्रमाणे राजाने मन्त्री व सेनापति यांना आपल्या स्वप्नाची हकीकत सविस्तर सांगितली. त्याच वेळी तिथे पहाऱ्यावर उभ्या असणाऱ्या नन्द नावाच्या पहारेकऱ्यानेही ती गोष्ट ऐकली. राजाच्या स्वप्नाविषयीच्या अन्ध-विश्वासाचा आपल्याला कधी तरी फायदा करून घेता येईल या विचाराने अनेक दिवस तो संधीच शोधत होता. हे स्वप्न ऐकून त्याने एक योजना तयार केली.

थोडे दिवस तसेच निघून गेले आणि एका रात्री अंतःपुरावर पहारा करताना, गारुड्याकडून आधीच खरेदी करून ठेवलेला एक काळा नाग त्याने हळूच शयनगारात सोडून दिला. नंतर खूप घाबरल्याचा अभिनय करीत त्याने जोरात दार खटखटावून राजाला उठवले.

राजाने दार उघडत रागाने गर्जत विचारले—"तू आमची झोप का मोडलीस? अशी काय आपति येऊन कोसळली?"

"क्षमा असावी महाराज! खिडकीवाटे एका काळ्या नागाला आत शिरताना मी

विजया देवधर



पाहिलं आहे; त्यामुळेच मी घाबरून जाऊन आपणाला उठवले." नन्दने मोठ्या विनयाने उत्तर दिले.

ही खबर ऐकून राजाला मोठे आश्चर्य वाटले. त्याने शिपायांना बोलवून शोध करवला; तर खरोखरीच एक काळा नाग आत सापडला! शिपायांनी त्याला मारून टाकले. राजाने पहारेकरी नन्द याची त्याच्या दक्षतेबद्दल तारीफ करून आपल्या गळयातला मूल्यवान हार काढून त्याला बक्षिस दिला! सकाळ होताच मोठ्या अभिमानाने आपले स्वप्न खरे झाल्याची वार्ता राजाने मन्त्री व सेनापति यांना सुनवली!

ते ऐकून त्या दोघांनी ओळखले की पहारेकरी नन्दने मोठ्या धूर्तपणे राजाला फसवले आहे. परंतु हे त्यांनी सांगूनही राजा त्यांच्यावर विश्वास ठेवणार नाही हे जाणून ते दोघे गप्प राहिले.

मंत्र्यानेही नन्दाला रागे भरून समजावले— "अरे दुष्टा, तू इनाम मिळवण्याच्या लोभाने जी चूक केलीस त्यामुळे आपल्या राजाच्या मूर्खपणात भरच पडेल. अन् महाराज असाच मूर्खपणाचा व्यवहार करून एकाद्या वेळी संकट ओढवून घेतील!"

सेनापतीने नन्दाला चांगला मार दिला होता त्यामुळे रागावून त्याने संधी मिळताच सेनापतीच्या सूड उगवायचा निश्चय केला.

या घटनेनन्तर थोडयाच दिवसात राजाला आणखी एका स्वप्नात असे दिसले की आपल्याला पंगु बनवण्यासाठी कोणीतरी काही मन्त्र-तन्त्र, चेटूक करीत आहे; पण मन्त्र म्हणणारा मात्र राजाला स्पष्ट दिसला नाही. त्याच्या वेशभूषेवरून मात्र तो माणूस राज्यातला कोणी अधिकारी असावा असे कळून येत होते.

दुसऱ्या दिवशी पुन्हा या स्वप्नाची गोष्ट मन्त्री व सेनापति यांना सांगून राजा म्हणाला—"मागल्या वेळेवरून हे सिद्ध झालं ना की माझी स्वप्नं खरीच होतात? तेव्हा आताच्या या स्वप्नावरून नक्कीच





सिद्ध होतंय की आपल्या दरबारातच कोणीतरी शत्रु चेटूक करून माझा निकाल लावायच्या प्रयत्नात जाळं लावून बसला आहे! पण तत्पूर्वीच आपण त्याला पकडलं पाहिजे. हे काम मी तुम्हा दोघांवरच सोपवत आहे."

तिथे उभ्या असलेल्या नन्दाने याही वेळी स्वप्नाची हकीकत ऐकली. अन् जरा विचार करून त्याच्या आधारे सेनापतीवर सूड उगवायची योजना बनवली.

काही दिवस निघून गेले. आपली म्हैस हरवली असल्याचा बहाणा करून नन्दाने ती शोधण्यासाठी सुट्टी घेतली आणि तो सरळ एका मान्त्रिकाकडे जाऊन पोचला. त्याचे नाव होते जोगिन्दर. जोगिन्दरच्या मदतीने नन्दाने स्मशानात तीन रंगाची एक मोठी रांगोळी काढली. रांगोळीच्या मध्यावर त्याने कोंबडीचे रक्त शिंपडलेली एक कवटी ठेवली. एक लिंबू कापून त्याला कुंकू माखले आणि ते तुकडे रांगोळीच्या दोन टोकांवर ठेवले. नंतर जोगिन्दरने मातीची एक मूर्ती बनवून ती कवटीच्या समोर ठेवली.

इतकी सारी तयारी झाल्यावर नन्द राजाकडे जाऊन त्याला म्हणाला—"महाराज, मी आपली हरवलेली म्हैस शोधत होतो, तेव्हा स्मशानात आपले सेनापती महाराज एका मान्त्रिकाकडून आपल्याला मारून टाकण्यासाठी काही चेटूक करवत असलेले मी आपल्या स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले. मान्त्रिक काही मन्त्र जपत मधून मधून आपल्याच नावाचा उच्चार करीत होता; आणि त्याबरोबरच एका मातीच्या मूर्तीत काटे घुसवत होता! मला पाहिल्याबरोबर ते दोघंही तिथून पळून गेले महाराज!"

राजाचा या गोष्टीवर एकदम विश्वास बसेना. परन्तु त्याने स्वतःच स्मशानात जाऊन पाहिले तेव्हा त्याची खात्री पटली की, नंदाचे म्हणणे खरेच आहे! सेनापतीवर रागावून चन्द्रसेनने त्याला ताबडतोब कैद



करून अंधारकोठडीत टाकवले आणि नन्दाची प्रशंसा करून, पुन्हा एकदा आपले प्राण वाचवल्याबद्दल त्याला मोठे बक्षिस दिले!

मन्त्र्याने नन्दाला बोलवून म्हटले—"तू राजाच्या मूर्खपणाचा फायदा घेऊन सेनापतीचा सूड उगवलास हे काही चांगलं नाही केलंस. अजून संधी गेली नाही. तू राजासमोर आपला गुन्हा कबूल करून सेनापतीला सोडवायला मदत कर. तुझ्या चुकीबद्दल क्षमा करून तुला शिक्षा न देण्याबद्दल राजाला मी समजावीन. ती जबाबदारी माझी!"

यावर नन्द हसून म्हणाला—"राजा तर आता माझ्या हातचं बाहुलं आहे! मी मनात आणलं तर तुम्हालाही तुरुंगाची हवा चाखायला लावू शकतो मन्त्री-महाराज!"

या घटनेनन्तर एकदा राजाने स्वप्न पाहिले की, शत्रूराजाशी हातमिळवणी करून नन्दाने आपली हत्या केली आहे! ते पाहून एकदम दचकून राजा जागा झाला आणि ताबडतोब शिपायांना बोलावून त्याने नन्दाला कैद करायची आज्ञा दिली!

पहाऱ्यावर असणाऱ्या नन्दाने ही आज्ञा ऐकली आणि तो ताबडतोब तिथून पळून गेला! दुसऱ्या दिवशी तो मन्त्र्याच्या घरी गेला आणि त्याच्या पायावर लोटांगण घालून गयावया करू लागला—"मी मुलाबाळांचा धनी आहे. आपला उपदेश न मानता आपल्याच हाताने पायावर कुऱ्हाड पाडून घेतली आहे! माझ्यावर दया करा, कसंही करून या संकटातून वाचवा मला!"

बरेच दिवस निघून गेले पण नन्द कुठेच सापडला नाही. इकडे रोजच राजाला स्वप्नात दिसू लागले की नन्द आपला वध करत आहे! शेवटी राजा मन्त्र्याला विनवू लागला—"मन्त्री महोदय, कसंही करून त्या नन्दाला एकदाचा कैद करा. माझी सर्व स्वप्नं अलिकडे खरी होत आहेत. तो नन्द नक्कीच एक दिवस माझी हत्या करील!"

दोन दिवसांनी राजाला भेटून मन्त्री म्हणाला—"महाराज, मला बातमी मिळालीय की, दोन दिवसांपूर्वी आपल्या गावात नन्द साप चावून मरून गेला. आत्ताच त्याच्या गावातल्या एका माणसाने येऊन मला ही खबर दिली."

नन्दाच्या मृत्यूची बातमी ऐकून राजाने आनन्दाने उडीच मारली. त्या दिवसापासून राजाला कधीही स्वप्नात नन्द दिसला नाही.

एका आठवड्याने मन्त्र्याने राजाला भेटून विचारले—"महाराज, अलिकडे आपणाला स्वप्नात कधी नन्द दिसतो?"

राजा मजेने हसत म्हणाला—"तो तर मरून गेला ना; आता कसा दिसेल स्वप्नात?"

"महाराज, खरं सांगू? नन्द तर आत्ताही जिवन्त आहे. स्वप्नात दिसणारी दृश्यं ही केवळ आपल्याच मनाचा भ्रम असतात, हे दाखवून देण्यासाठी नन्दला मीच लपवून ठेवला आहे. नन्दच्या मृत्यूची बातमी ऐके पर्यंत आपणाला तो रोज स्वप्नात दिसत असे, पण तो मेला हे कळल्यानन्तर, खरोखरी जिवन्त असणारा नन्द स्वप्नात दिसायचं बन्द झालं! आता आपणच ओळखा की स्वप्नं कशी खोटी असतात ते! स्वप्न खरी होतात हे मानणे कसे मूर्खपणाचे आहे, याबाबत आता आपणच विचार करावा." मन्त्री म्हणाला.

"पण माझी स्वप्न तर खरी झाली ना? त्याबाबत तुमचं काय म्हणणं आहे?" राजाने विचारले.

"हा सर्व नन्दाने केलेल्या फसवेगिरीचा परिणाम आहे." असे म्हणून मन्त्र्याने नन्दला बोलवून घेतले.

नन्दाने प्रवेश करून राजाच्या पायावर लोटांगण घेत सारी हकीकत सविस्तर सांगितली; आणि आपल्या या गुन्ह्यांबद्दल राजाची क्षमा मागितली.

यानंतर राजा चन्द्रसेनने प्रथम सेनापतीला मुक्त केले आणि त्या दिवसापासून स्वप्नांवर विश्वास ठेवणे सोडून दिले.





# मृत्युपत्राचे रहस्य

धर्मनन्द नावाचा एक जमीनदार आपल्या नावा प्रमाणेच धर्मशील होता. दान-पुण्य करण्यात त्याला आनन्द वाटे. त्याने अनेक व्रत-वैकल्ये आणि तीर्थयात्रा वगैरे ही केल्या, परंतु त्याला अपत्य लाभ मात्र झाला नाही. अशातच त्याची पत्नी अचानक आजारी पडून, अल्पकाळातच तिचे देहावसान झाले. तिच्या मृत्युच्या दु:खाने झुरून झुरून धर्मनन्दही एक महिन्याच्या आतच मरण पावला.

धर्मनन्दाचे पुष्कळ नोकर-चाकर होते. पण त्यातले दोन अत्यन्त विश्वासपात्र असे होते. त्यातला एक रामसहाय हा घरातली सर्व कामे, जबाबदाऱ्या संभाळत असे आणि दुसरा सोमनाथ हा सर्व बाहेरची कामे पहात असे. धर्मनन्दच्या मृत्युमुळे ते दोघेही पेचात पडले होते. अशातच एके दिवशी शेजारच्या गावचा न्यायाधीश व धर्मनन्दचा मित्र पुंडरीक तेथे आला आणि म्हणाला–"तुमच्या मालकाने मरण्यापूर्वी माझ्याशी सल्ला-मसलत करून एक मृत्युपत्र तयार केले आहे. त्यातल्या अटींप्रमाणे त्याचे घर एका अनाथालयाच्या ताब्यात द्यायचे आहे. अन् त्याबरोबरच तुम्हा दोघांना प्रत्येकी दहा-दहा हजार रुपये देण्याबद्दल लिहिले आहे. ते द्यायलाच मी आलो आहे."

त्याच रात्री सोमनाथ पुंडरीकच्या गावी जाऊन त्याला म्हणाला–"महाराज, आपण आज जे सांगितलेत, त्यावर माझा काही विश्वास नाही बसत. धर्मनन्दजींनी तसा अगदी मनापासून खूप दान-धर्म केला हे खरेच; पण तरीही त्यांच्याजवळ खूपच संपत्ति होती. त्यांच्या मृत्युसमयी त्यांच्याजवळ केवळ वीस हजारच उरले यावर काही विश्वास नाही बसत बुवा!"

राजेन्द्र कोल्हटकर

यावर काही उत्तर द्यायला पुंडरीक का-कू करू लागला. हे पाहून धाडसाने सोमनाथने त्याच्या हातावर एक हजार रुपये ठेवले आणि म्हणाला–"आपण स्वत:च्या हातांनी मला दहा हजार रुपये दिलेत; म्हणून कृतज्ञतेने मी हे एक हजार तुम्हाला देत आहे. कृपा करून काहीही न लपवता मृत्युपत्राबद्दल सर्व काही खरे खरे सांगून टाका ना!"

पुंडरीक हसून म्हणाला–"सोमनाथ, तू खरोखरीच मोठा बुद्धिमान दिसतोस. तू बरोबर ओळखलंस की मृत्युपत्राबाबत मी काही लपवू पहात आहे. खरी गोष्ट अशी की धर्मनन्दने संपत्तीच्या रूपात आणखी एक लाख रुपये मागे ठेवले आहेत. पण त्यानेच तुम्हा दोघांना अगोदर दहा-दहा हजार देऊन तुमच्यासाठी एक परीक्षा ठेवली आहे. धर्मनन्दने असे सांगितले की तुम्ही हे पैसे कसे खर्च करता यावर मी नीट लक्ष ठेवावे. त्याच्या आत्म्याला शान्ति मिळेल अशा पद्धतीने जो खर्च करील, त्यालाच उरलेले एक लाख रुपयेही द्यावे. हे सर्व मृत्युपत्रातही व्यवस्थित लिहून ठेवलेले आहे, कशा प्रकारच्या कार्यामुळे धर्मनन्दच्या आत्म्याला संतोष मिळू शकेल हे मीच एकटा नव्हे तर इथले अनेक लोक चांगल्या प्रकारे जाणतात."



पुंडरीकच्या तोंडून या गोष्टी ऐकून सोमनाथ फारच खूश झाला. घरी येऊन त्याने लगेच काही शिल्पकारांना बोलवून घेतले. आणि धर्मनन्दचा एक पुतळा बनवून घेऊन त्याने त्याची स्थापना गावातल्या एका प्रमुख चौकात करवली.

नंतर उरलेली रक्कम लावून सोमनाथने धर्मनन्दाची धर्मभावना, त्याचा दान-धर्म वगैरेबाबत कथा-कीर्तने, गीते, नाटके वगैरे रचवून घेऊन जनतेत त्याचा प्रसार केला.

रामसहायला बिचाऱ्याला धर्मनन्दच्या मृत्युपत्राबद्दल काहीच माहीत नव्हते. त्याच्याजवळ जी काही पुंजी जमली, तिच्या मदतीने तो गरिबांना अन्नदान करू लागला.

कोणी त्याच्या दानशीलतेबद्दल काही बोलू लागला तर तो त्याला थांबवून म्हणे– "अरे, हा पैसा माझा थोडाच आहे! तो तर सगळा मालकांनी-धर्मनन्दजींनी दिला. तेव्हा स्तुति करायची ती त्यांची करा, माझी नको."

कित्येक दिवस गेले आणि एके दिवशी पुन्हा पुंडरीक धर्मनन्दच्या गावी आला. त्याने सर्व ग्रामस्थांना एकत्र करून त्याच्या-समोर ते मृत्युपत्र वाचले; आणि नन्तर त्यांना विचारले–"आता आपणच सांगा-धर्मनन्दने ठेवलेले लाख रुपये सोमनाथच्या हाती सोपवावे की रामसहायच्या?"

सर्व गाववाले यावर म्हणाले–"धर्मनन्द आयुष्यभर नेहमीच विकलांग आणि गरीब लोकांना मनापासून मदत करीत राहिले. आपलं नाव व्हावं अशी रत्तीभरही भावना त्यांच्या मनात नव्हती. यासाठी त्यांच्याच प्रमाणे गरीब व असहाय लोकांना दान करणाऱ्या रामसहायलाच हे उरलेले एक लाखही दिले जावेत."

रामसहायच्या हाती ते एक लाख रुपये सोपवत पुंडरीक सोमनाथला म्हणाला– "सोमनाथ, मृत्युपत्राचं रहस्य जाणून घेण्यासाठी तू शेजारगावच्या मला, एका न्यायाधीशाला, एक हजार रुपये लाच दिलीस. ते तुझे हे पैसे परत घे. तुमचा दोघांचा स्वभाव मला पारखायचा होता म्हणून मी ते पैसे तेव्हां ठेवून घेतले होते."

यावर लज्जित होऊन सोमनाथने मान खाली घातली. इतक्यात रामसहाय आपल्या रकमेतले दहा हजार त्याच्या हाती देत म्हणाला–"सोमनाथ, आपल्या मालकांकडून मिळालेले सारे धन तू स्वतःला योग्य वाटले त्याप्रमाणे चांगल्यासाठीच खर्च केलेस; म्हणून ही रक्कम आता तू आपल्याजवळ ठेव."

यानन्तर बाकी रकमेतून रामसहायने धर्मनन्दच्या नावाने एक धर्मशाळा बांधली आणि तेथे गरीबांना मदत करत करत आपले उर्वरित जीवन संतोषाने व्यतीत केले.






[ ३ ]

दुसऱ्या दिवशी आपल्या समोर येऊन उभे राहिलेल्या धीरसिंहला सुलोचना म्हणाली–"दर अमावास्येच्या मध्यरात्री दक्षिण दिशेकडून अत्यन्त करुण आवा-जातले शब्द ऐकू येतात–'अरेरे, मी काहीच उपयुक्त काम करू शकलो नाही. ही अमावास्याही उलटून गेली!'–हा आवाज कुणाचा असावा? ती व्यक्ति असं का बोलते? याचे उत्तर शोधून काढून सांग. हाच माझा तिसरा प्रश्न."

या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी सुलोचने-कडून तीन महिन्यांची मुदत मागून घेऊन धीरसिंहने दक्षिणेकडे कूच केले. तीन दिवस अणि तीन रात्रींचा प्रवास केल्यावर तो एका दाट अशा भयानक जंगलापाशी पोचला. घोड्याला तिथे सोडून देऊन धीरसिंह पायीच जंगलात घुसला. ते निबिड जंगल ओलांडून जायला त्याला तीन दिवस लागले.

पुढे पाच कोस अंतरावर त्याला एक सुंदर नगर दिसले. ते पाहताच आनन्दाने आणि उत्साहाने पुढे जाऊन तो त्या नगरात प्रवेश करणार, तोच विचित्र पोशाख धारण करणाऱ्या दोन द्वारपालांनी त्याला अडवून कैद केले!

"अरे! मी काहीच अपराध केलेला नसताना तुम्ही मला कशासाठी कैद करत आहात?" धीरसिंहाने विचारले.

त्याच्या बोलण्याकडे मुळीच लक्ष न देता द्वारपालांनी त्याला कैद करून आपल्या राजापुढे हजर केले.



"तू कोण आहेस? कोणत्या देशातून आला आहेस इथे? आमच्या या शहरात तू का आला आहेस?" राजाने त्याला विचारले.

"मी नेपाळ देशचा राजपुत्र आहे. माझं नाव धीरसिंह. मला एका विशेष महत्त्वाच्या कामासाठी आपले हे शहर ओलांडून जायचे आहे. मी निर्दोषी आहे. तरीही आपल्या या शिपायांनी मला कैद करून इथे आणले आहे." धीरसिंहाने जरा आवेशानेच उत्तर दिले.

राजाच्या मागे उभा असलेला मंत्री यावर बोलू लागला–"धीरसिंह, जो कोणी माणूस आमच्या या शहरात शिरेल त्याला आमची राजकुमारी सीमन्तिनी देवी तीन प्रश्न विचारते. त्या प्रश्नांचे बरोबर उत्तर न देणारास मृत्युदण्ड मिळतो. हा आमच्या शहराचा रिवाज आहे."

"हा तर अन्याय आहे, अत्याचार आहे! बिचाऱ्या भोळ्याभाबड्या परदेशी लोकांचा वध करणे हा जघन्य अपराध आहे तुमचा! अन्याय आणि अत्याचार थांबवणे हे तर राजकर्तव्य आहे, परन्तु इथे तर उलटाच प्रकार दिसत आहे! आपणासारख्या शासकांना हे शोभत नाही." धीरसिंहाने राजाचा धिक्कार करत म्हटले.

"होय! तुझे म्हणणे खरेच आहे, पण मी ही हा प्रकार थांबवू शकत नाही. या बाबतीत मी असहाय्य आहे. एका यक्षाच्या शापामुळे माझ्या मुलीला ही दुस्थिति प्राप्त झाली आहे; आणि त्यामुळेच मी ही निन्देचा विषय झालो आहे. चल, तू स्वतःच पहा." असे म्हणून राजा धीरसिंहाला बरोबर घेऊन राजकन्येच्या महालाकडे निघाला.

त्यांना पहाताच डोळे वटारत राजकन्या म्हणाली–"ओहो! माझ्या प्रश्नांचे उत्तर देणारा धीर वीर आला आहे काय?"

"हां, हां! विचार तुझे प्रश्न." धीरसिंह म्हणाला.

"सर्व प्रकारच्या फळांत उत्तम व मधुर फळ कोणते?" सीमंतिनीने विचारले.

"संतान-फल!" धीरसिंह उत्तरला.

"अशी कोणती गोष्ट की जिची कोणी अपेक्षा तर करत नाही, पण सर्वांना ती भोगावी मात्र लागते?" सीमन्तिनीने दुसरा प्रश्न विचारला.

जरा वेळ गप्प राहून धीरसिंह म्हणाला–"ती गोष्ट म्हणजे मृत्यु!"

"वा, वा! फार छान! आता माझा तिसरा प्रश्न ऐक–जर ती गोष्ट असेल तर समज की, आपल्याजवळ सर्व काही आहे, ती गोष्ट नसेल, तर इतर सर्व काही असूनही काहीच नाही असे आहे. ती गोष्ट कोणती?" सीमन्तिनीने विचारले.

"ती गोष्ट–बुद्धिचे बळ!" धीर-धीरसिंहाने पटकन उत्तर दिले.

दुसऱ्याच क्षणी सीमन्तिनी जोरजोरात हसली आणि मूर्च्छित होऊन धाडकन् खाली पडली. त्याच क्षणी तिच्या शरीरातून काळ्या नागासारखी एक आकृति बाहेर पडली. धीरसिंहने त्याला पट्ट पकडले आणि एका कलशात बन्द करून जमिनीत गाडून टाकले.

थोड्याच वेळात हळूहळू डोळे उघडत सीमन्तिनीने विचारले–"हे सर्व काय चालले आहे?" नंतर चोहोकडे नजर फिरवून पाहिले आणि उठून हळूहळू चालत ती राजाजवळ जाऊन उभी राहिली.



राजाच्या डोळ्यातून आनन्दाश्रु वाहू लागले. धीरसिंहाचा हात आपल्या हातात घेऊन दाबत तो कृतज्ञतेने म्हणाला–"तू माझ्या मुलीला शापमुक्त करून माझी होणारी निन्दा टाळली आहेस. मी या जन्मात तरी तुझे ऋण फेडू शकणार नाही."

"ही तर सर्व देवाची करणी आहे! पण मी एका खास गोष्टीचा पत्ता लावण्यासाठी निघालो आहे." असे म्हणत धीरसिंहाने आपल्या कामाची माहिती राजाला दिली.

"हा आवाज आम्हाला ही ऐकू येतो. परंतु तो कोठून येतो हे आम्हाला ही ठाऊक नाही. तू तर असामान्य असा धीर वीर



आहेस. तुला कोणतीही गोष्ट अशक्य नाही. तुला आपल्या कामात नक्कीच यश मिळेल. आशिर्वाद आहे माझा!" असे म्हणून राजाने मोठ्या प्रेमाने त्याला निरोप दिला.

आता धीरसिंहाने पुन्हा दक्षिण दिशेकडे आपली यात्रा सुरू केली. तीन दिवसांनी तो एका वाळवंटाजवळ पोचला. त्यावेळी मध्यरात्रीची वेळ होती. अमावास्येची काळोखी रात्र होती. आकाशात सर्वत्र तारे चमचमत होते. आणि अचानक भयानक वादळ सुरू झाले! त्या वादळी वाऱ्याच्या एका तडाख्याने धीरसिंह जागचा उडाला आणि दक्षिणेकडे असलेल्या एका झाडाखाली जाऊन पडला! त्याने उठून चारी बाजूंना नजर फिरवून पाहिले. इतक्यात त्याला मंद असा घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकू आला. जवळच एक डोंगर दिसला आणि धीरसिंह त्या डोंगरावर चढला. त्याच्या दुसऱ्या बाजूच्या पायथ्याशी त्याला एक विशाल मैदान दिसले. इतक्यात टण्, टण् अशी बारा वेळा घण्टा वाजली आणि विचित्र अशा प्रकाशात सैनिकांसारखा पोशाक केलेली काही माणसे मैदानाकडे येऊ लागली. त्या सर्वांनी मूल्यवान आभूषणे धारण केलेली होती आणि त्यांच्या अंगातून सुगन्ध येत होता. ते सर्वजण येऊन एका मोठ्या रत्नखचित गालीच्यावर बसले.

त्या सर्वांपासून थोड्या अंतरावर एक दुबळासा, लक्तरे नेसलेला, केस पिंजारलेला, भिकाऱ्यासारखा दिसणारा म्हातारा जमिनीवर बसला आणि चोहोकडे दृष्टि फिरवून एकदम ओरडला–"अरेरे! मी काहीच उपयुक्त काम करू शकलो नाही. ही अमावास्याही उलटून गेली!"

थोड्याच वेळात तेथे बसलेल्या लोकांसमोर सोन्याच्या थाळ्यांतून वाढलेले पंचपक्वान्नांचे भोजन ठेवले गेले. जास्त असलेल्या एका थाळीकडे बोट करत त्यांच्यातला एक धीरसिंहाला म्हणाला–

"तू दूर उभा राहून पहात काय राहिला आहेस. ये, तू ही आमच्याबरोबर भोजन कर."

धीरसिंह जाऊन त्या थाळीसमोर बसला.

भिकाऱ्यासारख्या त्या म्हाताऱ्याला सोडून बाकी सर्वांसमोर जेवणाच्या थाळ्या होत्या; पण त्या म्हाताऱ्यासमोर मात्र मातीच्या खापरात दगड-गोटे भरून ठेवलेले होते! सर्वजण मजेने मेजवानी झोडत होते आणि म्हातारा मात्र दीनवाणेपणाने त्यांच्याकडे पहात बसला होता!

ते पाहून धीरसिंहने त्या लोकांना विचारले–"या म्हाताऱ्याने बिचाऱ्याने असा काय अपराध केला आहे, कि त्याला असं उपाशी ठेवलं जात आहे?"

"सगळं त्यालाच विचारा की!" सर्वांनी एका सुरात उत्तर दिले.

धीरसिंहाने आपल्या थाळीतील पदार्थांचे दोन भाग केले आणि एक भाग त्या म्हाताऱ्याला देऊन त्याला जेवायला सांगितले. पण काय आश्चर्य! दुसऱ्याच क्षणी त्या सर्व पदार्थांचेही दगडगोट्यातच रूपान्तर झाले!

"हा काय चमत्कार आहे?" धीरसिंहाने विचारले.

"हे सर्व माझ्याच करणीचं फळ आहे, बाळा!" म्हाताऱ्याने मोठ्या लीनतेने उत्तर दिले.

"का बरं असं होतं? आपण काय पाप केले आहे?" धीरसिंहाने कुतूहलाने विचारले.





'ती एक मोठी रामकहाणी आहे. इथून ऐंशी मैल असलेल्या विदिशा नगरातला धनगुप्त नावाचा करोडपति व्यापारी आहे मी! करोडो रुपये कमावले मी, पण कधी कुणाला मुठभर धान्यही दान नाही दिलं. उलट मी दान देणाऱ्या माणसांची टिंगल करीत असे. इतकंच नव्हे तर मी असा पापी, की त्यांना दान देण्यापासून परावृत्त करायचा प्रयत्न करीत असे! याशिवाय माझ्याकडे काम करणाऱ्या लोकांना मी नीट पगार देत नसे; खूप त्रास देत असे मी त्यांना! पंचवीस वर्षांपूर्वी दूर देशांशी व्यापार करावा म्हणून एकदा मी रेशमी वस्त्रे, हिरे-जवाहीर वगैरे उंटांवर लादून, अनेक नोकर बरोबर घेऊन निघालो. एका वाळवंटात दरोडेखोरांनी आमच्यावर हल्ला केला आणि आमचा सर्व माल लुटला आणि आम्हा सर्वांना ठार करून इथे गाडून टाकले! आता माझ्यासमोर बसून मजेने जेवत असलेले सर्वजण माझे त्यावेळचे नोकरच आहेत! या सर्वांनी आपापल्या तुटपुंज्या कमाईतून ही यथाशक्ति दानधर्म करून धार्मिक जीवन व्यतीत केलं होतं; त्याचा परिणाम म्हणूनच ते सर्वजण आता स्वर्गसुख भोगत आहेत अणि मी करंटा धर्मबाह्य, निरुपयोगी जीवन जगल्यामुळे आपल्या नोकरांसमोरच अशा नरकयातना भोगत आहे!" आपले अश्रू पुसत धनगुप्ताने आपली कहाणी संपवली.

"अरेरे! आता या वाईट परिस्थितीतून बाहेर निघायचा काही उपाय असेल तर सांगा." सहानुभूति प्रकट करीत धीरसिंह म्हणाला.

"मी आपल्या आयुष्यात जे काही धनार्जन केलं, त्याचा अधिकांश भाग' आमच्या घरामागे पूर्व दिशेला, दरवाज्यापासून दहा गज अंतरावर खड्डा करून ठेवला आहे. हे रहस्य माहीत नसल्यामुळे माझे तीनही मुलगे दारिद्र्यात राहून असंख्य यातना भोगत आहेत! मी जे धन

गाडून ठेवलं आहे, त्याचे चार भाग करावे. तीन हिस्से जनता-कल्याण-कार्यात खर्च करून बाकी पाव हिस्सा माझ्या मुलांनी आपसात सारखा वाटून घ्यावा; म्हणजे मला उत्तम गति प्राप्त होईल आणि या नरककूपातून माझी सुटका होईल." धनगुप्तने उपाय सांगितला.

यानंतर तेथून निघून धीरसिंह विदिशा नगरीत पोचला. धनगुप्तच्या मुलांना भेटून त्याने घडलेला सर्व वृत्तान्त कथन केला. त्यांचा प्रथम धीरसिंहावर विश्वास बसेना; पण त्याने सांगितल्याप्रमाणे घराच्या पिछाडीला खणून पाहिले, तेव्हा त्यांच्या वडलांनी गाडून ठेवलेले धन त्यांना सापडले व ते अत्यन्त आनन्दित झाले! वडिलांच्या इच्छेप्रमाणे त्यांनी त्या धनाचे चार हिस्से केले; त्यातले तीन हिस्से दान-धर्मात खर्च करून बाकीचा हिस्सा आपापसात वाटून घेतला. आता त्यांचे दरिद्रच फिटले आणि तेही अन्य संपन्न माणसांसारखेच आपले जीवन घालवू लागले.

पुढल्या अमावस्येला धीरसिंह परत या वाळवंटाजवळच्या डोंगराशी पोचला. त्या रात्री भोजनासाठी जे लोक हजर होते त्यांना पाहून धीरसिंहाला फार आनन्द वाटला.

धनगुप्तने डोळ्यात पाणी आणून धीरसिंहाजवळ आपली कृतज्ञता व्यक्त केली.

हे सर्व झाल्यावर धीरसिंह तेथून परत कौशाम्बीला आला. धनगुप्तची सर्व हकीकत त्याने सुलोचनेला सांगितली.

मोठ्या उत्सुकतेने ती गोष्ट ऐकून सुलोचना त्याला, म्हणाली–"तू जे सांगत आहेस ते सर्व खरेच आहे; कारण या आमावास्येला काही तो करूण स्वर ऐकू आला नाही! तुझे साहस, पराक्रम आणि परोपकारी वृत्ति खरोखरीच प्रशंसनीय आहे. उद्या मला येऊन भेट. मी तुला चौथा प्रश्न सांगेन." असे म्हणून तिने धीरसिंहाला आदरपूर्वक निरोप दिला.

(क्रमशः)



# स्वार्थ की परमार्थ

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाकडे परत आला. फांदीवर लटकणारे प्रेत उतरवून खांद्यावर टाकून नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाकडे चालू लागला. यावर प्रेतात निवास करणारा वेताळ बोलू लागला–"राजा, तुझी ही स्थिती पाहून माझ्या मनात एक शंका येत आहे. या मध्यरात्री आपली पूर्ण शक्ति-युक्ति उपयोगात आणून तू या भयानक जागी जे कष्ट करत आहेस, ते सर्व तुझ्या स्वार्थासाठी की परोपकारासाठी? आपल्या समाजात सर्वसाधारणपणे सर्वच जण आपल्या शक्तीचा आणि बुद्धीचा उपयोग आपल्या स्वार्थासाठीच करतात. तुझ्यासारखा परोपकार करण्यासाठी हे कोणी करत नाही. खूप दिवसांपूर्वी सुदर्शन नावाच्या युवकाने आपली सारी शक्ति आणि बुद्धीचा उपयोग आपल्या उपकारकर्त्यांसाठी, हितकर्त्यांसाठी न करता स्वतःसाठीच केला

वेताळाच्या गोष्टी



होता. मी त्याची गोष्ट तुला सांगतो, ऐक. तुला थोडा श्रमपरिहारही होईल.

वेताळ कहाणी सांगू लागला–

प्राचीन काळी कान्यकुब्ज नगरात रत्नगुप्त नावाचा एक प्रमुख व्यापारी रहात असे. अनेक प्रकारचे व्यापार करून त्याने करोडो रुपयांची संपत्ति मिळवली. म्हातारपण आल्यावरही आराम करण्याऐवजी आणखी संपत्ति जोडण्यासाठी त्याने समुद्री-व्यापार सुरू केला.

रत्नगुप्त सुगंधी द्रव्ये घेऊन पूर्वेकडील बेटांवर पोचला. तेथे आपला माल जास्त किमतीला विकून त्याने अपार धन संपादन केले. पैसे मिळवण्याच्या वेळी रत्नगुप्त विश्रान्तीचा विचारच करीत नसे. नव्यानेच केलेल्या या समुद्री-व्यापारांत त्याला अपेक्षेबाहेर धनलाभ झाला, त्यामुळे दुप्पट उत्साहाने त्याने याच व्यापारात लक्ष घालायला सुरुवात केली.

एकदा रत्नगुप्त असाच जहाजांवर सुगंधी माल लादून समुद्रयात्रेला निघाला. बऱ्याच दिवसांच्या प्रवासा नंतर तो पूर्वेकडील बेटांच्या एका राजधानीच्या शहरी पोचला, आणि त्याने तेथील एका धर्मशाळेत मुक्काम ठोकला.

दुसऱ्या दिवशीं रत्नगुप्ताने आपला माल विकायला सुरुवात केली. आणि संध्याकाळपर्यंत अर्धा-अधिक माल चांगल्या किमतीत विकूनही टाकला. त्या दिवशी रात्री जेवणानंतर विक्रीचे कागद घेऊन तो धर्मशाळेबाहेर ओटयावर हिशोब लावण्यासाठी जाऊन बसला. मध्यरात्र उलटली तरी त्याचा हिशोब बरोबर लागेना.

त्याच ओटयाच्या दुसऱ्या टोकाला एक तरूण झोप येत नसल्याने कूस बदलत झोपण्याचा प्रयत्न करत आडवा पडून होता. रत्नगुप्तची हालचाल पाहून त्याला आश्चर्य व कुतूहल वाटले. शेवटी तो तरूण उठून रत्नगुप्तजवळ येऊन म्हणाला–" महाराज, माझं नाव सुदर्शन. इतक्या मध्यरात्री आपण या हिशोबांमुळे चिन्तामग्न दिसत आहात."

डोके उचलून सुदर्शनकडे पहात रत्नगुप्त म्हणाला–" होय बेटा, मी एक व्यापारी आहे. आज दिवसभरात मी या शहरात आपला खूपसा माल विकला आहे. पण त्याचा हिशोबच काही केल्या लागत नाहीय, म्हणूनच माझी चलबिचल चालू आहे."

"आपली काही हरकत नसेल तर ते हिशोबाचे कागद माझ्या हाती द्या. मी नीट हिशोब लावून द्यायचा प्रयत्न करतो." सुदर्शन हात पुढे करत म्हणाला.

"महाराज, गणित हा माझा अत्यन्त प्रिय विषय. लहानपणापासून मोठ्या आवडीने मी गणिताचा अभ्यास केला आहे. आपल्या व्यापाराचा हिशोब म्हणजे माझ्या डाव्या हाताचा मळ !" असे म्हणत सुदर्शनने रत्नगुप्तच्या हातातून कागद घेतले आणि काही मिनिटातच हिशोब बरोबर करून त्याने रत्नगुप्तला तोंडात बोट घालायला लावले !

सुदर्शनजवळ आपली कृतज्ञता व्यक्त करत त्याचा परिचय जाणून घ्यायची जिज्ञासा रत्नगुप्तने व्यक्त केली.

"मी आपलं नाव तर प्रथम सांगितलंच आहे आपल्याला. काही वर्षांपूर्वी कान्यकुब्जहून मी आपल्या वडिलांबरोबर व्यापाराच्या कामासाठी या पूर्वेकडील बेटात आलो आणि इथेच राहिलो, व्यापारात माझ्या वडिलांचे फार मोठे नुकसान झाले, पैसे बुडाले त्यांचे ! काळं तोंड घेऊन पुन्हा स्वदेशी जाण्याचे त्यांच्या मनात नव्हते. शेवटी काळजीन





झुरूनच त्यांचे देहावसान झाले." सुदर्शनने सविस्तर आपला परिचय करून दिला.

थोडा वेळ विचार करून रत्नगुप्त त्याला म्हणाला–"हे बघ बेटा. नोकरी हेच काही उदरनिर्वाहाचं एकमेव साधन नव्हे! तुला व्यापाराची आवड असेल तर माझ्याबरोबर आपल्या देशी परत चल, आणि व्यापारात मला मदत कर. कबूल आहे तुला?"

सुदर्शनने मोठ्या प्रसन्नतेने या गोष्टीला संमति दिली. बाकीचा माल विकून झाल्यावर रत्नगुप्त सुदर्शनला बरोबर घेऊनच आपल्या घरी परतला.

विनयशील अशा सुदर्शनची बुद्धीही अत्यंत कुशाग्र होती. आपली वागणूक आणि कामाचा झपाटा या गुणांच्या बळावर त्याने लवकरच रत्नगुप्तचे प्रेम संपादन करून घेतले.

थोडे दिवस निघून गेले. रत्नगुप्तने पुन्हा एकदा पूर्वेकडील बेटांकडे व्यापारासाठी जायचा बेत केला. सर्व तयारी झाली, पण ऐन वेळी रत्नगुप्त अतिशय आजारी पडला.

त्याने एकूण परिस्थिती पाहून सुदर्शनला म्हटले–"तू एकटाच माल घेऊन जा बेटा यावेळी! आपल्याजवळ एकूण दहा लाखांचा माल आहे. तिथे त्याचे पंधरा लाख सहज मिळतील. यात्रेचा वगैरे सर्व खर्च-वेच वजा करूनही आपल्याला चार लाख नक्कीच मिळतील. तू ताबडतोब निघायची तयारी कर."

नंतर सुदर्शन जहाजांवर माल लादून पूर्व-बेटावर गेला. मागल्या यात्रेच्या वेळी रत्नगुप्त उतरला होता त्याच धर्मशाळेत यावेळीही सुदर्शन उतरला. तिथे आणखी व्यापाऱ्यांशी त्याचा परिचय झाला.

बोलता बोलता ते व्यापारी सुदर्शनला म्हणाले–"यावेळी इथे सुगंधी मालाला चांगली मागणी आहे. पण आणखी एका महिन्याच्या अवधीत त्याचे मूल्य आणखी वाढायची शक्यता आहे. एक महिना थांबलास तर दुप्पट किंमतही मिळेलसे वाटते. अर्थात् काम साहसाचं आहे, पण देवावर भरोसा ठेवून आम्ही तरी महिनाभर माल विकून टाकायचा नाही असं ठरवलंय. बोल, तुझा काय विचार आहे?"

थोडासा विचार करून सुदर्शन म्हणाला–"मी शक्य तितक्या लवकर माल विकून स्वदेशी परतायचं ठरवलं आहे."

अन् त्याप्रमाणे लवकरच माल विकून तो स्वदेशी परत गेला. सुदर्शनने सांगितलेले आपले अनुभव ऐकून रत्नगुप्तने आपल्या फायद्यातला चौथा हिस्सा त्याला देऊन टाकला.

आणखी काही दिवस गेले आणि सुदर्शनने पुन्हा तिकडेच व्यापारासाठी जायचा आपला मानस रत्नगुप्तजवळ बोलून दाखवला. त्याची इच्छा जाणून रत्नगुप्त फारच खूष झाला! तो म्हणाला–"ऐक बेटा, खऱ्या व्यापाऱ्याने असलेल्या संपत्तिवरच संतुष्ट होऊन आराम करत राहणे अगदी गैर आहे. तेव्हा 'शुभस्य शीघ्रम्!' माल घे अन् नीघ! यावेळी तू अर्ध्या फायद्याचा भागीदार!"

ठरवल्याप्रमाणे सुदर्शन जहाजांवर माल घेऊन निघाला आणि पूर्वेकडच्या त्या बेटांच्या राजधानीच्या शहरात त्याच जागी पुन्हा तळ दिला त्याने. याही वेळी त्याचा इतर व्यापाऱ्यांशी विचारविनिमय झाला. त्यांना तो म्हणाला–"आपल्या मालाचा भाव वाढणार आहे; तेव्हा मी आणखी काही दिवस वाट पहाणार आहे."





सुदर्शनच्या कल्पनेप्रमाणेच घडले! त्याचा सुगन्धी माल खूप अधिक किमतीत विकला गेला. या व्यवहारात त्याला दुप्पट लाभ झाला. तरीही, यावेळी लगेच स्वदेशी परतायचा त्याचा विचारच नव्हता. उलट आणखी काही दिवस तिथेच राहून कौशल्यपूर्वक बनवलेल्या कित्येक हस्तिदन्ती वस्तु खरेदी करून घेऊन मगच तो कान्य-कुब्जला परत गेला.

आपली घरं सजवण्याची आवड असलेल्या लोकांना त्याने या वस्तु आणखीनच जास्त किमतीला विकल्या आणि अशा प्रकारे एकाच वेळच्या प्रवासात त्याने पूर्वीपेक्षा कितीतरी पटींनी अधिक फायदा मिळवला.

त्याच्या या व्यापारकौशल्यावर रत्नगुप्त खूपच खूष झाला! आणि एक दिवस संधी साधून त्याने सुदर्शनला म्हटले—"बऱ्याच दिवसांपासून तुझ्याशी एक गोष्ट बोलायचं माझ्या मनात आहे. हे बघ बेटा, तुला माहीच आहे की मला एकुलती एक मुलगी आहे. मला तू खूपच आवडला आहेस; तुला जावई करून घ्यायचा माझा मानस आहे. तुझी आहे संमति या बेताला?"

सुदर्शन मोठ्या खुशीने तयार झाळा. नाहीतरी त्याचे असे कोण होते या जगात? रत्नगुप्तने हा विवाह सोहळा मोठ्या थाटामाटात साजरा केला.

ही गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, मला तर वाटतं की हा सुदर्शन पक्का स्वार्थी माणूस आहे. तो रत्नगुप्तकडे नोकर असताना जेव्हा इतर व्यापाऱ्यांनी 'थोडा थांब, वस्तूंच्या किमती आणखी वाढतील' असं सांगितलं, तेव्हा मात्र त्या-वेळी असलेल्या भावातच माल विकून टाकून तो परत आला. पण नंतर रत्न-गुप्तबरोबर तो भागीदार झाल्यावर मात्र मालाची किमत वाढेल अशी शक्यता पाहून तो कितीतरी दिवस तिथेच थांबला. इतकेच नव्हे तर त्या देशात स्वस्त मिळ-णाऱ्या हस्तिदन्ती-वस्तु खरीदून त्याने त्या स्वदेशात जास्त किमतीला विकून खूपच फायदा कमावला. आपण आपल्या बुद्धीचा उपयोग केल्यास फक्त मालकाचाच त्यात लाभ आहे—असा विचार त्याने पहिल्या खेपेला केला. पण दुसऱ्या खेपेला जेव्हा त्याला कळले की, मिळणाऱ्या लाभात आपलाही वाटा आहे, तेव्हा मात्र त्याने आपल्या प्रतिभेचा उपयोग करून व्यापा-राची खूपच उन्नति केली! आश्चर्य म्हणजे असल्या माणसाचा स्वार्थीपणा इतक्या अनुभवी रत्नगुप्तनेही ओळखला नाहीच, उलट त्याच्या व्यापारदक्षतेची स्तुति त्याने केली—हे कसं काय? रत्नगुप्त काय इतका भोळा होता, कि सुदर्शनचा धूर्तपणा त्याच्या लक्षातच नाही आला!—या शंकेचं उत्तर माहीत असूनही तू दिलं नाहीस तर परि-णाम तुला माहीतच आहे—तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे होतील."

विक्रमादित्य यावर म्हणाला—"या गोष्टीला काय आधार कि सुदर्शन स्वार्थीच आहे? पहिल्या वेळी तो जेव्हा पूर्वे-कडील बेटांवर व्यापारासाठी गेला, तेव्हा तो केवळ एक नोकर होता, मालकाची आज्ञा तंतोतंत पाळणे हेच त्याचे कर्तव्य होते, स्वतः काही निर्णय घेण्याचा त्याला अधिकारच नव्हता! पण दुसऱ्या वेळी तो अर्ध्याचा मालक होता, नफा-नुकसान दोन्ही-लाही तो तयार होता, दुसऱ्या कोणालाही तो जबाबदार नव्हता! परतीच्या प्रवासात त्याने आणखी एका व्यापाराचा विचार अशा करता केला कि अशा प्रकारे आपल्याला आपल्या प्रतिभेची चमकही दाखवता येईल. तेव्हा अशा प्रकारे सुदर्शनने नोकर म्हणून आपली जबाबदारी आणि कर्तव्यबुद्धी उत्तम प्रकारे दाखवली; आणि मालक म्हणूनही आपल्या व्यापारदक्षतेची चुणूक दाखवली. दोन्ही वेळी त्याने आपल्या अनुपम बुद्धीचा योग्यच उपयोग केला. स्वार्थीपणाचा यात प्रश्नच कुठे आला?"

असे उत्तर देऊन गप्प होताच वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्या झाडावर जाऊन लटकू लागला. (कल्पित)



# थाटमाट

एका शेतकऱ्याला एक तरुण मुलगा होता. त्याला थाटामाटात रहायची भारी आवड! उंची वस्त्र नेसून समाजात आपल्याला मोठे प्रतिष्ठित म्हणून मान्यता मिळावी अशी त्याची तीव्र इच्छा होती! परंतु त्याचं हे वागणं शेतकऱ्याला मात्र मुळीच आवडत नसे. आपल्या मुलाला चांगला धडा शिकवावा म्हणून तो योग्य संधी शोधत होता.

एके दिवशी शेतकऱ्याने आपल्या वांझ गायीला खूप सजवलं अन् तिला बाजारात नेऊन विकून टाकायला आपल्या मुलाला सांगितले.

बाजारात प्रत्येकजण एकच प्रश्न विचारी–"ही गाय रोज किती दूध देते?"

शेवटी बाजारची वेळ संपून गेली. मुलाने गायीची किंमत कितीही कमी करुन सांगितली तरी, ती दूध न देणारी, वांझ गाय विकली गेली नाही. शेवटी नाइलाजाने तो गायीला घेऊनच परत घरी आला.

"जी गाय दूध देत नाही. तिच्या गळ्यात किती घंटा घातल्या अन् सजवलं तरी ती कोणी विकत नाही घेत. थाटामाटाला काही महत्त्व नाही, कळलं?" शेतकरी आपल्या मुलाला म्हणाला.

हे सत्य एकदा नीट कळल्यावर त्या शेतकऱ्याच्या मुलाच्या वागणुकीत खूप बदल झाला आणि त्या दिवसापासून तो साधेपणाने राहू लागला.





# ज्ञानाचा खजिना

## या महिन्याचे इतिहासप्रसिद्ध व्यक्तित्व



### तेग बहादुर

शिखांचा नंववा गुरु तेग बहादुर याचा जन्म १ एप्रिल १६२१ रोजी झाला. तो सहावा गुरु हर-गोविन्द याचा मुलगा. लहानपणापासूनच तेग बहादुरला अनेक विषयात रुचि होती. संगीत आणि काव्याचाही तो चांगला जाणकार होता. त्याच काळात त्याने शस्त्रविद्या आणि घोडेस्वारी करणे याही कला आत्मसात केल्या. १६६४ मधे गुरु हरिकिशनचा मृत्यु झाल्यानंतर तेग बहादुर गुरु बनला. त्याने अनेक ठिकाणी प्रवास केला आणि अनेक प्रार्थनासभाही चालवल्या. त्याने आनन्दपुर नावाच्या नव्या शहराची स्थापना केली.

त्याच सुमारास मुगल सम्राट औरंगजेब याची भयानक कारकीर्द सुरू झाली. तो ब्राह्मणांना इस्लाम धर्म स्वीकारण्याबद्दल सक्ती करी. काही जणांनी आपले रक्षण करण्याबद्दल तेगबहादुरला विनवले. गुरुच्या उपदेशावरुन त्यांनी औरंगजेबला कळवले की–"तेग बहादुरला तू बाटवू शकलास तरच आपणही इस्लाम धर्म स्वीकारु."

औरंगजेबने गुरुला कैद केले आणि सांगितले की–"तू काहीतरी चमत्कार तरी करुन दाखव किंवा इस्लाम धर्म तरी स्वीकार." त्याने यापैकी काहीच मान्य केले नाही. तेव्हा ११ नोव्हेंबर १६७५ रोजी त्याला ठार मारण्यात आले.

## तो कोण?

सार्वजनिक रस्ता सोडून एक तरुण एका ओस पडलेल्या शेतातून चालत निघाला होता. राजाचे शिपाई त्याच्या शोधात होते, कारण त्याने आपल्यावर राजाचा कोप ओढवून घेतलेला होता.

एका ठिकाणी, एका विशिष्ट प्रकारच्या गवताच्या मुळांवर काही विशेष असे पाणी शिपत असलेला एक लुकडा, बारीक शरीर-यष्टीचा, उघड्या अंगाचा असा एक ब्राह्मण त्याने पाहिला. त्या गवताची पाती तीक्ष्ण होती.

"हे काय करत आहात आपण?" या तरुणाने जिज्ञासेने विचारले.

"मी या गवताच्या मुळांना गोड पाणी देत आहे. म्हणजे मुंग्या आकर्षित होऊन ही मुळं खाऊन टाकतील." ब्राह्मण उत्तरला.

"पण का?" त्या तरुणाने विचारले.

"कारण यापैकी एका पात्याने माझ्या पायाला कापलं अन् त्यातून रक्त निघालं." ब्राह्मण म्हणाला–"मला हे सर्वच गवत नष्ट करून टाकायचंय्." त्याने उत्तरात भर घातली.

त्या तरुणाने ओळखले, की हा ब्राह्मण चांगलाच दृढनिश्चयी आहे. या ब्राह्मणाचा ही राजाने अपमान केला होता. त्यामुळे दोघेही मित्र बनले.

ही जरी केवळ एक दन्तकथा असली तरीही हा ब्राह्मण एक प्रसिद्ध माणूस होऊन गेला. कोण बरं हा? पृष्ठ ८ पहा.....

EMBRYO

# बीजाच्या आत

**सूचना :**

थोडेसे पावटे किंवा डबल-बी प्रकारचे मोठे दाणे रात्रभर (किंवा थोडे जास्त वेळ) पाण्यात भिजत घाला. नंतर वरचे सुरकुतलेले, मऊ असे साल काळजीपूर्वक अलगदपणे काढा; आणि आतील दोन दळे हळूच निराळी करा. त्या दोन दळांच्या मधोमध एक छोटासा भाग दिसतो ना ? त्या छोट्या वस्तूचे निरनिराळे भाग तुम्हाला नीट दिसतात का ? दिसत नसतील तर जास्त बारकाईने पहाण्यासाठी भिंगाचा (मॅग्निफाईंग ग्लास) उपयोग करा.

## काय होते आणि का ?

त्या दाण्याच्या आत अपरिणत अवस्थेतील अगदी लहानसे रोपच तुम्हाला दिसेल. त्याला अंकुर असे म्हणतात. बारकाईने पाहिलेत तर दोन पाने आणि मधला दांड्यासारखा भाग दिसेल, आणि कदाचित पानांच्या शिराही दिसतील. तुम्ही कदाचित भुईमुगाचे दाणे खाताना हा भाग पाहिला असाल आणि हे काय असावे याबद्दल तुम्हाला कुतुहलही वाटले असेल.

त्या अंकुराच्या दांड्याकडे बारकाईने पाहिलेत तर तो दोन दळांमधे नेमका कुठे चिकटलेला आहे ते तुम्हाला दिसेल. अंकुर वाढीस लागेल तेव्हा या दांड्यासारख्या भागाचा तळ हाच त्याचा दांडा आणि मुख्य मूळ बनेल. आणि बीजाची दोन दळे जमिनीवर येऊन विचित्र आकाराची दोन जाडशी पाने झालेली दिसतील. खरे पाहता ही दोन बीज-पाने होत. परंतु त्यांचे कार्य अंकुर स्वतःचे अन्न बनवू लागेपर्यंत त्याला अन्न-पुरवठा करणे हे होय.

पावटे म्हणजे बीजे, आणि अंड्याप्रमाणे त्यांच्यातही गर्भ असतो. परंतु बऱ्याच प्रकारच्या बीजांमध्ये हे अंकुर इतके लहान असतात की ते (पावट्यातल्याप्रमाणे) दिसतच नाहीत. थोडेसे भिजलेले पावटे जमिनीत पुरून त्यांची वाढ कशी होते ते पहा ना !

पावट्याप्रमाणे काही बीजांना दोन दळे नसतात. पण काहींना असतात ही. भुईमूग किंवा पावटा यांच्या प्रमाणे अशा किती द्विदल बीजांची नावे तुम्हाला माहीत आहेत ?





# हॅलिकार्नेससमधील कबर

दोन हजार पाचशे वर्षांपूर्वी–आणि त्याही पूर्वी, एजियन समुद्र किनाऱ्यावर एक सुन्दर शहर वसलेले होते. त्याचे नाव होते हॅलिकार्नेसस. ती ग्रीक लोकांची वसाहत होती. कॅरिकचा राजा मौसोलस याच्या थडग्यावर, त्याची विधवा राणी आर्टेमिसिया हिने एक भव्य असे स्मारक या शहरात उभे केले होते. या स्मारकाच्या भोवती असणाऱ्या सपाट भागाच्या प्रत्येक बाजूची लांबी तीनशे फुटांहूनही काहीशी अधिक होती. हे स्मारक अप्रतिम सुन्दर असे होते व त्या वेळच्या जगातील सात आश्चर्यांपैकी एक गणले जाई. खिस्तपूर्व चौथ्या शतकात हे स्मारक बांधले गेले होते आणि इसवी सनाच्या चौथ्या शतकात तुर्क लोकांनी ते नष्ट करून टाकले.



*जगातील महान् घटना*




# अत्यंत वैभवशाली राजा नमला

सहाव्या शतकात लिडिया राज्यावर (एशिया मायनर मधे) क्रोससचे राज्य होते. तो जगातील सर्वात धनवान माणूस मानला जाई. आजही क्रोसेस हा शब्द श्रीमंत या अर्थाने वापरला जातो. 'क्रोसस सारखा श्रीमंत' हा वाक्प्रचार 'अत्यन्त श्रीमन्त व्यक्ति' अशा अर्थाचा आहे. त्यावेळी सोलोन नावाचा एक तत्त्ववेत्ता होता. पैसा व सत्ता यांच्या जोरावर हवी ती इच्छा पुरवून घेऊ शकत असे म्हणून एकदा क्रोससने 'आपण सर्वात सुखी माणूस आहोत' असे म्हटले. पण सोलोन अत्यंत गंभीरपणे त्याला म्हणाला–"जोपर्यंत माणूस मरत नाही तोपर्यंत त्याला कधीही सुखी म्हणू नये." परन्तु तत्त्वज्ञाचे हे म्हणणे क्रोससला आवडले नाही.

डेल्फीच्या धर्मोपदेकाने वर्तवलेली भविष्यवाणी किंवा देवाचा कौल या विषयावर क्रोससचा विश्वास होता. त्याने पर्शिया जिंकायचा विचार केला. आपल्या या मोहिमेच्या परिणामाबाबत डेल्फीहून काय संदेश येतो हे जाणायची त्याची इच्छा होती. त्याला असा कौल मिळाला की–त्याने पर्शियावर हल्ला केल्यास एका वैभव-संपन्न राज्याचा विनाश होईल. क्रोससने गृहीत धरले की पर्शियाचाच नाश होणार आहे; आणि आपल्या ४,२०,००० पायदळ आणि ६०,००० घोडदळासकट तो पर्शियावर चालून गेला. परंतु त्याचा दारूण पराजय झाला आणि लिडियाचा विनाश झाला! राजा पकडला गेला. पर्शियाचा राजा सिरास याने त्याला जिवन्त जाळण्याचा हुकूम फर्माविला. त्याला जेव्हा चितेकडे नेले गेले, तेव्हा दु:खाने तो ओरडला–"हे सोलोन!" ते ऐकून सिरासने त्याला सोलोनचे नाव घेण्याचे कारण विचारले. एकदा सोलोन त्याला काय बोलला होता व ते किती खरे होते, हे क्रोससने सिरासला सांगितले.

सिरासला एकदम क्रोससची दया आली आणि त्याला ठार मारण्याएवेजी त्याने क्रोससशी मैत्री जोडली.



## प्राचीन भारतात भटकन्ती

१. ज्या तीन खेड्यांनी मिळून कलकत्ता बनले आहे, ती खेडी विकत घेण्यासाठी ईस्ट इंडिया कंपनीने किती रक्कम दिली ?
२. विकणारे कोण होते ?
३. कंपनीच्या वतीने ही खरेदी करणारा कोण ?
४. त्या खेड्यांची नावे काय ?
५. ग्रीक इतिहासकार टॉलेमी याच्याकडून सात बेटांचा समूह या अर्थाने हेप्टेनेशिया नाव मिळालेल्या शहराचे आजचे नाव काय ?
६. मुंबई शहराचे मालक बनणारे पहिले परदेशी लोक कोण ?
७. मुंबईचा ताबा घेणारा पहिला जनरल कोण ? ताबा केव्हा घेतला ?
८. त्याने ताबा कसा मिळवला ?
९. मद्रास शहराच्या रूपात विकास पावलेल्या खेड्याचे नाव काय ?
१०. दिल्ली शहर वसलेल्या स्थानाचे सर्वात जुने नाव काय ?

## घटना, विज्ञान, आविष्कार आणि शोधांची दुनिया

१. आपल्या सूर्यमालेत किती ग्रह आहेत ?
२. सर्वात मोठा ग्रह कोणता ?
३. सर्वात लहान ग्रह कोणता ?
४. सूर्यापासून सर्वात जवळचा ग्रह कोणता ?
५. अंतराच्या दृष्टीने सूर्यापासून पृथ्वीचे स्थान कोणत्या क्रमांकाचे ?
६. सूर्यमालेत ग्रह सोडून आणखी काही आहे का ?
७. आपल्याला दिसणाऱ्या नक्षत्रात सर्वात तेजस्वी नक्षत्र कोणते ?
८. गणिताच्या मदतीने कोणता ग्रह शोधून काढला गेला ?

......पान आठवर पहा






१. अनेक जन्म घेण्यामुळे कोणत्या व्यक्तीचा शेकडो गोष्टींमधून अनेकदा उल्लेख केला गेला आहे ?
२. अशा गोष्टींच्या संग्रहाचे नाव काय ?
३. भारतातले कोणते राज्य परशुरामाच्या आज्ञेने समुद्रातून वर आले आहे असे मानले जाते ?
४. अर्जुनाच्या शंखाचे नाव काय ?
५. गायींची माता कोण ?
६. भारतातल्या कोणत्या देवळातील देवी अजून विवाह न झालेल्या स्थितीत वधू-वेषात उभी असलेली दिसते ?
७. या देवीनें संहार केलेल्या राक्षसाचे नाव काय ?
८. रावणाला मारताना रामाने वापरलेल्या धनुष्याचे नाव काय ?
९. हे धनुष्य त्याला कोणी दिले होते ?
१०. रावणाने वापरलेल्या खड्गाचे नाव काय ?
११. त्याला ते कोणी दिले होते ?

......पान आठवर पहा

## सर्व भारतीय भाषांचा एक शब्द शिकू या!

**मराठी** : पर्वत

| | | |
|---|---|---|
| **आसामी** : पर्वत | **कानडी** : पर्वत | **संस्कृत** : पर्वत |
| **बंगाली** : पर्बत | **काश्मिरी** : कोह, पहाड़ | **सिन्धी** : जबल् |
| **इंग्रजी** : माउंटन | **मल्याळी** : पर्वतम् | **तमिळ** : मलै |
| **गुजराथी** : पर्वत | **उडिया** : पर्बत | **तेलुगु** : पर्वतमु |
| **हिन्दी** : पहाड़ | **पंजाबी** : पहाड | **उर्दू** : पहाड, कोह |

## तुम्ही विश्वास ठेवाल ?

* प्लॅस्टिक शस्त्रक्रिया हे आधुनिक तन्त्र आहे ?
* पक्षी पंख फडफडावून आकाशांत उडत रहातात ?
* एकाच जागी वीज पुन:पुन्हा पडत नाही ?

**अंहं, मुळीच नाही !**

* इ.स.पू. ८ ते ७ या शतकात होऊन गेलेल्या सुश्रुत या शल्य चिकित्सकाने हे तन्त्र वापरले होते-
* पंख न फडफडवता पक्षी तासन्तास हवेत तरंगू शकतात.
* एकाच स्थळी किंवा इमारतीवर वीज कितीही वेळा पडू शकते.

# उत्तरावली

### तो कोण ?

चाणक्य किंवा कौटिल्य, आणि तरुण व्यक्ति म्हणजे चन्द्रगुप्त मौर्य.

### इतिहास

१. बाराशे रुपये.
२. सुवर्ण राय चौधरी.
३. जाब चारनॉक.
४. कालीघाट, गोविन्दपुर आणि सुतनिति.
५. मुंबई.
६. पोर्तुगीज.
७. जनरल अल्बुकर्क, १५३४ मधे.
८. गुजराथचा सुल्तान बहादुर शहा याच्याशी तह करून.
९. मद्रासपट्टम्
१०. इन्द्रप्रस्थ.

### विज्ञान

१. पृथ्वी धरून नऊ.
२. विषुववृत्ताचा व्यास ८८,८४६ मैल इतका असणारा गुरु.
३. व्यास १,८६० मैल असणारा प्लुटो.
४. बुध.
५. तिसर.
६. सूर्यमालेत, विशेषतः मंगळ व गुरु यांच्या कक्षांमधील जागेत असंख्य वस्तु किंवा छोटे छोटे तारे तरंगत असतात.
७. व्याध.
८. नेपच्युन.

### साहित्य

१. बुद्ध.
२. जातककथा.
३. केरळ.
४. देवदत्त.
५. कामधेनु. हिलाच नन्दिनी किंवा सुरभि असेही म्हणतात.
६. कन्याकुमारी.
७. बाणासुर.
८. इन्द्रधनु.
९. ऋषि अगस्त्य.
१०. चन्द्रहास.
११. भगवान शिव.



# नेहरूंची गोष्ट-२

जवाहर दहा वर्षांचा असताना त्याच्या आई-वडिलांनी आपले घर बदलले आणि ते नव्या 'आनन्दभवन' नावाच्या विशाल भवनात रहायला गेले. या मोठ्या महालासारख्या घराच्या चारी बाजूंचे वातावरण पाहून जवाहरला खूपच उत्साह आणि आनन्द वाटला.

परंतु आपल्याशी खेळायला कोणी बहीण वा भाऊ नाही ही गोष्ट त्याला नेहमी खटकत असे. काही दिवसांनी त्याला एक बहीण झाली. ती वार्ता देताना डॉक्टर जवाहरला म्हणाले होते–"अरे, बरं झालं तुला बहीणच झाली ! इस्टेटीत वाटा मागायला छोटा भाऊ नाही झाला !" डॉक्टरांनी आपल्याला असे स्वार्थी समजावे याबद्दल जवाहरला त्यांचा फार राग आला !





याच अवधीत मोतीलालजी एकदा इंग्लंडला जाऊन आले. समुद्र पार करून आल्याच्या पापाचे प्रायश्चित्त करावे म्हणून कट्टर धार्मिक अशा काश्मिरी ब्राह्मणांनी त्यांच्यावर दबाव आणायचा प्रयत्न केला. परंतु मोतीलालजींनी या गोष्टीला साफ नकार दिला. त्यावेळी समाजांत असणारे अन्धविश्वास आणि हेतुवाद यांच्यातला संघर्ष जवाहरला छान समजून आला.



एफ्. टी. ब्रुक्स नावाचा एक इंग्रज शिक्षक जवाहरला शिकवायला येत असे. 'ॲलिसेस ॲडव्हेंचर्स,' 'द जंगल बुक', 'डॉन क्विक्झोट' इत्यादि पुस्तकांनी त्याला त्या काळात चांगलेच रमवले. काल्पनिक जगाची कल्पना त्याला नीट समजली.

ब्रुक्स स्वत: 'दिव्य ज्ञाना'चा मतावलंबी होता. त्याला असा विश्वास वाटे की आपले भौतिक शरीर सोडून मानव आपल्या अदृश्य आत्म्याच्या द्वारे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाऊ शकतो. आपल्या या शिक्षकाकडून जवाहरच्या कानावर असल्या गोष्टी खूपच येत. त्यामुळे रात्री त्याला 'आपण ढगात उडत आहोत' वगैरे प्रकारची स्वप्ने दिसत.





रशिया व जपान यांच्यातल्या युद्धाच्या वार्ता जवाहर वर्तमानपत्रातून वाचत असे. त्यामुळे त्याच्या मनात राष्ट्रीय भावना जागृत झाली. एकाद्या प्राचीन सैनिकाप्रमाणे आपण ही हातात तलवार घेऊन भारताच्या स्वातन्त्र्यासाठी लढत आहोत असे चित्र त्याला वारंवार दिसे!

पंधरा वर्षांचा असताना आपल्या आईवडिलांबरोबर जवाहर इंग्लंडला गेला. लंडनला पोचल्यावर दुसऱ्याच दिवशी तो तेथील अत्यंत प्रसिद्ध अशी 'डर्बी रेस' (घोड्यांची शर्यत) पहायला गेला होता. त्या दिवशी त्याला इंग्लंडला रहाणाऱ्या अनेक प्रमुख भारतीय लोकांचे दर्शन झाले.





यानंतर शिक्षणासाठी जवाहर हॅरो येथे गेला. आईवडिलांनी त्याला प्रथमच सर्वस्वी अनोळखी अशा लोकांत, वातावरणात सोडून दिले. सुरवातीला आपले एकटेपण त्याला फार खटके. परंतु हळूहळू जवाहरलालजी तेथील वातावरणाशी एकरूप झाले आणि तिरनिराळे खेळ, व्यायाम वगैरेत रस घेऊ लागले.

इसवी सन १९०५ मध्ये ज्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या, त्यासंबंधीच्या वार्ता जवाहरलाल अत्यंत आवडीने वर्तमानपत्रातून वाचत असत. एके दिवशी वर्गात त्यांच्या शिक्षकांनी जेव्हा या निवडणूक-निकालासंबंधी प्रश्न विचारला तेव्हा एकटे जवाहरलालजीच त्याचे बरोबर उत्तर देऊ शकले.





यावरोबरच इकडे आपल्या मातृभूमीत होणाऱ्या घडामोडींबद्दलही त्यांना खूप रुचि असे. त्या काळात बंगाल, पंजाब व महाराष्ट्र या प्रान्तातल्या देशभक्तांनी ब्रिटिश शासनाविरुद्ध चळवळ चालू केली होती. परंतु त्यासंबंधी कोणाशी बोलावे, चर्चा करावी अशी कोणीही व्यक्ति त्यांना हॅरोमधे आढळली नाही.

जवाहरलालजींना बक्षिस म्हणून शाळेकडून एक पुस्तक मिळाले होते. ते पुस्तक म्हणजे इटलीचे देशभक्त गॅरिबॉल्डी यांचे आत्मचरित्र ! त्या महान् वीराची कहाणी वाचून ते अत्यंत उत्तेजित झाले आणि त्यांच्या मनात भारत व इटली दोन्ही पक्के ठसले.





मानसिक दृष्ट्या विकसित होत असलेल्या जवाहरलालजींना हॅरो हा प्रान्त आता फार संकुचित वाटू लागला. केम्ब्रिज युनिव्हर्सिटीत दाखल झालो तर मला खूप लाभ होईल—अशा अर्थाचे एक पत्र त्यांनी आपल्या वडिलांना लिहिले आणि मोतीलालजींनीही त्याला तावडतोब संमति दिली. हॅरोत दोन वर्षांचा काळ घालवल्यानंतर जवाहरलाल केम्ब्रिजला गेले. (क्रमशः)



# भोलारामचा विवाह

सीतापुरमधे भोलाराम नावाचा एक भोळाभावडा माणूस रहात असे. वारसा हक्काने त्याला काही संपत्ति मिळाली होती; परन्तु तो स्वत: मेहनत करून आपला चरितार्थ चालवत असे. आपल्या मुलीचा त्याच्याशी विवाह करून द्यावा असे गावातील अनेकांना वाटत असे. अशातच एके दिवशी शेजारच्या गावचा रुद्रप्रसाद नावाचा एक लबाड माणूस सीतापुरला आला. त्याच्याबरोबर एक अगदी कुरूप अशी मुलगी होती. तो दुष्ट गावातल्या लोकांना म्हणू लागला—"ही माझी मुलगी. भोलाराम दोन महिन्यांपूर्वी आमच्या गावी आला असताना त्याने हिच्याशी विवाह केला आहे. माझ्या मुलीवर तो काही अन्याय करील अशी मला भीती वाटतेय. तुम्ही सर्वजण मला मदत करा ना !"

रुद्रप्रसादचे बोलणे गाववाल्यांना जरा विचित्रच वाटले; पण तरीही काहीतरी छान तमाशा पहायला मिळेल म्हणून कित्येक लोक रुद्रप्रसादबरोबर भोलारामच्या घरी गेले.

भोलारामने साफ सांगितले—"मी या मुलीचा चेहरा कधी जन्मातही पाहिला नाही."

"एऽ! तू असं वेड पांघरलंस तर चालणार नाही हं! मी आपल्या गावाहून यासाठी साक्षीदार आणू शकतो, समजलं?" रुद्रप्रसादने त्याला धमकी दिली.

भोलारामने यावर गावच्या प्रमुखाला भेटून या संकटातून आपल्याला वाचवायची विनन्ती केली. दुसऱ्या दिवशी त्या गावात आणखी एक पाहुणा आला. त्याचं नाव होतं लक्ष्मीप्रसाद. त्याच्याबरोबर एक सुंदरशी मुलगीही होती. त्याने गाववाल्यांना

शांता गायकवाड



सांगितले की–चार महिन्यांपूर्वी भोलाराम जेव्हा आपल्या गावी आला होता, तेव्हा त्याने या तरुणीशी विवाह केला आहे.

आपल्या डोक्यावर मारून घेत भोलारामने आरडाओरडा करायला सुरुवात केली–"देवाशप्पथ, मी या मुलीशी मुळीच लग्न-बिग्न केलेलं नाहीय."

यावर लक्ष्मीप्रसादने गावच्या प्रमुखाकडे तक्रार केली. त्यावेळी रुद्रप्रसादही तिथे उभा होता.

त्या दोघांचेही बोलणे ऐकून प्रमुख म्हणाला–"तुमच्या बोलण्यावरून तरी असं वाटतं की तुम्हा दोघांपैकी कोणीतरी एक खोटं बोलत आहे."

यावर पुन्हा रुद्रप्रसादने आपल्या मुलीच्या लग्नासाठी साक्षीदार हजर करायचं आश्वासन दिलं. लक्ष्मीप्रसादनेही आपले साक्षीदार आणायचा मुद्दा काढला. आता त्या दोघांच्यातच वाद सुरू झाला.

त्याच वेळी एक कसाई तिथे आला. रुद्रप्रसादच्या मुलीकडे तीक्ष्ण दृष्टीने पहात तो म्हणाला–"अरे, तू इथे आलीस होय? तुला काय आधीच हे माहीत नव्हतं का, की कसायाशी लग्न केल्यावर मेलेल्या जनावरांचं कातडं सोलून काढावं लागेल म्हणून? लग्नाअगोदरच तू याचा नीट विचार करायला हवा होतास. लग्नानंतर तू घरातून पळून आलीस तर मी काय गप्प बसू होय? चल मुकाट्याने माझ्याबरोबर."

प्रमुखाने साक्षीदारांना बोलावून घेतले. त्या सर्वांनी रुद्रप्रसादच्या मुलीशी कसायाचे लग्न झाल्याबद्दल एकमुखाने साक्ष दिली.

"आता आणखी कुणा साक्षीदारांची गरजच नाही. रुद्रप्रसादची मुलगी भोलारामची बायको नक्कीच नव्हे." गावप्रमुखाने आपला निर्णय जाहीर केला.

"हे सगळे खोटे साक्षीदार आहेत. मी कसायाबरोबर मुळीच जाणार नाही!" त्या कुरूप मुलीने कसाया बरोबर जायला साफ नकार देत म्हटले.

गावप्रमुखाने निर्णायक आवाजात सांगितले–"तुझ्या बापाने, या रुद्रप्रसादने या कसायाशी तुझं लग्न लावून दिलं आहे हे सिद्ध करणारे अनेक साक्षीदार आहेत. तेव्हा तुला आता आपल्या नवऱ्याकडे गेलेच पाहिजे."

प्रमुखाचा तो निर्णय ऐकून डोळ्यात पाणी आणून ती मुलगी म्हणाली–"महाराज, हा रुद्रप्रसाद माझा बाप नव्हे, माझा मामा आहे तो. भोलाराम बिचारा गरीब, भोळा आहे हे ओळखून त्याच्यावर आपला अधिकार चालवावा म्हणून हे सगळं ढोंग चाललंय त्याचं, खरं म्हणजे भोलारामशीही माझं लग्न झालेलं नाही. अगदी खरं बोलतेय मी! पण मेहेरबानी करून मला या कसायाच्या हाती सोपवू नका."

"हूं! आता खरी ही समस्या सुटली म्हणायची. आता भोलाराम या लक्ष्मीप्रसादच्या मुलीशी संसार करू शकतो." गावप्रमुख म्हणाला.

"हुजूर, मी खरंच सांगतोय. माझं या तरुणीशी लग्न झालेलं नाहीय." भोलारामने दीनतेने निवेदन केलं.

"ठीक आहे. कबूल, तुझं म्हणणं खरं आहे. पण आता सांग, तू माझ्या मुलीशी लग्न करायला तयार आहेस? तुझी काही हरकत नाही नं?" लक्ष्मीप्रसादने विचारले.

चकित होऊन भोलाराम म्हणाला–"हे सगळं चाललंय तरी काय? मला तर काहीच समजत नाहीय. सगळंच आश्चर्यजनक वाटतंय मला!"



यावर सर्वांना खरी गोष्ट सांगत लक्ष्मीप्रसाद म्हणाला–"मी आपल्या मुलीसाठी योग्य वराच्या शोधात होतो. मला चिन्ता वाटते की, माझी मुलगी अगदीच भोळीभाबडी आहे, त्यामुळे लग्नानंतर तिचा नवरा तिला फसवेल. अशातच मला भोलारामच्या स्वभावसंबंधी माहिती मिळाली. त्याची नीट पारख करावी असे माझ्या मनात आले. याच संदर्भात या रुद्रप्रसादच्या योजनेबद्दल त्याच्याच गावच्या एका माणसाकडून सर्व काही समजले. रुद्रप्रसादचे करस्थान मोडून काढण्यासाठीच या कसायाचीही मदत मी घेतली."

"हा कसाई असल्याचा परिणाम चांगलाच झाला. पण आता सांग, भोलारामबद्दल तुझं मत काय?" प्रमुखाने विचारले.

"भोलाराम, भोळा असेलही; पण हेही चांगलं शाबित झालंय की कुणाला भिऊन तो आत्मसमर्पण नक्कीच करणार नाही. भोलारामच्या जागी दुसरा कोणी असता, तर माझ्या एक लाख रुपयांच्या मोहात पडून माझ्या सुंदर कन्येशी विवाह केल्याचं त्याने कबूल करून टाकलं असतं! आता हे सिद्ध झालंय की भोलाराम अगदी प्रामाणिक माणूस आहे." लक्ष्मीप्रसाद म्हणाला.

"पण यामुळे तुझा काय फायदा?" प्रमुखाने विचारले.

"महाराज, आपल्या समाजातील लबाड लोकांपासून वाचण्यासाठी भोलारामला माझ्यासारख्याची आवश्यकता आहे. हा जर माझ्या मुलीशी लग्न करायला तयार होईल, तर मी त्याचा आधार बनून राहीन. मी आपलं याबाबतीतलं सामर्थ्य सर्वांसमोर दाखवलं आहे ना? आता मला भोलारामचा निर्णय हवा आहे." लक्ष्मीप्रसाद म्हणाला.

मोठ्या प्रसन्नतेने भोलारामने लक्ष्मीप्रसादच्या मुलीशी विवाह करायचे मान्य केले. आणि नंतर थोड्याच दिवसात दोघांचा विवाह थाटात साजरा झाला.






यादवांनी जरासंध इत्यादि राजांच्या सैन्याला पराभूत केले आणि विजयाच्या उत्साहात सिंहनाद केला, विजय-दुंदुभि वाजवली. बलराम व सात्यकी यांच्या सह सर्वजण द्वारकेस परत आले.

श्रीकृष्ण जेव्हां रुक्मिणीला घेऊन गेला, तेव्हां श्रुतपर्वाने रुक्मिला आपल्या रथांत बसवले आणि तो निघाला. पण आपली बहीण रुक्मिणीला घेऊन आल्याशिवाय कुंडिनपुरात पाऊल ठेवणार नाही अशी रुक्मिने प्रतिज्ञा केली होती. तो आपली प्रतिज्ञा पूर्ण करू शकला नव्हता, म्हणून त्याने भोजकटक नावाची एक नगरी निर्माण केली आणि तेथे राहू लागला. जरासंधाने शुद्धीवर आल्या नंतर आपले अस्ताव्यस्त सैन्य पुन: संगठित केले आणि पूर्णत: अपमानित झालेल्या शिशुपालाला घेऊन तो आपल्या देशात परत आला. शिशुपालाची अवस्था फारच दयनीय झाली होती. कोणाला तोंड दाखवायची त्याला लाज वाटे. त्याला अन्न गोड लागेना, झोप येई ना, काही काम करण्याची इच्छा होईना! तो एकान्तात बसून पश्चात्ताप करीत राहिला.

वयोवृद्ध यादवांनी कृष्णाच्या विवाहाचा मुहूर्त निश्चित केला आणि सर्व नातेवाईक व राजे-मंडळींना निमंत्रण-पत्रिका पाठविल्या. राजधानीला खूप सुशोभित करण्यात आले. रत्ने जडविलेल्या वस्त्रांना कुंकुम पुष्पांनी स्वच्छ केले. सुवर्ण-स्तंभावर

१८. शंबरासुराचा वध



लपेटलेली वस्त्रें काढून टाकली, तेव्हां त्यांचेवरील कारागिरी उठून दिसू लागली. पक्क्या फर्शीवर कस्तुरी-मिश्रित पाण्याचा सडा घातला, तेव्हां सर्वत्र सुगंध दरवळू लागला. अनेक प्रकारच्या मोत्यांनी रांगोळ्या काढल्या. सर्वत्र सुपारीची झाडें आणि केळीचे वृक्ष यांची सजावट केली. पिंपळाच्या व आंब्याच्या कोमल पानांची तोरणें सर्वत्र लावण्यात आली. सर्वत्र रेशमी ध्वजा फडकू लागल्या. सर्व नागरिकांनी आपापली घरे स्वच्छ करून ती खूप सजवली. घराभोवतीच्या बागांची स्वच्छता करून सर्व कचरा जाळून टाकला. पुढच्या अंगणात सडा घालून रंगी-बेरंगी रांगोळ्या काढल्या. आपल्या जवळ असलेली उत्तमोत्तम वस्त्रे परिधान करून श्रीकृष्णाच्या विवाह-सोहळ्यात जाण्यास सर्व जण उत्साहाने सज्ज झाले.

श्रीकृष्णाच्या विवाह-सोहळ्यात भाग घेण्यासाठी अनेक नातेवाईक व राजे आपल्या लवाजम्यासह उपस्थित झाले. त्यांचे रथ, हत्ती व घोडे यांनी सर्व नगरी फुलून गेली. श्रीकृष्णाचे दर्शन करून आपली तपश्चर्या सफल करण्याच्या उद्देशाने अनेक मुनिजन विवाह-नगरीत दाखल झाले. यांशिवाय विवाह-समारंभात भाग घेण्यासाठी चारी वर्णांचे प्रमुख निरनिराळ्या देशांतून द्वारकेत उपस्थित झाले. येणाऱ्या लोकांचे उचित स्वागत करून त्यांच्या निवासाची व्यवस्था करण्याचे काम सात्यकी करीत होता.

विवाहाच्या दिवशी ब्राह्मणांचे वेद-पठण, स्तुति-पाठकांनी राजांचे केलेले यशोगान, स्त्रियांनी परिधान केलेल्या अलंकारांतून निघणारे मंजुळ ध्वनि, घोड्यांची खेंकाळणी, विवाह-समारंभातील मंगल वाद्यांचे सूर, आकाशांतून देवांच्या दुंदुभी या सर्वांच्या अभिनव मिश्रणाने वातावरण दुमदुमून गेले.

चार सुवर्ण-स्तंभांवर विवाह-मंडप तयार करून माणिक व निरनिराळ्या सुगंधित पुष्पांनी तो सुशोभित करण्यात आला. त्याच्या भोवती रंगी-बेरंगी रांगोळ्या काढण्यात आल्या. मध्यभागी मणि-जडित वेदी वर श्रीकृष्ण विराजमान झाले. त्यांच्या चारी बाजूंना उग्रसेन, वसुदेव, बलराम, वडीलधारे यादव व मुनि-वृन्द बसले. पुरोहितांनी अग्निकुंड प्रज्वलित केले.

मुहूर्ताची वेळ येऊन ठेपली. कोमलता, सुशीलता, सौंदर्य व सौभाग्य यांची जणु प्रतिमूर्ति दिसणाऱ्या रुक्मिणीचे श्रीकृष्णाने पाणिग्रहण केले. त्यावेळी श्रीकृष्णावर सुहासिनींनी अक्षदा व आकाशांतून देवतांनी एकसमयावच्छेदें करून पुष्प-वृष्टि केली. ब्राह्मणवरांनी आशीर्वाद दिले. श्रीकृष्णाने आपले माता-पिता तसेच सर्व वयोवृद्धांना नम्रतापूर्वक नमस्कार केला व त्यांचे आशीर्वाद मिळविले. यानंतर श्रीकृष्णाने आठ हजार रथ, अकरा हजार पाचशे हत्ती, असंख्य घोडे आणि गायी यांचे असंख्य ब्राह्मणांना दान दिले. तसेच आपल्या दास-दासींना विविध अलंकार, सोने व चांदी भेटीच्या स्वरूपात दिले. नंतर आपले सारथी, नर्तक, सेवक-वृन्द यांना विविध वस्तु भेट म्हणून दिल्या. शेवटी सर्वांना संतोष झाला. विवाहाचा दिवस अत्यन्त सुखा-समाधानात सर्वांनी एकत्र घालविला. लग्नासाठी आलेल्या सर्व पाहुण्यांना निरनिराळ्या भेटी दिल्या गेल्या आणि सर्वांनी आणलेले आहेर स्वीकारण्यात आले. सर्व अभ्यागत आपापल्या घरी रवाना झाले.





श्रीकृष्णाने रुक्मिणीसह वैवाहिक जीवनाचा अनुभव घेत घेत मित्रविंदा, जांबवती, सत्यभामा, कालिंदी, सुदंता यांच्याशी ही विवाह केले.

यानंतर थोड्याच दिवसात श्रीकृष्णाची ज्येष्ठ पत्नी रुक्मिणीला दिवस गेले. यावेळी श्रीकृष्णाने मोठ्या थाटात पुंसवन, सीमंत इत्यादि संस्कार साजरे केले. यथाकाल रुक्मिणीला एका पुत्र-रत्न प्राप्त झाले. प्राचीन काळी शिवाच्या तिसऱ्या डोळ्यातून निघालेल्या अग्नि-ज्वाळेत भस्म झालेल्या मन्मथानेच रुक्मिणीच्या पोटी जन्म घेतला. त्याचे नाव प्रद्युम्न ठेवण्यात आले.

शंबर नावाच्या एका राक्षसाला पहिल्या पासूनच कळून चुकले होते की रुक्मिणीच्या गर्भातून येणारा मुलगाच त्याचा सर्वनाश करणार आहे. म्हणून त्याने रुक्मिणीच्या कुशीत झोपलेल्या सात दिवसांच्या बालक प्रद्युम्नला अर्ध्या रात्रीत पळवून नेले व त्याला समुद्रात फेंकून दिले.

त्या बालकाला एका माशाने गिळले. त्या माशाला एका कोळ्याने आपल्या जाळ्यात पकडले. असा मोठ्ठा-थोरला मासा जाळ्यात आल्याने कोळ्याला खूप आनन्द झाला आणि त्याने हा मासा राणी मायावतीला भेट म्हणून दिला. तो कोळी इक्षुमतीपुरचा राहणारा होता. इक्षुमतीचा राजा होता शंबर आणि मायावती शंबराची पत्नी होती.

कोळ्याने दिलेला मासा मायावतीने स्वत: कापला. माशाच्या पोटांत तिला एक सुंदर शिशु सापडला. तिला ही खूप आनन्द झाला. तिने या मुलाचे पालन-पोषण करून त्याला लहानाचे मोठे केले. शंबराला स्वत:चे मूल-बाळ नसल्याने या मुलाला पाहून शंबराला ही संतोष वाटला.

मायावतीच्या देखरेखीखाली वाढणाऱ्या या प्रद्युम्नाने सर्व राक्षस-माया शिकून घेतल्या, तसेच अन्य सर्व प्रकारच्या विद्यांत ही तो प्रवीण झाला. तारुण्यात प्रवेश



करीत असताना तो खूपच सुंदर व आकर्षक दिसू लागला.

बालपणापासून ज्या मायावतीने प्रद्युम्नाचे पालन केले तिने एक दिवशी त्याला आपल्याशी लग्न करण्याची विनंती केली. प्रद्युम्न मायावतीला म्हणाला–"तू माझी आई आणि मी तुझा मुलगा आहे. तुझ्या मनात अशी अनुचित इच्छा उत्पन्न व्हावी याचे मला मोठे आश्चर्य वाटते. काही विशेष कारण असलं तर मला सांगशील?"

मायावतीने प्रद्युम्नाला समजाऊन सांगितले–" ऐक, यादव वंशाचे उद्धारक श्रीकृष्ण तुझे वडील आहेत, आणि तुझी आई आहे रुक्मिणी! प्रसूती नंतर थोड्याच दिवसात शंबराने तुला समुद्रात फेंकून दिले. केवळ दैवयोग म्हणून तू इथे पोचलास. मी आजपर्यंत तुझे रक्षण केले. तुझी आई तुझ्या वियोगामुळे अत्यन्त दुःखात दिवस काढीत आहे. तू शक्य तितक्या लवकर तिला भेट. माझी विनंती झिडकारू नकोस. शंबराला माया-मोहाच्या जाळ्यात टाकून मी आजपर्यंत त्याची पत्नी असल्याचे नाटक करीत आले. खरं म्हणजे तो आपला शत्रु आहे. त्याचा वध करण्याचे काम तुझे!"

मायावतीकडून सर्व वृत्तान्त समजल्यावर प्रद्युम्नाने शंबराला युद्धासाठी ललकारले. दोघांच्यात तुंबळ युद्ध झाले. या युद्धात प्रद्युम्नाने शंबरावर सात मायांचे प्रयोग केले, पण कशाचा ही काही उपयोग झाला नाही. शेवटी आठव्या मायेचा उपयोग करून प्रद्युम्नाने शंबरासुराचा संहार करण्यात यश मिळविले.

यानंतर मायावतीला बरोबर घेऊन प्रद्युम्न मायाविद्येच्या साह्याने आकाशमार्गे श्रीकृष्णाच्या अंतःपुरात उतरला. अशा रीतीने अकस्मात् उतरलेल्या प्रद्युम्नाला पाहून प्रथम श्रीकृष्णाच्या बायका चांगल्याच घाबरल्या. पण त्याचे रूप-सौंदर्य पाहून त्यांना अत्यन्त संतोष ही झाला. प्रद्युम्नाला पाहून रुक्मिणीच्या मनांत विचार आला की तिचा मुलगा जिवंत असता तर तो ही आज याच



वयाचा असता. श्रीकृष्णाने ही डोळे भरून या युवकाकडे पाहिले आणि तो प्रसन्न झाला.

एवढ्यांत नारद मुनींनी तेथे प्रवेश केला आणि प्रद्युम्नाची सारी कथा श्रीकृष्णाला सांगितली. आता स्पष्ट झाले की प्रद्युम्न हा रुक्मिणीचा मुलगा आहे. मायावती ही मागच्या जन्मातील मन्मथाची पत्नी रति आहे. या जन्मी ही ती त्याचीच पत्नी झालेली आहे. मन्मथ भस्मसात् झाल्यावर ती शंबराच्या तडाक्यात सापडली. मायारूप धारण करून तिने अनेक वेळी शंबराला चकविले आणि आपल्या पातिव्रत्याचे संरक्षण केले.

मुलगा परत आल्याने रुक्मिणीला अत्यंत आनंद झाला. अंतःपुरात अनेक मेजवान्या झाल्या. अनेक उत्सव साजरे केले गेले.

रुक्मिणीला प्रद्युम्नानंतर क्रमशः नऊ मुलगे झाले आणि शेवटी एक मुलगी झाली. प्रद्युम्नानंतर झालेल्या मुलांची नावे अशी. चारू, चेष्ण, सुचेष्ण, सुषेण, चारुवाहन, चारुविंद, चारुभद्र, चारुगर्भ आणि शेवटच्या मुलीचे नाव चारूमती. श्रीकृष्णाच्या अन्य बायकांना भामु, भानुविंद, संग्रामजित, दीप्तिमंत, वृक इत्यादि अनेक मुलगे व मित्रवती वगैरे अनेक मुली झाल्या.

प्रद्युम्नाच्या जन्मानंतर एक महिन्याने जांबवतीला सांब नावाचा एक मुलगा



झाला. तो मोठा प्रसिद्ध होता. बलरामाने सांबाला लहानपणापासूनच आपल्या आश्रयात घेतले आणि स्वतःच्या मुलाप्रमाणे त्याचे पालन-पोषण केले. त्याला सर्व युद्ध-विद्या व कला शिकविल्या. बलराम व रेवती यांना निशात आणि उल्मक नावाचे दोन मुलगे झाले. अशा रीतीने बलराम आणि श्रीकृष्ण आपल्या मुलांच्या सहवासात सुखाने जीवन जगू लागले.

विदर्भ देशात रुक्मिणीचा थोरला भाऊ रुक्मि याला शुभांगी नावाची एक मुलगी होती. ती उपवर झाली. रुक्मीने शुभांगीच्या स्वयंवराची तयारी केली. पृथ्वीवरील सर्व राजांना निमंत्रणे पाठविली. या स्वयंवरात

भाग घेण्यासाठी अनेक देशांचे राजे स्वयंवर-मंडपात आले. आपल्या आई–वडिलांची परवानगी घेऊन प्रद्युम्न ही थाटा-माटात स्वयंवराच्या स्थानी उपस्थित झाला. ठरल्याप्रमाणे स्वयंवराचा कार्यक्रम सुरू झाला. शुभांगीने अगोदरच प्रद्युम्नाच्या रूप-लावण्याची प्रशंसा ऐकलेली होती आणि तिने प्रद्युम्नालाच वरण्याचा निश्चय केला होता. म्हणून स्वयंवर-मंडपात तिने प्रद्युम्नाच्या गळ्यात वरमाला घातली. स्वयंवरात उप-स्थित असलेल्या अन्य राजांनी शुभांगीच्या या योग्य निर्णयाची प्रशंसा केली आणि या अत्यंत अनुरूप वर-वधूंना शुभाशीर्वाद दिले.

शुभांगी बरोबर विवाह करून प्रद्युम्न घरी परत आला. या जोडप्याला एक मुलगा झाला, त्याचे नाव अनिरुद्ध ठेवण्यात आले. अनिरुद्धाने हळूहळू सर्व शास्त्र व शस्त्र-अस्त्र संबंधी विद्यांचे अध्ययन केले. आता तो विवाह करण्याच्या वयाचा झाला.

रुक्मवती नावाची रुक्मिची एक नात होती. ती त्याच्या मुलाची मुलगी होती. अनिरुद्धाचा विवाह रुक्मवतीशी व्हावा असा विचार करून श्रीकृष्णाने प्रद्युम्नाला सूचना केली की या बाबतीत रुक्मीशी बोलणे करावे. प्रद्युम्नाने लगेच आपला दूत रुक्मिकडे पाठवून आपला मानस त्याला कळविला.

रुक्मि आपले जुने शत्रुत्व विसरला आणि त्याने या विवाहास आपली संमति दिली. मग अर्थातच विवाह निश्चित झाला. या विवाहाचे वेळी बलराम, कृष्ण, प्रद्युम्न व त्याचे सर्व भाऊ, रुक्मिणी व अनेक यादव प्रमुख उपस्थित होते. विवाह मोठ्या थाटात साजरा झाला.

सर्वत्र अपूर्व उत्साह भरलेला होता. अशा वेळी वेणुधारी, श्रुतपर्व, अंशुमंत, जयत्सेन इत्यादि दाक्षिणात्यांनी रुक्मिला उपदेश केला–"रुक्मि, तुझा तर जुगार खेळण्यात हातखंडा आहे. बलरामला जुगार खेळायला प्रवृत्त कर, त्याला जुगाराचे दांडगे व्यसन आहे. त्याला जुगा-रात हरविले तर आपल्याला यश मिळेल."





# शेतकरी व लांडगा

फ्रान्समधे एके ठिकाणी हल्ली जेथे एक विशाल मैदान आहे, तिथे एके काळी एक खूप मोठे जंगल होते. ते जंगल जळून भस्म होऊन जाण्याचे कारण असे सांगितले जाते :–

त्या जंगलाच्या एका टोकाला एक गरीब शेतकरी आपल्या बायकोसह रहात असे. एके दिवशी त्या शेतकऱ्याने दोन मोठे पाव खरीदले आणि जंगलातल्या रस्त्याने तो आपल्या घराकडे निघाला. वाटेत अचानक एका झुडुपाआडून एका लांडग्याने येऊन त्याची वाट अडवली. त्याचे सुळे लांब व भयानक दिसत होते!

त्या लांडग्याला पाहून शेतकरी तर भयाने जागीच खिळल्यासारखा झाला! आता तिथून पळून जाणे किंवा त्याच्याशी लढणेही अशक्य होते. इतक्यात विजेसारखी त्याच्या डोक्यात एक कल्पना चमकली. त्याने लांडग्याला विचारले–लांडगेभाऊ, तुला भूक लागली असेल ना? घे, हा थोडा सा पाव खा." असे म्हणून शेतकऱ्याने पावाचा एक मोठ्ठासा तुकडा तोडून लांडग्यापुढे टाकला. लांडगा तो तुकडा घेऊन प्रेमाने खाऊ लागला. ती संधी साधून शेतकरी तिथून निसटून पळू लागला.

तो थोडासा दूर पळाला असेल इतक्यात त्याला वाटले की लांडगा आपला पाठलाग करत आहे! तेव्हा तिथेच थांबून तो म्हणाला–"तू तर बराच दिसतोस की लांडगेभाऊ! बरं घे, हा आणखी एक तुकडा खा." आणि शेतकऱ्याने पावाचा एक तुकडा त्याच्यापुढे टाकला आणि लागला पुन्हा पळायला!

परंतु लांडगा त्याचा पाठलाग करीतच राहिला आणि शेतकरी पुन्हा पुन्हा त्याच्या-पुढे पावाचा एक एक तुकडा टाकत राहिला.

फ्रान्समधील लोक कथा



ते तुकडे खातखात लांडगाही त्याचा पाठलाग न सोडता पुढे पुढे येत राहिला. शेतकऱ्याने अधून-मधून आपला पळण्याचा वेग वाढवला पण लांडग्याने पाठलाग करायचे काही सोडले नाही.

शेवटी बिचारा शेतकरी कसातरी दम टाकत घरात घुसला. तोपर्यंत दोन पावां-पैकी एक छोटासा तुकडाच त्याच्या हाती राहिला होता. लांडगाही त्याच्या मागे येत त्याच्या घरासमोर येऊन बसला.

शेतकरी रिकाम्या हाताने परतलेला पाहून त्याच्या बायकोने विचारले—"पाव कुठे आहे? त्याच्याबरोबर खाण्यासाठी मी कांजीही बनवून ठेवली आहे."

श्वास घेणे ही मुश्किल होत असलेल्या शेतकऱ्याने बोटानेच लांडग्याकडे इशारा केला.

"अहो, लांडगा होय? बरं झालं तुम्हीच त्याच्या तोंडचा घास नाही बनलात." बायको म्हणाली.

"आपल्या खाण्यासाठीच मी दोन पाव विकत घेतले होते. तेच मी त्याच्यापुढे टाकले." शेतकऱ्याने सांगितले.

"म्हणजे या बेटचा लांडग्याने आपला पाव गिळला होय? काय आश्चर्य हो! बरं, तुम्ही आत येऊन दरवाजा लावून टाका. नाहीतर तो आपल्या दोघांनाही खाऊन टाकील." बायकोने शेतकऱ्याला सुचवले.

दरवाजा बन्द करता करता उरलेला तुकडाही लांडग्याकडे फेकत शेतकरी म्हणाला—"हा राहिलेला तुकडाही आता तूच खा."

लांडग्याने तो तुकडाही खाऊन टाकला आणि बराच वेळ तो शेतकऱ्याच्या घरा-बाहेरच बसून राहिला.

घराच्या आत बसून शेतकऱ्याचे ते जोडपे फक्त कांजीच पिऊ लागले. पिता पिता शेतकऱ्याची बायको पुन्हा पुन्हा त्या लांडग्याला शिव्या देत राहिली. आतले बोलणे संपल्याबरोबर लांडगा जंगलात निघून गेला.



या घटनेनंतर काही महिने निघून गेले. दरम्यान या शेतकरी दाम्पत्याने खूप मेहनत करून काही रक्कम जमवली आणि त्यातून एक गाय खरेदी करायचे ठरवले.

शेतकरी ते पैसे घेऊन जंगलातल्या वाटेने बाजाराकडे निघाला. त्याच्या मनात विचार चालू होता की—'आपल्याजवळ तर थोडीच रक्कम आहे. यातून आपण एकादी म्हातारी झालेली गायच विकत घेऊ शकू?' इतक्यात एका हडकुळ्या अन् उंच बांध्याच्या माणसाने त्याच्यासमोर येऊन विचारले—"तुला गाय विकत घ्यायची आहे काय?"

"होय, पण चांगलीशी गाय घ्यायला माझ्याजवळ पुरेसे पैसे नाहीत." शेतकरी उत्तरला.

"अरे, माझ्या गोठ्यात खूपश्या गायी आहेत. येऊन पहा, तुला त्यातली एकादी गाय आवडते का!" तो माणूस म्हणाला.

मग ते दोघेही मिळून एका चांगल्या घरात गेले. घरामागे गोठा होता.

"हं, आता सर्वात उत्तम अशी गाय पाहून घे." तो माणूस म्हणाला; आणि शेतकऱ्याने एक छान गाय निवडली.

"छानच गाय निवडलीस हं तू!" असे म्हणून त्याने गायीच्या गळ्यात एक दावं



बांधलं आणि त्याचं टोक शेतकऱ्याच्या हाती दिलं.

नन्तर त्या माणसाने आपल्या खिशातून एक डबी काढली आणि तीही शेतकऱ्याच्या हातावर ठेवत तो म्हणाला—"ही तुझ्या बायकोला माझ्याकडून भेट. त्यात काय आहे हे तू डबी उघडून पाहू नकोस. तुझ्या बायकोलाच ते पाहू दे."

"आमच्यावर ही तुमची खास मेहरबानी का बरं?" शेतकऱ्याने विचारले.

तो माणूस हसून म्हणाला—"तू माझ्यावर दया दाखवून एकदा मला दोन पाव खायला घातले होतेस. मीच तो लांडगा आहे. चांगल्या व्यक्तींशी मी फार चांगला आहे

आणि बाइटांशी बाईट! आता तू जा, देव तुझं कल्याण करो!"

हे ऐकून शेतकऱ्याला खूपच आश्चर्य अन् आनन्दही वाटला! गायीला हाकलून नेत तो जंगलाच्या वाटेने आता घराकडे निघाला.

रस्त्याने वारंवार त्याच्या मनात डबीत काय असेल याबद्दल कुतूहल जागृत होत राहिले. 'पाहू या काय, डबीत काय आहे!' असंही त्याच्या मनात येत राहिले. 'त्या लांडगा-माणसाने डबी केवळ बायकोनेच एकान्तात उघडावी असं का सांगावं?' शेतकऱ्याने डबी उलटी सुलटी धरून, वास घेऊनही पाहिले, पण त्याला डबीत काय असावे याबद्दल काही कल्पना करता येईना.

'शेवटी नवरा-बायकोत काही गुप्त थोडंच असतं? बायकोने जरी डबी उघडली तरी ती ही आपल्याला लगेच सांगणारच. तेव्हा घरी पोचेपर्यंत तरी मी कशाला थांबू?' असा विचार करून त्याने डबी उघडून पहायचाच निर्णय घेतला.

नंतर तो बाजूला एका झाडाखाली बसला; त्याने एकीकडे गाय चरायला सोडली आणि डबीचे झाकण उघडले! दुसऱ्याच क्षणी डबी खाली टाकून तो झटकन उठून दूर झाला! डबीतून आगीच्या भयानक ज्वाळा वर उठल्या आणि त्यांच्यामुळे झाडाच्या फांद्याही जळाल्या.

"बाप रे, माझ्या बायकोने ही डबी उघडली असती तर एकदम तिचा चेहरा आणि केसच जळाले असते. त्या लांडगा-माणसाला तिने शिव्या दिल्या होत्या, म्हणूनच तिचा सूड घेण्याचा त्याचा विचार असावा!" शेतकऱ्याच्या मनात आले.

एव्हाना सारे झाडच पेटून उठले होते; त्यामुळे आपली गाय घेऊन शेतकरी भराभरा घरी गेला. त्या आगीने जंगलाचा बराच भाग भस्म करून टाकला. परंतु त्या गायीच्या आधारे शेतकरी-दांपत्याने मात्र बरीच वर्षे सुखाने कालक्रमणा केली.





# धूर्त स्त्री

मुरारी नावाच्या एका तरुणाची शहरातल्या एका ऑफिसात एका छोट्या जागेवर नियुक्ति झाली. त्याच्या बायकोचे नाव होते कामाक्षी. हे दाम्पत्य शहरापासून थोड्या अंतरावर एक कमी भाड्याचे घर पाहून तेथे रहायला गेले.

नव्या घरात कामाक्षी आपलं सामानसुमान नीट लावत होती, इतक्यात एका माणसाने घरात प्रवेश करत विचारले—"काय ताई, ठीक आहात न? हे घर आवडलं तुम्हाला?"

"अरेरे, घरात पोचल्यापोचल्याच आपल्या वहिनींना सर्व काम करायला लागतंय." असं म्हणत त्या तरुणामागे एक तरुणी येऊन उभी राहिली.

त्या दोघांचा परिचय करून देत मुरारी कामाक्षीला म्हणाला—"हे दोघं नवराबायको आहेत. यांची नावं आहेत जनार्दन आणि जानकी. यांचं घरही इथेच जवळ आहे. दोघंही अगदी मनमिळाऊ आहेत बघ."

नंतर त्या दोघांनी कामाक्षीला स्वयंपाकात आणि मुरारीला घरातलं सामान नीट लावायला मदत केली. आपापसात गप्पा मारत-मारत सर्वांनी एकत्र भोजन केले. आणि जनार्दन-जोडपं संध्याकाळी आपल्या घरी परत गेलं."

"यांच्या मदतीमुळे चार दिवसांचं काम एकाच दिवसात होऊन गेलं की!" मोठ्या प्रसन्नतेने कामाक्षी म्हणाली.

पण तिची ही प्रसन्नता फार दिवस काही टिकली नाही.

दररोज सकाळी स्वयंपाक करून कामाक्षी नवऱ्याला जेवायला वाढत असे. जेवण उरकून मुरारी ऑफिसला जाई तोवर जानकी येऊन बसे. तिच्यासमोर जेवायला

राणी पटवर्धन

कामाक्षीला संकोच वाटे; म्हणून असलेलं जेवण दोघीं मिळून जेवत. संध्याकाळपर्यंत जानकी कामक्षीला काही न काही सांगत बसे; त्यामुळे शेवटी तिचं डोकं दुखू लागे! दुपारी थोडीही विश्रान्ति तिला मिळेनाशी झाली.

इकडे संध्याकाळी मुरारी घरी येई, त्याच वेळी जनार्दनही नेमका घरी येऊन टपके. दोघं ही मग बाजूच्या बैठकीच्या खोलीत बसून गप्पात रंगून जात. संध्याकाळचं खाणंही मुरारीबरोबर खाऊन जनार्दन अंधार झाल्यावर आपल्या घरी परते. कामाक्षी नव्यानेच संसार करू लागली होती म्हणून काही दिवस हे सगळं मुकाटयाने सहन करत राहिली.

एके दिवशी कामाक्षी नवऱ्याला म्हणाली– "हे शेजारचं जोडपं अगदी हात धुऊन आपल्या मागं लागलं आहे जसं काही! त्यांच्यामुळे आपल्याला संध्याकाळी जरा नदीकिनाऱ्यावरच्या देवळातही जाता येत नाही!"

तिचे बोलणे ऐकून मुरारी हसून गप्प राहिला. एका आठवडयाने जनार्दनला शेजारच्या गावी काही काम निघाले. त्याने मुरारीकडे येऊन त्याला सांगितले–"हे पहा मुरारी, मी दोन दिवसात परत येईन. माझ्या बायकोची तब्येत जरा ठीक नाही अलिकडे. तिला काही लागलं तर तेवढं बाजारातून आणून दे हं." आणि जनार्दन गावाला निघून गेला.



दुसऱ्या दिवशी ऑफिसला जाताना मुरारी जनार्दनच्या घरी गेला. जानकीने एक यादी त्याच्या हाती देत म्हटले– "भावोजी, ऑफिसातून येताना हे यादीतलं सामान तेवढं आणून द्या हं!"

सर्व सामान खरेदी करायला मुरारीला आपल्या खिशातून चांगले दोनशे रुपये खर्च करावे लागले. जनार्दन दोन दिवसात गावाहून परत आला, पण मुरारीने आणलेल्या सामानाच्या पैशांच्या बाबतीत मात्र पुढल्या दहा दिवसांतही एक चकार शब्द त्याने काढला नाही!

कामाक्षीने विचार केला की आपणच आता टोकल्याशिवाय काम भागायचं नाही! त्याच वेळी आपल्या घरात शिरणाऱ्या जानकीला तिने विचारले–"जानकीताई, सामानाचे पैसे अजून भावजींनी दिले नाहीत. त्याची जरा आठवण द्या नं त्यांना!"

यावर आश्चर्याने जानकी म्हणाली– "काय म्हणलात, त्या एवढयाश्या सामानाचे दोनशे रुपये झाले? आमचे 'हे' तर शंभर रुपयात याहून दुप्पट माल आणतात!" हे ऐकून कामाक्षीला फारच राग आला.

यानंतर काही दिवसांनी मुरारीलाही असेच गावाला जावे लागले. त्या वेळीं कामाक्षी म्हणाली–"तुम्हाला परत यायला दोन दिवस लागतीलच ना? मग असं करा, जनार्दनच्या हाती शंभर रुपये देऊन सांगा





की, आमच्या घरी काही लागलं तर विचारून तेवढं आणून द्या."

मुरारी रागाने म्हणाला—"तुला वेड तर नाही लागलं? पहिले दोनशे रुपये आधण घालवून बसलोत आणि आता आणखी शंभर रुपयांवरही पाणी सोडू होय?"

"रागावू नका गडे असे. आपले पैसे त्याच्याकडून परत मिळवायची जबाबदारी माझी. तुम्ही फक्त मी सांगितलं तसं करा." कामाक्षीने समजावून सांगितले.

यानन्तर मुरारीने जनार्दनला शंभर रुपये दिले व आवश्यक ती सूचना देऊन तो गावाला निघून गेला.

दुसऱ्या दिवशी येऊन जनार्दनने कामाक्षीला विचारले—"वहिनी, तुमचं काही सामान आणायचंय का?"

"भावोजी, सामानापेक्षाही एक फारच जरूरीचं काम आहे पहा." पण अगोदर त्याच्यापुढे खाण्याची बशी ठेवत कामाक्षी डोळे पुसत म्हणाली—"आमचे 'हे' माझ्या माहेरच्या माणसांवर उगीचच चिडून आहेत. माझ्या धाकट्या भावाच्या शिक्षणासाठी सध्या माझ्या वडिलांजवळ पुरेसे नाहीत. त्यांच्याकडून मिळालेल्या सोन्याच्या बांगड्या 'ह्यां'च्या अपरोक्ष विकून टाकायचं मनात आहे माझ्या. पण पहा हं, त्यांच्या कानावर ही खबर जाता कामा नये, कराल येवढं?"

सोन्याची गोष्ट ऐकून जनार्दन उत्सुकतेने म्हणाला—"चटकन द्या बांगड्या वहिनी."

पण कामाक्षी क्षणभर गप्प राहून म्हणाली—"भावोजी, आज आणखी एक संकट येऊन पडलंय बघा. भावाची फी तर आजच द्यायला हवी शहरात नेऊन. तीनशे रुपये लागतील. आज तर शुक्रवार! शुक्रवारी बांगड्या विकणं चांगलं नाही. मला तर काही कळतंच नाहीय काय करावं आता!"

यावर जनार्दन लगेच म्हणाला—"वहिनी, मी तुमचं दोनशे रुपये देणं लागतोच. मुरारीनेही काल मला शंभर रुपये दिलेत. मी ते तीनशे रुपये देतो आणून तुम्हाला. तुम्ही ते तावडतोब भावाकडे पाठवून द्या. बांगड्या काय, उद्यासुद्धा येतील विकता."

कामाक्षीने मान हलवून संमति दिली; आणि जनार्दनने तावडतोब जाऊन घरून तीनशे रुपये आणून दिले!

दुसऱ्या दिवशी जनार्दन सोन्याच्या बांगड्या घेऊन जाण्यासाठी कामाक्षीकडे आला. पहातो तर काय! कामाक्षी आपली उदास होऊन बसलेली!

जनार्दनला पहाताच ती जोराने रडू लागली—"भावोजी, माझं घर लुटलं हो चोरांनी! काल रात्री त्या बांगड्यांबरोबरच इतरही किती किमती सामान चोरीला गेलं हो आमचं! पगार होईपर्यंत काही दिवस तुमच्याच जिवावर जगावं लागणार आहे आम्हाला!"

कामाक्षीचं बोलणं ऐकून घाबरून जनार्दन म्हणाला—"वहिनी, मला तर आत्ताच बातमी मिळाली की माझ्या सासूबाईची तब्येत एकाएकी बिघडली आहे. काय होणार आहे कळत नाही. मी सासुरवाडीहून आलो की लगेच तुम्हाला येऊन भेटेन हं!" आणि तो आला तसाच भराभरा तिथून निघून गेला.

यानंतर दोन दिवस गेले, पण जनार्दन किंवा जानकी यांच्यापैकी कोणीही मुरारीच्या घरी पाय ठेवला नाही! पुढेही बाजारात कधी जनार्दनला मुरारी दिसला, तरी तो नजर चुकवून निघून जाई.

"तू एक छोटंसं सोंग करून जनार्दन–जानकीच्या तडाख्यातून आपली सुटका करून घेतलीस बघ. बरीच धूर्त आहेस की!" असं म्हणत मुरारीने बायकोची खूप स्तुति केली.

"तुमचा भिडस्तपणा जाईपर्यंत मला असंच धूर्तपणाने रहावं लागणार आहे, नाहीतर कसं चालेल आपलं?" कामाक्षी खोडकरपणे हसत म्हणाली.





# एका आण्यात ऐश्वर्य

एका गावात शेतावर मजुरीचे काम करणारा गणपा नावाचा माणूस रहात असे. तो एका जमीनदाराकडे काम करी. त्या जमीनदाराच्या गोठ्यातील एका कोपऱ्यात तो आपल्या बायको व मुलांसह रहात असे. एक दिवशी रात्री बायको गणपाला म्हणाली–"बरं का, कित्येक वर्षे आपण मोल-मजुरी करीत आलो, पोटाची खळगी भरण्याशिवाय काय केलं आपण? असंच चाललं, तर आपल्या मुलांचं काय होणार पुढे?"

गणपाने बायकोला समजावलं–"कार-भारणी, व्यापार केला तर खूप पैसा मिळेल आपल्याला, पण तो ही करायला काही भांडवल पदरी असायला लागतं! माझ्या जवळ अक्कल खूप आहे. भांडवल म्हणून माझ्याजवळ एक आणा ('आणा' हे पूर्वी एक नाणं असे ज्याची किंमत आजच्या सव्वा सहा पैशां इतकी असे.) असता तर मी एक महिन्यात हजार रुपये मिळवून दाखविले असते. पण तो एक आणा तरी असायला पाहिजे न गाठीला?"

नवरा-बायकोत चाललेली ही बोलणी जमीनदार भिंतीच्या पलीकडून ऐकत होता. त्याने विचार केला–"चला, पाहू या एक आण्यात गणपा काय व्यापार करतो आहे!" त्याने भिंतीवरून एक आणा गोठ्यात टाकून दिला.

दुसऱ्या दिवशी सकाळी गणपाची बायको गोठ्याची झाडझूड करीत असताना तिला तो आणा दिसला. नवरोजींना एक आणा दाखवीत ती म्हणाली–"ऐकलं का? तुम्ही म्हणत होता–एक आणा असता तर खूप पैसे कमवले असते! हा घ्या एक आणा."

गणपा तो आणा घेऊन शहरात गेला. किरकोळ व्यापारासाठी कर्ज देणारे

२५ वर्षापूर्वींच्या चांदोबातील गोष्ट

अनेक सावकार तिथे होते. एका सावकाराकडे जाऊन गणपा म्हणाला–"शेटजी, व्याजाचा एक आणा आगाऊ घेऊन मला एक रुपया कर्जाऊ देता? संध्याकाळ पर्यंत तुमचा रुपया परत आणून देईन."

त्या सावकाराकडून रुपया घेऊन गणपा दुसऱ्या सावकाराकडे गेला. व्याजाचा रुपया आगाऊ देऊन दहा रुपये कर्जाऊ मिळविले. दुसऱ्या दिवशी कर्ज परत करण्याचे आश्वासन दिले. तिसऱ्या सावकाराकडे जाऊन शंभर रुपये कर्जाची मागणी केली. त्या सावकाराने व्यवस्थित कागद-पत्र करून घेतले आणि शंभर रुपये कर्ज दिले गणपाला! हे शंभर रुपये घेऊन आता गणपा एका मोठ्या सावकाराकडे गेला आणि म्हणाला–"शेटजी, हे व्याजाचे शंभर रुपये अगोदर घेऊन मला हजार रुपये कर्ज दिले तर मोठे उपकार होतील माझ्यावर. मी तुमचे कर्ज एका आठवड्यात खात्रीने परत करीन."



सावकाराने एक हजार रुपये दिले. पहिल्या दोन सावकारांची कर्जे देऊन टाकून उरलेली रक्कम घेऊन गणपा घरी आला आणि बायकोला मर्दुमकी सांगितली.

बायको म्हणाली–"ही कसली प्राप्ति हो? पुन्हा सावकाराला एक हजार रुपये द्यायचेच आहेत न? तुमच्या जवळ पुरे नऊशे रुपये सुद्धा शिल्लक उरलेले नाहीत!"

गणपाने पुनः समजाऊन सांगितले–"ऐक, खरा व्यापार सुरू केला की दुप्पट फायदा होईल म्हटलं! आहे हा फायदा नाही, हे तर भांडवल आहे कळलं?"

दुसऱ्या दिवशी सकाळी गणपा उठला आणि घरातून बाहेर पडून जोंधळे गावी गेला. त्या गावातले शेतकरी उत्तम प्रतीचा जोंधळा पिकवतात. जोंधळ्याची शेतं कापणीला तयार होती. गणपाने सर्व शेतकऱ्यांना बोलावलं नि समजाऊन सांगितलं–"ऐका, यंदा मी तुमची सगळी ज्वारी

खरेदी करायचं ठरवलं आहे. मी आताच तुम्हाला विसार द्यायला आलो आहे. धान्य मोजाल तेव्हा मला अथवा माझ्या प्रतिनिधीला दिलं पाहिजे." या अटीनुसार गणपाने कुणाला पन्नास, कुणाला पंचवीस प्रमाणे विसार दिला आणि पावत्या लिहून घेतल्या. त्याने सर्व शेतकऱ्यांना आश्वासन दिले की त्यांना ज्वारीचा योग्य तो दर दिला जाईल.

मग गणपा आपल्या घरी परत आला. दोन-तीन दिवसांनी धान्याचे व्यापारी जोंधळे गावच्या शेतकऱ्यांकडे गेले तेव्हां समजलं की या वर्षाचा सर्व जोंधळा शेतातच विकला गेला आहे. सर्व धान्य विसार देऊन खरेदी करणारा गणपा अमुक गावचा राहणारा आहे. गणपाला शोधत सगळे व्यापारी त्याच्या गावी आले आणि विनंती करू लागले–"गणपतराव, आमच्या पोटावर पाय देऊन तुम्ही काय मिळवणार आहात? आम्ही पिढ्यान् पिढ्या हा व्यापार करीत आलो. तुम्ही तर नवीन व्यापारी. म्हणून या वर्षीचं पीक आम्हाला मिळू द्यावं हे बरं!"

"बाबांनो, मला तरी सगळ्या पिकाचं काय करायचं आहे? थोडी अधिक किंमत घेऊन मी धान्य विकणारच. व्यापारातले नियम तुम्ही सर्व जाणताच! माझ्या खरेदीच्या दरापेक्षा अधिक दराने सगळा जोंधळा तुम्ही खरेदी करून टाका की झालं!" गणपाने व्यापाऱ्यांना आपला विचार सांगितला. मग व्यापाऱ्यांनी आपापसात सल्ला-मसलत केली नि धान्याचा असा दर ठरविला की गणपाला एक हजार रुपयांचा फायदा होईल. गणपाला व्यापाऱ्यांकडून जी रक्कम मिळाली त्यातून एक हजार रुपये प्रथम सावकाराची कर्ज फेड केली. राहिलेल्या हजार रुपयातून एक छोटं शेत खरेदी केलं, एक लहानशी झोपडी बांधली आणि आपल्या बायको व मुलांसह तो सुखाने राहू लागला. गणपाने आपल्याला अक्कल असल्याचं सिद्ध करून दाखवलं हे पाहून जमीनदार पण आनंदित झाला.



## निसर्गातील आश्चर्यं :



### माणसाचा वध केला लांडग्याने !

लांडग्याने माणसाचा वध केला अशी घटना केवळ कॅनडातच नोन्दली गेली आहे. एका शिकाऱ्याला लांडगा चावल्यामुळे तो राबिस या रोगाने मृत्युमुखी पडला. लोकांना वाटतं तितका काही लांडगा हा प्राणी भयानक नाही. लांडगे विशेषत: लहान व म्हातारे प्राणी, आजारी प्राणी यांना मारून खातो. ससे व उंदीर हे त्याचे आवडते खाद्य !

### गारांचा अपूर्व असा वर्षाव

सन १९७० मधे अमेरिकेच्या कॅनसास मध्ये जो गारांचा पाऊस झाला त्यावेळी १७.१/२ इंच परिघ असणाऱ्या गारा पडल्या !

लंडन शहराच्या क्यू गार्डन्स मधे असणारी सुप्रसिद्ध 'व्हिक्टोरिया' (निफिली) ही वनस्पति जगांतील सर्वात मोठी पाण-वनस्पति मानली जाते. पाण्यावर तरंगणारे या झाडाचे एक-एक पान जवळ-जवळ ६.५ फुट इतक्या व्यासाचे असते.



# बक्षिस

एक जमीनदार कर्णाचे अवतार म्हणून प्रसिद्ध होते. जो कोणी त्यांच्यावर उपकार करील, त्याला काही ना काही बक्षिस दिले की त्यांना संतोष होई.

एकदा त्यांनी आपला सदरा धोब्याला धुण्यासाठी दिला. पण खिशात वीस रुपये आहेत हे ते विसरून गेले. दुसऱ्या दिवशी परीट जमीनदाराच्या घरी आला आणि म्हणाला– "सरकार, आपल्या खिशात वीस रुपये असल्याचे आपण विसरलात वाटतं ?" असं म्हणून त्याने जमीनदारांना रुपये परत दिले.

"असे इमानदार नोकर आजकाल कुठे मिळतात ? घे, हे दहा रुपये बक्षिस म्हणून घेऊन जा." जमीनदार म्हणाले.

काही दिवसांनी जमीनदारांनी पुन्हा काही कपड्यां बरोबर तोच सदरा धोब्याकडे पाठविला. सदऱ्याच्या खिशात दहा रुपये आहेत हे ते विसरून गेले.

दुसऱ्या दिवशी परिटाने जमीनदारांना भेटून सांगितले–"खिशात ठेवलेले पाच रुपयं तुम्ही विसरून गेलात. ते हे घ्या." असं म्हणून परिटाने पाच रुपये दिले.

जरा स्मरण करून जमीनदार म्हणाले–"मला वाटतं माझ्या खिशात दहा रुपये असले पाहिजेत !"

परिटाने उत्तर दिले–"हुजूर, आपण निम्मी रक्कम मला बक्षिस म्हणून देणारच असा विचार करून मी पाच रुपये अगोदरच माझ्याजवळ ठेवून घेतले. काय बरं चुकलं ?"

आता जमीनदारांना वाटलं की प्रत्येक वेळी बक्षिस देणं योग्य नाही. त्यांनी आपली ही सवय सोडून दिली.





# सुनेची निवड

करुणा आपल्या नावाप्रमाणेच दयाळु स्वभावाची होती. मुलगी जरी आठच वर्षांची होती, तरी भोवतालच्या परिस्थिती-मुळे तिला वयाच्या मानाने समज अधिक होती.

करुणा एक वर्षाची झाली अन् तिची आई वारली. तिच्या वडिलांनी पुन्हा दुसरे लग्न केले. सावत्र आई घरात आल्यावर छोट्या करुणेच्या वाट्याला तिच्या कडून प्रेमाऐवजी द्वेषच आला ! पण बिचारी काय करील ? भुकेने कासावीस होऊन ती रडू लागल्यावर गोळाभर अन्न तिच्या ताटात घातलं की आपलं इतिकर्तव्य झालं असं सावत्र आई समजे. आसपासच्या लोकांच्या दयेवरच ती वाढली.

एकदा करुणाची सावत्र आई, जानकीच्या माहेरी कोणाचेसे लग्न निघाले. आठ वर्षांच्या करुणेवर एकटीवर घर सोडून आपला मुलगा व नवरा यांच्यासह ती आपल्या माहेरी निघून गेली.

संध्याकाळी करुणाने आपल्यासाठी थोडासा भात शिजवला आणि लोणच्या-बरोबर तो खाऊन तिने जेवण उरकले. त्याच वेळी अचानक जोराचा पाऊस सुरु झाला, तो थांबायचे नावच घेईना. करुणा घरात एकटीच होती, म्हणून शेजारच्या राधाबाईने तिला रात्री झोपायला आपल्या-घरी बोलावले होते.

करुणाने पाऊस थांबायची जरा वाट पाहिली आणि काळजीपूर्वक सर्व दारे-खिडक्या बन्द करून ती बाहेर आली. पहाते तर काय, बाहेर ओटयावर कोणीतरी माणूस झोपलेला तिला दिसला. तो जवळ-जवळ बेशुद्ध होता आणि त्याचे शरीर तापल्या तव्यासारखे गरम लागत होते !

"अरेरे, यांना तर ताप चढलेला दिसतोय." असा विचार करून करुणाने हळूच थापटून त्यांना हाक मारली–"बाबा, बाबा!"

त्या माणसाने कष्टानेच डोळे उघडून पाहिले, करुणा त्याला म्हणाली–"हळूच उठा बाबा. आपण घरात जाऊ या."

आधार देऊन, उठवून हळूहळू चालवत करुणा त्या गृहस्थाला घरात घेऊन गेली आणि तिने त्याला खाटेवर झोपवले. कोरडा पंचा आणून तिने त्याचे डोके पुसले आणि म्हणाली–"बाबा, जरा उठून बसा आणि ओले कपडे बदला बरं! मग पुन्हा झोपा हं!"

त्या माणसाजवळ एक पिशवी तिला दिसली होती. ती दाखवून तिने विचारले–"यात तुमचे कपडे असतील नं?" त्या गृहस्थाने होकारार्थी डोकं हलवताच तिने त्यातले कोरडे कपडे काढून दिले!

"कपडे बदलून जरा डोळे मिटून पडा हं! इथेच दोन घरं टाकून पलिकडे एक वैद्य रहातो. नुसती आजाराची लक्षणं सांगितली की तो औषध देतो. मोठा प्रसिद्ध आहे हा आमच्या गावचा वैद्य! मी त्यांच्याकडून तुमच्यासाठी औषध घेऊन येते." असं म्हणून डोक्यावर घोंगडी घेऊन करुणा घराबाहेर गेली.

दहा मिनिटात ती परत आली आणि म्हणाली–"हं, हे घ्या औषध बाबा. वैद्याने तापासाठी दिलंय ते! मी शेजारच्या मामांकडून थोडं गरम दूध मागून आणते. औषध घेऊन वर दूध प्या.हं!"



करुणाकडे कृतज्ञतेने पहात तो माणूस उठून बसला. औषध घेऊन वर गरम दूध प्यायल्यावर त्याला जरा हुशारी आली.

"तू कोणाची मुलगी बाळ?" करुणाकडे प्रेमाने पहात त्याने विचारले.

"माझं नाव करुणा." असे म्हणून तिने आपला सविस्तर परिचय दिला.

नंतर दोघंही झोपून गेले. सकाळी करुणाने डोळे उघडून पाहिले तर तो गृहस्थ निघायची तयारी करून तिची झोप संपायचीच वाट पहात असलेला तिला दिसला.

तो करुणाला म्हणाला–"काल तू स्वतः-बद्दल तर सर्व सांगितलंस; पण माझ्याबद्दल नाही विचारलंस बाळ? माझं नाव गुरुनाथ. शहरात माझा चार-पाच प्रकारचा व्यापार आहे. माझा एक मित्र आजारी आहे; त्याला पाहून जावे म्हणून आलो, अन् मीच आजारी पडलो बघ." आणि हसत तो पुढे म्हणाला–"तू तर माझी प्राणदात्री आहेस. तुझे उपकार मी कधीच विसरू शकणार नाही. माझी कधी काही मदत लागली तर या मामाला विसरू नकोस हं. हा घे माझा पत्ता." असे म्हणून आपला नाव-पत्ता लिहिलेला एक कागद त्याने तिच्या हाती दिला आणि गुरुनाथ तेथून निघून गेला.

दहा वर्षे निघून गेली. करूणा आता उपवर झाली होती. या दहा वर्षात काही महत्वाच्या घटना घडून गेल्या होत्या.





करुणाची सावत्र आई काही आजार होऊन अचानक वारली होती आणि तिला आपल्या सख्ख्या आईच्या वडिलांकडून त्यांच्या इस्टेटीचा काही वाटा मिळाला होता.

उन्हाळयाचे दिवस होते. दुपारी कडक उन्ह पडे. करुणा जेवण-वगैरे उरकून बाहेरच्या खोलीत आली. बाहेर ओटयावर कुणीसं कण्हत असावं असा आवाज आला म्हणून ती बाहेर आली. पहाते तो ऐंशी वर्षांचा एक म्हातारा माणूस तिथे बेहोशीत धापा टाकत पडलेला दिसला!

करुणा त्या म्हाताऱ्या जवळ जाऊन म्हणाली–"आजोबा, इतक्या उन्हात एकटेच कसे आलात? बरं, आता हळूच उठा बरं, आणि चला आमच्या घरात." असे बोलत तिने त्या आजोबांना हळूच उठवले आणि त्यांना आधार देत देत ती आपल्या घरात घेऊन गेली.

त्यांना पलंगावर बसवून ती थंड पाण्यात बुडवलेलं एक फडकं घेऊन आली आणि त्याने तिने आजोबांचं तोंड पुसलं, अन् त्यांना प्यायला ताक दिले. म्हातारा आता जरा टुकटुकीत झाला अन्–"शतायुषी हो बाळ?" असे म्हणत तिथून उठू लागला.

करुणाने पट्कन त्याना धरून खाली बसवत म्हटले–"इतक्या कडक उन्हात कुठे जाल आजोबा?"

ते ऐकून एकदम दचकून म्हातारा म्हणाला–"तुला माहीत आहे, मी या गावात कशासाठी आलो आहे?" आणि आपल्या हातातल्या पिशवीतून पैशांचा एक बटवा काढून दाखवत तो म्हणाला–"माझा मुलगा गुरुनाथ, शहरातला एक प्रसिद्ध व्यापारी आहे. या गावातून काही कर्ज वसूल करायचं होतं, म्हणून त्याने मला इकडे पाठवलं. मी संध्याकाळ पर्यंत नाही पोचलो तर त्याला काही फिकिर नाही; पण पैसे पोचले नाहीत तर मात्र माझी काही खैर नाही! माझा जीवच घेईल तो!"

त्या म्हाताऱ्याचे बोलणे ऐकून करुणाला एकदम दहा वर्षापूर्वीची ती गोष्ट आठवली.



ती घरात गेली अन् गुरुनाथने दिलेला तो पत्ता लिहिलेला कागद घेऊन आली. म्हाताऱ्याला तिने तो पत्ता वाचून दाखवला अन् ती म्हणाली–"आजोबा हा गुरुनाथ म्हणजेच आपला मुलगा काय?"

"होय मुली, पण त्याचा पत्ता तुझ्याकडे कसा?" त्या वृद्ध गृहस्थाने विचारले.

करुणाने दहा वर्षांपूर्वी घडलेली ती गोष्ट सांगितली.

"असं होय!" असे म्हणत म्हातारा पुन्हा उठू लागला.

करुणाने त्यांना पुन्हा धरून बसवत म्हटले–"आजोबा, माझ्या एका प्रश्नाचं उत्तर द्या. या तुमच्या वयात तुमचा मुलगा तुमच्याकडे द्यावं तितकं लक्ष देत नाही असं दिसतं. तरीही त्याच्याचजवळ रहायचं असं ठरवलं आहात का तुम्ही?"

"असा काही निश्चय नाही माझा बाळ! पण माझा सख्खा मुलगा माझी काळजी घेत नाही तर आता या अवस्थेत मला नुसतं बसवून खायला तरी कोण घालील?" म्हाताऱ्याने विचारले.

"मग तर माझं म्हणणं ऐकाच आजोबा. आता इथेच जेवा, खा; आणि जरा आराम करा. संध्याकाळी मी ही तुमच्याबरोबर येईन शहरात, आणि तुमच्या मुलाला नीट समजावून इथून पुढे तुमची नीट काळजी



घेण्याबद्दल सांगेन." करुणाने त्यांना समजावले.

"मुली, तू नक्कीच गेल्या जन्मीं माझी नात असली पाहिजेस; म्हणूनच तुझ्या मनात माझ्याबद्दल इतका आदर आहे. तू म्हणतेच तसंच करू." वृद्ध म्हणाला.

करुणाचे वडील रंगनाथ काही कामासाठी शेजारगावी गेले होते, तेही संध्याकाळपर्यंत परत आले. करुणाने त्यांना या वृद्ध गृहस्थांबद्दल सांगितल्यावर त्यानेही म्हाताऱ्याला सल्ला दिला,–"माझी मुलगी म्हणत आहे तसंच करा काका!"

नंतर तिघेही घरून निघून शहरात पोचले. तेथे पोचल्यावर गुरुनाथकडे पाहून

म्हातारा हळून हसला. आणि करुणाचा हात पकडून म्हणाला–"गुरुनाथ, बघ मी घेऊन आलो माझ्या नातीला!"

गुरुनाथने मोठ्या प्रेमाने करुणाकडे पहात म्हटले–"ओळखलंस बाळ मला?"

करुणाने हसून मान हलवली. इतक्यात पंचवीस-एक वर्षांचा एक सुन्दर तरुण तेथे आला. गुरुनाथने त्याचा परिचय करून देत म्हटले–"हा माझा मुलगा श्रीकान्त."

नंतर गुरुनाथने खुणावल्यावरून श्रीकान्त तेथून निघून गेला. आता गुरुनाथ करुणा व रंगनाथ यांना म्हणाला–"कित्येक लाखांचे धनी असलेल्या माझ्या पिताजींनी जे नाटक रचलं, त्यामुळे तुम्ही दोघं आश्चर्यात पडला असाल ना? मी आता खरी गोष्ट सांगतो, ऐका. दहा वर्षांपूर्वी मी करुणाला पाहिलं होतं. तिची शांतवृत्ति आणि दयाभाव यांच्यामुळे मी चांगलाच प्रभावित झालो. श्रीकान्त माझा एकुलता एक मुलगा आहे. नुकतीच त्याची आई वारली. तिची इच्छा होती की तिच्यासारख्या स्वभावाची सून आपल्या घरात यावी. माझ्या वडिलांच्या परीक्षेत करुणा एकदम पास!" आणि रंगनाथचा हात आपल्या हातात घेत गुरुनाथ पुढे म्हणाला–"आपण माझा श्रीकान्त पाहिलातच: करुणा आमची सून व्हावी अशी आमची इच्छा आहे. तुम्ही सम्मति दिलीत तर मला फार आनन्द होईल."

"तुमची इच्छा हीच माझी पण इच्छा!" रंगनाथ म्हणाला.

"असं नाही. करुणाला मान्य असेल तरच हा विवाह घडेल. काय करुणा? श्रीकान्तने तुला पसन्त केलंय, आता केवळ तू आपली सम्मति द्यायची आहेस." गुरुनाथ म्हणाला.

यावर करुणाने लाजून मान खाली घातली. गुरुनाथच्या वडिलांनी तिचा हात पकडून म्हटले–"अरे गुरुनाथ, मुलगी याहून निराळे काय बोलणार?"

नंतर एका शुभमुहूर्तावर करुणा व श्रीकान्तचा विवाह थाटात पार पडला.





# विषारी मिठाई

अमरपुरी देशातल्या तीन सैनिकांनी एकदा शेजारच्या अश्व देश राज्याचा एक गुप्तचर विनय याला पकडले. त्याला आपल्या राजधानीकडे नेता नेता सैनिकांना जंगलात जरा विश्रांति घ्यावी असे वाटले.

सैनिकांनी विनयला जवळच्याच एका झाडाला बांधले. त्याच्याजवळ सैनिकांना एक थैली सापडली. त्यात एक मिठाईचा पुडा होता. मिठाई साजुक तुपात बनवलेली होती, त्याचा छान सुगंध येत होता. अशी मिठाई आतापर्यंत जन्मात खाल्लेली नव्हती त्या सैनिकांनी! त्यांच्या तोंडाला पाणी सुटले.

सैनिकांनी मिठाईचे तीन वाटे केले आणि ते खायला बसले. पण त्यांच्यापैकी एकाच्या मनात काही शंका आली आणि त्याने आपल्या साथीदारांना म्हटले–"यात विष-बीष मिसळलं असेल एखाद्या वेळी! काय सांगावं? नको बाबा खायला!"

सैनिक विचारात पडले–खावी की नाही मिठाई? त्यांची ही स्थिति पाहून विनयला हसू आले आणि तो म्हणाला–"अरे तुम्ही लोक विचारात काय पडलात? एक तुकडा मला द्या बरं, मी दाखवतो खाऊन. मग तर अगदी निर्धास्तपणे खाल माझी साजुक तुपात बनवलेली मिठाई? एक तुकड्या ऐवजी सबंध कडं वाटलं तर खाऊन दाखवतो! मग तर झालं?"

यावर एका सैनिकाने एक तुकडा विनयच्या तोंडात घातला, आणि वर पाणीही पाजलं त्याला. अर्धा तास गेला, पण विनयवर काहीही परिणाम झाला नाही असे पाहून सैनिक निश्चिन्त झाले. आणि त्यांनी मिठाई खाऊन टाकली.

थोड्या वेळाने विनयला बरोबर घेऊन सैनिक चालू लागले. रस्त्यात एका ठिकाणी कैदी एकदम धडामकन खाली कोसळला!

ग. रं. बीडकर

सैनिक आश्चर्याने पाहू लागले त्याच्याकडे! विनय त्यांना म्हणाला–"मला माहीत होतं की तुम्ही काही मला सोडणार नाही. आणि आपल्या देशात मला नेऊन विविध प्रकारे माझा छळ करून आमच्या देशाबद्दलच्या गुप्त बातम्या वदवून घ्याल! अशा प्रकारच्या धोक्याची अगोदरच कल्पना करून मी आपल्याजवळ विष घातलेली मिठाई ठेवली होती. पण हे विष तावडतोब आपला परिणाम दाखवत नाही, सावकाशीने त्याची चिन्हं दिसायला लागतात, म्हणूनच इतका वेळ तुमच्या हे लक्षातही आलं नाही अन् तुम्हीही खाल्लीत मिठाई! आता कसं? मलाही सूडाचं समाधान मिळालं! आता व्हा सगळे जण मरायला तयार! खाताना कसं वाटलं?"

विनयचे बोलणे ऐकून सैनिकांचे चेहरे पांढरे पडले! नंतर विनयचे तडफडणेही एकदम थांबले.

ते पाहून सैनिकांपैकी एकजण म्हणाला–"या गुप्त हेराने तर आपल्याला चांगलाच धोका दिला! आपण तर त्याने खाल्ल्यानंतर बऱ्याच वेळाने मिठाई खाल्ली आहे. त्यामुळे आपणावर अजून विषाचा परिणाम काही वेळानेच सुरू होईल. मग आता आपण काय करू या. काही उपाय सापडतो का पहा विचार करून, नाहीतर आपल्याला तडफडून तडफडून मरावे लागेल."

"आपण या दुष्टाला इथेच तडफडत सोडून देऊ. जाईल सडून-कुजून तसाच! आपल्याला तर आपले प्राण वाचवायला हवेत! पाहू, इथे कुठे जवळपास एकादे गाव असेल, तर तिथल्या वैद्याकडून काही इलाज करून घेऊ." दुसऱ्या सैनिकाने सल्ला दिला.

नंतर तिघेही सैनिक तिथून पळून गेले. ते निघून गेल्यावर विनय मनातल्या मनात हसत उठून बसला! खरं म्हणजे मिठाईत विष-बिष काही नव्हतेच मुळी!

आपली योजना अशी सफल झालेली पाहून विनय खूश झाला अन् आपल्या देशाची वाट चालू लागला.





[४]

धीरसिंह दुसऱ्या दिवशी जेव्हा सुलोचनेला भेटायला आला, तेव्हा ती त्याला म्हणाली–"इथून पन्नास योजनांच्या अंतरावर नैऋत्य दिशेला एक गुलाब-पाण्याने भरलेले माया सरोवर आहे. त्याचा संपूर्ण इतिहास काय आहे? हाच माझा चवथा प्रश्न आहे."

या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी धीरसिंहाने सुलोचने कडून तीन महिन्यांची मुदत मागून घेतली आणि त्याने नैऋत्येकडे प्रयाण केले. सतत सात दिवस प्रवास केल्यावर तो एका नगरात पोचला. नगराच्या सीमेवर एक विहीर होती, तेथे बरीच गर्दी जमलेली त्याने पाहिली. मध्य भागी एका सुसंपन्न कुटुंबातील वयोवृद्ध जोडपे अत्यन्त दुःखी अंतःकरणाने विलाप करीत होते.

धीरसिंहाने जवळ जाऊन त्यांना रडण्याचे कारण विचारले. गर्दीतील एकाने सांगितले–"या वृद्ध जोडप्याचा एकच एक मुलगा गुणशेखर काही दिवसांपूर्वी अमळ वेडा झाला आणि त्याने या विहिरीत उडी मारली!"

"मृत्यु हा सर्वांनाच अटळ आहे. जे काही झालं त्यासाठी रडून आता काय फायदा होणार?" धीरसिंहाने विचारले.

"तुमचं म्हणणं ठीक आहे. पण अजून असं निश्चितपणे म्हणता येत नाही कि



गुणशेखर मेलाच असला पाहिजे. कारण अद्याप पर्यंत प्रेत पाण्यावर येऊन तरंगू लागलेले नाही." लोकांनी आपली शंका व्यक्त केली.

थोडा वेळ मौन धारण करून धीरसिंह विचार करीत राहिला, आणि मग त्या वृद्ध जोडप्याला म्हणाला—"तुमच्या मुलाला परत घेऊन येण्याची जबाबदारी माझी! आपण काळजी करीत बसूं नका." असं म्हणून धीरसिंहाने विहिरीत उडी मारली.

धीरसिंह विहिरीत खूप खोलवर पोचला. त्याचे पाय तळाला लागले. त्याने चारी बाजूला बारकाईने निरीक्षण केले. डाव्या बाजूला बिळासारखी एक अरुंद वाट दिसली त्या वाटेने जाऊन तो डावीकडे वळला आणि दोन भक्कम दारे धडाम्दिशी उघडली केली. धीरसिंहाने आत प्रवेश केला. रंगी-बेरंगी फुलांनी नि फळांनी सुशोभित अशा एका उद्यानात एक अद्भुत महाल दिसला. धीरसिंह महालात शिरला. तेथे रंगी-बेरंगी प्रकाश देणारे दीप जळत होते. महालाच्या मध्यभागी एका चन्द्राकृति व्यासपीठावर बसून एक सुंदर युवती वीणा वाजवीत होती. मधुर सुरांनीं सर्व वातावरण व्याप्त होते. तिच्या समोर एक युवक बसून संगीताचे तन्मयतेने रसास्वादन करीत होता.

धीरसिंहाने प्रवेश केला नि वीणा-वादन बन्द झाले. त्या युवकाने आश्चर्यचकित होऊन धीरसिंहाकडे पाहिले. धीरसिंहाने विचार केला हाच युवक गुणशेखर असला पाहिजे.

त्या सुंदरीकडे पाहून धीरसिंह म्हणाला—"तू मोठी गुणवती दिसत आहेस. पण सौंदर्य, पवित नि सामर्थ्य यांचा उपयोग दुसऱ्याच्या कल्याणासाठी केला तरच त्यांची सार्थकता आहे हे विसरू नकोस? आपल्या एकुलत्या एक मुलाच्या विरहाने त्याचे आई-वडील किती दुःखात काळ कंठीत असतील याची थोडी कल्पना कर. याला योग्य उपदेश करशील?"



"तुझं म्हणणं सर्वस्वी योग्य आहे. पण मी जर भूलोकात प्रवेश केला तर माझं दिव्यत्व गमावून बसेन. मग मी एक साधारण स्त्री होऊन जाईन. जर गुणशेखर स्वतः आपल्या आई-वडिलांकडे जात असेल तर माझी काही हरकत नाही." त्या युवतीने आपला विचार सांगितला.

गुणशेखर धीरसिंहा बरोबर यायला तयार झाला. दोघांनी आलेल्या मार्गाने विहिरीत प्रवेश केला आणि तेथून वर आले.

त्यांना पाहून विहिरी जवळ जमा झालेल्या लोकांना अत्यन्त आनन्द व आश्चर्य वाटले. आई-वडिलांचा आनन्द गगनात मावेना. आपला मुलगा जिवन्त असण्याची आशा त्यांनी जवळ जवळ सोडून दिली होती. म्हणून त्यांनी धीरसिंहाचे साहस, पराक्रम आणि परोपकार-बुद्धि यांची मनः-पूर्वक प्रशंसा करून त्याला आशीर्वाद दिले.

आंता धीरसिंहाने पुन्हा आपला पुढील प्रवास सुरू केला. तीन दिवस चालत राहिल्यावर त्याला आणखी एक नगर आढळलं. तेथे त्याला एक अनुभवी वृद्ध माणूस भेटला. धीरसिंहाने त्या वृद्धाला गुलाबपाण्याने भरलेल्या माया-सरोवराबाबत विचारले. वृद्धाने समजाऊन सांगितले—"आज पर्यंत जे लोक हे सरोवर



पहायला गेले, त्यांच्या पैकी कोणी ही परत आलेला नाही. तेव्हा तेथे जाण्याची इच्छा करणे हे आत्महत्या करण्यासारखे आहे. समजलं?" तरी पण धीरसिंहाने आपला निश्चय अटळ ठेवला आणि त्या सरोवरा पर्यंत जाण्याचा मार्ग वृद्धाला विचारला. शेवटी वृद्धाने मार्गदर्शन केले—"या नगराचे दक्षिण द्वार ओलांडून दहा योजन चालत गेलास तर रस्त्याला दोन फाटे फुटतील. उजव्या बाजूच्या पाऊलवाटेने पुढे गेलास तर एक डोंगर दिसेल. त्या डोंगरा पलीकडे विरजापुर नावाचे राजधानीचे शहर आहे. गुलाब-पाण्याचे माया-सरोवर या नगरीच्या राज्याच्या अधिकार-क्षेत्रात आहे. येथील



राजाला माणिक मोत्याचे फार आकर्षण आहे. तू काही माणिक राजाला भेट म्हणून दिलेस तर राजाचे प्रेम संपादन करू शकशील, आणि मग तुला माया-सरोवराचे दर्शन घडेल." ही सर्व माहिती सांगून वृद्धाने धीरसिंहाला आशीर्वाद दिला आणि तो आपल्या वाटेने चालू लागला.

वृद्धाने केलेल्या मार्गदर्शनानुसार धीरसिंह वाट चालू लागला, अनेक संकटांना तोंड देत शेवटी डोंगरा पलिकडे विरजापुर नगरीत पोचला. राजाची भेट घेऊन त्याला मूल्यवान माणिक-रत्नांचा नजराणा दिला. धीरसिंहावर प्रसन्न होऊन राजा म्हणाला—"तू मला रोज रत्नांचा नजराणा देत आहेस, माझ्याकडून तुला काही पाहिजे असेल तर मागून घे."

धीरसिंह नम्रतापूर्वक म्हणाला—"महाराज, माझ्या इच्छेची पूर्ति निश्चितपणे करण्याचे आश्वासन आपण देत असाल, तरच मी आपणास एक विनंती करणार आहे. आपणास धर्म-संकटात टाकण्याची माझी इच्छा नाही."

"तू जरा ही संकोच करू नकोस. तुझी कसली ही इच्छा असली, तरी मी ती पूर्ण करीन. तुला काय हवे ते माग." राजाने वचन दिले.

"तर मग महाराज, गुलाब पाण्याने भरलेले माया-सरोवर पाहण्याची इच्छा आहे. कृपा करून परवानगी द्याल?"

धीरसिंहाची ही इच्छा जाणून राजाला मोठे आश्चर्य वाटले. अमळ धीरसिंहाला सावधान करीत राजा म्हणाला—"तुझ्या शत्रूंनी तुझ्या मनात माया-सरोवर पाहण्याची इच्छा जागृत केली असावी! कारण त्या मायेत अडकलेला कोणी ही आज पर्यंत परत आलेला नाही. म्हणून तू आपली ही इच्छा सोडून द्यावीस हे बरे!"

पण धीरसिंहाने आपला सरोवर पाहण्याचा हट्ट सोडला नाही. मग नाइलाजाने राजाने आपल्या दोन शिपायांना बोलवून धीरसिंहाला गुलाब-पाण्याने भरलेल्या माया-सरोवराजवळ नेण्याची आज्ञा केली.

त्या नगराच्या दक्षिण दिशेला थोड्या अंतरावर एका भव्य द्वारापाशी चार शिपाई पहारा देत होते. द्वाराच्या जवळच एका फलकावर सूचना लिहिलेली होती—"ज्या व्यक्तीला आपल्या प्राणांचा मोह असेल त्याने आत प्रवेश करू नये."

पहारेकऱ्यांनी फाटक उघडले. धीरसिंहाने आत प्रवेश करताच दारे आपोआप बन्द झाली. तीन पावले पुढे चालून त्याने मागे वळून पाहिले. ते फाटक व त्याची दारे अदृश्य झालेली होती. भिंत पण दिसेना, चारी बाजूंना फक्त विशाल मैदान दिसलं. थोड्या वेळाने आपल्या लांब केसांची वेणी घातलेला एक विचित्र माणूस पुढे आला. धीरसिंहाला नमस्कार करून तो म्हणाला—"इथे येणारांना गुलाब-पाण्याच्या सरोवराचे स्नान घडविण्याचे माझे काम आहे, चल."

धीरसिंह त्याच्या मागे चालू लागला. काही अंतर चालून गेल्यावर त्याला एक विशाल भवन दिसलं. मध्यभागी सुगंध पसरवणारं गुलाब-पाण्याचं सरोवर त्याला दिसलं. धीरसिंहाला सरोवर दाखवीत तो माणूस म्हणाला—"तू या सरोवरात उतरून मध्य-भागी जा. मी पण येतोच तुझ्या बरोबर!"

धीरसिंह सरोवरात उतरला...गुडघ्यां पर्यंत पाणी होतं. किनाऱ्यावरचा लोटा घेऊन





तो विचित्र माणूस ही पाण्यात उतरला. तिनदा लोट्यात पाणी घेऊन त्याने धीर-सिंहाला स्नान घातले. तिसऱ्यांदा लोटा पालथा करताच तो विचित्र माणूस अदृश्य झाला. सरोवरातील पाणी क्षणोक्षणी वाढू लागले आणि धीरसिंहाच्या गळ्यापर्यंत पोचले. त्याने वर पाहिले, एक साखळी लटकत असलेली त्याला दिसली. धीर-सिंहाने एकदम उंच उडी मारली आणि ती साखळी हातात पकडली. दुसऱ्याच क्षणी एक 'ढाम्' असा आवाज झाला आणि चारी बाजूला दाट अंधार पसरला. खरो-खरीच काय झालंय याचा अंदाज घेण्या-साठी धीरसिंहाने इकडे-तिकडे पाहिले. त्याला तें भवन ही दिसलं नाही. आणि सरोवर ही. तो एका हिरव्या गवताने आच्छादिलेल्या मैदानावर उभा होता. तेथे त्याला एक छोटा पण उंच मंडप दिसला. त्याच्या चारी बाजूला अनेक संगमरवरी मूर्ति त्याने पाहिल्या. मण्डपा पासून थोड्या अंतरावर एका सपाट टेकाडावर एक धनुष्य आणि बाणांनी भरलेले तीन भाते त्याला दिसले.

धीरसिंह हळू हळू मण्डपाच्या जवळ गेला. तेथे मध्यभागी एक सोन्याचा पिंजरा लटकत होता. पिंजऱ्यात एक पंचरंगी पोपट होता. मंडपाच्या एका भिंतीत एक दगडी फलक जडवलेला होता आणि त्यावर खालील मजकूर लिहिलेला होता.

"पाचशे वर्षां पूर्वी महाराजा अमरतेज या प्रदेशात शिकारीसाठी आला होता. त्याला इथे एक अपूर्व जीव-मणि सापडला. त्याच्या पश्चात् तो मणि योग्य त्या माणसालाच मिळावा अशा विचाराने त्याने आपल्या मायाशक्तिच्या बळावर गुलाब-पाण्याचे हे सरोवर व सभोवतालचा प्रदेश निर्माण केला आणि मणि सुरक्षित ठेवण्याची व्यवस्था केली. टेकाडावर ठेवलेले धनुष्य हाती घेऊन जो कोणी पिंजऱ्यातील पोपटाच्या डाव्या डोळ्यावर बरोबर नेम मारील त्याला या माये वर विजय मिळेल

व जीव-मणि प्राप्त होईल. अन्यथा त्याचे संगमरवरी मूर्तींत रूपान्तर होईल!"

धीरसिहाने तावडतोब टेकाडा वरील धनुष्य हाती घेतले आणि बाण लावून पोपटाच्या डाव्या डोळ्यावर नेम धरला, पण तो चुकला. इतक्यात गुडघ्यां पर्यंत त्याचे शरीर संगमरवरी होऊन गेले. त्याने लगेच दुसरा बाण सोडला, पण तो ही चुकला. आता कमरे पर्यंत त्याचे शरीर संगमरवरी झाले. पिंजऱ्यातला पोपट खो-खो हंसत उपहासाने म्हणाला—"धीरसिह, तू वायाचि शिणतो आहेस. मला मारणं तुला कसं शक्य होईल?"

दृढ निश्चय करून धीरसिहाने नेम धरून तिसरा बाण सोडला. तो मात्र नेमका पोपटाच्या डाव्या डोळ्यात घुसला. वीज कडकडावी असा भयंकर आवाज झाला. क्षण भर असं वाटलं की मेघांचा गडगडाट आणि विजेच्या कडकडाटाने पृथ्वीचा थरकाप झाला आहे. थोडा वेळ मंडप नि पिंजरा यातील काहीच दिसलं नाही. आता त्या प्रदेशात शुभ्र चांदणं पसरलं. थोड्या अंतरावर तो अपूर्व जीव-मणि आपल्या तेजाने चमकत धीरसिहाला आकर्षून घेऊ लागला. धीरसिहाने मणि हाती घेऊन संगसरवरी मूर्तींना स्पर्श केला. लगेच त्या मूर्तींतून राजकुमार प्रकट झाले. मायेतून मुक्त झाल्याच्या आनंदात त्यांनी धीरसिहाजवळ आपली कृतज्ञता प्रकट केली आणि आपापल्या मायदेशी जायला निघाले.

यानंतर धीरसिह विदिशा नगरीकडे परत आला. गुलाब-पाण्याने भरलेल्या माया-सरोवराची माहिती मिळविण्यासाठी त्याने ज्या संकटांशी सामना दिला, त्याची सविस्तर हकीगत धीरसिहाने सुलोचनेला सांगितली. ती ऐकून सुलोचना म्हणाली—"तू सांगतोस ते सर्व खरं आहे. तुझ्यामुळे मायेतून मुक्त झालेले सर्व राजकुमार तुझे साहस व पराक्रम यांची सर्वत्र प्रशंसा करीत आहेत. उद्या तू पुन्हा ये, म्हणजे मी माझा शेवटचा व पाचवा प्रश्न तुला विचारीन." असे सांगून सुलोचनेने धीरसिहाला निरोप दिला.



# राजयोग

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाजवळ परत आला, झाडावरून प्रेत उतरवून आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमी प्रमाणे मुकाट्याने श्मशानाकडे चालू लागला. तेव्हां प्रेतात वास करणारा वेताळ म्हणाला—"राजन्, कार्य करण्याचा आपण दृढ संकल्प केला आहे आणि त्यासाठी श्रमाची पर्वा न करता आपण जो कठोर प्रयत्न करीत आहात त्याची प्रशंसा केली पाहिजे. कधी कधी अनुकूल परिस्थितीत आपल्या ईप्सित कार्यात अनपेक्षितपणे दुप्पट यश मिळू शकते, पण ते समजून घेण्याचा विवेक आणि काळाची पारख नसली तर मनुष्य सद्भाग्याला लाथ मारणारा मूर्ख बनू शकतो. शिवशंभु नावाच्या एक धनगराने अगदी असेच केले. श्रम विसरण्यासाठी मी आपणास ती गोष्ट सांगतो ऐका."

वेताळ गोष्ट सांगू लागला :—

## वेताळाच्या गोष्टी



शांतिपुरी नावाच्या राज्यातील एका गावात शिवशंभु नावाचा एक धनगर युवक रहात असे. तो मोठा बहाद्दर होता, त्याला आपलं असं कोणी नव्हतं. रोज तो काही गावकऱ्यांच्या शेळ्या-मेंढ्या गावापासून दूर अंतरावर असलेल्या डोंगरावर चरण्या-साठी घेऊन जात असे. एके दिवशी एक मुनि त्या डोंगरावरून खाली आला.

मुनीने युवक शिवशंभूला आशीर्वाद देत म्हटले–"वत्स, तुझ्या नशिबात राजा बनण्याचा योग आहे. एक महिन्याच्या आत तू एका राज्याचा राजा होशील! त्यासाठी तयार रहा." असं सांगून मुनि आपल्या वाटेने पुढे चालू लागला.

शिवशंभूला मोठं आश्चर्य वाटलं. एक सामान्य धनगर राजा कसा काय बनणार? जरा विचार केल्यावर त्याला वाटलं की साधूची वाणी सत्य होणारच. गावात जाऊन त्याने ही वार्ता लोकांना सांगितली. लोक त्याला मूर्ख समजून हंसू लागले.

शरध नावाच्या एका शिप्याला थोडी मजा करावी असे वाटले. तो म्हणाला–"अरे शिवा, तू तर आता आमचा राजा होणार! असे फाटके कपडे घालून हिंडणं बरं नाही! तुला राजासारखे कपडे शिवून देतो. मग तुझं नशीब उचकटेल!"

शिवशंभूने जे काही पैसे जमवून लपवून ठेवले होते ते सर्व खर्चून उंची कापड खरेदी केलं नि ते शिप्याला दिलं. शिप्याने त्याचे छान शानदार कपडे शिवले. ते कपडे घालून शिवशंभु गावात इकडे-तिकडे संचार करू लागला. त्याचे कपडे पाहून गावकरी त्याच्याकडे उपहासाने पाहू लागले.

मल्लवर्मा नावाच्या एका पैलवानाने शिवशंभूला विचारलं–"तू मल्लयुद्ध करू शकतोस?"

"नाही!" शिवशंभु म्हणाला.

"तुला तलवार चालवता येत नाही. तुझ्याजवळ एक तलवार सुद्धा नाही. तू पण कसला राजा?" पैलवानाने शिवशंभूची थट्टा केली.



शिवशंभु एक प्रतिष्ठित गावकरी विश्व-शर्माकडे गेला. तो तरुणांना लाठी व तलवार चालवायला शिकवी. विश्वशर्माला तो म्हणाला–"मी राजा होणार आहे. मला तलवार चालवायला शिकवशील?"

विश्वशर्मा मनातल्या मनात हंसला आणि म्हणाला–"त्यात काय मोठंसं? प्रथम तुझ्याकडे एक तलवार असली पाहिजे. ती कोठून तरी पैदा कर."

शिवशंभूने आपल्या जवळचे सगळे पैसे खर्चून कपडे बनवलेले होते. आता तलवार कोण देणार? असा विचार करीत तो भैरव नावाच्या एका लोहाराकडे गेला. तो लोहाराला म्हणाला–"भैरव, मी लवकरच राजा होणार आहे. माझ्यासाठी एक छान तलवार बनवून देशील? मी राजा झालो की तुला उत्तम बक्षिस देईन."

भैरव हसत म्हणाला–"शिवशंभु, ऐक, माझ्या सहा मेंढ्या हरवल्या आहेत. त्या शोधून दिल्यास तर मी तुला हमखास एक तलवार बनवून देईन.

शिवशंभु मेंढ्यांच्या शोधात निघाला. गावापासून खूप दूर गेला. शेवटी एका बागेत चिंचेच्या झाडाखाली त्याला हरवलेल्या मेंढ्या दिसल्या. त्या मेंढ्यांना हाकत तो गावाकडे निघाला. रस्त्यात त्याला एक रथ येताना दिसला.



शांतिपुरी राज्याची राजकुमारी नलंदा आपल्या सख्यांसह त्या रथातून चालली होती. तिने पाहिले की एक राजाचा वेष धारण केलेला धनगर मेंढ्या हाकत चालला आहे. तिने आपला रथ थांबवला, खाली उतरून हंसत त्या धनगराला म्हणाली–"तू कुठल्या देशाचा राजकुमार अशा मेंढ्या हाकत चालला आहेस?"

राजकुमारीच्या सौंदर्यावर मोहित होऊन शिवशंभूने जरा ही न घाबरता विचारले–"आज मी कोणत्या ही देशाचा राजकुमार नाही, पण मी एक महिन्यात राजा होणार आहे. राजा झाल्यावर माझी तुझ्याशी लग्न करण्याची इच्छा असेल. तुला हे मान्य आहे?"

शिवशंभूचे बोलणे ऐकून राजकुमारीला अतिशय राग आला. सेवकांनी शिवशंभूला पकडून त्याचे हात बांधले. थोडे पुढे गेल्यावर शराबन्दी नावाचा एक पर्वताकार राक्षस त्यांना सामोरा आला. त्याच्या डोक्यावर मुकुट होता. त्याच्या अंगावर खूप सोन्याचे दागिने होते. त्याच्या कमरेला तलवार लटकत होती, आणि त्याच्या डाव्या हातात रत्नखचित गदा होती. त्या भीमकाय राक्षसाला पाहताच राजसेवक, राजकुमारीच्या सख्या आणि रथाचा सारथी हे लोक पळून गेले.

हात बांधलेल्या शिवशंभूकडे पहात राक्षस शराबन्दीने विचारले–"बिचाऱ्या तू रे काय अपराध केलास, सांगशील?"

"मी तर काहीच अपराध केलेला नाही!" निर्भयपणे शिवशंभूने उत्तर दिले आणि मग आपली सर्व कहाणी सांगितली.

सगळं काही ऐकून शराबन्दी नलन्दाकडे वळून म्हणाला–"राजकुमारी, मी शराबन्दी नावाचा राक्षस आहे. भूलोकावरील सर्व चांगल्या गोष्टी पाहून त्यांचा आपल्या लोकात कसा अंमल करता येईल हे पाहण्यासाठी मी येथे आलो आहे. मी अदृश्य रूपात राहून या तरुणाला मुनीने दिलेल्या आशिर्वादाबाबत जाणले आहे. हा तुला जे काही म्हणाला, त्यात त्याचा काही दोष मला दिसत नाही. त्यानी एवढेच म्हटलं की राजा झाल्यावर तुला संमत असेल तर तो तुझ्याशी लग्न करील. यावर तुला एवढं रागवायला काय झालं?"

नलन्दा रागाने म्हणाली–"तो तर एक धनगर आहे. मी आहे राजकुमारी! काही दिवसांपूर्वी अचानकपणे माझे वडील वारले. म्हणून मी या राज्याची शासिका बनले. या तरुणात नावाला सुद्धा काही वीराची लक्षणं दिसताहेत का? अशा स्थितीत माझ्याशी विवाह करण्याची इच्छा करणं हा सुद्धा अक्षम्य अपराध आहे."

हे उत्तर ऐकून राक्षस हंसला आणि म्हणाला–"जर एखाद्या तरुणाला कशाचा ध्यास असेल नि तो कर्मयोगी असेल तर त्याला चांगला वीर व्हायला किती वेळ लागणार? मी एका पंधरवड्यात याला महावीर करून टाकीन. मग तर तू त्याच्याशी लग्न करशील?"

नलन्दा क्षण भर गप्प राहून म्हणाली– "सिंहपुरीचा राजा विक्रमसिंहाने माझ्या राज्यावर अन्यायाने आक्रमण केले. जर या युवकाने विक्रमसिंहाचा पराभव करून दाखविला तर मी याच्याशी अवश्य लग्नाला तयार होईन!"

राक्षसाने हे सर्व ऐकून घेतले. नंतर नलन्दा तेथून निघून गेली. राक्षसाने एक पंधरवड्यात शिवशंभूला गदा-युद्ध, धनुर्विद्या, खड्ग-युद्ध वगैरे विद्यांचे शिक्षण दिले.

यानंतर राक्षस नि शिवशंभू दोघे जण मिळून विक्रमसिंहाकडे गेले. तेथे विक्रम-







सिंहाने आपल्या सेनेसह पडाव टाकला होता. राक्षसाला पाहताच विक्रमसिंहाचे सैनिक चारी दिशांना पळून गेले. पण विक्रमसिंहाने तलवार उपसली आणि शिवशंभूवर त्याने हल्ला केला. काही वेळ दोघांच्यात चांगलीच झटापट झाली. इतक्यात शिवशंभूने विक्रमसिंहाच्या तलवारी वर वार केला आणि ती दूर जाऊन पडली. विक्रमसिंह घाबरून घोड्यावर स्वार झाला आणि पळून गेला.

दुसऱ्या दिवशी राक्षसाने शिवशंभूला बरोबर घेतले आणि ते नलन्दाकडे पोचले. राक्षस नलन्दाला म्हणाला—"राजकुमारी, शिवशंभूने विक्रमसिंहाचा पराभव केलेला आहे. तो घोड्यावर बसून आपल्या राजधानीकडे पळून गेला."

नलन्दा म्हणाली—"विक्रमसिंहाचा पराभव करण्याचं श्रेय शिवशंभुला कसं देता येईल? तुला राक्षसाला पाहून त्याची सेना पळाली आणि या गोंधळात विक्रमसिंहाला पराभूत करणं हे काही मोठं शौर्य नाही."

"तू तर मोठी हुशार दिसते आहेस. पण तुझ्या राजनीति-तंत्राचा वापर आमच्यावर नको करूस!" राक्षस म्हणाला.

नलन्दा काही उत्तर देणार एवढ्यात राजसेवकांनी प्रवेश केला आणि बातमी दिली—"महाराणी, विक्रमसिंह घोडयावरून खाली पडला आणि मेला. त्याच्या दुष्ट शासनामुळे त्रासून गेलेले मंत्री, राज्याचे पदाधिकारी व काही प्रमुख लोकांनी मिळून विक्रमसिंहाला पराभूत करणाऱ्या शिवशंभूला राजा बनविण्याचे ठरवले आहे. ही वार्ता आताच इतक्यात येथे पोंचली."

हे वृत्त ऐकून नलन्दाने लाजून शिवशंभूकडे पाहिले. आणि म्हाणली—"आता तुझ्याशी लग्न करायला माझी काही हरकत नाही."

राक्षस मोठ्याने खदाखदा हसत उद्गारला—"मला वाटतं की आम्ही राक्षसवंशी लोकच तुम्हां मानवांहून अधिक उदार आहोत." नंतर शिवशंभूकडे वळून राक्षस म्हणाला—"हं, आता बोल शिवा, तुला राजकुमारीशी विवाह करायला काही अडचण नाही?"

शिवशंभूने दृढपणे उत्तर दिले—"माझी या राजकुमारीशी लग्न करण्याची मुळिच इच्छा नाही."

शिवशंभूच्या खांद्यावर थाप देत राक्षसाने प्रशंसोद्गार काढले—"शाबास शिवा, तुझा निर्णय मोठा विवेकपूर्ण आहे. तू एक राजा व्हायला सर्वस्वी योग्य आहेस!" नंतर राक्षस तेथून निघून गेला.

वेताळाने राजाला ही गोष्ट ऐकवून विचारलं—"राजा, जर शिवशंभूने नलन्दाशी लग्न केले असते तर तो सिंहपुरी बरोबर शान्तिपुरीचा ही राजा झाला असता. असली सुरेख संधि हातची सोडणे मूर्खपणाच नाही तर काय? असल्या माणसाची ज्या राक्षसाने तारीफ केली त्याला काय म्हणावं? या माझ्या शंकेचं समाधान जाणून ही तुम्ही न केलं तर तुमच्या शिराचे तुकडे तुकडे होतील."

विक्रमादित्याने उत्तर दिले—"नलन्दा ही अत्यन्त स्वार्थी आहे. आक्रमक होऊन आलेल्या विक्रमसिंहाचा शिवशंभूने पराभव केला. तरी काही सबब सांगून नलन्दाने त्याच्याशी विवाह करण्यास मान्यता दिली नाही. पण जेव्हां तिने ऐकले की शिवशंभु सिंहपुरीचा राजा झाला आहे, तेव्हां लगेच ती निःसंकोचपणे त्याच्याशी लग्न करायला तयार झाली. यावरून शिवशंभूने ताडले की नलन्दा मोठी स्वार्थी आहे आणि तिच्या मनात अधिकाराची तीव्र लालसा आहे. म्हणूनच त्याने तिच्याशी विवाह करण्यास मान्यता दिली नाही. राक्षसाने हे सर्व जाणून शिवशंभूची प्रशंसा केली."

इतके सांगून राजा गप्प झाल्यावर वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुनः झाडावर जाऊन बसला. (कल्पित)



# सावत्र आई

साहित्याची चांगली जाण असणाऱ्या एका स्त्री ने आपल्या सावत्र मुलाला, सख्ख्या मुलाहूनही खूप चांगल्या तऱ्हेने वाढवले. तो आपल्या या आईच्या देखरेखीखाली एक महान् कवि बनला!

सावत्र आयांच्या अत्याचारांची अगदी कडक शब्दांत टीका करणारे एक व्यंग-काव्य त्याने रचले आणि ते चांगलेच लोकप्रिय झाले. राजानेही त्याचे या काव्याबद्दल अभिनन्दन करून त्याला चांगले मोठे बक्षिसही दिले. हा सगळा मान-मरातब मिळाल्यानंतर त्याने घरी येऊन आपल्या सावत्र आईच्या पायांवर डोके टेकले!

यावर आई त्याला म्हणाली–"बाळा, जगात आधीच सावत्र आयांबद्दल सर्वांचं मत कलुषित असतं. मी तर तुला चांगलं लाडा-कोडाने वाढवलं ना? मग तू सावत्र आयांवर असं काव्य लिहिलंस हे योग्य केलंस का?" असे बोलत ती बिचारी रडू लागली!

"आई, क्षमा कर मला. जगातल्या सगळ्याच सावत्र आया तुझ्यासारख्या असत्या तर हे काव्य मला लिहिताच नसते आले. तू म्हणजे साक्षात् देवी! तूच सांग, इतर सावत्र आयांच्या वागणुकीला काय म्हणावे?" असे म्हणत त्याने आईचे अश्रु पुसून टाकले.





# ज्ञानाचा खजिना

## या महिन्याचे इतिहासप्रसिद्ध व्यक्तित्व



महाराणा प्रताप

राजपुतान्यातील प्रसिद्ध वीरश्रेष्ठ महाराणा प्रतापसिंह याचा जन्म ९ मे १५४० रोजी झाला. त्याचे वडील मेवाडचे राणा उदयसिंह.

प्रतापसिंह जेव्हा मेवाडचा महाराणा बनला, त्यावेळी अकबर आपले राज्य विस्तृत करण्याच्या मागे लागलेला होता. त्याला मोठे आव्हान मिळाले ते रजपूत राजांकडून! परंतु अकबराने या रजपूत राजांना एक एक करून आपल्या राज्य-तंत्र कौशल्याच्या साह्याने अथवा प्रत्यक्ष लढाई करून जिंकून घेण्यात यश मिळवले. परंतु एकच राजा बधला नाही, त्याने अकबराचे सार्वभौमत्व मानले नाही—तो होता महाराणा प्रताप!

हल्दीघाट येथे ५ एप्रिल, १५७६ रोजी महाराणा प्रताप व मानसिंहाच्या आधिपत्याखालील अकबराचे सैन्य यांच्यात घनघोर युद्ध झाले. या लढाईत महाराणा असामान्य धैर्याने लढला आणि तोच हे युद्ध जिंकणार अशी चिन्हे दिसत असतानाच अकबराला ताज्या सैनिकांची कुमक आली; आणि दुर्दैवाने महाराण्याचा प्रिय घोडा चेतक जखमी झाला! तरीही त्या अवस्थेत चेतक राण्याला सुरक्षित स्थानी घेऊन गेला.

या संस्मरणीय लढाईनंतरही महाराणा प्रतापने धीर सोडला नाही. त्याने एक नवीन किल्ला बांधला आणि मुगलांच्या ताब्यातील आपल्या मुलखाचे काही भाग त्याने परत मिळवले. १५९७ त तो मृत्यु पावला. परंतु भारताचा एक वीरमणी सुपुत्र म्हणून त्याचे नाव भारतीयांच्या मनात अमर झाले आहे.

## तो कोण?

दक्षिणे कडील एका मन्दिरावर दिल्लीच्या सुलतानाने हल्ला चढवला. उत्सवात मिर-वण्यात येणारी देवाची मुख्य मूर्ति आणि इतर अमूल्य संपत्ति सुलतानाच्या लोकांनी पळवून नेली.

यानंतर काही दिवसातच एक मोठा साधु दिल्लीला पोचला आणि आपल्या अथक प्रयत्नांनी ती मूर्ति परत करण्याचे वचन त्याने सुलतानाकडून मिळवले. मूर्ति सुलतानाच्या मुलीच्या ताब्यात होती. तिने ती साधूच्या ताब्यात दिली.

परंतु साधूने जेव्हा दक्षिणेकडे परतीचा प्रवास सुरू केला तेव्हा त्याच्या लक्षात आले की, एक पडदानशीन स्त्री गाडीच्या मागे मागे येत आहे. पुष्कळ दिवस लोटले. त्या स्त्रीची पदयात्राही चालूच राहिली. शेवटी साधूला कळून चुकले की ती स्त्री दुसरीतिसरी कोणी नसून ती सुलतानाची मुलगीच आहे! तिचे त्या देवावर इतके अलोट प्रेम होते की त्या मूर्तीवाचून जगणेच तिला अशक्य वाटले! त्या प्रेमळ साधूने तिला देवळात राहू दिले. तेथेच तिचा मृत्यु झाला. तिच्या सन्मानार्थ काही मुस्लिम रिवाज त्या देवळात पाळले जाऊ लागले.

हा साधू कोण? पान ८ पहा

## पाण्याच्या धारेतील बाक



**सूचना :**

पाण्याचा नळ असा सोडून ठेवा, की नळातून एक पातळशी, परंतु स्थिर अशी पाण्याची धार वाहत राहील. आता हवेने भरलेला एक फुगा कोरड्या लोकरी कपड्यावर जोराने घासून तो तो या पाण्याच्या धारेपासून काही इंच इतक्या अंतरावर धरा.

### काय होते आणि का ?

पाण्याच्या धारेला मधेच बाक आल्यासारखा वाटतो नाही ? नळातून पाणी सरळ खाली पडण्याऐवजी मधेच ते फुग्याच्या बाजूला थोडेसे वळते आणि मग पुन्हा सरळ खाली पडते.

खरे पाहता पाण्याच्या पातळशा धारेला एका बाजूला वळवण्यासाठी फारच थोड्या शक्तीची आवश्यकता असते. फुग्याच्या पृष्ठभागावर अगदी थोडीशी विद्युत्-शक्ति निर्माण झालेली असते आणि तीच पाण्याच्या धारेला तिच्या मार्गापासून आपणाकडे आकर्षून (ओढून) घेते ; फुगा लोकरीच्या कोरड्या कपड्यावर घासल्यामुळे फुग्याच्या पृष्ठभागावर अनेक विद्युत् परमाणु जमा होतात आणि त्यामुळे तयार झालेल्या विद्युत-शक्तीला 'स्थिर विद्युत' असे म्हणतात. ज्यादा विद्युत परमाणु हळूहळू हवेत विलीन होतात; परंतु असे दिसते की ते विलीन होण्यासाठी पाण्यासारख्या पदार्थाकडे अधिक वेगाने ओढले जातात. आणि हे विद्युत्-परमाणु विलीन होताना ते ज्यात विलीन होणार त्याकडे थोडेसे आकर्षण निर्माण होते.

आपण फुगा पाण्याच्या धारेच्या फार जवळ जाऊ दिला तर तो प्रवाह फुग्यावरून जाईल व त्यावर आपटेल, बरोबर आहे ना ? आणि हा ओला फुगा आता पाण्याला एका बाजूला ओढू शकेल ?

विद्युत्-भारीत फुग्याने कागदाचे छोटे तुकडे अथवा चुरगुरे तुम्ही उचलू शकाल ? स्वत: करून तर पहा.





# अलेक्झांड्रियातील दीपस्तंभ

अलेक्झांड्रिया शहरापासून जवळच, फारोस नावाच्या एका बेटावर, टॉलेमी फिलाडेफस याने बांधलेला विशाल दीपस्तंभ उभा होता. इ. स. पू. तिसऱ्या शतकात हा अस्तित्वात आला. पांढऱ्या संगमरवरी दगडाने हे बांधकाम केलेले होते. त्याला अनेक मजले होते. प्रत्येक वरचा मजला हा त्याच्या खालच्या मजल्याहून लहान होता. त्याची उंची ५२० फूट होती व त्याच्या वरच्या टोकावर केलेला जाळ समुद्रातून ३० मैल अंतरावरून दिसे. भूकंप व समुद्राच्या लाटांमुळे तो दीपस्तंभ हळूहळू नष्ट झाला. परंतु त्याचे अवशेष १३ व्या शतकापर्यंत पहायला मिळत असत.



# विचार करणारा मर्त्य त्याचे विचार अमर!

आपणास आठवणारही नाही. इतक्या प्राचीन काळा पासून प्रगतीशील विचारवन्त आणि पुराणमतवादी लोक यांच्यात नेहमीच झगडा चालत आलेला आहे. विचार-स्वातन्त्र्य व भाषण-स्वातन्त्र्य यांच्या द्वारेच मानवाची प्रगति होऊ शकते. परंतु सनातनी लोकांच्या हे ध्यानात येत नाही.



आणि म्हणूनच, इ. स. पू. सहाव्या शतकातल्या अथेन्सच्या सनातनी संस्कृति संरक्षकांना स्वतः योग्य विचार कसा करावा आणि अंधश्रद्धा व पूर्वग्रह दूषित कल्पनांपासून मुक्त कसे व्हावे या गोष्टी तेथील तरुणांना शिकवणाऱ्या तत्त्ववेत्त्याचे शिकवणे आवडेना! तरुण लोग या तत्त्वज्ञानी व्यक्तीला अत्यंत शहाणा माणूस समजत तर या उलट सनातनी लोकांनी त्याला दुष्ट व विक्षिप्त ठरवले! सार्वजनिक रित्या असे जाहीर केले गेले की तो तरुण पिढीला बिघडवत आहे. पाचशे-एक सभासद असणाऱ्या, न्यायाधीशांच्या एका मोठ्या मंडळाने त्याची चौकशी केली. सॉक्रेटीसने आपल्या विरुद्ध असलेल्या आरोपांना हुशारीने व चातुर्याने उत्तरे दिली. परंतु न्यायाधीशांनी त्याला दोषी ठरवले आणि मृत्युदंड ठोठावण्यात आला. हेमलॉक नावाचे विष पिऊन मरायची शिक्षा त्याला सुनावण्यात आली!

त्याच्या शिष्य व चाहत्यांनी त्याला गराडा घातला. सर्वांच्या डोळ्यात अश्रु होते, परंतु सॉक्रेटीसचा चेहरा मात्र हसरा व आनन्दी होता! त्याने आपल्या अनुयायांना दुःख न करण्याबद्दल सांगितले. "मृत्यु म्हणजे काहीही नसण्याची स्थिति, किंवा आत्म्याचे या जगातून दुसऱ्या जगाकडे गमन.........
आता जाण्याची वेळ आली आहे, आपण आपापल्या मार्गाने जाऊ या. मी मृत्यूकडे आणि तुम्ही जीवनाकडे देवलाच ठाऊक कोणता मार्ग जास्त चांगला!"

सर्वांच्या भल्याबद्दलचे हास्य चेहऱ्यावर ठेवूनच सॉक्रेटीसने हेमलॉकचा शेवटचा थेंब संपवला आणि त्याची शुद्ध हरपली! अशा प्रकारे अथेन्सच्या कोत्या मनाच्या लोकांनी आपल्याच देशातल्या अत्यन्त बुद्धिमान व्यक्तिचा शेवट घडवून आणला!

## प्राचीन भारतात भटकन्ती



१. भारतातील एका संस्थानाच्या मुख्य मन्त्र्याने आपल्या व्यक्तिगत जमवलेल्या वस्तूंचे संग्रहालय स्थापन केले. त्याला आता राष्ट्रीय वस्तुसंग्रहालयाचा दर्जा देण्यात आला आहे. त्या मन्त्र्याचे नाव काय ?

२. हल्लेखोरांकडून व परकीय सत्ताधाऱ्यांकडून भारतातले कोणते महत्वाचे मंदिर सहा वेळा भग्न केले गेले ?

३. या मंदिराचे स्थान पवित्र का मानले जाते ?

४. कोणती दोन जगप्रसिद्ध लेणी केवळ एकशे सत्तर वर्षांपूर्वी सापडली ?

५. एक राजपुत्र प्रथम 'भयानक वृत्तीचा' म्हणून ओळखला जाई; परन्तु पुढे त्याला 'धर्मात्मा' म्हणून संबोधले गेले. तो राजपुत्र कोण ?

६. कोणत्या लढाईमुळे बौद्ध धर्माची उन्नति झाली ?

७. 'गेटवे ऑफ इंडिया' नावाने ओळखले जाणारे स्मारक कोठे आहे ?

८. ते केव्हा व कशासाठीं बनवले गेले ?

## घटना, विज्ञान, आविष्कार आणि शोधांची दुनिया

१. दक्षिण ध्रुवापासून उत्तर ध्रुव किती अंतरावर आहे ?

२. वाचायला पुरेसा प्रकाश मिळविण्यासाठी किती काजवे पुरेसे आहेत ?

३. सूर्याभोवती किती धूमकेतु फिरत आहेत ?

४. चार डोळे असणारे मासे कोठे आहेत ?

५. शरलॉक होम्स चा निर्माता सर आर्थर कॉनन डाइल कोणता व्यवसाय करीत असे ?

६. साप कोणत्या इंद्रियाने वास घेतात ?

७. एका राजाच्या जन्म-स्थानाची शोभा कोणत्या चित्ताने वाढवली होती ?

८. बेडकाला आपले डोके फिरवता येते का ?

९. नागतोडयाचे रक्त कोणत्या रंगाचे असते ?

१०. जगातील सर्वात जुना पुतळा कोणता ?

[पान ८ पहा.






१. परमेश्वराचा आत्मा धारण करणारा नगाधिराज असे हिमालयाचे वर्णन कोणी केले आहे ?

२. चन्द्रगुप्त मौर्याची कथा कोणत्या नाटकाचा विषय आहे ?

३. हर्षवर्धनाची कथा कोणत्या ग्रंथात वर्णिलेली आहे ?

४. ज्या भारतीय कवीला ब्रिटिशांनी 'सर' ही पदवी दिली आणि त्याने ती स्वीकारली नाही तो कोण ?

५. कोणती भारतीय भाषा उजवीकडून डावीकडे लिहिली जाते ?

६. ही भाषा कशी निर्माण झाली ?

७. ही भाषा लिहिण्यासाठी कोणत्या लिपीचा वापर केला जातो ?

८. तुलसीदासाच्या रामायणाचे बरोबर नाव कोणते ?

९. तुलसीदास कोठे रहात असे आणि केव्हां ?

......पान आठवर पहा

## सर्व भारतीय भाषांचा एक शब्द शिकू या !

मराठी : उत्तर

| | | |
|---|---|---|
| आसामी : उत्तर | कानडी : उत्तर | संस्कृत : उदीचि |
| बंगाली : उत्तर | काश्मिरी : शुमाल | सिन्धी : उत्तरु |
| इंग्रजी : नार्थ | मल्याळी : वत्तकु | तमिळ : वडक्कु |
| गुजराथी : उत्तर | उडिया : उत्तर | तेलुगु : उत्तरामु |
| हिन्दी : उत्तर | पंजाबी : उत्तर | उर्दू : शुमाल |

## तुम्ही विश्वास ठेवाल ?

१. कि महाकाव्यांच्या काळांतील भारतवर्ष नि आजचा भारत एकच आहेत ?
२. कि लाल चिंधुक पाहून बैल रागावतात ?
३. कि सर्वच पक्षी घरटी बांधतात ?

**अंहं, मुळीच नाही !**

१. तो खूप विस्तृत देश होता.
२. बैलांच्या डोळयांना रंग-ज्ञान नसते.
३. घुबड आणि पोपट सामान्यपणे झाडांच्या पोकळ ढोलीत अथवा अन्य भग्नावशेषात राहतात.

## उत्तरावली

### तो कोण ?

रामानुज, आणि ते मंदिर श्रीरंगम् येथील.

### इतिहास

१. पहिला सालार जंग, हैद्राबादच्या निजामाचा प्रधान मंत्री.
२. सोमनाथचे मंदिर.
३. श्रीकृष्णाने जेथे देह ठेवला असे मानले जाते त्या प्रभास येथे ते आहे.
४. अजंता व एलोरा.
५. अशोक.
६. कलिंगाची लढाई. तिने अशोकाचे हृदय-परिवर्तन केले. त्याने बुद्ध धर्म स्वीकारला आणि त्याचा प्रचार केला.
७. मुंबईच्या अपोलो बंदर या स्थानी.
८. राजा जॉर्ज आणि राणी मेरी यांच्या स्वागतार्थ सन १९११ मध्ये.

### विज्ञान

१. २७९९ मीटर.
२. एक डझन पुरेसे आहेत.
३. शंभर मिलियनहून अधिक.
४. मध्य अमेरिकेत.
५. डॉक्टर.
६. आपल्या जिभेने.
७. मोना लिसा. फ्रान्स चा राजा पहिला फ्रॅन्सिस याने आपल्या जन्म-स्थानी ते लावले.
८. नाही, कारण त्याला मान नसते.
९. पांढरा.
१०. स्फिंक्स.

### साहित्य

१. कालिदास.
२. विशाखदत्ताचे मुद्राराक्षस.
३. बाणभट्टाने लिहिलेले हर्षचरित.
४. रवीन्द्रनाथ टागोर.
५. उर्दू.
६. पर्शियन आणि हिन्दी यांच्या आपसांतील देव-घेवीमुळे. तुर्की भाषेचा ही प्रभाव पडला आहे.
७. पर्शियन.
८. रामचरितमानस.
९. वाराणशीत. त्यांचा काल सन १५३२ ते १६२३ पर्यंत होता.





## नेहरूंची गोष्ट-३

जवाहरलाल नेहरू उच्च शिक्षणासाठी हॅरो सोडून केम्ब्रिजला गेले. तेथे त्यांनी विज्ञानशास्त्राचे शिक्षण घेतले, परन्तु इतिहास, राजनीति आणि अर्थशास्त्राची त्यांना अतिशय आवड होती.

भारतातून प्रकाशित होणारी वर्तमानपत्रे ते मोठ्या आवडीने वाचत असत. विशेषत: जहाल मतवादी बाळ गंगाधर टिळक आणि श्री अरविन्द यांच्या स्वदेश-प्रेमाच्या भावनांनी त्यांना आपल्याकडे आकृष्ट केले. परंतु त्यांचे वडील मात्र मवाळ पक्षाच्या नेत्यांपैकी एक होते.





त्या दिवसात केम्ब्रिजमधे रहाणाऱ्या भारतीयांनी 'मजलिस' नावाची एक संस्था सुरू केली आणि ते नेहमी त्या दिवसातल्या राजनीतीबद्दल चर्चा करीत असत. जवाहरलाल त्या सभेत भाग घेत असत आणि त्या लोकांची भाषणे खूप श्रद्धापूर्वक ऐकत असत. परंतु केवळ संकोचामुळे त्यांनी त्या सभांमधे व्याख्यान कधीच दिले नाही.



१९०९ च्या ग्रीष्म ऋतूत जवाहरलालजींनी आपल्या वडिलांबरोबर युरोप खंडातल्या देशांचा दौरा केला. त्यावेळी त्यांनी विमान प्रथमच पाहिले ! त्या विमानाने काउंट जेप्लिन आले होते. जर्मनीचा राजा कैसर याने त्यांचे मोठ्या आदरपूर्वक स्वागत केले.

१९१० मध्ये जवाहरलाल केम्ब्रिजचे पदवीधर बनले. यानंतर त्यांनी नॉर्वेतून फेरफटका मारला. तेथेच एक दिवस आपल्या युरोपियन मित्राबरोबर ते एकदा नदीत स्नानाला गेले. बर्फासारख्या थंड पाण्याच्या स्पर्शाने त्यांचे हातपाय बधिर होऊ लागले. त्यावेळी उताराकडे वेगाने वाहणाऱ्या जवाहरलालजींचे त्यांच्या मित्रानेच रक्षण केले.





त्यानंतर जवाहरलाल यांनी लंडनमध्ये न्यायशास्त्राचा अभ्यास केला. १९१२ मध्ये (कायद्याचे) पदवीधर बनून ते भारतात परतले. आपला प्रज्ञाशील पुत्र आपल्या वकिलीच्या कामात आपला योग्य वारस म्हणून नाव मिळवील या विचाराने मोतीलाल फार आनन्दित झाले.

स्वदेशात पोचल्याबरोबर जवाहरलाल राजनीतीकडे खूपच आकर्षित झाले. १९१२ मध्ये बांकीपुरला आयोजित केलेल्या कॉंग्रेस परिषदेत त्यांनी भाग घेतला. या सभेत केवळ गोपाळ कृष्ण गोखलेच जवाहरलालजींवर आपला प्रभाव पाडू शकले.





यानंतर जवाहरलालजींनी उच्च न्यायालयात वकिली पेशा सुरु केला. परंतु त्याना या पेशात खास अशी रुचि नव्हती. ते नेहमी शिकारीला जात असत. एकदा त्यांच्या गोळीने जखमी झालेले एक हरीण त्यांच्याकडे आपल्या मोठ्या मोठ्या डोळ्यांनी दीनतेने पाहू लागले. ते पाहून त्यांचे अंत:करण विरघळले आणि त्या दिवसापासून त्यांनी शिकारीला जाणे सोडून दिले.

१९१६ मध्ये लखनऊला झालेल्या कॉंग्रेस परिषदेत जवाहरलालजींनी गांधीजींना प्रथम पाहिले. दक्षिण आफ्रिकेत ब्रिटिशांनी भारतीयांना दिलेल्या अपमानास्पद वागणुकीसाठी त्यांच्याशी झगडणाऱ्या साहसी गांधीजींना पाहून जवाहरलाल फारच आनन्दित झाले.





जवाहरलालजींना आपणाकडे सर्वात अधिक आकर्षित करणारी आणखी एक प्रमुख व्यक्ति म्हणजे–अलाहाबादमध्ये अनेक व्याख्याने देणाऱ्या श्रीमती सरोजिनी नायुडू. त्यानंतर लवकरच जवाहरलालजी एक उत्तम राष्ट्रवादी म्हणून प्रसिद्धीस आले.

१९१६ तल्या वसंतपंचमीच्या दिवशी दिल्लीत जवाहरलालजींचा कमलाबरोबर विवाह परंपरेनुसार मोठ्या थाटामाटात साजरा झाला. नूतन दम्पतिने नेहरू घराण्याच्या पूर्वजांची भूमि काश्मीरमध्ये काही दिवस आनन्दात घालवले.





एकदा नेहरूजी आपल्या एका नातेवाईकाबरोबर लडाख प्रान्तात गेले. तिथे जवळच अमरनाथची गुहा आहे असे समजून दोघेही एका बर्फाळ पहाडावर चढले. पण अचानक पाय घसरून जवाहरलाल एका बर्फानिभरलेल्या भेगेत कोसळले. त्यांच्या नातेवाईकाने तावडतोब त्यांच्याकडे दोर फेकला, आणि त्याला धरून, मोठ्याच संकटातून वाचून जवाहरलालजी वर चढून आले.



# अयाचित धन

पूर्णचन्द्रच्या एका नातेवाइकाने मरताना आपल्या इस्टेटी पैकी पंचवीस हजार रुपये त्याच्या नावे लिहून ठेवले होते. आपल्या वाट्याची ही रक्कम ताब्यात घेण्यासाठी तो त्या शेजारच्या गावी गेला. तेथे पोचल्यावर अनेक लोकांनी त्याचे नशीब उजळल्याबद्दल त्याची तारीफ केली. ती ऐकून त्याच्या मनात कुठेतरी शंकेची पाल चुकचुकली.

पूर्णचन्द्र घरी परत निघाला, तेव्हा नारायण नावाचा एक माणूस त्याला म्हणाला–"तुमच्या गावच्या फुलचन्दची मुलगी माझ्या मुलाला पसन्त पडली आहे. तेव्हा, कृपा करून त्यांना माझ्या वतीने निरोप सांगा, की पुढल्या महिन्यातला मुहूर्त पाहून लग्नाची तारीख पक्की करा अन् तसं मला कळवा."

त्याला निरोप पोचवायचे वचन देऊन पूर्णचन्द्र आपले पंचवीस हजार रुपये घेऊन आपल्या गावी परत आला आणि अगदी पोचल्या पोचल्या सर्वात अगोदर त्याने आपली रक्कम एका जागी पुरून टाकली.

नंतर तो फूलचन्दकडे जाऊन त्याला म्हणाला–"फूलचन्दजी, माझ्यासारखा अभागी या दुनियेत दुसरा कोणी नसेल! माझे सर्व पैसे चोरीला गेले."

त्याला सहानुभूति दाखवत फूलचन्द म्हणाला–"हे बघ पूर्णचन्द्र, आपण गाववाले म्हणून एकमेकांना माहित असलो तरी आपलीतुपली इतकी मैत्री कुठंय? अन् तसे आपण एकमेकांचे नातेवाईकही नव्हेत! मग तू आपलं हे रडगाणं माझ्यासमोर का बरं गातो आहेस?"

पूर्णचन्द्र यावर विषादाने हसत म्हणाला–"अरे! आपले पैसे गेल्याच्या दुःखातच मी इतका बुडून गेलो, की तुम्हाला एक चांगली बातमी देण्यासाठी मी इथे आलो

"वसुंधरा"



आहे हे मी विसरूनच गेलो! अहो, तुमच्या मुलीचं लग्न ठरलं!" आणि पूर्णचन्द्रने नारायणचा निरोप फूलचन्दला सविस्तर सांगितला.

फूलचन्द यावर एकदम आनन्दून म्हणाला–"अरे, तू तर फारच चांगली बातमी आणलीस! सांग बरं मी तुला काय मदत करू?"

"आपण मला फक्त शंभर रुपये कर्जाऊ द्या. असेच आणखी काही मित्रांकडून मी पैसे कर्जाऊ घेऊन चार एकर जमीन खरेदी करीन. लोकांच्या कर्जाला तारण म्हणून माझे छोटे घर आहेच. मी माझ्या जमिनीची खूप मशागत करीन आणि दोन-तीन वर्षांत कर्ज-मुक्त होऊन जाईन. नशीब चांगले असेल तर शेतात खूप धान्य पिकेल.

याप्रमाणे अनेकांकडून कर्ज घेऊन पूर्णचन्द्रने चार एकर जमीन घेतली आणि तो मनापासून शेतात खपू लागला. त्याची कडक मेहनत पाहून गावचे लोक म्हणू लागले–"दृढनिश्चय असावा तर पूर्णचन्द्र-सारखा. त्याच्याकडून सर्वांना काही शिकण्यासारखं आहे."

या वेळी एकूण सर्वत्रच पीकपाणी चांगले झाले. पूर्णचन्द्रचं पीक तर सर्वात जास्त झालं! त्याने त्याच वर्षी आपलं पाऊण हिस्सा कर्ज फेडून टाकलं! तो प्रामाणिक होता आणि शिवाय त्याचं आपलं स्वतःचं घर आहे हे पाहून इतरांनी कर्जाबद्दल त्याला तगादा केला नाही.

दुसऱ्या वर्षी त्याने उरलेलं सर्व कर्ज तर फेडलंच अन् शिवाय आणखी एक एकर जमीनही खरीदली. त्याचा प्रामाणिकपणा व मेहनती स्वभाव पाहून एका शेतकऱ्याने त्याच्याशी आपल्या मुलीचे लग्न लावून दिले. त्याच्या बायकोचं नाव माला.

लग्नानंतर एक दिवशी माला म्हणाली–"तुमच्याशी माझं लग्न व्हावं असं मला खूप पूर्वीपासूनच वाटायचं! पण तुमच्याजवळ जमीनजुमला काहीच नव्हतं, म्हणून माझ्या बाबांचा विरोध होता. पुढे तुम्हाला जेव्हा पंचवीस हजार रुपये मिळणार असल्याचं कळलं तेव्हा तुम्हाला जावई करायचं त्यांच्या मनात आलं; पण पुन्हा ते पैसे हरवल्यावर या बेजबाबदार माणसाला मुलगी देणं नको असं वाटून त्यांनी आपला विचार बदलला. शेवटी स्वतःच्या मेहनतीच्या जोरावर तुम्ही इस्टेट बनवलीत, हे पाहून त्यांनी आपला विवाह करून दिला. पण माझ्या मनात एक शंका आहे." इतके बोलून ती गप्प झाली.

"कसली शंका आहे, सांग तर खरं?" पूर्णचन्द्रने विचारले.

"तसं तर पहिल्यापासूनच तुमच्याजवळ आपलं घर होतं. पण बरेच दिवस तुम्ही इतरांच्या शेतावर काम केलंत, कर्जच काढायचं होतं, तर आधीही तुम्हाला काढता आलं असतं की! तेव्हा आता असं सांगा, की तुम्ही पैसे हरवले म्हणून तुम्हाला मेहनत करावी असं वाटू लागलं की लोकांनी केवळ दया म्हणून तुम्हाला पैसे उधार दिले?" मालाने शंका विचारून टाकली.

पूर्णचन्द्र यावर हसून म्हणाला–"तसं तर खरी गोष्ट कुणालाच ठाऊक नाही. तू माझी बायको आहेस म्हणून खरं सांगतो.



शेजारच्या गावाहून आपले पंचवीस हजार रुपये आणत असतानाच मला फूलचन्दच्या मुलीच्या लग्नाचा निरोपही आणावा लागला. माझा असा अन्दाज आहे की फूलचन्दच्या मुलीच्या लग्नाला दहा हजार तरी खर्च होणारच. तेव्हा मला अचानक पैसे मिळालेले जाणून फूलचन्दने माझ्याच-कडे पैसे कर्जाऊ मागितले असते. त्याचा माझा खास असा परिचयही नव्हता. पण मी 'पैसे नाहीत' म्हणू शकलो नसतो; गाववाल्यांनीही विश्वास नसता ठेवला ना माझ्यावर! पैसे काही मी मेहनत करून मिळवले नव्हते–अचानकच मिळाले होते ते! असल्या पैशांना लोकांच्या मनात काही

किंमत नसते. फूलचन्दच काय, पण गावातल्या आणखी कोणी पैसे मागितले असते तर मी 'नाही' म्हणू शकलो असतो का? लोकांची खप्पा मर्जी झाली असती माझ्यावर! वरं असंच विना कष्टाने मिळालेलं धन कर्जाऊ घेतल्यावर ते लवकर परत करायचीही कोणी फिकीर नसती केली. म्हणून शेवटी मी खोटंच सांगितलं, की पैसा चोरीला गेला!"

यावर माला म्हणाली—"बराच दूरचा विचार केलात की! पण मग खरंच मेहनत करून कर्ज चुकवलंत, की लपवून ठेवलेल्या पैशातनं फेडलंत ते?"

"छे छे! तसं नाही हं! मी मेहनत करूनच कर्ज फेडली. माझा आपल्या मेहनतीवर पूर्ण विश्वास आहे. पण यापूर्वी कर्ज घ्यायला मी भीत होतो. दुर्दैवाने पीक आलं नसतं तर मला माझं एकुलतं एक घर विकून टाकावं लागलं असतं. पण आता पंचवीस हजारपर्यंत कर्ज काढायची हिम्मत आली होती माझ्यात! त्याच हिंमतीने मी खूप मेहनत केली, पैशाचं बळ होतं ना मागे! आणि मला त्या पंचवीस हजाराला हातही नाही लावावा लागला! गावात माझी प्रतिष्ठा वाढली. माझा आपल्या शक्ती अन् युक्तीवर विश्वास आहे. शिवाय मला तुझ्यासारखी चांगली दक्ष गृहिणीही मिळाली!" पूर्णचन्द्र प्रसन्नतेने म्हणाला.

"तुमच्यात चांगली दूरदृष्टि आहे; आळशीपणा नावालाही नाही. अचानक मिळालेल्या धनाचा तुम्ही जसा उपयोग केलात तसा करणारे जीवनात सदा सफलच होणार. असा योग्य पति मला मिळाला हे माझंच अहोभाग्य!" माला समाधानाने म्हणाली.

यानंतर पूर्णचन्द्रला प्रत्येक कामात सफलताच मिळत गेली. तरीही स्वतः मेहनत करणे त्याने सोडले नाही! अन् त्याने आदर्श जीवन व्यतीत केले.





# कृष्णावतार

दक्षिण देशातील आपल्या मित्रांच्या सल्ल्याने रुक्मीचा अहंकार बेसुमार वाढला. एका सभा-मंडपात द्यूत-क्रीडेची सर्व सामग्री सुंदर रीतीने सजवण्यात आली. जुगार खेळण्यासाठी एक सोन्याचा पट, मोहरा आणि फासे यांची व्यवस्था केली गेली. आता बलरामकडे निमंत्रण पाठवले गेले—"आपण आनंदाने थोडा वेळ द्यूत खेळू या. आपण खेळात भाग घेण्यासाठी अवश्य यावे." बलराम जुगाराचे विशेष प्रेमी होते, मोठ्या उत्साहाने सभा-भवनात हजर झाले.

दक्षिण देशाच्या राजांनी सुचविले—द्यूत खेळण्यासाठी बलराम व रुक्मि यांची जोडी सर्वांत उत्तम. खेळ सुरू झाला. मोती, रत्ने आणि सोने यांचे ढीग पणावर लावले गेले. दहा हजार सुवर्ण-मुद्रा लावून बलराम हारले, पुन्हा तेवढ्याच सुवर्ण-मुद्रा लावल्या. या ही वेळी बलराम हारलेच, नशीबाचा खेळ असा की आज बलराम हारतच गेले.

शेवटी बलरामाने एक कोटी स्वर्ण-मुद्रा पणावर लावल्या आणि यावेळी मात्र ते जिंकले. असे असून ही रुक्मीने आरडा-ओरडा केली—"मीच जिंकलो आहे. बलरामना फासेच धड टाकता येत नाहीत. मी एक कोटी सुवर्ण-मुद्रा जिंकल्या आहेत."

रुक्मीचा मित्र कलिंग राजाने बलराम-कडे उपहासाने पहात म्हटले—"खरेच, रुक्मीचेच म्हणणे खरे आहे. रुक्मीने डाव जिंकला. बलराम हारले!" यावर बल-

१९. नरकासुराचा दांडगा उत्साह



रामचा पारा चढला, तरी पण आपल्यावर नियंत्रण ठेवून त्यांनी तिथे असलेल्या लोकांना विचारले–"तुम्हीच सांगा, डाव तर मी जिंकला, नि हे म्हणताहेत रुक्मीचा जय झाला. हा कुठला न्याय?"

बलरामाला समजेना की या स्वच्छ खोटचाला काय उत्तर द्यावे? एवढ्यात आकाशवाणी झाली–"बलराम जे म्हणतो आहे ते खरं आहे. रुक्मि खोटं बोलतो आहे. तुम्ही सर्व जण तोंडाला कुलूप लावून मुकाट्याने कसे सर्व ऐकून घेत आहात?"

यावर ही कोणी आपले तोंड उचकटले नाही. आता बलराम स्वतःवर ताबा ठेऊ शकले नाहीत. अशात येऊन त्यांनी रुक्मी वर गुद्दे घालायला सुरुवात केली नि त्याला चित केला. नंतर जुगाराचा पट कलिंगाच्या डोक्यावर आपटून त्याला जखमी केले. बाकीच्या राजांनी बलराम वर हल्ला चढविला, तेव्हा त्यानी तलवार उपसून सर्वांचा शिरच्छेद केला. सर्वजण घाबरून पळून गेले.

ही सर्व कपट-कथा संपल्यावर बलराम घरी आले आणि श्रीकृष्णाला सर्व वृत्तान्त सांगितला. श्रीकृष्णाने यावर काहीच आक्षेप घेतला नाही. बलरामाची प्रशंसा पण केली नाही. इतर प्रमुख यादव-मंडळींनी मात्र बलरामाची तोंड भरून स्तुति केली, नि रुक्मीची भर्त्सना केली.

नंतर सर्व जण वधू-वरासह द्वारकेस परत आले.

बलरामचं बळ आणि पराक्रम, शक्ति व सामर्थ्य निःसंशय असामान्य होतं. दहा हजार हत्तींचं बळ असणाऱ्या भीमाने बलरामपाशी राहून शिक्षण घेतलं होतं. सर्वांना असं वाटायचं की बलराम आणि भीम यांच्यात लढाई झाली तर जय भीमाचाच होईल.

एकदा श्रीकृष्णाचा मुलगा सांबु हा दुर्योधनाची मुलगी लक्षणा हिच्या प्रेमात पडला आणि तिला पळवून नेऊ लागला. कौरवांनी त्याचा पाठलाग केला आणि त्याला बंदी बनवून हस्तिनापुरच्या तुरुंगात टांबून ठेवले. ही बातमी समजताच बलरामांना राग आला, ते हस्तिनापुरला गेले आणि सांबूला कारागृहातून मुक्त करण्याची विनंती केली. पण कौरवांनी बलरामांची विनंती मान्य केली नाही.

यावर बलरामांनी हस्तिनापुरच्या जनतेला त्यांच्या घरांसकट गंगेत ढकलून देण्याची प्रतिज्ञा केली आणि किल्ल्याच्या परिसराखाली आपला नांगर घुसवण्यास सुरुवात केली.

हा सर्व प्रकार पाहून दुर्योधन व इतर कौरव घाबरले आणि त्यांनी सांबूला आणून बलरामांच्या ताब्यात दिले. अशा प्रकारे बलरामांचा राग शांत झाला. आता दुर्योधनाने बलरामांचा शिष्य होण्याचे ठरवले आणि त्यांची गुरु-पूजा केली. बलरामांच्या नांगरामुळे हस्तिनापुर काय-मचे एका बाजूला वर आले व दुसऱ्या बाजूला उतरते झालें. बलरामांचे शिष्यत्व पत्करून दुर्योधनाने गदा-युद्धात उत्तम कौशल्य प्राप्त केले.

याच कालात राक्षसांच्या जगात नरका-सुर फार बलाढ्य बनून राहिला. प्रागज्यो-तिषपुर ही त्याची राजधानी होती. त्याच्या आईचे नाव भूदेवी होते. ब्रह्मदेवाकडून



त्याने अनेक वर मिळविले होते. कोणी ही देव त्याला पराजित करू शकत नसे. त्याचे बळ व पराक्रम पाहून सर्व लोक थरथरा कापत.

नरकासुर सर्वात अगोदर आपल्या सेने सह इंद्रपुरी वर चालून गेला. नगराच्या प्रवेश-द्वारांवर आपल्या मुठीचे जोरदार आघात केले, तेव्हां ती मोडून पडली. मग त्याने सिंह-गर्जना करून इन्द्राला युद्धासाठी पुकारले. ऐरावतावर स्वार होऊन आपल्या वज्रायुधा सह इन्द्र युद्धासाठी सज्ज झाले. नरकासुराने कशाची ही पर्वा न करता इंद्रावर हल्ला चढवला. यम, वरुण आणि कुबेर आपल्या सेन्या सह इन्द्रांना मदत



करायला धावले. दोन्ही पक्षात तुंबळ युद्ध सुरू झाले.

नरकाला मदत करण्यासाठी हयग्रीव, निशुंभ व मुरासुर नावाचे तीन राक्षस-नेता आपल्या सैन्यासह युद्ध-भूमी वर येऊन दाखल झाले. हयग्रीवाने वरुणा बरोबर युद्ध केले. या युद्धात वरुणाचे डोके फुटले व तो बेशुद्ध होऊन पडला. शुद्धी वर येताच त्याने पलायन केले. त्याच्या बरोबर त्याचे सैन्य ही पळू लागले. तसेच निशुंभाने यमा बरोबर आणि मुरासुराने कुबेरा बरोबर युद्ध केले. त्यात यम आणि कुबेर हरले व आपल्या सैन्यासह त्यांनी माघार घेतली. शेवटी नरकासुराच्या लढाऊयांना घाबरून स्वतः इद्रांनी ही रणांगणातून काढता पाय घेतला. अशा प्रकारे नरकासुराने देव-लोकात प्रवेश करून सर्वत्र अपूर्व यश मिळविले व आपल्या विजयाचा डंका पिटला.

यानंतर नरकासुर इन्द्राच्या आसनावर बसला, नि ऊर्वशीला बोलवून आज्ञा केली— "ऐक, मी सर्व दिक्पालांना युद्धात हरवलं आहे. आता मीच सर्व देवांचा राजा आहे. आजपासून नृत्य-गायनाने तू माझं मनोरंजन करायचं! समजलीस ?"

"असं होय ? तर मग सर्व मुनी आपल्या यज्ञात आपली पूजा करतील, तेव्हां मी आपली इच्छा-पूर्ति अवश्य करीन." ऊर्वशीने उत्तर दिले.

नरकासुराने ऊर्वशीची अट मान्य केली. यानंतर नरकासुराने अमरावती लुटली, सुमेरु पर्वतावर असलेली रत्नें खोदून बाहेर काढली, आठ हजार देव-कन्यांना कैद केले, विश्वकर्माची मुलगी आपल्या महालात आणून ठेवली, अदितीच्या कुंडलांचे अपहरण केले आणि आपल्या नगरी परत आला.

नरकासुराच्या आज्ञेवरून त्याच्या सेवक-राक्षसांनी चौदा लोकातील मूल्यवान वस्तु लुटून आणून त्याला दिल्या. ते जेथे जात, तेथे लोकांना त्रास देत आणि अप्सरांना पळवून आणीत. त्यांनी सोळा हजार एकशे



गंधर्व-कन्या, कित्येक लाख यक्ष-नारी, तसेच असंख्य किन्नर, सिद्ध, साध्य व विद्याधर स्त्रियांना कैदी बनवून आणले.

प्रागज्योतिषपुरच्या चारी बाजूंना चार महान् योद्धे-मुरासुर, हयग्रीव, निशुंभ आणि पंचजन उभे राहून नगरीचे संरक्षण करू लागले. मुरासुराला हजारो मुलगे होते. त्यांच्यामुळे कोणाला नगरीत प्रवेश करणे सहज शक्य नव्हते.

यानंतर नरकासुराला वाटले की समस्त भूलोकावर आपले आधिपत्य असावे. सर्वत्र संचार करून तो विनाश करू लागला. मुनींना त्रस्त करून सोडले, ब्राह्मणांचा संहार केला. सर्व राजांना त्राहि त्राहि केले. धर्माचा नाश करण्याची जणू त्याने प्रतिज्ञा केली.

एकदा नरकासुर बदरीवनात आला. तेथे अनेक ऋषि आपल्या यज्ञ -कार्यात मग्न होते. त्यावेळी नरकासुराला ऊर्वशीच्या अटीची आठवण झाली. त्याने ऋषींना विचारले— "तुम्ही कोणाला स्मरून यज्ञ करीत आहात?"

ऋषींनी सांगितले—"वेदांच्या आज्ञेनुसार आम्हीं इंद्राला स्मरून हा यज्ञ करीत आहोत!"

नरकासुर रागाने लाल होऊन म्हणाला— "इन्द्र, वरुण, यम, कुबेर इत्यादि सर्वांना मी युद्धात हरवले आहे. त्यांचे राज्य मी जिंकले आहे. आता सगळ्या विश्वाचा अधिपति मी आहे. म्हणून तुम्ही सर्व जण आता माझी उपासना करा. मला नमस्कार करा. मला संतुष्ट कराल तर मी तुमचे सर्व मनोरथ पूर्ण करीन."

ऋषींनी स्पष्टपणे बजावलं—"हे सर्वस्वी अनुचित आहे. सर्व लोकांचा शासक तर इन्द्र! तू बोलून-चालून दुष्ट राक्षस. अशा परिस्थितीत आम्ही तुझी पूजा कशी करू शकणार?"

ऋषींचं हे उत्तर ऐकून नरकासुराच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. त्याने गरजून आपल्या सेवकांना हुकूम दिला— "हे मुनि गर्वाच्या भरात बकवास करीत आहेत. यांचा हा यज्ञ उखडून टाका." नरकासुराच्या आज्ञेनुसार राक्षसांनी लगेच अग्निकुंडे भरून टाकली, जनावरांची हत्या केली, यज्ञाचे होता, उद्गाता व अन्य मंडळींना मार-पीट केली, दर्भ जाळून टाकले, यज्ञ-सामग्री इतस्ततः फेकून दिली. शिजविलेले अन्न खाऊन टाकले, सोमरस राखेत ओतून टाकला नि असे अनेक बीभत्स प्रकार केले. हे सर्व कांड संपवून नरकासुर घरी परत गेला.

यानंतर वसिष्ठ, वामदेव, जाबाली, धुम्य, भरद्वाज, मंकण इत्यादि सर्व महा-ऋषि विचार-विनिमयासाठी एकत्र येऊन बसले. या दुष्ट राक्षसां पासून यज्ञाचे रक्षण कसे करावे ही समस्या सर्वांपुढे होती. या नरकासुरापासून आपले रक्षण करणारे कोणी नसेल तर जिवंत राहणं कठिण होऊन जाईल. शेवटी सर्वांनी निश्चय केला की अवतार-पुरुष श्रीकृष्णच या सर्वांतून आपला उद्धार करायला समर्थ आहे. आता त्यालाच शरण गेले पाहिजे. असा विचार करून सर्व जण द्वारकेच्या रोखाने निघाले.

दक्षिण दिशेला यात्रा करीत असता वाटेत लागणाऱ्या तीर्थ-स्थानी स्नान करीत सर्व ऋषि भागीरथी पर्यंत पोंचले. इथे स्नान करून त्यांनी प्रायश्चित केले. अशा वैभवसंपन्न द्वारकापुरीस आले.

या नगरीतील ऐश्वर्य पाहून त्यांना अत्यन्त आश्चर्य वाटले. राजपथावरून



पुढे जात ते राजमहालापर्यंत पोचले. श्रीकृष्णाकडे बातमी पोचली की बदरी-वनातून काही ऋषि त्यांना भेटण्यासाठी आलेले आहेत.

ऋषींच्या आगमनाची वार्ता समजताच श्रीकृष्णाने प्रद्युम्नाला बोलवले आणि ऋषींचे स्वागत करून त्यांना आदरपूर्वक घेऊन येण्यास सांगितले.

राजमहालाच्या बाहेर येऊन प्रद्युम्नाने ऋषींचे प्रेमाने स्वागत केले आणि त्यांना श्रीकृष्णाच्या सभा-भवनात घेऊन आला.

तेथे श्रीकृष्ण एका उच्चासनावर विराजमान झाले होते. श्रीकृष्णाच्या जवळ जात असता मुनींच्या मनात विचार येत होता–"आपल्या सर्व इच्छांची पूर्ति सहज करू शकेल असा श्रीकृष्ण असताना, आपण आजपर्यंत या दुष्ट राक्षसांकडून का बरे अपमानित होत राहिलो? कदाचित् नशीब म्हणतात! उशीराने का होईना, पण आता श्रीकृष्णाची भेट झाली, छान छान झाले! अरण्यात तपस्या करणारांना या दुष्ट राक्षसामुळे ही श्रीकृष्ण-दर्शनाची सुवर्णसंधि लाभली!"

ऋषींना पाहताच श्रीकृष्ण तावडतोब आपल्या आसनावरून उठून खाली आले; अर्घ्य आणि पाद्य-पूजा करून त्यांचे प्रेम-पूर्वक स्वागत केले आणि त्यांच्या अनुमतीने पुन: आपल्या आसनावर जाऊन बसले.

श्रीकृष्णानंतर अन्य प्रमुख यादव-मंडळींनी मुनींना नमस्कार केला आणि आपापल्या जागी येऊन बसले.

नंतर श्रीकृष्णाने हात जोडून ऋषींना प्रश्न केला–"आपले यज्ञ निर्विघ्नपणे संपन्न होत आहेत ना? आपली तपश्चर्या व व्रते सर्व व्यवस्थित चालू आहे? आपण सर्व जण मिळून इथे आलात याचं काही विशेष कारण असलं पाहिजे अवश्य! माझ्या वर अनुग्रह करून मला कृतार्थ करण्यासाठीच आपण इथे आलेले असणार. आपण जर माझ्याकडे काही कामगिरी सोपवली तर ती स्वीकारण्यास आम्ही एका पायावर तयार आहोत. नि:संकोचपणे सांगा."





# एक खड्डू-एक देव

उन्हाळ्याच्या दिवसात एक प्रवासी शिवपुरी गावातून पुढे चालला होता. त्याला खूप तहान लागली होती; म्हणून गावशिवेवर दिसलेल्या घरासमोर उभे राहून त्याने पाण्यासाठी हाक दिली.

घरातला मालक त्यावेळी दार बन्द करून ठेवून आत देवाची पूजा करत बसला होता. बाहेरची हाक ऐकून तो म्हणाला– "जरा थांबा. मी पूजा करीत आहे. बाहेर ओटयावर बसा. पूजा संपल्याबरोबर देतो पाणी आणून."

प्रवासी ओटयावर बसला. थोडया वेळाने आतून आरतीची घंटा वाजली. संपलीच पूजा, आता आपल्याला पाणी मिळेल–या विचाराने प्रवासी आनन्दला. पण बराच वेळ गेला तरी दार उघडून कोणीच बाहेर आले नाही. लोक विसरले असावेत पाणी द्यायला, असं समजून त्याने पुन्हा एकदा पुकारा केला.

"आत्ता गणपतीची पूजा झाली, इतर देवांचीही झाली की देतोच पाणी. जरा थांबा." आतून आवाज आला.

थोडया वेळाने पुन्हा खणखण घंटा वाजली. प्रवासी जरा वेळ थांबला आणि पुन्हा त्याने पाणी मागितले.

"आत्ताच नवग्रहांची पूजा झाली. बाकी देवांची पूजा संपली की देतो आणून पाणी. जरा वाट पहा." आतून पुन्हा आवाज आला.

यानंतर पुन्हा एकदा आरतीची घंटा ऐकू आली. पुन्हा जरा वेळ वाट पाहून प्रवाशाने हाक मारली.

"आत्ता बालाजीची झाली पूजा; बाकीच्यांची होऊन जाऊ दे; मग देतोच हं पाणी. अजून जरा धीर धरा." आतला आवाज पुन्हा बोलला.

शीला भागवत

अशा प्रकारे त्या मालकाचे उत्तर मिळत राहिले, की आत्ता अमक्या-तमक्या देवाची पूजा झाली आणि बाकीच्यांची संपल्यावर पाणी मिळेल, तोवर वाट पहावी.

इकडे तहानेने प्रवाशाचा गळा सुकायला लागला. वेळ कसा काढावा हे त्याला समजेनासे झाले! तिथेच एक कुदळ पडलेली त्याला दिसली. आता जेव्हा घंटा वाजेल, तेव्हा तेव्हा कुदळीने तो ओट्यांजवळ एक एक खड्डा खोदू लागला.

थोड्या वेळाने पूजा आटोपून मालक एकदाचा पाणी घेऊन बाहेर आला.

प्रवाशाने खणून ठेवलेले खड्डे पाहून त्याने आश्चर्याने त्याच्याकडे पाहिले.

जरा ही विचलित न होता प्रवासी म्हणाला–"महाराज, मला काय करावे सुचेना. शेवटी वेळ काढण्यासाठी, जितक्या वेळा आपण आरती केली, तितक्या वेळा मी एक एक खड्डा खणला. माफ करा मला."

तो मालक यावर चिडून म्हणाला– "डोकं तर फिरलं नाही तुझं! ओट्याजवळ एवढे सारे खड्डे करून ठेवलेस! तुला काही सुचत नव्हतं तर एकाच जागी खणायचं होतंस! एक छोटीशी विहीर बनली असती अन् तुझी तहानही भागली असती की!"

आता तो प्रवासीही चिडून रागाने म्हणाला–"बरोबर आहे आपलं म्हणणं! तुम्ही इतक्या सगळ्या देवांची पूजा करण्या-ऐवजी एकाच देवाची केली असतीत तर आतापर्यंत तुम्हाला त्याचा साक्षात्कारही झाला असता!" इतके बोलून, पाणी पिऊन प्रवासी आपल्या वाटेने निघून गेला.

तो गेल्यावर मालक शान्तपणे विचार करू लागला. या सर्व देवांची क्रमा-क्रमाने पूजा करण्यापेक्षा कोणा तरी एकाची मनोभावे आराधना केलेली बरी. आता फक्त गणपतीची पूजा करायचा त्याने निश्चय केला.





# ठकांचा गुरू

खूप दिवस लोटले. बगदाद शहरात हिन्दबाद नावाचा एक श्रीमन्त व्यापारी रहात असे. तो सगळ्या जगात यात्रा करून आला, परंतु पहाडांच्या मधे वसलेल्या एका शहरात तो अजून कधी गेला नव्हता. त्या शहरातला एक माणूस एकदा त्याला भेटला.

हिन्दबादने त्याला विचारले–"तुमच्या शहरात जास्त मागणी कोणत्या वस्तूला असते भाई?" तो प्रवासी म्हणाला– "चन्दनाच्या लाकडाला चांगली मागणी असते तिथे!"

हिन्दबादने आपलं सर्व धन खर्चून चन्दन खरेदी केलं आणि ते गाड्यांवर लादून तो त्या पहाडांच्या गावाकडे निघाला. व्यापारी शहराच्या अगदी जवळ पोचला, आणि आपल्या मेंढ्या हाकत त्यांना घेऊन निघा-लेली एक म्हातारी त्याला दिसली. तिने हिन्दबादला पाहूनच ओळखलं, कि हा कोणीतरी परदेशी व्यापारी दिसतोय. तिने त्याला सावध करत म्हटले–"नीट सावध रहा हं बेटा! या शहरातली माणसं पक्की बदमाश अन् चोर आहेत. परदेशी माण-सांना तर दिवसाढवळ्या लुटतात ते!" आणि ती निघून गेली.

शहरात घुसताच एका माणसाने खूपसे प्रश्न त्याला विचारले.

हिन्दबादने सांगितले–"मी बगदादचा व्यापारी आहे. या शहरात चन्दनाच्या लाकडाला चांगली मागणी आहे हे ऐकून मी आपला माल विकायला घेऊन आलो आहे."

"कोणा मूर्खाने तुम्हाला ही बातमी दिली? आम्ही लोक तर चन्दनाच्या लाकडाचा सरपण म्हणून उपयोग करतो! आता तुम्हीच सांगा, जळाऊ लाकडाला

कमल देवभानकर



"कोण किंमत देईल जास्त ?" असे म्हणून तो माणूस आपल्या वाटेने निघून गेला.

हिन्दबादला तर कळेनासे झाले, की या माणसाचे म्हणणे खरे की खोटे! तो आपल्या मालासकट एका खाणावळवालीकडे पोचला आणि त्याने तिथेच मुक्काम ठोकला. नंतर तो जेव्हा घराबाहेरच्या आवारात आला, तेव्हा त्याला एक विचित्र दृश्य दिसले!–वेशीजवळ त्याला भेटलेला माणूस आणखी एका माणसाबरोबर बाहेर मैदानात चूल पेटवून स्वयंपाक करण्यात मग्न आहे; आणि सरपण म्हणून ते चन्दनाच्या लाकडाचा उपयोग करीत आहेत! ते पाहून हिन्दबादचा थरकाप झाला! त्या माणसाचं म्हणणं खरंच आहे की! या शहरात खरोखरीच चन्दनाचा सरपण म्हणून उपयोग करतात असे दिसते! आता आपल्याला सर्व माल विकूनही फक्त थोडीशी चान्दीच हाती येईल!

हिन्दबाद हळूहळू त्यांच्याजवळ पोचला. तेव्हा त्याने विचारले–"विकणार आपला माल आम्हाला?"

"काय किंमत द्याल याची?" हिन्दबादने विचारले.

"त्याच वजनाची जी वस्तु मागाल ती देऊ की!" त्या माणसांनी उत्तर दिले. ते कबूल करून, वस्तु नंतर मागून घेईन असे सांगून हिन्दबादने माल त्यांच्या हवाली केला.

नन्तर हिन्दबाद नगरातून फेरफटका करण्यासाठी बाहेर पडला. रस्त्यात एका एकाक्ष माणसाने येऊन एकदम त्याचा हात पकडला आणि तो ओरडू लागला–"लोकहो, इकडे पहा. यानेच माझा एक डोळा फोडला होता. आता यावेळी पळून जाऊ शकणार नाहीस बच्चमजी!"

अनेक लोकांनी हे ऐकून हिन्दबादला घेरले. तो बिचारा आपल्याला सोडवून घ्यायचा प्रयत्न करत म्हणू लागला–"अरे, तू कोण हे सुद्धा माहीत नाही मला! मी आजपर्यंत तुझा चेहराही पाहिला नाही





कधी! प्रथमच आज मी या गावात येतो आहे; मी कधी फोडला तुझा डोळा?"

परन्तु तिथे जमलेल्या लोकांनी एकाक्ष माणसाचीच बाजू घेतली. त्यांनी असा निर्णय दिला की हिन्दबादने त्याला नुकसानभरपाई द्यावी.

"ठीक आहे, देईन मी." असे म्हणून हिन्दबादने कशीतरी आपली सुटका करून घेतली.

पण त्या गर्दीत बिचाऱ्याच्या पायातली चप्पल तुटली म्हणून जवळच बसलेल्या चांभाराला ती दुरुस्त करायला सांगितले त्याने.

"काय द्याल?" चांभाराने विचारले.

"तू खूश होशील असं कांहीतरी देईन मी. ठीक आहे?" चांभाराने हे मानले.

एका पायात चप्पल घालून चालणं कठीण होतं म्हणून जवळच काही लोक जुगार खेळत असलेले पाहून आपले मनोरंजन करून घेण्यासाठी हिन्दबाद तिथे जाऊन उभा राहिला. थोड्या वेळाने त्याच्या जवळ उभा असलेला इसम त्याला म्हणाला–"तुम्ही लावा नं काही रक्कम!" हिन्दबादनेही त्यात भाग घेतला अन् थोड्याच वेळात तो त्या सर्वांचा कर्जदार बनून बसला! यावर त्याला प्रोत्साहन देणाराने अट घातली–"तू एक तर समुद्राचे सर्व पाणी पिऊन दाखव; नाहीतर तुजजवळ जितकं धन आहे ते सर्व देऊन तरी टाक."

"उद्यापर्यंत मला मुदत द्या म्हणजे मी नीट निर्णय घेईन." असे म्हणून आपल्या विचित्र परिस्थितीबद्दल पश्चात्ताप करीत तो रस्त्यातून भटकू लागला.

रस्त्यात त्याला पुन्हा ती मेंढ्यावाली म्हातारी दिसली. त्याचा चेहरा पाहूनच म्हातारीने ताडले की काहीतरी गडबड घडली आहे. हिन्दबादनेही आपली रामकहाणी तिला ऐकवली.

"बेटा, या शहरातली माणसं महापापी आहेत. त्यांच्या ठकबाजीबद्दल मी आधीच



तुला सावधगिरीचा इशारा दिला होता. चन्दनाच्या एका तुकडयाची किंमत इथे दहा अशर्फी इतकी असते. तुझ्याजवळचं लाकूड विकून तुला पुष्कळ सोनं मिळायला हवं होतं. तरी काही हरकत नाही; अजूनही मी सांगते तसं केलंस तर काही उपयोग होऊ शकेल. संध्याकाळपर्यंत तू वेशीजवळ पोचलास तर तिथल्या निर्जन स्थानी एक तुला एक आंधळा साधु बसलेला दिसेल. तो खराखुरा साधु नाहीय. तो या शहरातल्या सर्व ठकांचा गुरु आहे. अंधार होताच सर्व ठक त्याच्याकडे जमतात आणि त्याचा सल्ला घेतात. दिवसभरात आपण केलेल्या कर्तृत्वाचा पाढाही वाचतात त्याच्यापुढे. तू जर गुप्तपणे त्यांचं बोलणं ऐकू शकलास तर तुला थोडा बहुत लाभ होईल."

अंधार होण्यापूर्वीच हिन्दबाद वेशीकडे निघाला. दाराबाहेर म्हातारीने सांगितलेला आंधळा साधु तेथे एका मोठया दगडाला टेकून बसलेला त्याला दिसला. तो समाधी लावून बसल्यासारखा दिसत होता.

हिन्दबाद जराही चाहूल न लागू देता त्या दगडामागे लपून बसला.

अंधार होताच शहरातली सर्व ठक माणसं एक एक येऊन साधुसमोर भक्तांसारखी बसली; आणि दिवसभरात आपण केलेल्या लबाडीचा वृत्तान्त सांगू लागली. त्यातच हिन्दबादला ठकवणारे चारही जण होते. प्रत्येकाच्या ठकबाजीची हकिकत ऐकून त्यांच्या बुद्धीबद्दल साधु साधकबाधक टीका करी. ती सर्व टीका हिन्दबादने ऐकून ठेवली.

ठकांपैकी एक म्हणाला–"गुरुजी, आज मी एका परदेशी व्यापाऱ्याकडून खूपच स्वस्त भावाने चन्दनी लाकूड मिळवलं."

"काय भाव पडला?" साधुने विचारले.

"चन्दनाच्या वजनाची काहीही वस्तु त्याने मागावी असे ठरले." ठकाने सांगितले.

"मग गेलास तू बाराच्या भावात! त्या व्यापाऱ्याचाच जास्त लाभ होईल." साधु म्हणाला.



"असं का म्हणता गुरुजी? त्याने चन्दनाच्या भारंभार सोनं मागितलं तरी स्वस्तच पडेल न?" ठकाने विचारले.

"ते बरोबर आहे. पण समज त्याने तितक्या वजनाच्या माश्या मागितल्या, अन् त्या सुद्धा निम्म्या नर आणि निम्म्या मादी-माश्या; तर? मग काय होईल तुझं?" साधु म्हणाला. हे ऐकून निराश होऊन तो तो ठक तेथून निघून गेला.

नंतर तो एकाक्ष पुढे येऊन म्हणू लागला–"गुरुजी, आज मी एका परदेशी व्यापाऱ्याला चांगलं फसवलं. मी तक्रार केली की याच व्यापाऱ्याने माझा डोळा फोडला आहे. आता अटीप्रमाणे त्याने मला एक डोळा तरी द्यावा किंवा त्याची सारी संपत्ति तरी द्यावी असे ठरले आहे."

"तू तर शुद्ध मूर्ख आहेस! तो व्यापारी तुला अगदी सहज चकवू शकेल. तू जी अट घातली आहेस, ती खरी करण्याकरता तो म्हणेल की त्याचा एक डोळा आणि तुझा डोळा सारख्याच वजनाचा असेल तरच तो तुला डोळा देईल. अन् मग तुझं काय होईल बावळटा? तुझा दुसरा डोळाही जाऊन पक्का आंधळा होशील तू, पण त्याचा एक तरी डोळा वाचेलच ना?" साधु म्हणाला. तो एकाक्षही खाली मान घालून तेथून निघून गेला.

यानंतर पुढे आला चांभार. तो म्हणाला–"गुरुमहाराज, आज एका परदेशी



माणसाने एक चप्पल दुरुस्त करायला सांगून म्हणाला की त्याबदल्यात तो मला खुश करील. मी आता त्याची सर्वच संपत्ति मागून घेऊन त्याला पार धुळीस मिळवीन."

"तुझी अक्कल काय चरायला गेली की काय? तुला एक कवडीही मिळायची नाही यात! समज, तो तुला म्हणेल – आपल्या सुलतानाच्या सर्व शत्रूंचा नाश झाला ना? त्याला सामना देईल असा आता कोणी राहिलाच नाही! ही बातमी ऐकून खुश झालास ना तू?" तुला निरुपायाने म्हणावेच लागेल की–"हां, मी खुश आहे." तसं नाही म्हणालास तर सैनिक तुझी हाडं मोडून खिळखिळी करतील मग?" तो चांभारही मनातल्या मनात स्वतःलाच शिव्या देत निघून गेला.

यानंतर तो जुगारी पुढे झाला– "स्वामीजी, आज मी एकाला जुगारात हरवलं आणि अशी अट घातली की, तू हरलास तर समुद्राचं सगळं पाणी पिऊन दाखव किंवा तुझी सारी संपत्ति तरी दे."

"तो व्यापारी तुला काही देणार नाही· तो म्हणेल की तू समुद्राचं पाणी तुझ्या ओंजळीत भरून आण, मग दाखवतो मी पिऊन, मग तुझं काय होईल?" साधूने विचारले.

हा सारा संवाद हिन्दबाद आडून ऐकत होता. त्यामुळे त्याच्याशी ठकबाजी करणाऱ्या सर्वांनाच त्याने दुसऱ्या दिवशी सहज चकवले. चन्दनाच्या वजनाच्या अर्ध्या मादी-माश्या देऊ शकत नसल्याने पहिल्या पहिल्या ठकाकडून चन्दनाच्या प्रत्येक तुकड्याची किंमत दहा अशर्फी या दराने किंमत मोजली. याचप्रकारे बाकीचे तीनही ठक बरोबर अट पाळू न शकल्याने त्याची माफी मागून आपापल्या रस्त्याने निघून गेले. हिन्दबादने आपल्या चन्दनाची पुरी किंमत वसूल करून नंतर सर्व शहर धुंडून त्या म्हातारीला शोधून काढले, तिला थोडं सोनं बक्षिस दिलं आणि पुन्हा त्या शहरात कधीही पाऊल न घालायचा निश्चय करून मोठ्या खुशीने तो बगदादला निघून गेला.





# सुवर्णमुद्रा

एका जमीनदाराच्या गावात एक गरीब शेतकरी रहात असे. त्याची दयनीय अवस्था पाहून जमीनदाराने दया येऊन त्याला गावापासून ज़रा दूर असलेली एक ओसाड पडलेली जमीन दिली आणि आपल्या आयुष्यभर त्याचा उपयोग करायची परवानगी दिली.

एक दिवस आपलं शेत नांगरत असताना नांगर कशालासा आपटून 'खण्' असा आवाज झाला. तिथे खोदून पहाता त्याला सोन्याच्या मुद्रांनी भरलेला एक हंडा दिसला!

शेतकऱ्याने विचार केला कि–काही करून, कोणाला दिसू न देता या सुवर्णमुद्रा घरी नेल्या पाहिजेत. कोणाला कळलं तर यातली एकही मोहोर माझ्या हाती लागायची नाही. जमीनदार माझा कान पकडून सगळा हंडाच नेईल उचलून!

पण हा हंडा तर जड आहे; एकट्याने घरी नेणं अशक्य आहे! या कामात बायकोची मदत घ्यायला हवी. पण तिच्या तर तोंडात तीळ काही भिजत नाही.

शेतकरी काही अगदीच अडाणी नव्हता. बराच विचार करून त्याने एक योजना आखली. संध्याकाळ होताच त्याने थोडे मासे आणि एक कोंबडी खरेदी केली आणि तो घराकडे वळला. आपल्या घरामागे लावलेल्या जाळ्यात त्याने मासे टाकून ठेवले आणि तलावात लावून ठेवलेल्या जाळ्यात कोंबडी ठेवली. नंतर रिकाम्या हाताने तो घरी आला.

"पहा, तुम्ही नेहमीच रिकाम्या हाताने घरी येता! मी आता स्वयंपाक कशाचा करू?" बायको चिडून त्याला म्हणाली.

"तू उगाच ओरडाआरडा नको करूस बुवा! मी सकाळीच जाळी लावून ठेवली



आहेत; चल पाहू या काय नशिबात आहे आपल्या!" शेतकरी समजुतीनं बोलला.

दोघंही घराच्या मागे आले. तिथे जाळयात मासे मिळाले आणि तलावातल्या जाळयात पहातात तर कोंबडी अडकलेली! हा प्रकार पाहून शेतकऱ्याची बायको आश्चर्यचकित झाली! "वा, वा! हा काय चमत्कार आहे!" ती म्हणाली.

"अग, हे काहीच नाही. आपल्या शेतात तर मोहोरांनी भरलेला हंडा सापडलाय्! मध्यरात्री आपण तिथे जाऊन तो घेऊन येऊ. पण हे बघ, ही गोष्ट अगदी गुप्त रहायला हवी. कोणाला कळलं तर सगळं सोनं हातचं जाईल." शेतकरी बायकोला म्हणाला.

नंतर रात्री अंधारातच नवराबायको शेताकडे गेले. शेतकऱ्याने तेथे लाल रंगाचे पाणी आणि एक डहाळी तयार ठेवली होती. अंधाराचा फायदा घेऊन त्याने लाल पाण्यात डहाळी बुचकळून ते पाणी बायकोच्या अंगावर उडवले.

"अरे, हे कसलं पाणी पडतंय!" असे म्हणत बायकोन मान वर करून आकाशाकडे पाहिले. पण तेथे तर एकादा ढगाचा तुकडाही दिसत नव्हता. सर्वत्र तारे चमचमत होते!

"ढग नसताना हा कसला पाऊस बाई!" बायकोने शेतकऱ्याला विचारले.

"तुला नाही माहीत? असा ढग नसताना येणारा पाऊस रक्ताचा पाऊस असतो. घरी गेल्यावर उजेडात बघ नीट आपले कपडे!" शेतकऱ्याने सांगितले.

"असं असतं होय?" तिने आश्चर्याने विचारले. आजचा दिवसच एकूण चमत्कारांचा दिसतोय!"

नंतर दोघांनी मिळून तो मोहोरांचा हंडा उचलला आणि ते घराकडे निघाले. ते जमीनदाराच्या घरामागून जात असताना तेथून काही गायींचे हंबरणे ऐकू आले. एकदम दचकून बायकोने विचारले—"हा कसला आवाज?"

"विशेष काही नाही! जमीनदाराला भुतांनी उचलून नेलं म्हणून त्याचे नोकर रडत आहेत." शेतकऱ्याने सांगितले.

"असं झालं होय?" बायको म्हणाली.

नंतर दोघंही निर्विघ्नपणे घरी पोचले. हंडा शेतकऱ्याने एका ठिकाणी पुरून ठेवला. बायको दमली होती. पटकन गाढ झोपून गेली. शेतकरी जागत राहिला. त्याने हंडा आणि मोहोरा पुन्हा निरनिराळ्या जागी पुरून ठेवले; आणि तोही झोपून गेला.

सकाळी उठल्याबरोबर शेतकऱ्याची बायको म्हणाली—"मला द्या नं थोडयाशा मोहोरा. मला बाजारातून काही साडया आणि दागिने आणायचे आहेत. आता तर आपल्याला पैशांची ददात नाही नं?"

"वेडे, अग असं धडाधड सोनं वगैरे वापरायला लागलो तर आपलं बिंग फुटेल ना बाहेर!" शेतकरी समजावू लागला.

दोघांच्यात बोलाचाली झाली अन् त्याचं भांडणात पर्यवसान झालं!

शेतकऱ्याची बायको विहिरीजवळ गेली आणि तिथे आपल्या शेजारणीला म्हणाली—"बघ, माझा नवरा कसा कंजूस आहे."

"का? काय झालं?" शेजारणीने विचारले.

"तू कुणालाही बोलू नकोस. अग आमच्या शेतात सोन्याच्या मोहोरांनी भरलेला हंडा सापडलाय. पण मला मात्र साडया खरेदी करायला एक मोहोर ही द्यायला तयार नाहीत हे!" शेतकऱ्याच्या बायकोने तक्रार मांडली.



झालं! दुसऱ्या दिवशी संध्याकाळपर्यंत निम्म्याहून अधिक लोकांना ही वार्ता कळली. नंतर दोन दिवसात जमीनदाराच्या कानावरही ही वार्ता पोचली. तो रागावून शेतकऱ्याकडे आला आणि त्याला धमकी देत म्हणाला–"दुष्टा, विश्वासघातक्या! तुझ्यावर दया दाखवून तुला मी जमीन दिली. अन् माझ्या जमिनीत सापडलेल्या मोहोरा तूच हडपल्यास होय?"

मनातल्या मनात घाबरत, पण वरकरणी धाडस करून काही माहीत नसल्याचा आव आणत शेतकरी म्हणाला–"ऑं? कसला मोहोरांचा हंडा? कोणी बातमी सांगितली मालक तुम्हाला?"

"तू अन् तुझी बायको हंडा घेऊन आलात नं? तिनेच तर गाववाल्यांना हे सांगितलंय!" जमीनदार म्हणाला.

शेतकऱ्याने आपल्या बायकोकडे तीक्ष्ण दृष्टीने पाहिले. यावर ती बावळी नवऱ्याला म्हणू लागली–"असे काय रोखून पहाता आहात माझ्याकडे? आपण दोघं शेतात गेलो होतो; आणि तो जड हंडा उचलून नाही आणला आपण? त्यात मोहोरा पण नव्हत्या का?"

"तुम्हाला काय वाटतं विसरून गेले मी सर्व? त्याच दिवशी रात्री आपल्याला घरामागच्या जाळ्यात मासे सापडले आणि तलावातल्या जाळ्यात कोंबडी नाही सापडली?" बायको म्हणाली. तिचं हे बिनबुडाचं बोलणं ऐकून लोक हसू लागले.

"अरे, हसता काय सगळे? त्या रात्री ढग नसतानाच रक्ताचा पाऊस पडला होता. मध्यरात्री भूत जमीनदाराला घेऊन गेले म्हणून त्यांचे नोकर सुद्धा रडत होते!" शेतकऱ्याची बायको म्हणाली.

"छी! वेडी बाई!" अशी टीका करत जमीनदार ताबडतोब तिथून निघून गेला. त्याने हेही जाहीर केले की ही मोहोरांच्या हंड्याची बातमी ही खोटीच असली पाहिजे.

तिथे जमलेल्या बाकीच्या लोकांचाही तिच्या बोलण्यावर विश्वास बसला नाही आणि सर्व जण आपापल्या घरी निघून गेले.



## निसर्गातील आश्चर्य :




उडणारा मासा खरं म्हणजे हवेत उडत नाही. हृदयाच्या खालच्या बाजूला असलेले पंख उघडून आपल्या शेपटीने पाण्याला जोरात दूर सारून गतीने पाण्याच्या वर येऊन १२-१४ सेकंद उडत दुसऱ्या जागी पाण्यात जाऊन पडतो.




कॅलिफोर्नियातील कोस्ट रेडवुड (सीक्वो सेंपर वीरन्स) नावाच्या जातीची झाडे जगात सर्वाधिक उंच वाढतात. ही झाडे ३६७.८ फुट उंची पर्यंत वाढतात.

### दीर्घायुषी कासवे



पाठीचा कणा असणाऱ्या प्राण्यात कासव सर्वात अधिक काळ जिवंत राहते. काही कासवे १६० वर्षांपर्यंत जीवित राहिल्याचे सांगतात. सबळ पुराव्याचे आधारे काही कासवे ११६ वर्षे मात्र निश्चित जगलेली आहेत.

# चांदोबातील नवलाई

## आलपिनच्या डोक्यावर विश्वकोष



ब्रिटिश वैज्ञानिकांनी 'अलबेट्रॉन बीम' ची निर्मिती केली आहे. या अलबेट्रॉन बीम प्रक्रिये द्वारा संपूर्ण ब्रिटिश विश्वकोशाचे (एलसायक्लोपीडिया ब्रिटानिकाचे) सर्वच्या सर्व २७ खंड एकाच आलपिनच्या डोक्यावर बसवणे शक्य होईल. पेन्सिलच्या एकाच रेषेवर दहा लाख अक्षरे आणि सुईच्या अग्रावर दहा लाख छिद्रे बनवणेही यामुळे शक्य होईल.

## बाल पंडित

वेलूरच्या बालमुरली नावाच्या ११ वर्षांच्या मुलाने आपल्या बुद्धिचातुर्याने अमेरिकेच्या शिक्षणशास्त्रज्ञांना तोंडात बोटे घालायला लावली आहेत ! या बालपंडिताने तीन वर्षांचा असतानाच अस्खलित इंग्लिश बोलायला व लिहायला सुरुवात केली. चार वर्षांचा असताना तो गुणाकार व भागाकार करु शकत असे ! आणि नंतर लगेच त्याने बेसिक कॅलक्युलसची सुरुवात केली !





## विमानाबरोबर आगगाडीची शर्यत

'ट्रान्सरॅपिड मॅग्नेटिक लेव्हिटेशन ट्रेन'-ही वेगात विमानाशी स्पर्धा करु शकते. सर्वप्रथम हॅनोव्हर-हॅंबुर्ग या शहरांमधे विशेष पद्धतीने बनवलेल्या रुळांवर य आगगाडीचा प्रवास सुरु होईल.

## थायलॅण्डची प्राचीन राजधानी

ओळीने २५ वर्षे केलेल्या शोध व खोदकामाचे फळ म्हणून थायलॅण्डच्या प्राचीन राजधानी–नगरीचा शोध नुकताच लागला आहे. शेकडो वर्षे झाकली गेलेली माती व जंगल दूर करून वैज्ञानिकांनी ७०० वर्षांपूर्वी अस्तित्वात असलेल्या सुखोताय शहराच्या भग्नावशेषांचा पत्ता लावला आहे. त्या 'स्वर्णयुगा' तील १९३ बौद्धमन्दिरे, खंदक व विटांच्या भट्ट्याही सापडल्या आहेत !



# खरे बोलण्याचा फायदा

शिवपुरी गावाचा निवासी गोविन्दप्रसाद याच्या घरात एके दिवशी रात्री एक चोर घुसला. गोविन्दप्रसाद व त्याच्या बायकोला सुरा दाखवून त्याने धमकी दिली–"तुमच्या घरातले सोन्याचे दागिने व पैसे कुठे लपवून ठेवले आहेत ते सांगा, नाहीतर आज तुमचे प्राण काही वाचणार नाहीत."

"आमच्या घरात चोरण्यासारखं काही नाहीच आहे मुळी!" नवरा-बायकोने सत्य लपवत म्हटले.

इतक्यात त्यांचा दहा वर्षांचा मुलगा चोराला सांगू लागला–"मी खरं सांगतो तुम्हाला. समोर ती लाकडी पेटी दिसतेय ना, त्यात फक्त सोन्यांच्या वीस गिन्या आहेत. बास, आणखी काही नाही आमच्याकडे!"

चोराने घर धुंडाळले, पण त्याला फक्त त्या वीस गिन्याच मिळाल्या. त्याशिवाय काही नव्हतेच घरात! चोराने त्या मुलाला विचारले–"काय रे, तू आपल्या आईबापां-सारखं खोटं का नाही सांगितलस, की आमच्याकडे काहीच नाही?"

यावर मुलगा उत्तरला–"माझ्या आईवडिलांना खऱ्याखोट्याचं मूल्य कळत नाही. मी ते उत्तम जाणतो. म्हणूनच मी खरं बोललो."

"मग सांग बरं खऱ्याचं मूल्य किती अन् खोट्याचं किती?" चोराने विचारले.

मुलगा चटकन म्हणाला–"खऱ्याचं मूल्य माझ्या आईवडिलांचे प्राण अन् खोट्याचं मूल्य सोन्याच्या वीस गिन्या! खरं बोलून मी माझ्या आईबापांचे प्राण खरेदी करु शकलो; पण खोटं बोलून मला फक्त सोन्याच्या वीस गिन्या मिळाल्या असत्या कदाचित्!"

मुलाच्या बुद्धिमत्तेवर प्रसन्न होऊन चोराने त्या गिन्या त्याच्या हातावर ठेवल्या अन् तो निघून गेला!





# परोपकारी भुते

मंगलपुर गावाजवळ एक घनदाट जंगल होतं. त्या जंगलात एका वडाच्या झाडावर दोन भुतं रहात. ही भुतं फार परोपकारी वृत्तीची होती. एके दिवशी ऐन दुपारी ही दोघेही जरा पेंगत होती. तोच कसलासा आवाज ऐकून दोघंही खडबडून सावध झाली. अन् आजूबाजूला पाहू लागली.

एक चांगला बलदंड माणूस त्या वडावर चढत होता. त्या माणसाने वर चढून कमरेचा कसा काढला. कश्यात मोहोरा होत्या. त्याने तो कसा झाडाच्या ढोलीत लपवला आणि झाडावरुन उतरुन आपला रस्ता सुधारला. भुतांनी ओळखलं की याने नक्कीच कुठे तरी चांगला हात मारला आहे! लागलीच ती दोघंही झाडावरुन उतरुन त्याचा पाठलाग करु लागली.

तो धष्टपुष्ट तरुण मंगलपुरला रहाणाऱ्या श्यामलाल नावाच्या एका माणसाच्या घरात शिरला. ती भुतंही त्याच्या पाठोपाठ आत शिरून गच्चीत जाऊन बसली. श्यामलालने त्या तरुणाला विचारलं "अरे भीमदास, मोहोरांची एक थैली इथं होती; ती कुठं दिसत नाही! मी तर सगळं घर धुंडाळलं, पण सापडतच नाही ती. तू कुठं पाहिलीस? चन्दनदासने थैली मला दिली नि त्याच्या गहाण वस्तु परत करायच्यात."

भीमदासने सल्ला दिला–

मालक, थैली सापडत नाही. तेव्हां आता चन्दनदासला सांगा की तू ती मला दिलीच नाहीस!

हा सल्ला श्यामलालला रुचला. इतक्यात चन्दनदास तिथे येऊन पोचला अन् त्याने आपल्या गहाण ठेवलेल्या वस्तु परत मागितल्या.



यावर अडेलपणाने श्यामलाल म्हणाला- "चन्दनदास, अरे अशा कशा वस्तु परत मागतोस तू ? गहाण ठेवलेल्या वस्तु कर्ज परत केल्यावरच मागायच्या असतात हे नाही माहिती तुला ?"

आता थोडा विचार केल्यावर श्यामलालच्या मनातली गोष्ट चन्दनदासने बरोबर ताडली. त्याने श्यामलालच्या पायावर लोटांगण घेत खूप विनवण्या केल्या; पण श्यामलालचं मन काही विरघळेना ! त्याने उलट भीमदासला इशारा करून चन्दनदासला घराबाहेर काढवलं. उदास चेहेऱ्याने आपल्या घराकडे निघालेल्या चन्दनदासचा आता ती भुतं पाठलाग करू लागली.

घरी पोचल्याबरोबर चन्दनदासच्या बायकोने त्याच्याजवळ आपल्या वस्तु मागितल्या. यावर तिला सगळी रामकहाणी सांगून तो काळजीने म्हणाला- "अग, काल रामसहायने जी रक्कम मला दिली ती आता या श्यामलालने हडपली बघ. रामसहायने आपल्या शेतीवाडी संबंधीचे जे कागद माझ्याकडे गहाण ठेवले होते, ते मागायला तो आता थोड्या वेळात येईल."

चन्दनदासचा उदास चेहरा पाहून त्याची बायको हसत हसत त्याला म्हणाली- "श्यामलालने तुमच्या बाबतीत वापरलेली युक्तीच आता आपण रामसहायच्या बाबतीत वापरू. तुम्ही चिन्ता कशाला करता? रामसहायने तरी तुमची रक्कम परत केली याला पुरावा काय ?"

इतक्यात दारावर थाप पडली अन् दरवाजा उघडताच रामसहाय आत आला. चन्दनदास म्हणाला-"तू पैसे परत दिलेले नाहीस, पैसे दे अन् कागदपत्र घेऊन जा."

चन्दनदासचं हे बोलणं ऐकून रामसहाय आपल्या कपाळा वर हात मारून घेऊ लागला. यावर चन्दनदास जराही विचलित झाला नाही. उलट तो कोरड्या आवाजात म्हणाला-"रामसहाय, तू विसरभोळा आहेस हे माहीत असून सुद्धा तुला कर्ज दिलं, ही माझी चूकच झाली."

रामसहाय बिचारा निरुत्तर होऊन भरल्या डोळ्यांनी आपल्या घरी परतला. ही सर्व लबाडी नीट कळलेल्या भुतांनी ठरवलं की—त्या श्यामलाल अन् चन्दनदासची लबाडी उघडकीला आणून आपण या बिचाऱ्या रामसहायला काही मदत केली पाहिजे. हा विचार ठरताच त्या दोघांनी प्रौढ माणसांचं रूप धारण केलं अन् रामसहायसमोर येऊन त्याच्या दुःखाचं कारण विचारलं. आपल्यावर झालेल्या अन्यायाचा पाढा वाचून रामसहाय रडू लागला.

तावडतोब धनाने भरलेल्या थैलीची निर्मिती करून ती त्यांनी रामसहायच्या हाती दिली आणि पुढे कसे कसे करायचे हे त्याला नीट समजाऊन सांगितले. ती थैली घेऊन रामसहाय चन्दनदासच्या घरी गेला आणि त्याने दारावर थाप मारली.

पुन्हा दारी आलेल्या रामसहायला पाहून चन्दनदासच्या अंगाचा तिळपापड झाला !-"पुन्हा कशाला आलास माझ्या दारी ?" असे विचारत तो त्याला रागावू लागला.

पण रामसहाय धीटपणे त्याला म्हणाला- "मला माझ्या विसरभोळेपणाची लाजच वाटतेय. खरं म्हणजे थोड्या वेळापूर्वी मी तुमची रक्कम परत करायलाच आलो





होतो, पण कसा कुणास ठाऊक, विसरूनच गेलो. माफ करा मला. आता आपलं हे धन घ्या अन् माझे कागद मला परत द्या बरं. तुम्ही माझ्यावर केलेले उपकार मी जन्मभर विसरणार नाही!'' इतकं बोलून ती थैली रामसहायने चन्दनदासच्या हाती सोपवली.

चन्दनदासने मोठ्या आनन्दाने ती थैली घेतली अन् रामसहायचे कागद त्याला देऊन टाकले. रामसहाय कागद घेऊन घरी निघून गेला.

हे सगळं नाटक पहाणान्या चन्दनदासच्या बायकोने त्याला उत्साहाने म्हटले—''पहा, रामसहायच्या विसराळूपणाचा आपल्याला फायदाच झाला. आता या विसराळूपणाच्या अवस्थेतून तो बाहेर येण्यापूर्वी तुम्ही असेच जाऊन ही थैली श्यामलालला देऊन आपल्या वस्तु सोडवून आणा बरं.''

चन्दनदासने लगेच श्यामलालच्या घरी जाऊन त्याच्याशी गोडीगुलाबीने बोलून ती थैली त्याला दिली आणि गहाण ठेवलेल्या वस्तु परत घेऊन घरी आला.

चन्दनदासनने दिलेली थैली घेऊन ती ठेवायला श्यामलाल आतल्या खोलीकडे वळणार, तोच दोन शिपाई तिथे आले अन् म्हणाले—''शेठजी, आपणाला तावडतोब न्यायालयात बोलवलं आहे न्यायाधीश-साहेबांनी! चला आमच्या बरोबर!'' शिपायांचं गुरकावणं ऐकून श्यामलालला आश्चर्य वाटलं आणि भीमदासला बरोबर घेऊन तो न्यायालयाकडे चालू लागला.

तिथे न्यायाधीशा जवळच प्रौढ माणसांच्या वेषातली ती दोन भुतं उभी होती. श्यामलालला पाहून न्यायाधीश म्हणाला—''या दोघांच्या मोहोरा तू चोरून नेल्या आहेस असा त्यांचा तुझ्यावर आरोप आहे. खरी आहे ही गोष्ट?''

''काय घोर अन्याय! मी तर आजपर्यंत यांना कधी पाहिलंही नाही!'' आश्चर्याने श्यामलाल ओरडला.

भुतांनीही श्यामलालच्या कमरेला लटकणान्या मोहोरांच्या थैलीकडे बोट दाखवत म्हटले—''पहा साहेब, मोहोरांची तीच ती थैली! आमची आहे ती!''

''अरे हा तर जूलूम झाला! या थैलीत तर गहाणवटीची रक्कम आहे. तुमच्याजवळ पुरावा काय, की ही रक्कम तुमची आहे?'' श्यामलालने रागाऊन विचारले.

''थैलीतल्या प्रत्येक मोहोरेवर वडाचं चिन्ह आहे—हाच आमचा पुरावा. पहा काढून मोहोरा.'' हसत भुतं उत्तरली.

न्यायाधीशाने तपासणी केली, तेव्हा खरंच प्रत्येक मोहोरेवर वडाचं चिन्ह होतं! आता न्यायाधीश रागावून म्हणाला—''आता तरी तुझी चोरी उघडकीस आली ना?''

यावर ती थैली आपल्याला चन्दनदासकडून मिळाल्याचं श्यामलालने सांगून टाकलं. न्यायाधीशाने चन्दनदासला बोलावून आणून विचारले तर कांगावा करत त्याने सांगितले की त्या मोहोरा त्याला रामसहायकडून मिळाल्या.

त्या दोन भुतांकडे हात करत रामसहायने सांगितले—''चन्दनदासने फसवल्यामुळे मला दुःखी झालेला पाहून या दोघांनी मला हे धन दिलं.''

आता नाइलाज होऊन चन्दनदासने आपली चूक कबूल केली अन् त्याबरोबर



श्यामलालने आपल्याशी कशी लबाडी केली, हे ही सांगितले.

यावर घाबरून थरथर कापत श्यामलालनेही आपला अपराध कबूल केला; आणि म्हटले–"सरकार, हे सर्व या भीमदासच्या सल्ल्यामुळे घडलं!" पुढे त्याने आपली थैली कशी हरवली याबद्दल सविस्तर सांगितलं.

सर्व हकीकत ऐकून ती थैली कोणी चोरली असावी याबद्दल अंदाज घेऊन न्यायाधीशाने तीक्ष्ण दृष्टीने भीमदासकडे पाहून गर्जत विचारलं–"भीमदास, घरच्या चोराला तर देवही नाही पकडू शकत! खरं ना हे?"

आता भीमदासलाही आपली चोरी कबूल करावीच लागली. त्याने सांगितलेल्या खुणांच्या आधाराने शिपायांनी जाऊन वडाच्या ढोलीत लपवलेली थैली काढून आणून न्यायाधीशासमोर हजर केली.

प्रौढ माणसांच्या वेषातल्या भुतांनी न्यायाधीशाला सांगितले–"आपलं झालेलं नुकसान दुसऱ्याच्या डोक्यावर ठेवायची साधारणतः लोकांची प्रवृत्ति असते अन् बिचाऱ्या रामसहायसारखे लोक त्याला बळी पडतात. म्हणून केवळ दयाबुद्धीने रामसहायला धन देऊन आम्ही त्याला मदत केली.

न्यायाधीशाने भीमदास, श्यामलाल अन् चन्दनदास यांना योग्य शिक्षा सुनावली आणि त्याने भुतांना विचारले–"तुम्ही आमच्या गावच्या या लबाड माणसांना पकडून देऊन होणारा एक अन्याय वाचवला हे छानच झालं. पण तुम्हाला या सगळ्या भानगडीचा पत्ता कसा काय लागला?"

"आम्ही आता या प्रश्नाचं जर खरं उत्तर दिलं ना, तर न्यायाधीशसाहेब, आपणसुद्धा घाबरून जाल. त्यापेक्षा 'झाकली मूठ' बरी!" असं म्हणत त्या भुतांनी जंगलाची वाट धरली.

भुतांचं हे उत्तर न्यायाधीशाला नीट समजलं तर नाहीच, पण तो त्यावर उगीचच हसला!





# प्रेम आणि द्वेष

कमल नावाचा एक तरुण मोठा संगीतप्रेमी होता. जे वाद्य हाती येईल त्यावर थोडा सराव करून अल्प काळातच तो त्यात प्राविण्य संपादन करी.

एक दिवशी नदीवरून स्नान उरकून घरी येत असताना वाटेत त्याला एक बासरी पडलेली दिसली. कमलला ती पाहून फारच आनन्द झाला. त्या दिवसापासून त्याची मुरलीवादनाची आराधना सुरू झाली.

"अरे, तुला तुझ्या या कलेची नीट पद्धतशीरपणे साधना करायला हवी. तू एखाद्या चांगल्या गुरूच्या आश्रयाला राहून संगीतातले बारकावे जाणून घे, चांगलं अध्ययन कर." आई-वडिलांनी सुचवले.

ही सूचना कमलला फारच आवडली. पण त्याच्या गावात तर संगीत शिकवणारा कोणी बरासा गुरु नव्हता. पण चपल नावाचा एक माणूस काही दिवस शहरात राहून संगीताचा अभ्यास करून आलेला होता, म्हणून त्याला भेटून कमलने त्याचा सल्ला विचारला.

चपलला गुरु बनण्याची चांगली संधि चालून आली. त्याने त्याचा फायदा घेण्याचे ठरविले.

चपल म्हणाला–"तुझी किती तयारी आहे हे तर मला पाहू दे!"

कमलने चपल पुढे बांसरी वादन केले. त्याने दोन राग आळवले. चपलने कमलची संगीतांतील योग्यता जाणली. त्याचे स्वतःचे संगीताचे ज्ञान कमलच्या मानाने बेताचेच!

कमलची बासरी ऐकून चपलचे भान हरपले! त्याने स्वतः कित्येक गुरूंजवळ राहून गायनविद्येचे अध्ययन केले होते; पण तरीही त्याची त्यात कमलइतकी प्रगति नव्हती. त्यामुळे कमलबद्दल त्याच्या मनात

संतोष मुळे

असूया उत्पन्न झाली. तो म्हणाला–"बाप रे! तुझ्या संगीतात तर मला सर्वत्र अपस्वरच ऐकू आला. संगीतविद्या शिकण्याची तर तुझी लायकीच नाही. तू आपला कुठे इकडे-तिकडे लोकगीतं गाऊन आपला वेळ घालव झालं!"

हे उद्‌गार ऐकून कमल बिचारा अगदीच हताश होऊन गेला. आपण आपल्या आयुष्यातला केवढा तरी अमूल्य वेळ उगीचच वाया घालवला असे वाटून त्याला स्वत:चाच फार राग आला! तो सरळ घरी गेला अन् आपली बासरी आईच्या हाती देत तिला म्हणाला–"घे, चुलीत टाक ही बासरी! मी आता आयुष्यात कधी गाण्याचे नाव म्हणून घेणार नाही!"

आईने कमलकडून सर्व हकीकत जाणून घेतली अन् त्याला समजावले–"कमल, तू चपलचं बोलणं ऐकून आपल्या संगीत-साधनेला तिलांजली देऊ पाहतोस? डोकं बिकं फिरलं की काय तुझं? त्याने तर तुझं गाणं ऐकून द्वेषबुद्धीने तुझी अवहेलना केली आहे, तुला नाही समजलं?"

"पण आई, त्या चपलमुळेच मी संगीत-संन्यास घेतला हे कळू दे सर्वांना! लोक त्याची चांगली निन्दा करतील, तेव्हाच मला बरं वाटेल! काही असो! ठरलं ते ठरलं, आता काही मी संगीताचं नाव काढणार नाही तोंडून."

दूर बसलेले कमलचे वडीलही हे सर्व बोलणे ऐकत होते. आपल्या मुलाजवळ येऊन तो त्याला म्हणाले–"जशी तुझी इच्छा बाबा! संगीतावर तुझं जितकं प्रेम आहे, त्यापेक्षा जर तुझ्या मनात चपलबद्दल द्वेषभाव जास्त असेल तर, अशा परिस्थितीत तू गायनसंन्यास घेणंच चांगलं!"

वडिलांचे हे बोलणे ऐकून कमलचे डोळे चांगलेच उघडले! त्याला आपली चूक उमगली. चपलबद्दलचा द्वेषभाव सोडून देऊन शहरात जाऊन योग्य गुरूजवळ राहून त्याने संगीतात प्राविण्य मिळवले, बासरीवादनात तर तो आजोड झाला!






[५]

दुसऱ्या दिवशी योग्य वेळी धीरसिंह सुलोचनेसमोर हजर झाला. सुलोचना म्हणाली–"इथून ईशान्य दिशेला शब्द-भेदी नावाचा एक पर्वत आहे. त्या पर्वताचं वैशिष्ट्य काय? त्या पर्वताच्या पलिकडील राज्याचं नाव काय? हाच आहे माझा पाचवा प्रश्न!"

धीरसिंह सुलोचनेकडून तीन महिन्यांची मुदत मागून घेऊन तावडतोब घोड्यावर स्वार होऊन ईशान्य दिशेकडे निघाला. वाटेत अनेक गावे व शहरे ओलांडत सात दिवसांच्या प्रवासानंतर तो एका मोठ्या अरण्यात पोचला. ऊन खूप कडक होते, त्यामुळे जरा विश्रान्ति घेण्याच्या विचाराने धीरसिंह घोड्यावरून उतरला. त्याला झाडाला बांधून आपण त्या झाडाखाली सावलीत बसला. अचानक त्याला पक्ष्यांचा किलबिलाट ऐकू आला आणि त्या पाठोपाठच अनेक जनावरांच्या ओरडण्याने अन् गर्जनांनी सारे जंगल दुमदुमून गेले. हळूहळू तो आवाज जवळजवळ येऊ लागला. त्या बरोबर धीरसिंह झटकन त्या झाडावर चढला–आणि आवाजाच्या दिशेने पाहू लागला. तिथले दृश्य पाहून तो एकदम आश्चर्यचकित झाला!

हरणे, हत्ती, वाघ, सिंह, कोल्हे इत्यादि जनावरे ओरडत-आरडत जीव घेऊन पळत होती आणि चार पाय, लांब शेपूट अन्



आग ओकणारे डोळे असलेले एक विचित्रसे जनावर त्या कळपाचा पाठलाग करत होते! त्या जनावरां पासून प्राण वाचवण्यासाठीच ती सर्व जंगली जनावरे जीव घेऊन पळत होती!

एक विचित्र अक्राळ-विक्राळ प्राणी तेथे आला. धीरसिंहाने त्याच्याशी युद्ध करून त्याला मारून टाकले.

धीरसिंहाने त्या जनावराची नखे आणि सुळे कापून व्यवस्थित बांधून घेतली व तो पुढे निघाला. दुसऱ्या दिवशी संध्याकाळपर्यंत तो एका मोठ्याशा शहरात पोचला. संपूर्ण नगरात वैभवशाली उंच उंच हवेल्या आणि सुंदर, मनमोहक उद्याने होती. परंतु त्याला माणसांचा संचार मात्र कुठेही दिसला नाही. थोड्याच वेळात तो तेथल्या राजवाड्याशी पोचला. एका शिपायाने पुढे होऊन त्याला म्हटले– "महाराज, आपल्याला आमचे राजेसाहेब बोलवीत आहेत."

त्या शिपायाच्या मागोमाग धीरसिंह राजमहालात शिरला. राजाचा चेहरा त्याला चिन्ताग्रस्त दिसला. धीरसिंहला पाहताच तो म्हणाला–"तू कोणी परदेशी माणूस दिसतोस. माझं हे नगर धनदौलतीने, सर्व प्रकारच्या वैभवाने भरलेलं आहे. अन् यासाठीच ते विख्यात आहे. परंतु सुख-शांतीचं मात्र माझ्या राज्यात नाव नाही! इथल्या जवळच्या जंगलात एक विचित्रसा प्राणी आहे. तो हवं तेव्हां शहरात घुसून सापडेल त्या माणसांना खाऊन टाकतो! त्याला पकडणं किंवा त्याचा वध करणं कुणालाच शक्य नाही. यामुळे माझी सारी प्रजा जिवाच्या भीतीनं गाव सोडून निघून गेली आहे. आणि माझ्या या सुन्दर नगरीचं अगदी वाळवंट होऊन गेलंय. तुला दिसलंच असेल वाटेनं येताना!"

"हो, पाहिलं की, पण आपण ज्या विचित्र प्राण्याबद्दल सांगत आहात तो प्राणी मी कालच दुपारी मारून टाकला."



असे म्हणून धीरसिंहाने त्या प्राण्याची नखे व सुळे राजाला दाखवले.

त्या वस्तू पाहून राजा अतिशय आनन्दित झाला आणि म्हणाला–"बऱ्याच वर्षांनी तुझ्या रूपात मला माझ्या प्रजेचे प्राण वाचवणारा माणूस भेटला. मी आताच दवंडी पिटायला लावून ही बातमी सर्वांना कळवतो. माझी प्रजा तावडतोब आपल्या नगरात परतेल. नगर पुन्हा वसेल. तुझे हे उपकार मी कसे फेडू? मी कधीच विसरणार नाही तुला! पण हे सांग, तू इकडे का आला होतास? तुला माझी कुठली मदत हवी असेल तर सांग. तुझं काम करायला आनन्दच वाटेल मला."

"मी शब्दभेदी पर्वता संबंधी माहिती मिळवायला निघालोय. तिथे जाण्याचा रस्ता सांगितलात तर फार उपकार होतील आपले!" धीरसिंह म्हणाला.

राजाने दिलेले दोन सेवक बरोबर घेऊन तो शब्दभेदी नगरात पोचला. नगराच्या उत्तर दिशेला एक उंच पर्वत होता. वृक्ष व झाडाझुडुपांनी व्यापलेला तो पर्वत इतका हिरवागार दिसत होता, कि जणू काही त्यावर सर्वत्र हरळीचं गवतच पसरलेलं आहे! तेथे वीरवर्मा नावाचा एक तरुण त्याचा मित्र बनला.



एके दिवशी धीरसिंह आणि वीरवर्मा शहरातल्या रस्त्यावरून चालत असताना मेघगर्जनेसारख्या आवाजात त्यांना एक पुकारा ऐकू आला–"ये, लवकर ये." अन् काय आश्चर्य! जवळच एका दुकानात बसलेला एक तरुण तट्कन उठून उभा राहिला आणि एखाद्या वेड्यासारखा त्या पर्वताकडे पळत सुटला. धीरसिंहाने त्याला पकडायचा प्रयत्न केला परंतु तो लवकरच खूप दूर निघून गेला.

धीरसिंहाने आश्चर्याने विचारले–"वीरवर्मा, ही हाक कसली? तो तरूण असा पळत कुठे निघाला? त्याला अडवायचा प्रयत्न कोणीच का केला नाही?"



"ही हाक शब्दभेदी पर्वतातून येते. ज्याला उद्देशून ही हाक मारलेली असेल तो माणूस अगदी भारल्यासारखा, आपलं अस्तित्व विसरून पर्वताकडे पळत सुटतो. आजपर्यंत अशा प्रकारे पळत गेलेली व्यक्ति पुन्हा कधीही परत आलेली कोणी पाहिली नाही. म्हणूनच तिकडे कोणी लक्षही देत नाही." वीरवर्माने धीरसिंहाला समजवायचा प्रयत्न केला.

"पण ही हाक येते कशासाठी?" धीरसिंहाचे कुतूहल त्याला स्वस्थ बसू देईना.

"ते रहस्य आजपर्यंत कोणालाच कळलेलं नाही." वीरवर्मा उत्तरला.

धीरसिंह यानंतर गप्प झाला. काही वेळ तो विचारात गढून गेला. नंतर ते दोघेही आपल्या खाणावळीत परतले.

एका आठवड्यानंतर एका संध्याकाळी धीरसिंह-वीरवर्माची जोडगोळी एका उद्यानात बसली होती. त्यावेळी पुन्हा मेघगर्जनेसारखी ती हाक वातावरणात दुमदुमली— "ये! लवकर ये!"

अन् काय आश्चर्य! यावेळी धीरसिंहाच्या समोर बसलेला वीरवर्मा एकदम उठून पर्वताकडे चालू लागला! धीरसिंह एकदम तटकन उठून—"अरे वीरवर्मा, थांब! थांब!" असे ओरडत त्याच्या मागे लागला. पण वीरवर्माने त्याच्या विनवणीकडे मुळीच लक्ष दिले नाही. भारल्यासारखा तो पुढे पुढेच जात राहिला. धीरसिंह त्याला पकडण्यासाठी पळू लागला, पण वीरवर्माही आपली गति वाढवत राहिला. धीरसिंहाने त्याचा पाठलाग सोडला नाही. नंतर दोघेही थोड्या वेळाने पर्वतावर चढू लागले. एक मोठा उभा कडा वाट अडवून उभा होता! पण वीरवर्मा अगदी सहजपणे तो कडा चढून गेला. धीरसिंहाने ही उड्या मारत ती चढण पण पार केली. त्यानंतर ते दोघे हिरव्या हरळीने भरलेल्या मैदानावरून पळत राहिले; आणि अचानक वीरवर्मासमोरची धरणी दुभंगली. तो त्या





आ वासलेल्या खाईत पडला आणि जसे काही घडलेच नाही अशा प्रकारे ती जमीन पुन्हा एक झाली!

बिचाऱ्या धीरसिंहाने आपली उदास नजर चोहीकडे फिरवली अन् समोरच दिसणाऱ्या पर्वत शिखराच्या रोखाने तो चालू लागला. थोडे पुढे गेल्यावर एक एक प्रकारच्या असह्य उष्णतेने त्याला घेरले. थोडे आणखी पुढे गेल्यावर त्याला एक अग्निनदी दिसली. त्या नदीतल्या पाण्याचे तरंग ज्वाळांसारखे आकाशाला स्पर्श करायला झेपावत होते. ही अग्निनदी आता कशी पार करता येईल, याचा विचार करत धीरसिंह एका दगडावर बसला. इतक्यात सूर्यास्त झाला. त्या भयानक वातावरणात अर्धी रात्र होईपर्यंत नुसतेच बसून राहिल्यावर तिथल्याच एका दगडाला रेलून बसल्या बसल्याच धीरसिंह झोपी गेला.

स्वप्नात त्याला मानवी शीर आणि सिंहाचे धड असणारा विचित्र प्राणी दिसला. तो प्राणी म्हणाला—"धीरसिंह, तुझं साहस अन् पराक्रम केवळ अपूर्व असंच आहे. या अग्निनदीच्या पलिकडे अग्निनाभ नावाचा एक राक्षस रत्नपर्वताचा पहारा करत बसलेला आहे. नदीत तुला एक नाव दिसेल. धैर्याने त्या नावेत बस अन् सूर्योदयापूर्वीच त्या राक्षसाचा वध कर. तुला माझा आशिर्वाद आहे. या कार्यात सफळ होशील!"

धीरसिंहाने डोळे उघडून पाहिले, तेव्हा पूर्वेला लाली पसरत होती. तो उठून नदी-किनारी गेला. अग्निनदीत एक नाव तरंगत होती. मोठ्या साहसाने त्याने थेट त्या नावेतच उडी मारली! नाव त्याला घेऊन दुसऱ्या तटावर पोचली. इतक्यात एक अक्राळविक्राळ राक्षस तिथे येऊन गरजला—"माझ्या परवानगीशिवाय माझ्या या भूमीवर पाय ठेवणाऱ्या दुष्ट माणसा! कोण आहेस तू?" धीरसिंहाने या प्रश्नाचे उत्तर तलवारीनेच दिले! त्याने तलवारीच्या एकाच झटक्यात राक्षसाचे शीर धडावेगळे



केले ! पण दुसऱ्याच क्षणी एका दिव्य पुरुषात त्याचे रूपान्तर झाले आणि त्याने म्हटले– "मित्रद्रोह केला होता, त्याची शिक्षा म्हणून मला हे राक्षसाचे जिणे जगावे लागले. तुझ्यामुळे मी आज शापमुक्त झालो, ऋणी आहे मी तुझा." असे म्हणून धीरसिंहाला प्रणाम करून तो पुरुष आकाशमार्गाने उडून गेला.

धीरसिंह मोठ्या आनंदाने पुढे गेला. त्याच्या चारी बाजूचा प्रदेश चंदेरी प्रकाशाने चमकत होता. समोरचं सरोवर चांदीसारख्या पाण्याने झळाळत होते. तहान लागलेली होती म्हणून धीरसिंहाने वाकून ओंजळीत पाणी घेतले, पण त्याच्या असे लक्षात आले की जिथपर्यंत पाण्यात बुडाले होते, तिथपर्यंतचे आपले हात चांदीचे झाले आहेत! आश्चर्य वाटून त्याने हातातले पाणी पुन्हा खाली सोडून दिले! तेथून तो पुढे गेला. तेथे त्याला एक सुवर्ण-तलाव दिसला. त्यात सर्वत्र सुवर्ण-कमळे फुललेली होती. एक नावही तेथे दिसली. त्या नावेने तो तलाव ओलांडून धीरसिंह त्या पहाडाच्या शिखरावर पोचला. तेथे सर्वत्र हिरे-माणिक वगैरे रत्नांचा खच पडलेला होता आणि त्यामुळे तो संपूर्ण पर्वत इंद्रधनुष्याच्या विविध रंगांनी उजळून निघाल्यासारखा दिसत होता! इतक्यात त्याने आकाशवाणी ऐकली–"इथून तू फक्त सहाच रत्नं उचलून घे." धीरसिंह त्यातली फक्त सहाच रत्ने उचलून घेऊन पुढे निघाला.

थोड्याच अंतरावर निर्मळ पाण्याने वहाणारी एक नदी त्याला दिसली. पाण्यात उतरून धीरसिंहाने आपले हातपाय धुतले. त्याचे चांदीचे झालेल्या हातांना ताबडतोब पूर्व-स्वरूप प्राप्त झाले! फक्त त्याची नखेच तेवढी चांदीची राहिली. इतक्यात नदीच्या प्रवाहात एक नाव वहात आली. त्या नावेत बसून धीरसिंह पैलतीरावर पोचला. तीरावरील जंगल ओलांडल्यावर तो एका गावात पोचला.

इतक्यात समोरून एक गाववाला येताना त्याने पाहिला. गाववाल्याने त्याच्या जवळ

येताच त्याला मोठ्या भक्तिभावाने नमस्कार केला.

"अरे, तू मला पाहून असा घाबरतोस का? हे गाव कोणत्या राज्यातलं?" धीरसिंहाने विचारले.

"हे राज्य तर आपलं नेपाळराज्य! हे नेपाळराज्याचं सीमेवरचं एक गाव आहे. आपण तर आमचे युवराजच दिसता!" तो गावकरी आश्चर्याने म्हणाला.

ते ऐकून धीरसिंहाला परमानन्द वाटला! तो तावडतोब तेथून निघून कौशाम्बीस पोचला. आणि लगेच जाऊन सुलोचनेला भेटला. त्या वेळी कौशाम्बीचे दरबारी पंडित सुधाकराचार्य तेथेच हजर होते. धीरसिंहाकडे पाहून प्रसन्नतेने हसतच त्यांनी त्याचे स्वागत केले. शब्दभेदी पर्वतावर आपण जी जी विचित्र दृश्ये पाहिली त्याचे सविस्तर वर्णन करत धीरसिंहाने त्या पर्वताची वैशिष्ट्येही त्या दोघांना कथन केली. नंतर तेथून आणलेली अपूर्व रत्ने आणि आपली चांदीची झालेली नखेही त्याने दोघांना दाखवली.

सर्व वृत्तान्त ऐकून सुधाकराचार्य म्हणाले— "धीरसिंह, तू ज्यावर विजय मिळवू शकत नाहीस असे या पृथ्वीवर काही नाहीच. तुझा पराक्रम आणि साहस केवळ अपूर्व असेच आहे. तुझ्या परोपकारी वृत्तीमुळे मानवजातीची मान उंच झाली आहे." असे बोलून सुलोचनेकडे वळून म्हणाले—"राजकुमारी, तू जे पाच प्रश्न विचारलेस त्या सर्वांची उत्तरे धीरसिंहाने दिली आहेत. तुला ज्या प्रकारच्या धीरोदात्त राजकुमाराशी विवाह करण्याची इच्छा होती तशीच सर्व लक्षणे या नेपाळच्या राजकुमारात मला आढळत आहेत. आता तू याच्याशी विवाह करायला तयार आहेस न?"

हळूच हसत सुलोचनेने आपली संमति प्रकट केली. त्यानंतर एका शुभमुहूर्तावर सुलोचना व धीरसिंह यांचा विवाह राजेशाही पद्धतीने पार पडला. धीरसिंहाने नंतर पुष्कळ वर्षे न्यायाने राज्य केले.

(समाप्त)



# भेद

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडापाशी परत आला; झाडावरले प्रेत उतरून त्याने खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाकडे चालू लागला. हे पाहून त्या शवात वास करणारा वेताळ बोलू लागला—"राजा, ह्या मध्यरात्रीच्या वेळी आपल्या शयनगृहात निद्रासुख न घेता तू ह्या भयानक स्मशानात नानाप्रकारचे कष्ट भोगत आहेस. तुझी ही दशा पाहून मला तुझी कीव येते. मला असे वाटते की तू केवळ पराक्रमीच नाहीस तर अनेक विद्यांच्या अभ्यासाने प्राप्त झालेल्या गुणांनी युक्त आहेस. तेव्हां तुझ्यात थोडाफार अहंकार असला तरी त्याला कोणी दोष मानणार नाही. तुला ह्या कार्यास प्रवृत्त करणारे जर क्षुद्र वृत्तीचे असतील तर राईचा पर्वत करून ते तुझी अवगणना करू शकतील. याचे उदाहरण म्हणून मी

## वेताळाच्या गोष्टी



तुला एका गावाच्या अधिकाऱ्याची गोष्ट सांगतो. ती ऐक म्हणजे तुला तुझ्या कष्टांचा विसर पडेल.

वेताळ गोष्ट सांगू लागला–"भूषण हा सीतापूर गांवाचा अधिकारी होता. त्याने अनेक विद्यांचा अभ्यास केला होता. शासकीय कामासाठी दुसऱ्या अनेक गांवांना त्याला जावे लागे. तो नेहमी सांगे की जेथे जेथे तो जातो तेथे त्याचा आदर सत्कार केला जातो. गावातील सारे लोक त्याची स्तुति करत व त्याला मान देत.

एकदा काही कामानिमित्त भूषणवर्माला विद्यानगरला जायचे होते. सीतापूरहून विद्यानगर बरेच दूर होते. जाण्याची वाट बिकट होती. पण लोक म्हणत की विद्यानगर पृथ्वीवरील जणु स्वर्ग आहे आणि आदरातिथ्यात तेथील रहिवाशी सर्वांना मागे टाकतात.

सीतापूरच्या चार सद्गृहस्थांना विद्यानगर पाहावेसे वाटले. ते भूषणवर्माकडे आले व त्याला म्हणाले–"अहो भूषणवर्मा, आम्ही असे ऐकले की आपण कामानिमित्त विद्यानगरला जाणार आहात. आम्हाला ते नगर पाहण्याची खूप इच्छा आहे. आपल्या बरोबर आम्हाला नेलेत तर आपले आभारी होऊ. अशाने तेथे होणारा आपला आदर सत्कार आम्ही पाहू शकू व तुमच्याबरोबर आमचाही आदर सत्कार होईल. कृपा करून नाही म्हणू नका."

भूषणवर्माने थोडा वेळ विचार केला. मग म्हणाला–"अहो, आदर सत्कार प्रत्येक व्यक्तीच्या योग्यतेनुसार केला जातो. तेथले लोक माझ्याशी जसे वागतील तसे तुमच्याशी न वागल्यास तुम्हाला वाईट वाटेल. म्हणून तुम्ही याचा नीट विचार करा. एरवी तुम्हाला माझ्या बरोबर येऊन जाण्यास माझी हरकत नाही."

भूषणवर्माची अट सर्वांनी मान्य केली. नंतर भूषणवर्माने सर्वांसाठी असा एक रथ निवडला की ज्यामुळे त्यांचा प्रवास एकाच दिवसात पूर्ण झाला.





विद्यानगरात प्रवेश करत असताच नगराध्यक्षाचा एक अनुचर भूषणवर्माला भेटला व त्याच्याबरोबर इतर चार व्यक्तींना पाहून चिंतातुर स्वरात म्हणाला–"अरे, आपण तर पाच माणसे आहात व आम्ही एकाच्याच राहण्याची चांगली सोय केली आहे, आता काय करावे!"

"असे पाहा, हे चार जण माझे मित्र आहेत, ह्यांच्या राहण्याची दुसरीकडे कोठे सोय केली तरी ह्यांना वाईट वाटणार नाही." भूषणवर्मा चटकन म्हणाला.

"अहो, आपल्या मित्रांचा असा अवमान आम्ही कसा करू?" असे बोलून नगराध्यक्षाच्या अनुचराने सर्वांची एकत्र राहण्याची व्यवस्था राजभवनात केली. त्यांची व्यवस्था इतकी अप्रतिम होती की आलेल्या चारी गृहस्थांनी भूषणवर्माची खूप प्रशंसा केली.

विद्यानगर जडजवाहिरांसाठी विशेष प्रसिद्ध होते. भूषणवर्मा एका जवाहिऱ्याच्या दुकानातून दोन हिरे विकत घेऊ लागला; परंतु नगराध्यक्षाने भूषणवर्माला ते हिरे विनामूल्य भेट दिले. इतकेच नव्हे तर त्याच्या प्रत्येक मित्रालाही दोन-दोन हिरे भेट दिले.

जेव्हां नगराध्यक्षाला समजले की भूषणवर्माची संगीतादि ललितकलांत गति आहे तेव्हां त्याने संगीत-नृत्य, काव्य-संमेलने भरविली.

या साऱ्या समारोहात भूषणवर्माच्या बरोबर त्याच्या गांवातील गृहस्थांनीही भाग घेतला व समारोहातील विषयांवर आपापले विचार मांडले.

नगराध्यक्षाने भूषणवर्माची प्रशंसा करताना म्हटले–"आपल्या गांवात केवळ आपणच नाही तर इतर ग्रामवासी पण ललितकलात प्रवीण आहेत!"

शेवटच्या दिवशी ही मंडळी विद्यानगरच्या प्रख्यात महेश्वराच्या मंदिरात देवदर्शनाकरिता गेली. त्या दिवशी नगराध्यक्ष इतर कामात गुंतला असल्याने



त्यांच्या बरोबर जाऊ शकला नाही. देवाचे दर्शन करून लोक बाहेर येतात तोच मुसळधार पाऊस सुरू झाला.

लगेच नगराध्यक्षाचा रंगदास नावाचा एक अनुचर पटांगणात असलेली एक छत्री घेऊन आला व त्याने भूषणवर्माचे पावसांत भिजण्यापासून रक्षण केले. सीतापुरचे इतर चार गृहस्थ मात्र पावसात चांगलेच भिजले.

विद्यानगरातील भूषणवर्माचे काम आटोपले. तेथून परतण्याच्या वेळेस भूषणवर्मा सहित त्याच्या मित्रांनाही नगराच्या अधिकाऱ्यांनी निरनिराळे उपहार दिले. सीतापूरच्या गृहस्थांनी भूषणवर्माला विचारले–"अहो भूषणवर्मा, इथे कुणा कुणाला कदाचित् भेट द्यावी लागेल असा विचार करून आम्ही ही आमच्यासह काही वस्तु भेटीदाखल आणल्या आहेत. आम्हाला काही लोकांनी हिरे दिले, काहींनी गालीचे दिले, काहींनी इतर चांगल्या भेटी दिल्या. परंतु कोणाला कोणती वस्तु भेटीदाखल द्यावी हे आम्हाला समजत नाही. आपण आमच्या वस्तु पाहून ठरवावे की नगराध्यक्षासह कोणाला काय भेट द्यावी." असे म्हणून त्या लोकांनी आपल्या वस्तु भूषणवर्माला दाखविल्या. त्या वस्तूंकडे तुच्छतेने पाहत भूषणवर्मा म्हणाला–"अशा वस्तु प्रतिष्ठित व्यक्तींना देण्यालायक नाहीत. ह्या वस्तु नगराध्यक्षाचा अनुचर रंगदासला देणे योग्य होईल." त्यानंतर रंगदासला बोलावून त्याला ह्या वस्तु भेट म्हणून दिल्या.

सीतापुरला परतल्यावर चार गृहस्थांतील सर्वात लहान भूषणवर्माला म्हणाला– "वर्माजी, आपल्या बरोबर दुसऱ्या गांवाची यात्रा करणे हे सुदैव आहे. पुन्हा अशी संधि मिळाली तर आम्हाला आपल्या बरोबर अवश्य घेऊन चला."

भूषणवर्मा ह्या बोलण्याला उत्तर देणार इतक्यात, त्या गृहस्थांतील वडीलधाऱ्या व्यक्तीने लहानास दम देऊन म्हटले– "तुम्हाला एकदा जी संधी मिळाली तेवढयावर संतोष मान, राज्यशासनाच्या कार्याकरिता जातात त्यांनी नेहमी आपल्यासह काही मित्र न्यावे हे उचित नाही. मी पण भूषणवर्माचा कृतज्ञ आहे. परंतु भविष्यात कधी त्यांना अशा प्रकारचे कष्ट देणार नाही."

वेताळाने ही गोष्ट सांगून म्हटले– "राजा, गावाच्या वडीलधाऱ्या गृहस्थाचे बोलणे जरा रहस्यमय प्रकारचे होते व त्यावरून असे वाटते की वर्मा विषयी त्याच्या मनात किल्मिष निर्माण झाले. वर्माविषयी त्याच्या मनात असे किल्मिष असण्याचे काय कारण? त्याने असे कृतघ्नतेचे भाषण का केले? ह्या शंकेचे उत्तर माहीत असूनही दिले नाहीस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होऊन पडतील."

यावर विक्रमादित्याने उत्तर दिले– "गावातील वडीलधारा गृहस्थ अत्यंत चाणाक्ष होता. इतर तिघांनी भूषणवर्माला नीट ओळखले नाही. भूषणवर्माला हे मुळिच पसंत नव्हते की गावातील गृहस्थांचा त्याच्याइतकाच आदरसत्कार व्हावा. ते टाळण्यासाठी रहाण्याच्या व्यवस्थेच्या वेळेपासून तो सतत प्रयत्न करत राहिला. परंतु विद्यानगरचे रहिवासी व नगराध्यक्ष हे अतिशय सुसंस्कृत होते, म्हणून त्यांचे प्रयत्न निष्फल झाले. विद्यानगरात गावातील गृहस्थांपेक्षा भूषणवर्माविषयी अधिक आदर केवळ रंगदासनेच दर्शविला. पाऊस पडताना छत्री आणून वर्माला भिजण्या पासून वाचवले, परंतु छत्री देऊ न शकल्याबद्दल इतर गृहस्थांची माफी सुद्धा मागितली नाही. या कारणासाठी तो वर्माच्या पसंतीस उतरला. ज्या सर्वांनी ह्या चार गृहस्थांचा आदर सत्कार व सन्मान केला त्यांना उपहार देणे वर्माला पसंत पडले नाही. यावरून हे स्पष्ट आहे की भूषणवर्मा केवळ अहंकारीच नाही तर शिष्टाचारही न जाणणारा दांभिक सुद्धा आहे."

राजाचे मौन अशा प्रकारे भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्या झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# दोन सल्लागार

आनंदपुर नावाच्या गावात कृष्णदास व श्यामदास नावाचे दोन भाऊ रहात असत. त्यांचे परस्परांवर गाढ प्रेम होते. गावातील प्रतिष्ठित व्यक्ति म्हणून त्यांना मान होता. वेळप्रसंगी संकटात पडलेल्यांना ते मदत करीत व जरूर पडेल तेव्हां त्यांना उत्तम सल्ला देत. दोन भावातील जो कोणी त्यावेळी हजर असेल तो हे काम करी.

काही काळानंतर श्यामदासला एक गोष्ट कळून चुकली—ती ही की त्याचा मोठा भाऊ गावकऱ्यांना जो सल्ला देई तो लोक निमूटपणे पाळत. परंतु आपला स्वतःचा सल्ला मात्र लोक तशाच प्रकारे पाळत नाहीत. काही लोक त्याच्या सल्ल्याच्या विरुद्धही वागत. याचे कारण खोलवर विचार करूनही श्यामदासला समजेना.

एक दिवस श्यामदासने आपल्या मोठ्या भावाला विचारले—"दादा, तू जो सल्ला देतोस तो गावकरी शंका उपस्थित न करत, निमूटपणे लगेच पाळतात. पण माझ्या सल्ल्याच्या बाबतीत असे वागत नाहीत ह्याचे काय कारण?"

आपल्या धाकट्या भावाचा प्रश्न ऐकून मोठा भाऊ कृष्णदास हसला व म्हणाला—"मी स्वतःच तुला याबाबत सल्ला देण्याचा विचार करत होतो व योग्य प्रसंगाची वाट पाहत होतो. आज तू स्वतःच हा प्रश्न काढलास म्हणून सांगतो की आता जेव्हां मी दुसऱ्यांना सल्ला देईन तेव्हां तू शांतचित्ताने त्याचे परीक्षण कर."

याच वेळी तेथे चंद्रनाथ नावाचा शेतकरी आला व म्हणाला—"कृष्णदासजी या वर्षी एक चांगले घर बांधावे असा माझा विचार होता, परंतु माझ्या पत्नीचे म्हणणे असे की ह्या वर्षी आमच्या मुलीचे लग्न करून द्यावे. ही दोन्ही कार्ये करण्यास पुरेसे धन माझ्यापाशी नाही. तेव्हां प्रथम कोणते कार्य करावे हे मला समजेनासे झाले आहे. म्हणून आपला सल्ला विचारायला आलो."

"तुमच्या मुलीचं वय काय आहे?" कृष्णदासने विचारले.

"पंधरा वर्षे." चंद्रनाथने उत्तर दिले.

"योग्य वर निवडला आहे का?" कृष्णदासने पुन्हा विचारले.

"नाही, अजून वर शोधून काढायचा आहे." चंद्रनाथ म्हणाला.

यावर कृष्णदास म्हणाला—"असे पहा, चंद्रनाथ, तुमची मुलगी अजून लहानच आहे, विवाहयोग्य झालेली नाही. म्हणून या वर्षी तुम्ही घर बांधा. त्या नंतर मुलीच्या लग्नासाठी तुम्हाला धन जमवता येईल व समजा धन जमवता आले नाही तरी घर गहाण ठेवून तुम्हाला कर्ज मिळू शकेल."

कृष्णदासचा सल्ला चंद्रनाथला योग्य वाटला. त्याप्रमाणे वागण्याचे आश्वासन देत चंद्रनाथ निघून गेला.

इतक्यात नारायण नावाचा दुसरा एक शेतकरी आला व कृष्णदासला प्रणाम करून म्हणाला—"कृष्णदासजी, मी माझ्या मुलीचा सीमंतसंस्कार करण्याचा विचार करीत आहे. आणि करायचाच तर तो मोठ्या थाटामाटाने करायचा विचार आहे. मात्र अडचण अशी की सध्या माझ्या हातात पुरेसे धन नाही. तेव्हां मी आमचे दोनही बैल विकणार आहे. माझ्या पत्नीचे पण असेच मत आहे. कृपा करून आपण आपला सल्ला द्या."



"नारायण, तुम्ही जसा विचार केला आहे तसेच करा." कृष्णदासने सल्ला दिला. नारायण आनंदाने निघून गेला.

निर्णय ऐकून श्यामदास कृष्णदासला म्हणाला—"दादा, तू चंद्रनाथला दिलेला सल्ला सर्वतोपरी योग्यच होता, परंतु नारायणला तू जो सल्ला दिलास तो माझ्या

विजय देवघर

मते योग्य नाही. मुलीचा सीमन्त संस्कार करायला बैल विकणे तर्कसंगत नाही."

कृष्णदास हसून म्हणाला–"ऐक श्याम, आमचा सल्ला मागायला येणारे लोक मुख्यतः दोन प्रकारचे असतात. पहिल्या प्रकारचे लोक असे असतात की एखादी समस्या निर्माण झाल्यास जे स्वतः निर्णय करू न शकल्यामुळे आमच्याकडे येतात. अशा व्यक्तींच्या बाबतीत आम्हाला नीट विचार करून योग्य सल्ला द्यायला हवा. आता दुसऱ्या प्रकाराच्या लोकांबद्दल सांगतो. ह्या लोकांनी पूर्वीच निर्णय घेतलेला असतो. आम्ही जर त्यांना सांगितले की तुमचा निर्णय चुकीचा आहे तरी ते आपला निर्णय बदलणार नाहीत."

"तर मग हे लोक आमच्यापाशी सल्ला मागायला येतात का?" श्यामदासने विचारले.

"आपण गावातील प्रमुख व्यक्ति आहोत. म्हणून जो निर्णय ते घेतात तो शिष्टाचार म्हणून आम्हाला सांगायला येतात एवढेच. चंद्रनाथ खरोखरीच आमचा सल्ला विचारायला आला होता. पण नारायणची गोष्ट तशी नाही. तो जे कार्य करणार होता त्याची सूचना देण्यासाठी केवळ त्याने नाममात्र आमचा सल्ला मागितला. तेव्हां भविष्यात तुला सल्ला द्यायचा असेल तेव्हां प्रथम हे समजून घे की ती व्यक्ती खरोखर तुझा सल्ला घेऊन त्याप्रमाणे वागायला आली आहे की नाही व मग सल्ला दे. जर तो दुसऱ्या प्रकारचा माणूस असेल तर त्याचे सारे म्हणणे ऐकून घे व खुषीने संमति दे." कृष्णदासने समजाऊन सांगितले.

श्यामदास थोडा वेळ विचार करीत गप्प बसला, मग बोलला–"दादा, आता मला समजले की काही लोकांनी माझा सल्ला का मानला नाही. ते काही ही असो, तू आता जो सल्ला दिलास तो सर्व दृष्टीने योग्य आहे."



चांदोबा पुरवणी - ८

# ज्ञानाचा खजिना

## या महिन्याचे इतिहासप्रसिद्ध व्यक्तित्व



### गुरु हरगोविन्द

१४ जून १५९५ रोजी पंजाबमधल्या अमृतसर जिल्ह्यातील वडाली गावात जन्मलेला हरगोविन्द आपल्या वयाच्या ११ व्या वर्षीच शिखांचा गुरु बनला. आपली चाणाक्षपणा आणि एखाद्या गोष्टीचा चटकन् निर्णय घेण्यात आश्चर्यकारक दूरदर्शित्व दाखवण्याच्या क्षमतेमुळे तो स्वतःच्या वयापेक्षा जरा अधिक प्रौढच वाटे!

तो आपल्याजवळ नेहमी दोन तलवारी बाळगी. एक आपल्या शारीरिक-शक्तीचे चिन्ह म्हणून, आणि दुसरी आध्यात्मिक शक्तीचे चिन्ह म्हणून! त्याने एक सैन्य बनवले व सैनिकांना स्वतःच सर्व काही शिकवले. मुसलमान राजांशी त्याच्या लहान-मोठ्या लढाया नेहमीच चालत. एकदा तर त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात काही दिवस कैदेत ठेवून, नंतर मुक्त करण्यात आले होते.

१६२८ मध्ये एक दिवस हरगोविन्द अमृतसरजवळच्या जंगलात शिकारीला गेला होता. त्याच दिवशी नेमका बादशहा शहाजहानही तेथेच शिकारीला आला होता. दोन्ही पक्षात काहीतरी कुरबूर झाली आणि लढाईला तोंड लागले. शहाजहानचे सैन्य पराभूत झाले. परंतु गुरु हरगोविन्द जाणून होता की या पराभवाचा बदला घ्यायला सैन्य लवकरच परत येईल. यासाठी त्याने आपल्या सैन्याचे मुख्यस्थिती पुनर्गठन केले. यानंतर दो-तीन वेळा त्याच्या व बादशहाच्या सैन्याची टक्कर झाली; पण प्रत्येक वेळी विजय गुरुचाच झाला. यानंतर मात्र हरगोविन्द आपली जागा बदलून हिमालयाच्या पायथ्याशी किरतपुर येथे राहायला गेला. तेथे त्याने आपल्या शीख समाजाचे संगठन करून त्यांना तत्वज्ञान समजावून सांगण्यात आपला काळ घालवला. ३ मार्च १६४४ रोजी त्याचे देहावसान झाले.

## तो कोण?

एका राजाने एक विशाल देवस्थान बनवण्याची आज्ञा दिली. बाराशे कारागीरांनी बारा वर्षे राबून ते मंदिर बांधले व ते एक विशाल असे स्मारक बनले. भरतीच्या वेळी मन्दिर समुद्राच्या पाण्याने वेढले जाई.

आता फक्त मन्दिराचा कळसच बसवायचा राहिला होता. परंतु तो इतर सर्वसामान्य देवळां पेक्षा काही निराळ्याच पद्धतीने बसवायचे ठरले होते. परंतु दुर्दैवाने मुख्य कारागीर कळस बनवण्याचा मनात ठरलेला आराखडा विसरून गेला!

एक लहान मुलगा आपल्या कारागीर बापाला भेटायला त्या जागी आलेला होता. तो जेमतेम बारा वर्षांचाच होता, परंतु मंदिर-स्थापत्यावरील सर्व ग्रंथ वाचून आत्मसात केलेले होते! कळस कसा बसवावा याबद्दलची महिती त्याने कारागीरांना सांगितली; आणि त्याचप्रमाणे काम पुरे केले गेले. परन्तु त्या मुलाने कारागीर आपसात कुजबुजताना ऐकले–"अरे, जे आपल्यासारख्यांना जमले नाही, ते एका लहानशा मुलाने करून दाखवले! राजाला हे कळले तर आपली काय गत होईल!" तो मुलगा फारच भावनाप्रधान होता. पौर्णिमेची रात्र होती आणि समुद्राच्या पाण्याने मंदिर वेढून गेलेले होते. मुलगा मन्दिराच्या शिखरावर चढला आणि स्वतःला त्याने पाण्यांत झोकून दिले. अदृश्य झाला तो!

या पौराणिक कथेतला हा मुलगा कोण बरे?

पान ८ पहा



## सुळावर !

**सूचना :**

थोडयाशा सोडा पिण्याच्या नळ्या आणि एक कच्चा बटाटा मिळवा. त्यातली एक नळी बटाटयात घुसवायचा प्रयत्न करा. नळी वाकडी होईल–होय ना ?

आता दुसरी एक नळी एका हाताने टेबलावर टेकवून सरळ उभी पकडून ठेवा. आणि दुसऱ्या हातात बटाटा घेऊन नळीच्या वरच्या टोकावर जोरात मारा. जपून हं ! नळी आपल्या हातात घुसू देऊ नका !

### काय होते आणि का ?

बटाटा जर नळीच्या बरोब्बर डोक्यावर जोरात आपटता आला तर बटाटा सुळी गेल्यासारखी ती नळी त्यात घुसेल ! पण वरून बटाटा अगदी बरोबर नळीच्या डोक्यावर बसला नाही; तर मात्र नळी वाकेल, अन् ती बटाटयात घुसून दुसऱ्या बाजूने तिचे टोक बाहेर निघेल !

खरे पाहता वरून सरळ माथ्यावर केलेले आघात सहन करण्याइतकी भरपूर शक्ती या नळीत नक्कीच असते. त्यामुळे नळीचे खालचे टोक टेबलावर टेकलेले असल्याने नळी हलू शकणार नाही. नळीच्या टोकापेक्षा बटाटा मऊ असल्यामुळे तो जेव्हा जोराने त्या टोकावर आपटतो, तेव्हा नळी बाटाटयात घुसते.

तुम्ही बटाटयातून नळी आरपार घुसवू शकाल? थोडया प्रयत्नाने एकाच जोराच्या फटक्याने तुम्हाला ते ही जमेल.

तुमच्याजवळ दोन बटाटे असतील तर टेबलावर ठेवलेल्या एका बटाटयावर नळी नीट सरळ उभी धरून दुसऱ्या बटाटयाने वरील टोकावर बरोबर माथ्यावर आघात करून नळी दोन्ही बटाटयात घुसवू शकाल ? करून पहा बरं !

नळीच जोराने बटाटयावर सरळ मारून त्यात घुसवू शकाल ?





# चीनची भिंत

अवकाश-यात्री जेव्हा वर वर जातात आणि पृथ्वीवरची शहरे व पर्वत हळूहळू अस्पष्ट होत होत अजिबात दिसेनाशी होतात, तेव्हा बहुधा शेवटी अदृश्य होणारं स्मारक म्हणजे चीनची विशाल भिंतच असावी ! १,५०० मैल, म्हणजेच पृथ्वीच्या परिघाच्या बारावा हिस्सा–इतकी जागा व्यापणारी मानवाने बांधलेली अशी ही सर्वात मोठी वास्तु होय ! या भिंतीत २४,००० दरवाजे आणि मीनार आहेत. भिंतीची सरासरी उंची २५ फुट असून पायथ्याशी तिची रुंदी २० ते ३० फुट आणि माथ्यावर ती रुंदी १५ फुट इतकी आहे. या भिंतीवरून एकाच वेळी एका रेषेत अनेक घोडेस्वार आपले घोडे दौडवू शकतात. इ. स. पू. तिसऱ्या शतकात चीनचा राजा शिन व्हांग टी याने बांधकामास सुरुवात केलेल्या या भिंतीचे काम पुढे १७०० वर्षेपर्यंत चालू राहिले व त्याला शेवटचा हात मिंग राजघराण्याच्या हातून दिला गेला. (१३६८-१६४४)



### जगातील महान् घटना

# शान्ति-प्रसाराला प्रेरणा देणारे युद्ध

ख्रिस्त जन्माच्या ३०० वर्षे अगोदर चन्द्रगुप्ताने मौर्य घराण्याची स्थापना केली. त्याच्यानन्तर त्याचा पुत्र बिन्दुसार हा राजा झाला; आणि त्यानंतर सिंहासनारूढ झाला तो 'सम्राट अशोक' म्हणून प्रसिद्धीस आलेला त्याचा पुत्र अशोक! मौर्य साम्राज्याच्या सीमा वाढवण्याची इच्छा असणारा, एक महत्त्वाकांक्षी राजपुत्र-म्हणूनच त्याने आपला कारभार सुरू केला. राज्यामागून राज्ये जिंकत अखेर तो कलिंग (आजचा ओरिसा) देशापर्यंत आला. त्या वेळी तेथला राजा कोण होता हे इतिहासच जाणे! परंतु इतके मात्र खरे की तेथील सर्वांची सर्व जनता हे आक्रमण परतवून लावण्याच्या ईर्ष्येनेच एक होऊन लढली! परंतु अशोकाचे सैन्य त्यांच्याहून अधिक सामर्थ्यवान्, सुसज्ज होते! या लढाईत एक लाख माणसे मारली गेली, दीड लाख माणसे कैदी म्हणून पकडली गेली आणि इतर अनेक बेघर होऊन व युद्धाच्या परिणामस्वरूप मरून गेली. इतका भयानक रक्तपात व लोकांची दीनावस्था पाहून अशोकचे मन द्रवले! त्याने पुन्हा म्हणून युद्धाचे नाव न काढण्याची प्रतिज्ञा केली आणि बुद्ध धर्म स्वीकारून शान्ति व अहिंसेच्या प्रचारार्थ आपले उर्वरित आयुष्य वेचले. प्रसिद्ध लेखक एच्. जी. वेल्स लिहितो– "इतिहासाची पाने भरणाऱ्या दहा हजार सम्राटांतून एकट्या अशोकाचेच नाव एकाद्या ताऱ्याप्रमाणे चमकत राहिले आहे!"

भुवनेश्वरजवळ, दया नदीच्या किनाऱ्यावरील धौली नावाच्या स्थानी हे कलिंग-युद्ध लढले गेले. तेथे आजही एका छोट्या टेकडीवर सम्राट अशोकाचा शान्ति-संदेश कोरून ठेवलेला आहे.



## प्राचीन भारतात भटकन्ती



१. कोणत्या भग्नावस्थेतील किल्ल्याशी तीन उल्लेखनीय स्त्रियांची नावे निगडित आहेत ?

२. त्यांची नावे सांगा ?

३. मीराबाईचा शेवट कसा झाला ?

४. आणखी कोणत्या संत-स्त्रीचा असाच शेवट झाला ?

५. गौतम बुद्धापूर्वी कोणत्या राजपुत्राने राज्याचा त्याग करून एका मोठ्या धर्माचे पुनरुत्थान केले ?

६. त्याचा जन्म कोठे झाला होता ?

७. कोणता प्रसिद्ध राजा उपासामुळे मरण पावला ?

८. त्याला अशी स्थिति कोणामुळे प्राप्त झाली ? [पान ८ पहा.

## घटना, विज्ञान, आविष्कार आणि शोधांची दुनिया

१. सरड्याची जीभ किती लांब असू शकते ?
२. जगात सर्वात जास्त वापरली जाणारी भाजी कोणती ?
३. जगात सर्वात कमी आढळात येणारी वनस्पति कोणती ?
४. तुम्हाला माहिती असणाऱ्या जनावरात अजिबात बहिरे जनावर कोणते ?
५. इंग्रजी भाषेत सर्वात अधिक उपयोगात येणारे अक्षर कोणते ?
६. तुमच्या शरीरात एकूण किती हाडे आहेत ?
७. तुमच्या नाडीच्या ठोक्यांचा वेग किती असतो ?
८. हत्तीच्या नाडीची गति काय असते ?
९. ध्रुवप्रदेशीय अस्वलाचे वजन किती असू शकते ?
१०. चतुष्पाद जनावरात सर्वात अधिक वेगवान कोणते ?

[पान ८ पहा.






१. कोणता मुस्लीम शहाजादा हिन्दु धर्मग्रन्थांचाही चांगला अभ्यासक होता ?

२. शिवाजीचे गुरु रामदास यांनी लिहिलेल्या ग्रन्थाचे नाव काय ?

३. सर्वात जुन्या संस्कृत शब्दकोषाचे नाव काय ?

४. शीख धर्मग्रन्थाचे नाव काय ?

५. तो कोणी संग्रहित केला ?

६. त्यात काय काय आहे ?

७. भारतीय ज्ञानपीठ पुरस्काराचा पहिला मानकरी कोण ?

८. त्यांनी, आपली रचना कोणत्या भाषेत केली ?

९. आपल्या वयाच्या चौथ्या वर्षी अन्धत्व आलेला सध्या जिवन्त असलेला भारतीय लेखक कोण ?

......पान आठवर पहा

## सर्व भारतीय भाषांचा एक शब्द शिकू या !

**मराठी** : दक्षिण

| | | |
|---|---|---|
| **आसामी** : दक्षिण | **कानडी** : दक्षिण | **संस्कृत** : दक्षिण |
| **बंगाली** : दक्षिण | **काश्मिरी** : जोनुब | **सिन्धी** : दक्नु |
| **इंग्रजी** : साउथ | **मल्याळी** : तेक्कुन | **तमिळ** : तेर्क्कु |
| **गुजराथी** : दक्षिण | **उडिया** : दक्षिण | **तेलुगु** : दक्षिणमु |
| **हिन्दी** : दक्षिण | **पंजाबी** : दक्षिण | **उर्दू** : जुनुब |

### तुम्ही विश्वास ठेवाल ?

१. कि रविवार हाच सर्वत्र सुट्टीचा दिवस असतो ?
२. कि प्रत्येक महिन्यात पौर्णिमा एकदा तरी येतेच ?
३. कि सर्वांत मोठा पिरॅमिड ईजिप्तमध्ये आहे ?

### अंहं; मुळीच नाही !

१. ग्रीक लोकांचा सोमवार हा सुट्टीचा दिवस; पर्शियन लोकांचा मंगळवार; मुसलमानांचा बहुधा शुक्रवार; तर ज्यू लोकांना सुट्टीचा दिवस असतो शनिवार !

२. १८६६ सालातील फेब्रुवारी महिन्यात पौर्णिमा आली नव्हती. असा निसर्गचमत्कार अडीच मिलियन वर्षांनी एखादा पुन्हा होऊ शकेल !

३. सर्वात मोठा पिरॅमिड मेक्सिकोमध्ये आहे. तो विटा व चिखल यांच्या साह्याने बांधलेला आहे. त्याने एकूण ४५ एकर इतकी जागा व्यापलेली असून त्याची उंची-१७७ फूट आहे. ईजिप्तमधला केऑप्स पिरॅमिड सर्वात उंच (४८० फूट) आहे, परंतु त्याने केवळ १३ एकर जागाच व्यापलेली आहे !

## उत्तरावली

| तो कोण ? | विज्ञान | साहित्य |
|---|---|---|
| धर्मपद<br>**इतिहास**<br>१. चित्तोडगड.<br>२. राणी पद्मिनी, मीराबाई आणि पन्नादाई.<br>३. असे मानले जाते की ती द्वारकेला भगवान श्रीकृष्णाच्या मूर्तीत विलीन झाली.<br>४. तमिळनाडूमधली आंडाळ. ती श्रीरंगमच्या रंगनाथस्वामीच्या मूर्तीत विलीन झाली असे मानले जाते.<br>५. इ. स. पू. सहाव्या शतकात महावीराने जैन धर्माचे पुनरुत्थान केले.<br>६. वैशाली.<br>७. मगधदेशाचा राजा बिम्बिसार.<br>८. त्याचा पुत्र अजातशत्रु याच्यामुळे. | १. त्याच्या शरीराच्या लांबीइतकी किंवा त्याहूनही अधिक.<br>२. कांदा.<br>३. हवाई बेटातील सुप्त ज्वालामुखींच्या मुखावर उगवणारी सिल्व्हरस्वोर्ड जातीची एक वनस्पति.<br>४. जिराफ.<br>५. 'E'<br>६. दोनशे सहा.<br>७. सर्वसाधारण सशक्त माणसाची नाडी दर मिनिटाला पंचाहत्तर ठोके या गतीने चालते.<br>८. दर मिनिटाला पंचवीस ठोके इतकी.<br>९. त्याचे वजन १००० पौण्ड पर्यन्त असू शकते.<br>१०. चित्ता. तो ताशी ७० मैलांच्या वेगाने धावू शकतो. | १. शहाजादा दारा शिकोह.<br>२. दासबोध.<br>३. अमरकोष.<br>४. आदि ग्रन्थ.<br>५. पाचवा गुरु अर्जुनमल.<br>६. गुरु नानक व त्याचे तीन उत्तराधिकारी यांची पदे, आणि हिन्दु व जैन संतांची काही पदे.<br>७. कवि जी. शंकर कुरुप.<br>८. मल्याळी.<br>९. वेद मेहता. तो सध्या अमेरिकेत असतो. |





## नेहरूंची गोष्ट-४

१९१९ मध्ये अनेक दुःखदायक घटना घडल्या. कॅनडाहून आलेल्या 'कामकटमारू' बोटीत क्रांतिकारक असल्याच्या संशयावरून ब्रिटिश सरकारने ती अडवली व ती किनाऱ्याला लागल्यावर तिच्यातील यात्रेकरूंना नानाप्रकारचा त्रास दिला.

त्याच काळात 'रौलट ॲक्ट' अंमलात आणला गेला व तो अशासाठी की ब्रिटिश शासनाच्या विरोधकांना कोर्टात दाखल केल्याशिवाय तुरुंगवासाची सजा देता यावी. याच कायद्याने वर्तमानपत्रांचे स्वातंत्र्यही रद्द करता येई.





गांधीजी अस्वस्थ झाले. गांधीजींच्या विरोधाला न जुमानता रौलट ॲक्टचा अंमल सुरू झाला. तेव्हां त्यांनी अखिल भारतीय पातळीवर त्या कायद्याविरुद्ध आंदोलन चालविण्याचे नेतृत्व प्रथम स्वीकारले. या आंदोलनाचे नाव 'सत्याग्रह' असे ठेवण्यात आले. तेव्हां हा निर्णय घेण्यात आला की या सभेच्या समस्त सभासदांनी रौलट ॲक्टचे उल्लंघन केलेच पाहिजे.



'सत्याग्रह सभे'चा सदस्य होण्याचे जवाहरलालने ठरवले. याचा परिणाम म्हणून त्यांना बंदीवास होणार हे नक्की. मोतीलाल या विचाराने व्याकुळ झाले की आपला मुलगा कारागृहाच्या जमिनीवर कसा झोपू शकेल. यासाठी त्यांनी घरीच जमिनीवर झोपून ते कष्ट प्रत्यक्ष अनुभवले.

तिथे पंजाबात सैनिक शासनाचा अंमल होता. त्याच वेळी अमृतसरमधील जालियनवाला बागेत भयंकर हत्याकांड झाले. लोक आपल्या नेत्यांची भाषणे ऐकायला जमले होते. त्या वेळेस दुष्ट ब्रिटिश सेनापती जनरल डायरने निर्दोष व निःशस्त्र लोकांवर गोळ्या चालवण्याची आज्ञा दिली. या हत्याकांडात शेकडो स्त्रीपुरुष मृत्युमुखी पडले व हजारो जखमी झाले.





जनरल डायरने लोकांना भयभीत करायला रस्त्यावर रांगत सरपटत त्यांनी जायला हवे तसेच त्यांच्या समोर जो कोणी इंग्रज येईल त्याच्या पाया पडायला हवे असा आदेश दिला. विद्यार्थ्यांना अशी शिक्षा देण्यात आली की दररोज त्यांना दहा पंधरा मैल पायपीट करवावी आणि कित्येक तास कडक उन्हात उभे करण्यात यावे.

सैनिकी शासन कायदा (मार्शल लॉ) रद्द होताच अनेक पुढारी पंजाबातील स्थितीचे निरीक्षण करायला तेथे गेले. पंडित मदनमोहन मालवीय आणि स्वामी श्रद्धानंदांनी पीडितांच्या पुनर्वसाची व साहाय्याची योजना हाती घेतली आणि असंख्य लोकांना ते स्वयंसेवक बनवू लागले.





जालियनवाला बागेतील हत्याकांडाची चौकशी करण्यासाठी काँग्रेसच्या सभेने अमृतसरला एक चौकशीमंडळ पाठवले. त्या मंडळाचे नेतृत्व पं. मोतीलाल नेहरू व चित्तरंजन दास यांच्याकडे होते. चित्तरंजन दासचे साहाय्यक म्हणून जवाहरलाल नेहरूंची योजना झाली. डायरने केलेल्या भयंकर हत्याकांडाच्या कथा ऐकून जवाहरलाल अगदी हतबुद्ध झाले.

आपले कार्य समाप्त झाल्यावर जवाहरलाल एका रात्रीच्या गाडीने दिल्लीला जायला निघाले. ज्या डब्यात ते चढले तेथे एकच वरचा बर्थ रिकामा पाहून ते तेथे निजले. सकाळी उठल्यावर त्यांनी पाहिले की डबा सैनिकांनी भरला होता. त्यांच्या मध्ये बसून जनरल डायर निर्लज्जपणे आपल्या दुष्कृत्यांची फुशारकी मारत होता. जवाहरलालने स्वतःच्या कानांनी हा सारा वृत्तांत ऐकला.





१९१९ साली अमृतसरमध्ये कांग्रेस महासभेचे अधिवेशन झाले. पं मोतीलाल नेहरु ह्या सभेच्या अध्यक्षस्थानी होते. याच अधिवेशनात भारतीय राष्ट्रीय कांग्रेसने नवयुगाचे नेता या नात्याने गांधीजींचा स्वीकार केला.

१९२० च्या १ ऑगस्टला मुंबईत लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांचे निधन झाले. १९०६ साली टिळक व श्री अरविंद यांनी मिळून कांग्रेस महासभेच्या अधिवेशनात संपूर्ण स्वराज्याची मागणी केली होती. १९१० मध्ये श्री अरविंद राजनीतीच्या क्षेत्रातून निवृत्त झाले. आणि आता टिळकांच्या निधनानंतर गांधीजी कांग्रेसच्या नेतृत्वासाठी पुढे आले.





टिळकांचे निधन झाले त्या दिवशी पहाटेच गांधीजी व जवाहरलाल मुंबईला पोचले. जवाहरलाल नेहरूंच्या शब्दात सांगायचे तर - आपल्या परमप्रिय महान नेत्याविषयी आपला आदर व्यक्त करायला दहा लाख लोकसंख्या असलेले सारे शहर लोटले होते. त्या विशाल समुदायाच्या सभेत गांधीजी आणि पं नेहरूंनी भाग घेतला.



# अनन्तरामचा मुलगा

एका गावात अनंतराम नावाचा एक जमीनदार रहात होता. त्याच्याकडे एक घोडागाडी होती व त्या गावातील लोकाना ती अतिशय उपयोगी पडत असे. त्या गावात एकादा कुशल वैद्य नसल्यामुळे जर गावात कोणावर एकादी आपत्ति ओढवली, आजार विकोपाला गेला किंवा साप चावला, तर आपल्या गाडीतून जवळच्या राजधानीत त्याला पोचवून अनंतराम लोकांवर उपकार करीत असे.

काही काळाने अनंतरामचे निधन झाले. मरण्यापूर्वी त्याने आपला मुलगा नरसिंह याला सांगितले–"मुला, संकटात पडलेल्यांना गाडीची जरूर पडल्यास ती तातडीने पाठवून त्यांना मदत कर."

नरसिंहाने आपल्या वडिलांना तसे वचन दिले खरे, परंतु त्याचे पालन मात्र केले नाही. वेळी अवेळी जर कोणी संकटात पडलेला त्याच्याकडे रडत गेला व गाडी देण्यासाठी त्याने प्रार्थना केली तर आपली झोपमोड करणाऱ्यावर रागाने तो तुटून पडे आणि त्याला बरेवाईट ऐकवून घराबाहेर काढी.

काही दिवसातच गाववाले समजून चुकले की नरसिंहाकडे गाडी मागणे अगदी व्यर्थ आहे. त्यामुळे स्वर्गवासी अनंतरामला लोक मनोमन प्रणाम करत आणि त्याचा मुलगा नरसिंह याला भरपूर शिव्याशाप देत.

एकदा मध्यरात्रीच्या सुमारास रंगनाथ नावाच्या गृहस्थाच्या वीस वर्षाच्या तरुण मुलाच्या जीविताला धोका उत्पन्न झाला. तेव्हां आपल्या मुलाला पाठीवर घेऊन रंगनाथ नरसिंहाच्या घरी गेला व त्याला झोपेतून उठवून त्याने गाडी मागितली.

निद्राभंग झाल्याने नरसिंह क्रोधाने ओरडला–"अशा तशा वाटेल त्या सोमा

प्रभा प्रभू



गोमासाठी गाडी तयार ठेवायला मी काय तुमचा नौकर आहे? ही काही तुमच्या बापजाद्यांची नाही. मुकाट्याने चालता हो." अशा प्रकारे दमदाटी करून त्याने दरवाजा धाडकन बंद केला.

रंगनाथच्या मुलाने बापाच्या बाहूंमध्ये असतानाच प्राण सोडले.

रंगनाथ कितीतरी वेळ शोक करीत होता. शेवटी याचे कारण झालेल्या नरसिंहाचा सूड घेण्याचा त्याने निश्चय केला.

आपल्या मुलाचे शव तेथेच टाकून तो सरळ न्यायाधीशाकडे गेला व त्याने नरसिंहा विरुद्ध तक्रार केली–"न्यायाधीश महाराज, नरसिंहाने माझ्या मुलाला कामावर बोलावले, मजुरीच्या पैशावरून दोघात भांडण झाले, मग रागाच्या भरात त्याने माझ्या मुलाला ठार मारले.

न्यायाधीशही अनेक दिवसांपासून नरसिंहावर नाराज होता. कारण तो कोणाला, कधीही कोणत्याही प्रकारे मदत करीत नसे. संधी मिळताच त्याला शक्य तितकी कठीण शिक्षा देण्याचा त्याचा मानस होता. अशी वेळ आज आल्याने त्याने नरसिंहाला चांगला धडा शिकवायचे ठरविले.

इतक्यात न्यायाधीशाच्या पत्नीने त्याला आत बोलावून विचारले–"अहो, आपण नरसिंहाला शिक्षा करणार आहात की काय?"

"होय, त्या दुष्टाला सजा दिल्याने सारा गाव प्रसन्न होईल" न्यायाधीश उत्तरला.

"आपण असे करू नये. अनंतरामने गाडी पाठवल्यामुळे आपला मुलगा वाचला व तो आता कचेरीत काम करीत आहे." पत्नी म्हणाली.

न्यायाधीशाने जरा विचार केला. मग मनाशी काही एक निर्णय करून त्याने रंगनाथला बोलावले व म्हणाला–"रंगनाथ, मी एक महत्वाची गोष्ट विसरलो होतो. उद्या सकाळीच एका अत्यंत महत्वाच्या कामासाठी मला दुसऱ्या गांवी जाणे अत्यावश्यक आहे. शेजारच्या गावातून गाडी मागवली आहे. घाईघाईत ह्या फिर्यादीची सुनवणी करणे शक्य नाही, म्हणून तू थेट राजाकडेच फिर्याद कर."

अखेर नाइलाजाने रंगनाथ राजाकडे गेला व नरसिंहा विरुद्ध फिर्याद केली.

राजाने नरसिंहाच्या गावातील काही लोकांना बोलावून त्यांची साक्ष घेतली. सर्वांनी नरसिंहाविरुद्ध साक्ष दिली. तेव्हां राजाने रंगनाथाच्या म्हणण्यावर विश्वास ठेवून नरसिंहाला फाशीची शिक्षा दिली.

दुसऱ्या दिवशी नरसिंहाला फाशी द्यायचे, पण ऐन वेळी वध करणारा मांग आजारी असल्याचे सांगून आला नाही. त्यामुळे फाशी स्थगित झाली. त्यानंतर दहा दिवस झाले पण मांग आलाच नाही.

राजाला शंका आली की मांग जाणून बुजून फाशी द्यायला विलंब करीत आहे. म्हणून खरे काय ते जाणून घ्यायला तो छद्मवेष घेऊन त्याच्या घरी गेला.

त्यावेळी मांगाची पत्नी त्याला म्हणत होती–"अशा प्रकारे किती दिवस आजाराचे ढोंग करून राजाला फसवणार तुम्ही? कधी न कधी नरसिंहाला फाशी द्यावेच लागणार आहे नं?"

त्यावर मांग म्हणाला–"राजेसाहेबांनी मला फाशी दिले तरी मी काही झाले तरी नरसिंहाच्या गळयात फास घालणार नाही.



मी सुद्धा त्याच गावचा आहे. बालपणी आजारी पडून मी मृत्युमुखी पडणार होतो, पण नरसिंहाच्या पित्यानं गाडी पाठवल्यानं वेळेवर उपचार होऊन आणि त्यामुळेच माझे प्राण वाचले. अशा पुण्यात्म्याच्या मुलाला फाशी देऊन स्वतःच्या शिरावर पापाचा बोजा लादून घेण्याची माझी इच्छा नाही. तूच सांग अनंतराम सारख्या पुण्यात्म्याचा मुलगा खून करण्याइतका दुष्ट असेल? मला वाटते की राजाच्या न्याय-दानात काही तरी चूक असावी."

हे ऐकून राजा विचारात पडला. त्याला वाटले की रंगनाथला बोलावून पुन्हा तपासणी करणे योग्य होईल.

दुसऱ्या दिवशी राजाने रंगनाथला बोलावून दरडावून विचारले—"खरे ते सांग, नरसिंहाने तुझ्या मुलाची हत्या केली का? मी म्हणतो तू खोटे बोलत आहेस. माझे म्हणणे खरे आहे नं?"

रंगनाथ घाबरला व त्याने राजाला खरी हकीगत सांगितली.

नंतर राजाने नरसिंहाला मुक्त केले व त्याला राजा म्हणाला—"तुझे वडील स्वर्गवासी झाले असूनही त्यांच्या परोपकारी स्वभावामुळे तू वाचलास. तू जिवंत असूनही स्वतःचा निर्दोषीपणा शाबित करू शकला नाहीस. तुझ्या गावातले सर्व लोक जाणून होते की रंगनाथच्या मुलाची तू हत्या केली नाहीस. परंतु कोणीही ते सत्य उघड केले नाही, कारण दुष्ट व्यक्तीचा सारे सारे लोक तिरस्कार करतात. आज तू केवळ अनंतरामचा मुलगा म्हणून वाचलास. नरसिंह या नात्याने नाही. या घटनेपासून धडा घेऊन तू आपले अंतरंग पालट आणि तुझ्या पित्याप्रमाणे सर्वांना यथाशक्ति साहाय्य करत जा. तेच तुझ्यासाठी सर्वात खात्रीचे रक्षा-कवच होईल."

या अनुभवाने नरसिंहाला परोपकार आणि चांगुलपणाच्या भावनेत किती शक्ति आहे व तिचे किती महत्त्व आहे ते कळले. त्या दिवसापासून तो आपल्या वडिलांच्या मार्गानेच जाऊ लागला.





# कृष्णावतार

श्रीकृष्णाने मुनींना कुशल-क्षेम विचारले.

मुनींनी प्रसन्न होऊन बदरीवनांतील मेवा म्हणून बोरे श्रीकृष्णाला भेट-स्वरूप दिली, आणि ते म्हणाले—"श्रीकृष्णा, आम्ही एक मोठी कामगिरी घेऊन तुमच्या-कडे आलो आहोत. भूदेवीचा मुलगा नरक हा राक्षसांचा नायक आहे. तो अत्यन्त पराक्रमी आहे, अलिकडे फार उद्दण्ड झाला आहे. तो समुद्राला शुष्क करू शकतो, धरणीला भयभीत करू शकतो, पर्वतांना खाली पाडू शकतो. आजकाल त्याला पाहून सर्व लोक थरथरा कापतात. एकदा तो आमच्या बदरीवनांत घेऊन टपकला. आम्ही आपल्या यज्ञकार्यात गुतलेलो होतो. त्याने येऊन आदेश दिला की आम्ही देवांना उद्देशून यज्ञ करू नये, त्याला उद्देशून यज्ञ करावा. आम्ही ते कबूल केले नाही. तेव्हा त्याने रागावून आपल्या सेवकां करवी आमचे यज्ञ-कुंड विझविले. आमची सर्व यज्ञाची सामग्री इकडे तिकडे फेकून दिली. आमच्या स्त्रियांना कैद करून घेऊन गेला. अशा प्रकारे आमच्या नित्य-कर्मात विघ्न आले आणि आमची प्रतिष्ठा धुळीस मिळाली. आम्ही अत्यन्त दुःखी आणि भयभीत झालो आहोत. आता आपण सोडून कोण आमचे संरक्षण करणार?"

मुनींची तक्रार ऐकून श्रीकृष्णांना आश्चर्य वाटले, तसेच त्यांना नरकासुराचा फार राग आला. अमळ मौन राहून श्रीकृष्ण



विचार करू लागले. श्रीकृष्णाची ही अवस्था पाहून मुनि एकमेकांकडे पाहू लागले.

यावेळी सात्यकि वगैरे प्रमुख यादव मंडळींनी श्रीकृष्णाला सावध केले. मुनींकडे पाहून श्रीकृष्ण म्हणाला—"आपण अन्यथा मानू नये. या दुष्ट नरकासुराचे चाळे ऐकून रागाच्या भरात मी थोडा व्याकुळ झालो. या दुष्ट राक्षसाचा संहार निश्चितपणें करणारच. आपण आता भय बाळगू नका. इथून निघा आणि आपला नित्यक्रम पहिल्या सारखा चालू करा. मुनींनी मनःपूर्वक श्रीकृष्णाचे आभार मानले आणि निरोप घेऊन बदरिकाश्रमाकडे प्रयाण केले.

मुनी-जन गेल्यावर इन्द्र अन्य दिक्पालांसह द्वारका नगरीत उतरले. श्रीकृष्णाने सामोरे जाऊन त्यांचे स्वागत केले. इन्द्राची प्रमुख यादव मंडळींची प्रेमाने विचार-पूस केली. सर्वांना अत्यन्त आनन्द झाला. नंतर 'सुधर्म' सभा-भवनात सर्व मंडळी विचार-परामर्श करण्यासाठी बसली.

इन्द्राने श्रीकृष्णाचा हात आपल्या हातात घेत म्हटले—"श्रीकृष्णा, मी एका विशेष कामासाठी आपली भेट घेण्यास आलो आहे. मी काय म्हणतो ते ऐकाल? नरकासुर नांवाच्या राक्षसांच्या नायकाने ब्रह्मदेवाकडून वरदान मिळविले आणि आता त्याने अगदीच उत्पात मांडला आहे. देवांशी युद्ध करून त्याने त्यांना पराजित केले. त्याच्या त्रासाला कंटाळून आम्ही घर-दार सोडून मानव-लोकात पळून आलो आहोत. त्याने आमच्या घरात शिरून आमची सर्व संपत्ति लुटून नेली. आता आम्ही आमचे हाल कुणाला सांगायचे? कुणाला ही मिळणार नाहीत अशी अदितीची कुंडले तो घेऊन गेला. मुनींच्या आश्रमांचा त्याने ध्वंस केला. अनेक राक्षसांचा संहार करून जगाचे रक्षण करण्याचा आपला संकल्प त्याच्या कानांवर गेलेला आहे. म्हणून आता युद्धात आपणास ही पराजित करण्याची महत्त्वाकांक्षा तो बाळगून आहे. म्हणून आता त्याचे पारिपत्य आपण करावे हे सर्वस्वी योग्य आहे. यामुळे सर्व लोकांचे कल्याण होईल. आपले वाहन बनून आपणास मदत करण्यासाठी गरुड माझ्या बरोबर आला आहे." असे म्हणून इन्द्राने गरुडाशी श्रीकृष्णाचा परिचय करून दिला.

"काही वेळापूर्वी या सर्व गोष्टी मी मुनींच्या तोंडून ही ऐकल्या आहेत. आपण आल्यामुळे माझा निश्चय आता अधिक पक्का झाला आहे. आम्ही तत्काल प्राग-ज्योतिषपुरा कडे प्रयाण करायचे ठरवले आहे." असे म्हणत श्रीकृष्ण आपल्या आसनावरून खाली आले. सर्व प्रमुख यादवांनी त्यांना निरोप दिला. शंख, चक्र वगैरे आपली आयुधे घेऊन त्यांनी सत्यभामेकडे खबर पाठविली. आता श्रीकृष्ण गरुडावर आरूढ झाले. वडील मंडळींनी त्यांना आशिर्वाद दिले. सेवकांनी स्तोत्र-पाठ केला. इन्द्र मार्ग दाखवू लागले. श्रीकृष्ण त्यांचे मागे निघाले. थोडा वेळ भूतलावर प्रवास करून मग इन्द्र आणि श्रीकृष्ण यांनी आकाशात उड्डाण केले. नि आकाश मार्गे प्रयाण सुरू केले.

श्रीकृष्णाने लांबूनच आकाशातून प्राग-ज्योतिषपुराचे दर्शन केले. या नगरीत प्रवेश करणे तसे सहज कुणाला शक्य नव्हते. नगराची संरक्षण-व्यवस्था कशी आहे याचे श्रीकृष्णाने निरीक्षण केले. देखरेख करणारे सर्व राक्षस पाहून घेतले.





यानंतर श्रीकृष्णाने इन्द्राला निरोप दिला आणि पुढे निघाले. नगराच्या सीमेवरील अनेक राक्षसांचा फडशा पाडला.

प्रागज्योतिषपुराच्या प्रवेश-द्वाराचे संरक्षण करणाऱ्या अनेक राक्षसांचा संहार करून आता श्रीकृष्ण द्वाराच्या जवळ पोचले, इतक्यात राक्षस-सेना त्यांच्यावर तुटून पडली. श्रीकृष्णाने अगदी सहजपणे या सर्वांचा समाचार घेतला. ही सर्व वार्ता नरकासुराला समजल्यावर आता तो स्वतःच श्रीकृष्णाशी युद्ध करण्याच्या तयारीने आला. युद्धासाठी एकट्याच आलेल्या श्रीकृष्णाला तो म्हणाला–"ऐक, या मला नरकासुर म्हणतात. इन्द्र आदि देवतांना पराभूत करून मी तिन्ही लोकांना संत्रस्त करून सोडले आहे. माझ्या पुढे मोठ मोठे धाडसी वीर कुछ कामाचे! तू असा कोण लागून राहिलास? इथं कशासाठी आला आहेस? हा मोठा-थोरला पक्षी कोण आहे? ही तुझ्या बरोबरची बाई कोण आहे? सगळं काही नीट सांग. मी आता तुला मारून टाकून या बाईला ताब्यात घेईन. पळून जाण्याचा प्रयत्न करू नकोस आणि युद्धाला तयार हो."

नरकासुराची ही वटवट ऐकून श्रीकृष्ण हंसून म्हणाले–"मी तिन्ही लोकात प्रसिद्ध असलेला श्रीकृष्ण! तुला माझी कीर्ति ठाऊक आहे की नाही? मला वासुदेव ही म्हणतात. या स्त्रीचं नाव सत्यभामा, ती माझी पत्नी आहे. हा पक्षी पक्षी-जातीचा राजा आहे. याला गरुड म्हणतात. हे माझे वाहन आहे. तुझा संहार करून जगाचे कल्याण करण्याच्या हेतूने मी येथे आलो आहे. समजलं?"

मंद स्मित करीत नरकासुर म्हणाला–"अस्सं, तर तो श्रीकृष्ण तू काय? तुझ्याशी लढायला मी फार उत्सुक होतो. तू युद्धात आपले सर्व सामर्थ्य पणाला लाव. आता बरा माझ्या तावडीत सापडला आहेस, प्राण वाचून कसा जातोस पाहतो!" असं म्हणून नरकासुराने श्रीकृष्णा बरोबर



लढायला सुरुवात केली. खरोखर हे युद्ध पाहून राम-रावणाची आठवण झाली. या युद्वात श्रीकृष्ण जखमी होऊन बेशुद्ध होऊन पडले.

हा प्रकार पाहून सत्यभामा जरा सुद्धा घाबरली नाही. तिने श्रीकृष्णाच्या डोक्यात शिरलेला बाण कुशलतेनें काढला. तेव्हा रक्ताची धार वाहू लागली. ती थांबविण्यासाठी सत्यभामेने जखमे वर आपला हात ठेवला आणि श्रीकृष्णाची योग्य ती सेवा-सुश्रूषा केली. गरुडाने आपल्या पंखांनी श्रीकृष्णाला वारा घातला. थोडया वेळात श्रीकृष्ण शुद्धी वर आले. ते सत्यभामेला म्हणाले—"मी आता थकून गेलो आहे. थोडा वेळ तू युद्ध कर." मग सत्यभामेने श्रीकृष्णाचे धनुष्य व बाण आपल्या हाती घेतले.

सत्यभामेने नरकासुरावर बाणांचा वर्षाव केला. नरक मोठ-मोठयाने म्हणाला—"श्रीकृष्णा, स्वतः युद्ध करायचे सोडून एका बाईला माझ्याशी युद्ध करायला सांगतोस! छी:! छी:!" नरकासुराने सत्यभामे वर अनेक तीक्ष्ण बाण सोडले. ते सत्यभामेच्या छातीत व हातात घुसले, पण त्याची जरा ही पर्वा न करता सत्यभामेनें क्रोधावेशात नरकासुराची ध्वजा उडवली, त्याच्या रथाच्या घोडयांना मारून टाकले. नंतर त्याच्या सारथ्याचा वध केला. सत्यभामे वर सोडण्यासाठी नरकासुर बाण दोरी पर ठेवतो न ठेवतो, इतक्यात सत्यभामा तो उडवून लावी. अशा प्रकारे नरकासुराचे तीन बाण वाया गेल्यावर त्याने आपली गदा जोरात सत्यभामे वर फेकली. पण सत्यभामेने मधेच गदेचे तुकडे-तुकडे करून टाकले. नरकासुराच्या प्रत्येक आयुधाचा सत्यभामेने नाश केला.

सत्यभामेचे हे युद्ध-कौशल्य पाहून श्रीकृष्णाला फार संतोष वाटला. तिच्या कपाळावरील घाम पुसत ते म्हणाले—"सत्यभामे, तू आता खूप दमलीस, पुरे कर युद्ध!" प्रशंसा करीत श्रीकृष्णांनी आपला कंठहार सत्यभामेच्या गळयात घातला. हा हार प्राप्त करण्याची तीव्र इच्छा सत्यभामा व रुक्मिणी या दोघींच्या मनात होती. पण अजून पर्यंत तो कुणालाच मिळालेला नव्हता. आज तो सत्यभामेला मिळाला.

यानंतर श्रीकृष्णांनी सत्यभामेच्या हातून धनुष्य घेतले आणि नरकासुराशी युद्ध सुरू केले. नरकासुराने रथ बदलला आणि श्रीकृष्ण, सत्यभामा व गरुड यांच्यावर बाणांचा वर्षाव केला. श्रीकृष्णाने क्रमशः नरकाचा नवा रथ, त्याचे घोडे आणि सारथी यांचा संहार केला. आता नरकासुराला खूप राग आला आणि हातात गदा घेऊन तो खाली उतरला. श्रीकृष्णाच्या छातीच्या रोखाने त्याने आपली गदा फेकली. श्रीकृष्णाने अगदी सहजपणें ती गदा मोडून टाकली. नरकासुराने श्रीकृष्णावर विविध अस्त्रें, वृक्ष आणि दगड मारले पण कशाचा ही काही उपयोग झाला नाही.

शेवटी श्रीकृष्णाने नरकावर आपल्या सुदर्शन-चक्राचा उपयोग केला. या चक्राने नरकासुराचे शिर धडापासून अलग झाले. अशा रीतीने नरकासुराचा नाश झाला आणि पृथ्वी वर आलेले भारी संकट टळले. भू-देवी मानव रूप धारण करून प्रत्यक्ष अवतीर्ण झाली. तिने नरकासुराच्या शवाला आलिंगन दिले व त्याच्या कानातील दिव्य



कुंडले काढून घेतली. श्रीकृष्णाजवळ जाऊन रडत रडत हात जोडून म्हणाली—"महात्मन्, आपणच मला हा पुत्र दिला आणि आता त्याला लोककंटक म्हणून मारून टाकले. आता देव आणि मुनि सुखाने राहतील. इन्द्राला पराजित करून मिळवलेली ही कुंडले आहेत. ही मी आता आपणास देऊन टाकते. नरकाच्या मुलाला अभय द्या नि त्याला आपले राज्य देऊन टाका."

श्रीकृष्णानें भूदेवीची विनंती मान्य केली. तेव्हा भूदेवी अदृश्य झाली. श्रीकृष्णाने नरकाच्या शवाची उत्तर-क्रिया केली आणि मग त्याचा पुत्र भगदत्त याला राज्याभिषेक केला.

प्राग्ज्योतिषपुरात असंख्य खजिने पडले होते. दिक्पालांना पराभूत करून नरकासुराने त्यांचा संग्रह केलेला होता. नरकासुराच्या सेवकांनी हे सर्व खजिने श्रीकृष्णाच्या ताब्यात दिले.

नरकासुराने देव-लोकातील सोळा हजार एक शे स्त्रियांना कैद करून मणिशैलाजवळ ठेवलेले होते. श्रीकृष्ण सत्यभामेसह तेथे गेले. त्यांना पाहून त्या स्त्रिया म्हणाल्या—"आम्ही देवांच्या नारी आहोत. एकदा नारदाने आमचे दुःख पाहून या शब्दांत आम्हाला आश्वासन दिले होते—'तुम्ही चिंता करू नका. श्रीविष्णु मानवाचा अवतार धारण करून नरकाचा नाश करतील व तुमची मुक्तता होईल.' त्या आशे वर आम्ही आजतागायत सर्व दुःखे सहन करीत आलो. आता आम्ही धन्य झालो."

श्रीकृष्णाने प्रेमभराने त्या सर्वांकडे पाहिले आणि त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होतील असा त्यांना आशीर्वाद दिला. राक्षक-सेवकांकडून त्यांच्यासाठी पालख्या आणवून घेतल्या. यानंतर श्रीकृष्णाने सर्व मणिशैल हिंडून-फिरून पाहिला. त्याचे एक शिखर, त्यावरील वृक्ष व पक्ष्यांसह बाजूला करून ते गरुडावर ठेवले. गरुडाने प्रेमभराने हा भार वाहिला. पर्वत-शिखरासह श्रीकृष्ण गरुडावर आरूढ झाले आणि इन्द्र-नगरीत पोचले. इन्द्र व शची यांना भेटून त्यांची विचार-पूस केली. शची आणि सत्यभामा यांनी एकमेकींना आलिंगन दिले. श्रीकृष्णानें इन्द्राला नमस्कार केला आणि आणलेली कुंडले त्याला देऊन टाकली. श्रीकृष्णाने नरकाचा संहार केला आणि त्यात सत्यभामेने ही सहकार्य केले हे जाणून शचीने सत्यभामेची तारीफ करीत म्हटले—"सांग सत्यभामे, तुझी आवडती कोणती ही वस्तु तुला देण्याची माझी इच्छा आहे. सांग तुला काय देऊ?"

सत्यभामेने उत्तर दिले—"माझ्याजवळ सर्व काही आहे. मला कसला ही अभाव नाही. तुझे प्रेम मिळाले की बस आहे. याहून अधिक कशाची इच्छा नाही."





# तोंडफाटले खडे

रत्नगुप्त नावाच्या एका धनाढ्य व्यापाऱ्याकडे सुधाम नावाचा एक नोकर होता. आपल्या मालकाचे आज्ञापालन तो मोठ्या निष्ठेने करीत असे. रत्नगुप्तही त्याच्याशी प्रेमानेच वागे, त्याला आपल्या कुटुम्बातल्या व्यक्तीप्रमाणेच समजे.

एके दिवशी रत्नगुप्तकडे त्याचा एक धनगुप्त नावाचा नातेवाईक रहायला आला. या धनगुप्ताचा आपल्या जिभेवर मुळीच ताबा नसे. बारीकसारीक गोष्टींवरून तो नोकरांना वाकडेतिकडे बोले, शिव्या देई. आपल्या सवयीप्रमाणे एकदा त्याने सुधामलाही फैलावर घेतले.

हा प्रकार न आवडल्याने रत्नगुप्त मात्र धनगुप्तला एकीकडे नेऊन त्याला म्हणाला—"सुधाम सहसा कधी काही चूक करीतच नाही. पण क्वचित केलीच तर मी त्याला गोड शब्दात ती दाखवून देतो. तू मात्र आज त्या चांगल्या माणसाला उगीचच शिवीगाळ केलीस. इतरांशी वागायची ही काय पद्धत झाली?"

यावरही आपलंच समर्थन करीत धनगुप्त म्हणाला—"मानाने मोठ्या आणि श्रीमन्त माणसांना अशी चिडायची सवयच असते. अन् मग त्याचा प्रयोग आपण कुणावर करणार? आपल्या शिव्या ऐकण्यासाठी नाही, तर मग नोकरांचा उपयोगच काय मुळी?"

रत्नगुप्त चिडून म्हणाला—"पण असं एकसारखं त्यांच्यावर ओरडत राहिलो तर आपल्याला नोकर मिळणंच मुश्किल नाही का होणार?"

"अरे, छोड भी यार! आपल्या देशात इतके दरिद्री लोक आहेत की ते आपल्या शिव्या ऐकूनही गप्प राहू शकतील." धनगुप्त म्हणाला.

आनन्द पत्की



"तरीपण उगीचच शिव्या का म्हणून द्यायच्या? लाचारीमुळे बिचारा सुधाम काही करू शकत नाही. पण मनातल्या मनात तो आपली निन्दा करील, तीच शाप बनून आपलं नुकसान नाही करू शकणार?" रत्नगुप्तने विचारले.

धनगुप्त यावर हसून म्हणाला–"यालाही एक उपाय आहेच. आपल्याला जेव्हा खरंच असं वाटतं की आपण एकाद्याला उगीचच शिव्या दिल्या आहेत, अशा वेळी त्या नोकराला बोलावून त्याच्याशी जरा गोड-गोड बोलून त्याच्या हातावर एकादं चांदीचं नाणं ठेवावं! अरे, खुश होईल तो, अन् नेहमीच अशा संधीची वाट पहात राहील की, पुन्हा कधी आपल्याला शिव्या ऐकायला मिळणार!"

"तरीही मी असंच म्हणेन की नोकरांना शिव्या देऊन संपल्या की आपल्या बायका मुलांवर आणि नातेवाईक, मित्र वगैरेंवर काढायला राग शिल्लकच रहाणार नाही, अन् मग आपलं जीवन कसं आनन्ददायक राहील! चल, मी तुझ्या सुधामचाही आत्ता फैसला करून टाकतो बघ! तू पहातच रहा!" इतकं बोलून सुधामला जवळ बोलावून तो म्हणाला–"हे बघ सुधाम, मी आत्ता तुला शिवीगाळ केली, त्याचं वाईट वाटून घेऊन नकोस. मी कधी कधी रागाने वेडा होऊन जातो अगदी! अशा वेळी मी काय-काय बडबडतो याचं भानच रहात नाही मला बघ! माझं मलाच नन्तर काही आठवत नाही. असो. ये इकडे, हे घे पैसे तुला!" असे बोलून तो सुधामला पुढे म्हणाला–"अरे, समज, तांदुळात कधी खडे सापडले तर आपण ते निवडून काढून टाकतो, पण तांदुळांवर आपण राग नाही काढत, 'तांदूळच वाईट' असं नाही म्हणत आपण! तसाच माझ्या शिव्याही विसरून जा तू."

पण त्याच दिवशी संध्याकाळी या दोघांच्या कानावर बातमी आली की सुधाम जोरजोरात कोणालातरी शिव्या देत आहे.





रत्नगुप्त अन् धनगुप्त तावडतोब सुधामच्या खोलीत गेले. सुधाम तांदूळ निवडत बसला होता अन् तोंडाने शिव्या चालू होत्या!

"ए, कुणाला शिव्या देतो आहेस तू?" रत्नगुप्ताने आश्चर्याने विचारले.

"हे तांदूळ विकणाऱ्या सावकाराला! दुसऱ्या कुणाला?" सुधाम उत्तरला.

"पण त्याने तुझं काय वाकडं केलं?" रत्नगुप्तने पुन्हः विचारले.

पळभर थांबून सुधाम म्हणाला–"पहा नं साहेब, या तांदुळात कित्ती खडे आहेत! धान्याबरोबर काही खडे उत्पन्न होत नाहीत. बरं शेतकरीही आपल्या तांदुळात खडे मिसळत नाही. भात कांडणारेही खडे नाही घालत. तेव्हा साहजिकच उघड आहे की हे खडे मिसळणारा तो स्वार्थी सावकारच असला पाहिजे. तांदूळ निवडून खडे बाजूला काढता येतात हे मला माहीत आहे. पण प्रत्येक खडा काढून बाहेर टाकता टाकता सावकाराला एकेक शिवी दिली नाही, तर माझा राग कसा शान्त होईल? ही गोष्ट मलाच नाही, तर असले तांदूळ खरीदणाऱ्या कोणालाही विचारा. ते स्वतःच सांगतील."

यावर रत्नगुप्त सुधामशी काहीच बोलला नाही. धनगुप्तला घेऊन तो घरात निघून गेला. अन् त्याने विचारले–"काय धनगुप्त, ऐकलंस ना सुधामचं बोलणं?"

"हो, ऐकलं की! मानलं बाबा, तुझा सुधाम काही साधासुधा नोकर नव्हे!" धनगुप्तने कबुली दिली.

रत्नगुप्त हसून म्हणाला–"प्रत्येक गोष्टी-वरून शिव्या देऊन नंतर नोकराला खुश करण्यासाठी पैसे देण्याने काही त्याचा राग शान्त होत नाही. तात्पुरते ते खुश होत असतील कदाचित्! बास, इतकंच माझं म्हणणं."

धनगुप्तनेही कबुलीदर्शक मान हलवत म्हटले–"आजपासून मीही नोकरांशी माझी वागणूक बदलीन. सुधामने चांगला धडा शिकवला मला. पण त्याबद्दल मी त्याला आता इनाम नाही देणार हं!" असे म्हणून तो हसू लागला!





# हत्तींची पंचायत

आफ्रिकेत एक मोठे-थोरले सरोवर होते. त्या सरोवराच्या किनाऱ्यावर रामोगी नावाचा एक वृद्ध माणूस आपले सात मुलगे, सुना नि नातवंडांसह रहात असे. त्याच्या सर्व झोपड्यांनी मिळून एक छोटं गावच वसवलं होतं. रामोगीच्या मृत्युनंतर तो सर्व प्रदेश मोठ्या मुलाच्या अधिकारात आला. बाकीच्या सर्व भावांना आपल्या कुटुंबासह अन्यत्र राहण्याची व्यवस्था करावी लागली.

सर्वात छोटे दोन भाऊ–पोधू नि अरुवा लहानपणासून एकमेकात मिळून-मिसळून रहात असत. एकाने काही काम करण्यास सुरुवात केली कि दुसरा त्याला मदत करायला धावून येई. इथपर्यंत कि दोघांनी दोन सख्ख्या बहिणींशी लग्नें केली होती.

आपापसातील या अति स्नेहामुळे दोघांनी निश्चय केला की हा प्रदेश सोडून जायचे झाले तर दोघे ही कोठे तरी एकाच जागी जाऊन आपले घर बनवतील आणि तेथे एकत्र राहून आपली कालक्रमणा करतील. अशी प्रथा त्यांच्या रिवाजा विरुद्ध होती, पण दोघांनी ही त्याची पर्वा केली नाही.

आता त्यांच्यापुढे एक समस्या उभी राहिली कि कुठे जाऊन आपले नवे घर बनवावे? रामोगीचे कुटुंब जिथे रहात असे, त्याच्या पूर्वे कडे एक मोठं जंगल होतं. दोन्ही भावांनी विचार केला की त्या जंगलाच्या सीमे वर जाऊन आपल्या झोपड्या बांधाव्यात आणि शेती-वाडी सुरू करावी. या भयानक जंगलाच्या सीमे वर पोधू नि अरुवा यांनी आपल्या झोपड्या बांधल्या आणि शेतात जोंधळा पेरला. थोड्याच दिवसात जोंधळ्याच्या ताटांना कणसं लागली आणि हवेत ती डोलू लागली.

आफ्रिकेतील एक लोककथा



एक दिवशी अरुवा जनावराना चारण्या-साठी बाहेर घेऊन गेला होता. पोधु आळसाने बिछान्यावरच लोळत पडलेला होता. एकदम मुले आरडा-ओरडा करू लागली–"हत्ती आले! हत्ती आले!!" पोधू झटपट उठला नि सापडेल तो भाला हाती घेऊन बाहेर आला.

हत्तींचा एक मोठा कळप जोंधळ्याच्या शेतात ताटं तुडवीत होता, सोंडांनी ताटं उपटून फेकून देत होता. पोधू शेताच्या बांधावर जाऊन मोठ्याने ओरडला. सर्व हत्ती शांतपणे उभे राहिले नि पोधूकडे पाहू लागले.

'सर्वात मोठ्या हत्तीच्या रोखाने पोधूने' आपल्या हातातील भाला सर्व बळ एकवटून फेकला. तो त्याच्या बगलेत जाऊन घुसला. हत्तीला खूप राग आला. वेदनेने कळवळून तो मागे फिरला नि जंगलाकडे चालू लागला. बाकीचे सर्व हत्ती त्याच्या मागे जाऊ लागले. जणू काही सर्वांनी सल्ला-मसलत करून एक निर्णय घेतला होता.

जे काही घडले यात पोधूच्या हातून नकळत एक अपराध घडला. त्याने जो भाला हत्तीवर फेकला तो काही साधा भाला नव्हता. रामोगीच्या वंशात हा भाला पिढ्यात् पिढ्या चालत आला होता. असा समज होता की कोणे एके काळी नंबि जातीच्या लोकांनी हा भाला तयार केला होता आणि तो मंत्र-शक्तीने भारलेला होता. हा भाला म्हणजे अरुवाचा जीव की प्राण होता. नीट लक्षात न आल्याने पोधूने हा भाला हत्तीवर फेकला होता. आणि आता हा भाला हत्ती बरोबर जंगलात गेला.

अरुवा जनावरांना हाकून घरी घेऊन आला, तेव्हां तो भाला घरात नसल्याचे त्याच्या लक्षात आले. त्याने रागा-रागाने पोधूला विचारले–"बाबा, माझा भाला दिसत नाही? माझा भाला मला आणून दे."

"अरुवा, तुझा तो भाला हत्ती बरोबर त्या भयंकर जंगलात गेला. आता तो मी



तुला कसा आणून देऊं शकणार? त्याच्या ऐवजी त्याहून उत्तम भाले मी तुला खरेदी करून देऊ शकतो. मागून घे." पोघूने विनवणी केली.

"मला माझाच पाहिजे! जर तो तू दिला नाहीस तर प्राणाशी गाठ आहे समज!" अरुवाने धमकावले.

"असं होय? बरं, तुला आपला भाला आणून देईन. नाही तर मरून जाईन!" पोघू शांतपणे म्हणाला.

दुसऱ्या दिवशी पोघू सर्वांच्या अगोदर उठला, एक भाला हाती घेतला. जंगली जनावरांच्या पावलांच्या खुणांनुसार पोघू दिवसभर चालत राहिला. पण त्याला हत्ती काही दिसले नाहीत. जेव्हां रात्रीचा दाट अंधार पसरला, तेव्हां पोघू एका विशाल वृक्षाच्या ढोलीत जाऊन झोपला. सकाळ उजडताच तो पुन्हा वाट चालू लागला. बराच वेळ चालल्यावर जंगलांतील एका मैदानात तो पोचला. तिथं एक जुनी-पुराणी झोपडी त्याला दिसली. झोंपडीतून धूर बाहेर पडत होता

पोघूला पाहताच एक म्हातारी हातात कुऱ्हाड घेऊन बाहेर पडली. लांकडं फोडता-फोडता बडबडली—"आता या म्हातारपणी मला मदत करणारं कोणी नाहीं! मला ही सगळी कामं केलीच पाहिजेत."

पोघू म्हातारीच्या जवळ जाऊन म्हणाला—"आजी बाई, मी तुमची लाकडं फोडून देतो. तुम्ही का काळजी करता?" असं म्हणून पोघूने म्हातारीच्या हातांतली कुऱ्हाड घेतली आणि थोडयाच वेळात फोडलेल्या लाकडांचा ढीग रचला.

म्हातारीने खदखडून हंसत विचारलं—"वाह बेटा, तू पण मोठा शूर दिसतो आहेस! आपलं निवास-स्थान सोडून तू या जंगलात कशासाठी आलास बरं?" पोघूने आपली सगळी कथा म्हातारीला ऐकवली.

म्हातारीनं सांगितलं—"या कामासाठी इथ पर्यंत येणं हे एक निश्चित धाडसाचं



काम आहे. मी तुला काही मदत करू शकेन की नाही कोणास ठाऊक? तूर्त माझी लाकडं फोडण्याचं काम करीत तू इथंच रहा. समजलं?"

पोघू जवळ जवळ महिना भर म्हातारी पाशी राहिला. दिवस भर तो लाकडं फोडीत राही. म्हातारी दिवस भर काही तरी कुरकूर करीत असे. मधून मधून त्याला आळशी, नालायक म्हणून शिव्या देई.

शेवटी पोघूला वाटलं की ही म्हातारी काही आपल्याला मदत करू शकणार नाही. तो निराश झाला. अखेर म्हातारीने पोघूला एकदा आपल्या जवळ बसवून समजावलं—"बेटा हे सगळे दिवस फुकट गेले असं वाटून घेऊ नकोस! जर तुझ्यात धाडस, सहनशीलता आणि परोपकारी वृत्ति हे तीन गुण असतील, तर हत्तींकडून तू आपले काम करून घेऊ शकशील. मी तुझी परीक्षा पाहिली की हे गुण तुझ्यात आहेत की नाहीत. तू एका हत्तीवर अन्याय केलेला आहेस. हत्ती हा अन्याय कधी ही विसरू शकणार नाहीत. म्हणून तुला उपयोगी पडेल अशी एक वस्तु मी तुला देणार आहे." असं म्हणून म्हातारीने एक निळ्या रंगाचा कांचेचा मणी पोघूच्या हाती दिला.



दुसऱ्या दिवशी सकाळी म्हातारीने पोघूला एक रस्ता दाखवला आणि कसं गेलं म्हणजे हत्तींच्या निवास-स्थानापर्यंत पोचता येईल हे समजून सांगितलं.

म्हातारीने दाखवलेल्या रस्त्याने पोघू चार तास चालत राहिला आणि शेवटी हत्ती राहतात त्या ठिकाणी जाऊन पोचला. ऐन जंगलात एक ऐस-पैस मैदान होतं नि तिथे हत्ती रहात असत. या मैदानाच्या सभोवताली उखडून टाकलेले मोठमोठे वृक्ष एकमेकांवर ठेवून जणू काही एक भिंत-शी बनवलेली होती.

पोघूने या मैदानात असंख्य लहान-मोठे हत्ती पाहिले. त्या सर्वांमध्ये एकाचा



छोटया टेकडीसारखा एक विशालकाय म्हातारा नर-हत्ती त्याला दिसला. कदाचित् तोच या कळपाचा राजा असावा.

पोधू हत्तींच्या राजाजवळ पोचला आणि मान खाली घालून नम्रपणे त्याच्याजवळ जाऊन थरकापत उभा राहिला.

हत्तींच्या राजाने पोधूला काही तरी विचारलं. पोधूला वाटलं राजा विचारतो आहे–"तू कशासाठी इथं आला आहेस?" पोधूने मान वर करून मोठया हिंमतीने सर्वांना ऐकू यावे म्हणून खणखणीत आवाजात निवेदन केलं–"प्रिय हस्ती जन हो, तुम्ही त्या दिवशी माझ्या शेतात आला होतात, तेव्हां मी तुमच्याशी अत्यंत निर्दयपणे वागलो. मी माझ्या भावाचा एक भाला तुमच्या पैकी कोणावर तरी फेकला. तो या जंगलात तुमच्या बरोबर आलेला आहे. माझ्या भावाने मला धमकावलं आहे की मी जर तो भाला आणून दिला नाही जर तो मला मारून टाकील. आता तुम्ही लोक मला माझा भाला तरी परत द्या, नाही तर माझे प्राण घ्या. मला दोन्हीं सारखेच आहे.

हत्ती काही वेळ शान्त राहिले. मग हत्तींचा राजा आपल्या सहकाऱ्यांशी काही बोलला. राजाच्या आदेशानुसार दोन हत्ती पोधूला एका वृक्षाच्या छायेत घेऊन गेले.

दरम्यानच्या काळात हत्तींची पंचायत बसली. पण काही निर्णय होऊ शकला नाही. मधून हत्तींची आरडा-ओरड मात्र ऐकू येई. शेवटी एकदाची पंचायत संपली. हत्ती पोधूला राजाकडे घेऊन गेले. हत्तींच्या राजाने काही तरी सांगितले.

राजाच्या आदेशानुसार हत्ती पोधूला एका झाडा मागे घेऊन गेले. तेथे त्याने अनेक भाले पाहिले. पोधूने आपला भाला ओळखला. तो हातात घेऊन पोधूने हत्तींना नमस्कार केला आणि आपली कृतज्ञता प्रकट करून तो तेथून निघाला.

परतीच्या रस्त्यावर त्याला म्हातारीची झोपडी दिसली नाही. बहुतेक त्याचा रस्ता चुकलेला होता. यामुळे म्हातारीने दिलेला निळया रंगाचा काचेचा मणी त्याच्याच जवळ राहून गेला. रस्ता चुकल्यामुळे पोधूला आपल्या घरी पोचायला तीन दिवस लागले.

आपला भाला परत आलेला पाहून अरुवाला अत्यन्त आनन्द झाला. पोधूने सर्वांना आपला रोमांचकारी अनुभव सांगितला आणि तो काचेचा मणी पण दाखवला. प्रत्येकने तो नीट पारखला. सर्वांनाच मोठे आश्चर्य वाटले. नंतर तो मणी मुलांच्या हाती गेला, मुले कौतुकाने तो पाहू लागली. अरुवाच्या सर्वात छोटया मुलाने मणी हातात घेऊन पटकन तोंडात टाकला आणि चक्क गिळला.

आता मात्र बरीच गडबड माजली.

पोधूच्या बायकोने मुलाला मारायला सुरुवात केली. अरुवाच्या बायकोने आपल्या ताई वर खूब तोंडसुख घेतले.

पोधू अरुवाला म्हणाला–"हे बघ, प्रिय अरुवा, माझ्या हातून तुझा भाला गेला. मी आपले प्राण पणाला लावून तुझा भाला परत आणून दिला. आता माझा मंतरलेला मणी तुझ्या मुलाने गिळला, मी तो परत मागितला तर काय बरे उत्तर देशील?"

"मी उद्याच दुसरी कडे कोठे तरी रहायला जातो. आपण आपली वाटणी करून टाकू. म्हणतात ना–कुत्री नि मांजरं एकत्र राहू शकतात, पण दोन सख्खे भाऊ गुण्यागोविंदाने एकत्र राहू शकणार नाहीत. मी अन्यत्र कोठे तरी माझे घर बनवतो." अरुवाने आपले उत्तर सांगून टाकले.

"ठीक आहे, तसंच कर तर! पण माझी एक अट ध्यानात ठेव. मणी गिळणारा तुझा मुलगा मला देऊन टाक." पोधूने मागणी केली.

अरुवाने मोठया भावाची अट मान्य केली. आपल्या छोटया मुलाला पोधूकडे सोडून अन्य कुटुंबीयांसह अरुवा नव्या घराच्या शोधार्थ निघाला.





# बिम्ब आणि प्रतिबिम्ब

विशाल नावाच्या नगरावर धर्मनन्द राजा राज्य करीत होता. तो रोज आपल्या महालाच्या छतावर जाई. तेथे थंड हवा खात तो सूर्योदय व सूर्यास्ताची शोभाही पहात असे.

रोज सकाळी एक लाकुडतोड्या राजवाड्यासमोरून जंगलाकडे जाणाऱ्या रस्त्याने लाकडं तोडायला जाई; आणि संध्याकाळी डोक्यावर लाकडांची मोळी घेऊन त्याच रस्त्याने घराकडे परत जाई.

राजाला रोज सकाळ-संध्याकाळ हा लाकुडतोड्या दिसे. सकाळी जेव्हां तो जंगलाकडे जाताना दिसे, तेव्हा राजाच्या मनात येई–"अरेरे, बिचारा अगदीच दरिद्री असावा! दिसायलाही कसा हाडांच्या सापळ्यासारखा दिसतो. दिवसभर कडक मेहनत करूनच त्याचं पोट भरत असलं पाहिजे." त्याला पाहून राजाच्या मनात दयाभाव उत्पन्न होई; पण संध्याकाळी मात्र जेव्हां डोक्यावर मोळी घेऊन तोच लाकुडतोड्या परत येई, तेव्हा मात्र–का कुणास ठाऊक–पण राजाला त्याचा अत्यंत राग येई! त्याच्या मनात येई–"या दुष्टाचा वध केला, तरी काही दोष घडणार नाही."

राजाला समजेना की एकाच व्यक्तीला पाहून आपल्या मनात सकाळी एक अन् संध्याकाळी दुसरा असे परस्परविरोधी भाव का उत्पन्न होतात? त्याला फार आश्चर्यही वाटे याबद्दल!

शेवटी राजाने आपल्या मन्त्र्याला बोलावून त्याला आपला हा अनुभव कथन केला आणि आपल्या मनात असे भाव उत्पन्न का होतात याचा शोध घ्यायला सांगितले.

दुसऱ्या दिवशी एका गरीब माणसाचा वेष घेऊन मन्त्री लाकुडतोड्याच्या मागोमागे जंगलात गेला. दिवसभर कष्ट करणाऱ्या लाकुडतोड्याकडे तो पहात राहिला आणि संध्याकाळी पुन्हा तो त्याच्यामागोमाग परत आला.

लाकुडतोड्याबद्दल राजाला दया का येते इतकेच फक्त त्या दिवशी मन्त्र्याला कळून आले.

दुसऱ्या दिवशी एका साधूचा वेष करून मन्त्री त्या लाकुडतोड्याच्या घराकडे निघाला. आपल्या घराच्या दरवाज्याशी त्या साधूला पाहून लाकुडतोड्याच्या बायकोने त्याचे स्वागत केले; त्याला घरात बसायला आसन देऊन साष्टांग नमस्कार केला. मन्त्र्याला घरांतून चन्दनाच्या लाकडांचा तीव्र वास आला.

"तुमच्या घरात चन्दनाचं लाकूड बरंच असावं असं वाटतंय. ते विकून आरामात आपले दिवस का घालवत नाही तुम्ही? इतके कष्ट करायची गरज काय?" लाकुडतोड्याच्या बायकोला सहानुभूति दाखवत मन्त्र्याने विचारले.

"साधुमहाराज, मोठ्याने बोलू नका. माझा नवरा जंगलात जेव्हां लाकडं तोडतो, तेव्हा कधीकधी एकादं चन्दनाचं लाकूडही मिळून जातं. अशा तऱ्हेने मिळालेलं लाकूड आम्ही एका खोलीत भरून ठेवलेलं आहे. त्याच्या मनात एक कल्पना आहे–आपला राजा कधी ना कधी मरेलच ना; तेव्हा त्याच्या दहनासाठी चन्दनाच्या लाकडांची जरूरी पडेल. अन् त्यावेळी या लाकडांची



आम्ही मागू तितकी किंमत मिळेल न?" लाकुडतोड्याच्या बायकोने साधूच्या प्रश्नाचं खरंखरं उत्तर सांगून टाकलं!

आता मन्त्र्याच्या बरोबर लक्षात आले की, लाकुडतोड्याबद्दल राजाला राग का येतो! लाकुडतोड्या सकाळी जंगलाकडे निघतो, तेव्हा त्याच्या मनात आपल्या दारिद्र्याबद्दलचे विचार घोळत असतात; त्यावेळी त्याच्या मनात इतकंच असतं की आपल्या कुटुम्बाच्या आजचा खर्च निघण्यापुरते लाकूड मिळालं की आपण खुश होऊ. अशा वेळीच राजालाही त्याची दया येत असते.

परंतु आपले काम पुरे करून संध्याकाळी परत येणाऱ्या लाकूडतोड्याच्या मनात त्यावेळी मात्र घरात लपवून ठेवलेल्या चंदनाचे विचार घोळत असतात. त्याच्या मनात असते की राजा लवकर मेला तर आपल्याला खूपसे धन प्राप्त होईल; अन् त्यावेळीच इकडे राजाच्या मनात त्याच्याबद्दल असह्य असा क्रोध उत्पन्न होतो!

यावरून एक गोष्ट उघड आहे की लाकुडतोड्याच्या अन् राजाच्या मनातले भाव 'बिम्ब व प्रतिबिम्ब-स्वरूप' आहेत!

यानंतर लाकुडतोड्याच्या बायकोचा निरोप घेऊन मन्त्री आपल्या घरी गेला अन् दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे दरबारात हजर झाला. राजाने त्याला विचारले—"मन्त्री महोदय, काय रहस्याचा काही पत्ता लागला?"

"महाराज, मी सत्य शोधून काढलं. आपण लाकुडतोड्याला अभयदान देण्याचे वचन दिलेत, तर मी आपणाला वास्तविक गोष्ट काय आहे हे सांगेन. लाकुडतोड्याला कोणतीही शिक्षा न व्हावी." इतके बोलून मन्त्र्याने राजाला सर्व वृत्तान्त ऐकवला.

राजाने बरोबर जाणले की लाकूडतोड्या गरीब आहे म्हणूनच तो दररोज राजाच्या शीघ्र मृत्युची अपेक्षा करत असतो. त्यामुळे राजाने त्याला काही धन देऊन सुखाने आपले जीवन घालवता येईल अशी व्यवस्था करून दिली.





## निसर्गाची करणी

पाठीचा कणा नसलेल्या प्राण्यात सर्वात अधिक वजनदार प्राणी म्हणजे अटलांटिकमधला-जायण्ट स्क्वीड नामक जलचर प्राणी! प्रमाणित माहिती अशी आहे की ५५ फूट लांब अन् वजनाने २ टन वजनाचे स्क्वीडही आढळात येतात. काही लोकांचे असे म्हणणे आहे की १७५ फुट लांबीचा स्क्वीडही त्यांनी पाहिलेला आहे! सर्व प्राण्यात या प्राण्याच्या डोळ्यांची बाहुली सर्वात खूपच मोठी असते. एकेका बाहुलीचा व्यास जवळजवळ १५ इंच इतका मोठा असू शकतो; म्हणजेच तो एक फुटबॉलच्या दुपटी इतका असू शकतो. या जनावराच्या शरीरात शिरा (नसा) फारच अधिक असतात. या शिरा माणसांच्या शिरांहून ५०० पट जाडीच्या असतात!

या जलचरांचा मुख्य शत्रु म्हणजे देवमासा. कित्येक देवमाशांच्या शरीरावर यांच्या प्रहारामुळे झालेल्या १८-१८ इंच व्यासाइतक्या मोठ्या जखमाही दिसून आलेल्या आहेत.













## चांदोबातील नवलाई



### अतिप्राचीन काळापासून फुलणारी फुले

आतापर्यंत असे समजले जाई, की जगात दहा कोटी वर्षांपूर्वी पासून फुलं फुलत आली आहेत. परन्तु जर्मनीतल्या शास्त्रज्ञांनी (३००,०००,०००) तीस कोटी वर्षांपूर्वी पासूनच फुलत आली आहेत असे सिद्ध केले आहे.

### नागाचे स्वगत



जैन मतावलम्बी लोग नागोबाला 'भाग्यदेवता' असे मानतात. धनबादजवळील भगवान परेशनाथाच्या मंदिराच्या उद्‌घाटन समारंभाचे वेळी, दहा फूट लांबीचा एक नाग मन्दिराच्या गोपुरावर चढला आणि तो सर्व कार्यक्रम संपेपर्यंत फणा उघडून तेथे डोलत राहिला. हजारो भक्त ते पाहून भक्तिभावाने भारावून गेले.



### सुप्रसिद्ध कथानायक

युनेस्कोने प्रकाशित केलेल्या वर्णनावरून असे कळते की जगातील जास्तीत जास्त भाषांमध्ये भाषांतरित कथांमध्ये प्रथम क्रमांक "मिकी माऊसची साहसकृत्ये" या पुस्तकाचा, दुसरा क्रमांक लेनिनने रचलेल्या ग्रंथांचा, तिसरा क्रमांक अँगाथा ख्रिस्तीच्या गोष्टींचा व चौथा क्रमांक बायबलचा लागतो.

### लघु कॉम्प्यूटर



नुकताच एक इंचाहूनही कमी जाडीचा अन् पॉकेट-बुक आकाराचा एक कॉम्प्यूटर बनवला गेला आहे, टेबलावर ठेवण्यासारख्या सामान्य आकाराच्या कॉम्प्यूटर इतकेच काम हा छोटा कॉम्प्यूटरही करू शकतो.

# समाईक चप्पल

दोन कंजूष माणसं शहरात एक घर भाड्याने घेऊन रहात असत. त्यातला एक बांगड्या विकण्याचा धन्दा करी, तर दुसरा वस्तु गहाण ठेऊन घेऊन सावकारी करण्याचा.

एके दिवशी कासाराने गहाणवटी काम करणाऱ्या सावकाराला सुचवले–"आपण दोघं अर्धा-अर्धा खर्च करून एक चप्पल जोड खरीदला तर कसं होईल ?"

"हे कसं ठीक होईल ? तू एक अन् मी एक चप्पल घालून फिरलो तर लोक हसणार नाहीत का आपल्याला ?" सावकाराने आपले मत प्रकट केले.

"अरे, चप्पलजोड आपल्यात समाईक असला, तरी आपल्याला एक एक चप्पल घालून जायची काही गरज नाही. व्यापाराच्या निमित्ताने जो बाहेर जाईल, त्याने चप्पल घालून जायचं" कासार म्हणाला.

ही सूचना सावकारालाही पसन्त पडली. मग दोघांनी मिळून चप्पल-जोड खरेदी केला. कासार खांद्यावर बांगड्यांची बंडलं लटकवून शहरात फिरत बांगड्या विकत असे. अन् त्यावेळी गहाणवटवाला सावकार आपल्या घराच्या ओसरीवर बसून गरजू लोकांच्या वस्तु ठेवून घेऊन त्यांना पैसे देऊन रवाना करी. यामुळे झालं असं की खर्चात अर्धा वाटा असूनही त्याला चप्पल घालून कुठे जाण्याची संधीच मिळेना ! यामुळे त्याला आता चिन्ता वाटू लागली. यावर खूप डोकं खाजवून त्याने एक उपाय शोधून काढला. रात्रीच्या वेळी पायात चप्पल घालून सकाळ पर्यंत घराभोवती फेऱ्या घालत रहायचा उपक्रम त्याने सुरु केला. थोड्याच दिवसात चप्पला झिजून तुटून गेल्या !

पुन्हा एका दिवशी कासाराने सावकाराला विचारले–"दोस्त आपण पुन्हा नव्या चपला घ्यायच्या ?"

"चपला-खरेदीचं नाव पुन्हा माझ्यासमोर उच्चारु नकोस" सावकार तट्कन म्हणाला.

"का बरं ? काय झालं ?" कासाराने आश्चर्याने विचारले.

"रात्री न झोपता मी किती दिवस चालवू ? मलाही झोपायची गरज आहेच ना ?" सावकार उत्तरला.







# ताडाखाली दूध

कोणे एके काळी रत्नगिरि नगरात एक व्यापारी रहात होता. त्याचं नाव होतं कुबेर. दुर्भाग्याने व्यापारात त्याला चांगलीच ठोकर बसली.

या परिस्थितीत तो आपल्या भविष्याबाबत विचार करीत होता, इतक्यात एका ज्योतिषाने येऊन त्याला सल्ला दिला–"तुर्त हे शहर आपल्याला अनुकूल दिसत नाही. म्हणून आपण जहाजात बसुन विदेशी जावं. तिथे काही दिवस व्यापार करून परत यावं. आपलं भाग्य संपूर्ण बदलून जाईल."

कुबेराला एक एकुलता एक मुलगा होता-समीर. तसा तो काही दुर्गुणी नव्हता, पण तो आपला बराच वेळ दारुडे नि जुगार खेळणारांच्या संगतीत घालवीत असे.

जहाजा वरील प्रवास सुरू करण्यापूर्वी कुबेराने आपल्या मुलाला जवळ बोलवले नि समजून सांगितले–"बेटा, मी काही व्यापार करण्यासाठी परदेशी जाण्याचं ठरवलंय. मी परत येईपर्यंत आपला इथला व्यापार तुला पहावा लागेल आणि आईला नीट सांभाळण्याची जबाबदारी ही अर्थात् तुझीच !"

समीरने वडिलांची सूचना मान्य केली, पण कुबेराला तेवढंच सांगून संतोष झाला नाही. पुढं तो मुलाला म्हणाला–"तू बुद्धिमान आहेस हे मी जाणतो. पण दुष्ट लोकांशी तुझी मैत्री योग्य नव्हे. दारुडे आणि जुगार खेळणारांच्या संगतीत न राहिलास तर बरं !"

वडिलांचा उपदेश ऐकून समीरला मोठं आश्चर्य वाटलं. त्याने विचारलं–"बाबा, इतके दिवस आपण काही बोलला नाहीत, आणि आजच हा सारा उपदेश आपण मला का करीत आहात हे मला समजत नाही.

"वसुंधरा"



याच्या मागे काही तरी खास कारण असलं पाहिजे जरूर ?"

"होय बेटा, काही कारण आहे, म्हणून तर आज तुला समजाऊन सांगतो आहे. आज पर्यंत तू लहान होतास. आता कुटुंबाची सर्व जबाबदारी तुझ्यावर सोपवितो आहे. आता तू मोठा झालास म्हणून काही गोष्टी तुला समजाऊन सांगत आहे." गंभीर होऊन कुबेराने मुलाला सांगितले.

"बाबा, मी दुष्टांशी मैत्री करतो याला काही कारणं ही आहेत. हे सर्व लोक माझे बालपणचे मित्र आहेत. लहानपणी आम्ही सर्वजण एकत्र खेळलो. मोठं झाल्यावर त्यांच्या वाईट संवयीं वर बोट ठेऊन त्यांच्यापासून दूर होणं मित्र-धर्माला शोभेल का? हे झालं पाहिलं कारण. दुसरं कारण असं की मी त्या सर्वांपेक्षा अधिक बुद्धिमान आहे, ते सर्व जण माझ्या अंगच्या गुणांची नेहमी तारीफ करतात. त्यांच्याशी मैत्री करताना त्यांच्या दुर्गुणांची झळ मला लागणार नाही यासाठी मी नेहमी जागरूक असतो. म्हणून ही ते नित्य माझी प्रशंसाच करतात. याचा मला अत्यन्त आनन्द वाटतो. आणि आता तिसरं कारण सांगतो— अनेकांनी माझ्याशी पैज लावली आहे की या दुष्टांच्या संगतीत राहून मी नक्की बिघडणार! त्यांचं हे म्हणणं खोटं आहे हे सिद्ध करण्यासाठी मी मुद्दामच त्यांच्यात थोडा अधिक वावरतो." समीरने आपली बाजू मांडली.

समीरचं सगळं म्हणणं ऐकून कुबेर हसला आणि म्हणाला—"तुझं सगळं म्हणणं बरोबर आहे. पण आजपर्यंत त्यांची संगत घडली तेवढी पुरेशी नाही का? लक्षात ठेव, समाजातील तुझे स्थान तुझ्या मित्रांवर अवलंबून आहे. आता तू एका कुटुंबातील एक जबाबदार माणूस आहेस. म्हणून वाईटांची संगत सोडून दे. ताडाखाली दूध प्यायलं तरी काय होतं हे माहीत आहे न?"

खरं म्हणजे ताडाखाली दूध प्यायलं म्हणजे काय होतं हे समीरला माहीत नव्हतं.



पण तसं वडिलांना विचारलं तर ते म्हणतील—'ही एवढी साधी गोष्ट तुला माहीत नाही?' वडिलांनी आपली चेष्टा करायला नको म्हणून समीर गप्प बसला.

यानंतर कुबेर व्यापार करण्यासाठी परदेशी गेला. एक दिवशी समीरने लोट्यात दूध घेतलं नि गावच्या सीमेवरील एका ताडाच्या झाडाखाली जाऊन बसला नि दूध पिऊ लागला. दुधाच्या चवीत काही बदल झाल्याचे त्याला जरा सुद्धा जाणवले नाही. तो विचार करू लागला—"बाबांनी असं का बरे सांगावं? ताडाच्या झाडाखाली दूध प्यायलं तरी दूध हे दुधासारखंच लागतं!"

परंतु समीरला ताडाखाली दूध पिताना पाहून ओळखीच्या एका माणसाने त्याच्या आईकडे जाऊन तक्रार केली—"आई, समीर गावाबाहेर एका ताडाखाली बसून ताडी पीतोय!"

हे सर्व ऐकून समीरची आई व्याकुळ होऊन रडू लागली. ही बातमी कोणी तरी ताडाखाली बसलेल्या समीरला जाऊन सांगितली.

लोट्यात थोडं दूध शिल्लक होतं ते घेऊन तो घरी आईजवळ पोंचला. तिला म्हणाला—"आई, मी ताडी नव्हतो ग पीत, पहा या लोट्यात दूधच आहे की नाही?"



तोपर्यंत समीरची आई रडतच बसली होती. समीरने आईला समजाऊन सांगण्याचा प्रयत्न केला. पण तिकडे लक्ष न देता ती ओरडून दटावीत म्हणाली—"मी आज पर्यंत समजत होते की दुष्ट लोकांशी तुझी केवळ मैत्रीच आहे; पण आता समजलं त्यांच्या वाईट संवयी ही तुला लागलेल्या आहेत!"

समीर आईला आर्जवाने सांगू लागला—"अग आई, गैरसमज होतोय तुझा! या लोट्यांत ताडी नाही, दूध आहे दूध! पहा तर खरं."

"काही नकोय पहायला! दूधच प्यायचं होतं तर ताडाखाली जाऊन बसायची काय

जरूर होती? एवढी सुद्धा तुला अक्कल नाही मूर्खा?" आईनी धमकावलं.

"आई, मी चुकलो. नीट विचार न करता मी असं केलं. आता पुन्हा मी कधी असं करणार नाही. बघ, आता घरातच बसून पीतो." असं म्हणत राहिलेलं दूध पीण्यासाठी लोटा तोंडाला लावला.

आईने जोराने लोटा हिसकावून घेतला आणि दूर फेंकून देत म्हणाली—"तुला जर ताडीच प्यायची असेल तर ताडाखाली जाऊन मी. घरात पीणं मला मुळिच सहन होणार नाही!"

समीर चिडून म्हणाला—"आई, मी तुला समजाऊन सांगतो आहे, या लोटयात ताडी नाही, दूध आहे! तू नीट समजून का घेत नाहीस?"

इतक्यात एक मांजरी तिथे आली नि सांडलेलं दूध तिने चाटून टाकलं. पण काय झालं कोणास ठाऊक? चांगली चालत आलेली मांजरी, लडखडत तेथून निघून गेली.

समीरला कळेना की आता आईला काय उत्तर द्यावं. त्याने आपलं डोकं लाजेने खाली घातलं.

आई डोळे पुशीत म्हणाली—"तुझ्या वडिलांनी प्रथम पासून तुला धाकात ठेवलं असतं तर आज तूं जुगारखोरांच्या नि दारूड्यांच्या संगतीत फसला नसतास तुझ्या वडिलांनी तुझ्यावर या कुटुंबाच्या प्रमुखाची जबाबदारी सोपवली आहे. आता का होईना तू आपल्या वाईट संवयी सोडून आपल्या व्यापारात लक्ष घाल."

आईचा उपदेश ऐकून आता समीरच्या लक्षात आलं की ताडाखाली बसून दूध जरी प्यायलं, तरी लोकांचा त्यावर विश्वास बसणं फार कठीण आहे. त्याला वडिलांनी सांगितलेल्या गोष्टींच मर्म समजलं. त्या दिवसापासून त्याने वाईट लोकांची संगत सोडून दिली. वडिलांनी सांगितल्या प्रमाणे आता त्याने आपल्या घरच्या व्यापार-धंद्यात लक्ष घालून चांगलं यश मिळवलं!





# डाकू युवराज

हिरण्यागार डोंगराच्या पायथ्याशी वसलं होतं शान्तिपुर. नावाप्रमाणेच शान्त नगर! सुमेध राज्याच्या राजधानीचं शहर शान्तिपुर! आरंभापासूनच सुमेध राज्यावर शासन करणाऱ्या राजांनी नगर मनापासून सुंदर सजवलं होतं. सुंदर बगीचे लावले, तलाव खोदले अन् विशाल मन्दिरं बांधली! सध्या सुमेध राज्यावर राज्य करत होता राजा शान्तिदेव. शान्तिपुर नगरातील जनतेबरोबरच संपूर्ण राज्यातील प्रजेला सुख मिळावं, जनता संपन्न असावी आणि सर्वांनीच शान्तिपूर्ण जीवनाचा आस्वाद घ्यावा म्हणून राजा जागरूक असे.

याच गोष्टीची चर्चा करत असताना सेनापती वीरसिंह एक दिवस राजाला म्हणाला—"राज्यात संपत्ति वाढवायची असेल तर सर्वांत सोपा उपाय म्हणजे शेजारच्या देशावर हल्ला करणं! यामुळे एका दगडात दोन पक्षी मारल्यासारखं होतं. एक तर त्या राज्यावर आपला अधिकार प्रस्थापित होतो, अन् दुसरं म्हणजे त्या राज्यातली सारी संपत्ति आपल्याला मिळते!"

यावर हसून राजा म्हणाला—"वीरसिंह, हा काही बरोबर मार्ग नव्हे! शेजारचं राज्य जिंकून मिळणारी संपत्ति काही जास्त दिवस टिकणार नाही. शिवाय अशी संपत्ति विनासायास मिळालेली असल्याने प्रजेची मेहनत करण्याची वृत्ति कमी होईल. आणखी एक गोष्ट म्हणजे, लुटलेली



संपत्ति एकदा संपली की पुन्हा आणखी एकाद्या राज्यावर हल्ला करावा असं आपल्याला वाटेल.

"महाराज, आपल्याला युद्धच करायचं नसेल तर मग सैन्य तरी कशाला बाळगायचं आपण?" वीरसिंहने विचारले.

"आपण हल्ला न केला तरी इतरांच्या हल्ल्या पासून आपल्या देशाच्या रक्षणासाठी सैन्य हवंच ना आपल्याला! पण माझं तर म्हणणं असं, की युद्धामुळे होणाऱ्या अनर्थाची नीट कल्पना करून सर्वांनीच सैन्य ठेवणं बन्द करावं! तुला माहीतच आहे ना, की युद्धामुळे अपार जनसंहार, संपत्तीचा निरर्थक व्यय आणि वेळाचा दुरुपयोग होतो? खरं म्हणजे युद्धंच झाली नाहीत, तर ही सर्व शक्ति आपल्याला जनकल्याणासाठी उपयोगात आणता येईल. बरोबर आहे ना?" राजा शान्तिदेव म्हणाला.

"क्षमा करा महाराज, पण आपण केवळ शान्तिची स्वप्नं पहात आहात!" जराशा अवहेलनेच्याच सुरात वीरसिंह म्हणाला.

सेनापती वीरसिंह हा राजाचा केवळ जवळचा नातेवाईकच नव्हे, तर त्याचा बालमित्रही होता; अन् म्हणूनच तो राजाशी सर्व गोष्टी अगदी उघड उघड बोले.

"वीरसिंह, मी स्वप्न पहातो हे तुझं म्हणणं तर बरोबरच आहे. पण कपटाने एकमेकांचा गळा कापण्यापेक्षा-एकमेकां सहाय्य करू, अवघे धरू सुपंथ-हेच धोरण मला जास्त पसन्त आहे, हेच स्वप्न मी पहात असतो. म्हणूनच आपल्या सेनेला कल्याणकारी कार्याला प्रवृत्त करावं अशी सूचना मी देत आहे. आपल्या सैन्याच्या मदतीने आपण आवश्यक स्थानी नद्यांवर पूल बांधू; जिथे नद्या नाहीत तिथे कालवे खोदू; रस्त्यांच्या दुतर्फा फळझाडे लावू; धान्य निर्माण करण्यासाठी अथक प्रयत्न करणाऱ्या शेतकऱ्यांना आपल्या सैनिकां-



नीही मदत केली तर...राजा पुढे आणखी काही बोलणार इतक्यात–

राजाला मधेच टोकत वीरसिंह रागाने म्हणाला–"महाराज, विचित्रच विचार आहेत आपले! मी आपल्या सैनिकांना आज्ञा देतो, की आजपासून त्यांनी गवळ्यांना दूध काढायला मदत करावी अन् घरात बायकां बरोबर स्वयंपाकही करू लागावे."

वीरसिंहाच्या या बोलण्यावर राजा फक्त थोडासा हसला. सेनापती राजाहून दोन वर्षांनी लहान होता; म्हणून राजा त्याच्यावर मोठ्या भावाप्रमाणे प्रेम करी.

"वीरसिंह, गुराखी व बायकांना मदत करणं हे काही कमीपणाचे काम नव्हे. इतर लोकांचे जीव घेऊन त्यांची धन-संपत्ति लुटण्यापेक्षा हे काम हजारपट बरं! तू जरा थंड डोक्याने विचार करून पहा; म्हणजे मगच तुला 'शान्ति'ची किंमत कळेल." राजाने त्याला पुन्हा समजावायचा प्रयत्न करत म्हटले.

त्याच वेळी मन्त्री तेथे आल्यामुळे सेनापती आपलं बोलणं संपवून तेथून निघून गेला; अन् राजा मन्त्र्याशी इतर विषयांवर बोलण्यात गढून गेला.

त्याच रात्री सेनापती वीरसिंहाने आपल्या निरनिराळ्या पथक-नायकांना



गुप्तपणे एका ठिकाणी बोलावून घेतले अन् तो त्यांच्याशी बोलू लागला–"मित्रांनो, आपल्या महाराजांची अशी अपेक्षा आहे, की आजपासून तुम्ही सर्वांनी हाती नांगर धरून शेती करावी अन् बायका स्वयंपाक वगैरे करतील तेव्हां त्यांना मदत म्हणून जळण आणून देण्यासारखी कामं करून त्यांना मदत करावी."

हे ऐकून त्या पथक-प्रमुखांना मोठे आश्चर्य वाटले. जरा थांबून सेनापति पुढे बोलू लागला–"दोस्तांनो, आपण सर्वांनी उत्तम सैनिक-शिक्षण घेतलेले आहे. साहस हा तर आपला प्राणच! तलवार चालवणं हे आपलं मुख्य कर्तव्य! अस



असताना आपण काय आपल्या शस्त्रांना गंज चढू द्यायचा?"

"छे, छे! मुळीच नाही!" सर्वजण एका सुरात ओरडले.

"अरे, अरे! ओरडू नका असे. भिंतीलाही कान असतात बरं का!" वीरसिंहाने त्यांना सावधगिरीचा इशारा दिला.

वीरसिंहाने किती काळजी घेतली, तरी त्याच्या कारस्थानाची वार्ता राजाच्या कानी पोचलीच! पण त्याच्या योजनेबद्दल राजाला काहीच समजले नाही. राजाने तरीही या गोष्टीकडे फारसे लक्ष दिले नाही. राजा फार चांगल्या स्वभावाचा असल्यामुळे, त्याच्या मनातही आले नाही की वीरसिंहसारखा आपला नातेवाईकच आपल्यावर उलटू शकेल! अन् शिवाय छोटचा राजकुमाराचा वाढदिवसही अगदी जवळ आल्यामुळे त्या प्रसंगी होणाऱ्या अन्नदान, नृत्य-गान वगैरे कार्यक्रमाची तयारी धुमधडाक्यात चालू होती. ठिकठिकाणी तोरणं बांधण्यासाठी अन् मांडव वगैरे घालण्यासाठी अनेक माणसांची नियुक्ति केली गेली. आकर्षक दारूकामासाठी कुशल कारागीर नेमले गेले. या सर्व धामधुमीमुळे वीरसिंहशी या कार्यक्रमानंतरच बोलू, असे राजाने ठरवले. अन् त्याच्याकडे थोडे दुर्लक्षही केले.

युवराजाच्या वाढदिवशी पहाटे मंगलवाद्यांच्या स्वरांनी उत्सव सुरू झाला. राजप्रासादासमोरील विशेष आकर्षकपणे सजवलेल्या मंडपातील उच्चासनावर आपल्या बाळाला घेऊन राणी आसनस्थ झाली. तिच्यामागे तिचा सखीवृन्दही नटून-सजून उभा राहिला. शेकडो नरनारी राणी व युवराजाचे अभीष्टचिन्तन करण्यासाठी येऊन पोचले.

बराच वेळ तेथे बसून रहाणे राणीला जरा कष्टप्रद झाले, पण राजा व राज-परिवारा संबंधी जनतेची श्रद्धा व भक्ती पाहून ती अत्यन्त मुग्ध झाली होती.





संध्याकाळ होताच झोपेने पेंगणाऱ्या आपल्या बाळाला घेऊन राणी शयनगृहात पोचली.

दारूकाम पहाण्यासाठी हजारो माणसे राजवाड्यासमोर गोळा झाली होती. एकीकडे नृत्यकार्यक्रम चालू होता, तर दुसरीकडे एक विनोदी नाटक पहात जनता खदखदून हसत होती. तेथील एकूण सर्वच वातावरण निरनिराळ्या आवाजांनी दुमदुमून गेले होते! एरव्ही राजद्वारावर नेहमीच जागरूक पहारा असे; पण आज उत्सवामुळे लोकांना येण्याजाण्याला पूर्ण मुभा होती!

राणीही आता झोपायच्या तयारीत होती, इतक्यात राजा स्वतःच शीघ्रगतीने शयनगृहात आला! राजाच्या अशा अचानक प्रवेशाचे राणीला मोठे आश्चर्य वाटले, पण त्याला पाहून ती हळूच हसली. यापूर्वी सूचना न देता राजा असा कधीच आत घुसत नसे.

"महाराज, आपण फार थकलेले दिसता?" राणीने प्रेमाने विचारले.

राजाने काही उत्तर न देता तेथे हजर असलेल्या राणीच्या सखीकडे पाहिले. इशारा समजून ती तेथून निघून गेली.

"काय झालं महाराज?" राजाचा अस्वस्थपणा पाहून राणीने विचारले.

राजाने काही न बोलता प्रथम शयनगृहाचा दरवाजा बन्द करून आतून कडी घातली; अन् मस्तकाचा घाम टिपत म्हणाला—"देवी, जास्त सविस्तर बोलायला आत्ता वेळ नाही, आपल्या जिवाला धोका उत्पन्न झालेला आहे. तुला इथून ताबडतोब निघून जाऊन जीव वाचवायला हवा."

"गुप्त मार्गाने निघून जावं लागेल मला?" राणीने अत्यंत आश्चर्याने विचारले.

"हो, असंच करावं लागेल." राजा गंभीरपणाने उत्तरला.

राजाचे उत्तर ऐकून राणीला तर आपल्यावर वज्रपातच झाल्यासारखे वाटले!



शयनगृहातून अरण्याच्या मध्यापर्यंत एक गुप्त भुयारी मार्ग होता.

"मी एकटीनेच जायचं भुयारातून?" भयविव्हल स्वरात राणीने विचारलं.

"एकटीने कसं? आपल्या बाळालाही बरोबर घेऊन जायचं आहे तुला." राजा दृढ स्वरात म्हणाला.

"तुम्हाला एकटं सोडून कशी जाऊ मी!" अत्यन्त विषादाने राणीने विचारले.

"आपल्या राजपुत्रासाठी तुला एवढा त्याग करायलाच हवा देवी!" गद्‌गद्‌ल्या आवाजात राजा म्हणाला.

पुन्हा थोड्या वेळात राजा बोलू लागला–"शत्रूची खरी नजर तर माझ्या-वरच आहे सध्या, पण त्यांनी आपल्या तिघांचाही शेवट करायची पक्की योजना बनवलेली आहे. मीही जर तुझ्याबरोबर निघालो तर आपल्या तिघांनाही तो बन्दिवान करायचा प्रयत्न करील. पण मी जर इथे थांबून त्याच्याशी लढलो तर काही वेळापुरता तरी त्याला तुझा व बाळाचा विसर पडेल." अशा प्रकारे राजाने कसेबसे राणीला समजावले.

नंतर राजाने वीरसिंह आपल्या अनुयायांच्या मदतीने राजसिंहासन मिळवायच्या खटपटीत कसा आहे आणि उत्सवाच्या गडबडीचा, कोलाहलाचा फायदा करून घेण्याचं कारस्थान त्यानं कसं रचलं आहे हेही तिला सांगून टाकलं.

तसे पाहता प्रजा व साधारण सैनिकांच्या मनात राजाबद्दल खूप आदरच होता; तरीही असंघटित अशा लाखो माणसांच्या इच्छेविरुद्ध सुसंघटित अशा अल्पसंख्य लोकांचाच जय होतो.

राजाला आपल्या गुप्त हेरांकडून असे कळले होते की राजवाड्याचे सर्व दरवाजे वीरसिंहाच्या ताब्यात गेलेले आहेत आणि एका तासाने होणारे अपूर्व असे दारूकाम पहायला अगणित लोक राजवाड्याबाहेर गोळा होत आहेत. ज्या वेळी हे दारूकाम सुरू होईल अन् त्याचा कानठळ्या बसवणारा





आवाज होईल त्यावेळी सारी जनता भान हरपून तेच पहात राहील; अन् त्याचवेळी आत घुसून वीरसिंह व त्याचे अनुयायी राजपरिवाराची कत्तल करतील.

"महाराज, आपले अंगरक्षक कुठे आहेत? दिसत नाहीत ते कुठे!" राणीने विचारले.

"मनोरंजनाचे कार्यक्रम पहाण्यासाठी जायला मीच त्यांना परवानगी दिली नं! आता तर मी राजवाड्याबाहेर पाऊलही घालू शकणार नाही. वीरसिंहाचे सैनिक सर्व दरवाजे रोखून उभे आहेत; त्यांना चुकवून जाणंही अशक्य आहे. बाहेर कुणाला पत्ताही नसेल, की आपण इथे कसे अडकून पडलो आहोत!" राजा खिन्न स्वरात उद्‌गारला.

"मग आता अशा परिस्थितीत काय करायचा विचार आहे आपला?" राणीने विचारले.

"मी स्वतःला शत्रूपासून वाचवायचा शक्य तितका प्रयत्न करीन. ते जमलं नाही तर त्यांच्याशी मुकाबला करीन. तू जर आत्ता माझ्या सूचनेचं पालन केलंस, तर समज की आपल्याला अर्धी सफलता मिळालीच." राजा म्हणाला.

"आज्ञा करा मला, काय करू मी?" राणीने विचारले.



राजा म्हणाला–"देवी, आता वेळ न गमावता तू इथून पळ काढ. तू अन् युवराज कुशल राहिलात तर तोच माझा एक प्रकारे विजय ठरेल. खरं म्हणजे, शत्रूशी लढून माझा जीव वाचण्याची शक्यता कमीच आहे, पण आता वाद-विवादात वेळ घालवण्यात काही अर्थ नाही." स्पष्टच सांगून टाकले राजाने.

"नाही, नाही! हे शक्य नाही! तुम्हाला मृत्यूच्या दाढेत ढकलून निघणं शक्य नाही मला!" राणी एकदम विलाप करू लागली.

राजाने तिच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही, तो गुप्त मार्ग उघडण्याच्या उद्योगाला

लागला. कोणाला कधी संशय सुद्धा आला नव्हता, की शयनगृहातून गुप्त मार्ग असेल!

थोड्याच वेळात भुयारी मार्गाचं दार उघडलं गेलं, त्या अंधाऱ्या पोकळीत डोकावत राजा राणीला म्हणाला–"देवी, तू आता एका हातात बाळाला अन् दुसऱ्या हातात मशाल घेऊन भुयारात प्रवेश कर. भुयारात दर पाचशे यार्डांच्या अंतरावर एक अशा हिशोबाने बारा हिरे जडवलेले आहेत, हे तुला माहीतच आहे. अंधारात ते हिरे चमकतातच, पण मशालीचा उजेड पडल्यावर तर ते चांगलेच प्रकाशित होतील, शेवटच्या हिऱ्याशी पोचल्यावर तू तो दोन तीनदा फिरवलास की पलिकडचा दरवाजा उघडेल."

आतापर्यंत राजवाड्याबाहेर चाललेल्या हसण्या-खिदळण्याचा जो आवाज ऐकू येत होता, तो एकाएकी बंद झाला.

"देवी, मला वाटतंय की वीरसिंह इकडे येत असावा, तू आता नीघच. या जन्मात नाही, तरी आता पुढल्या जन्मात नक्की भेटू आपण!" असं म्हणून झोपेत असलेल्या युवराजाला राजाने उचलून राणीच्या हातात दिले. नंतर तिच्या हाती मशाल देऊन तिला त्याने भुयारात उतरायला मदत केली.

साश्रु नयनांनी आपल्याकडे दीनपणे पहाणाऱ्या राणीला अखेर राजा म्हणाला–"तुला असा निरोप देताना माझ्या मनाला अत्यंत क्लेश होत आहेत, पण आपल्या बाळासाठी हे सर्व सहन करणं भाग आहे ना!"

थोड्याच वेळात राणीला अंधाराने घेरले.

राजाने गुप्त-मार्गाचा दरवाजा पूर्ववत बन्द केला अन् त्याच क्षणी, बाहेर दाही दिशा दणाणून सोडणारा भयंकर आवाज झाला, दारूकाम सुरू झाले!!

इतक्यात दरवाजावर भक्कम हातांची थाप ऐकू आली. तत्काल म्यानातून तलवार बाहेर खेचत राजाने गरजून विचारले–"कोण आहे बाहेर?" (सशेष)



# गाणारे पिशाच्च

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाकडे परतला, फान्दीवर लटकणारे प्रेत खाली उतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मुकाट्याने स्मशानाकडे चालू लागला. तेव्हा त्या प्रेतात वास करणारा वेताळ त्याला म्हणाला–"राजा, जो माणूस आपल्या शक्ती व सामर्थ्या बाहेरचे काम अंगावर घेतो त्याचा अपमान होतो व इतरांच्या दृष्टीने तो एक अवहेलनेचा विषय बनून राहतो. तू जी जबाबदारी अंगावर घेतली आहेस ती तुझ्या शक्ती, सामर्थ्य आणि लायकी बाहेरची आहे किंवा कसे हे मला माहीत नाही. आपलं पूर्ण समाधान झाल्या-वाचून आपण रहात असलेलं घर सोडायचं नाही असा निश्चय केलेलं एक पिशाच्च थोड्या काळातच ते घर सोडून पळून गेलं! त्या पिशाच्याची गोष्ट मी तुला सांगतो,

## वेताळाच्या गोष्टी



ती ऐक. तुला आपले कष्टही जरा विसरायला होतील."

वेताळ गोष्ट सांगू लागला :—

कोणे एके काळी हरपुर नावाच्या गावी हरिशर्मा नावाचा एक महान् गायक रहात असे. त्याला रामशर्मा, कृष्णशर्मा, देवशर्मा आणि विष्णुशर्मा असे चार मुलगे होते. हरिशर्माच्या मनात होते की आपली मुलंही आपल्यासारखीच उत्तम गायक बनावीत.

आपला हा हेतु पूर्ण व्हावा म्हणून हरिशर्माने थोडे दिवस आपल्या मुलांना संगीताचे धडे दिले अन् म्हटले—"मुलांनो, माझं आता वय होत चाललं आहे. तुमच्यापैकी कुणाला तरी एकालाच मी स्वतः बरोबरचा गायक बनवू शकेन. यासाठी तुम्हांपैकी कोण योग्य आहे याचा निर्णय हरिपुरला रहाणारा शिवशर्मांच करू शकेल. तेव्हा तुम्ही सर्वजण त्याच्याकडे जाऊन आपापल्या परीने त्याची मर्जी संपादन करून परत या."

पित्याच्या या सूचनेवरून चौघेही भाऊ हरिपुरच्या शिवशर्माकडे जाऊन पोचले. त्यांचं बोलणं ऐकून शिवशर्मा म्हणाला—"तुम्ही अगदी योग्य वेळीच आला आहात माझ्याकडे! हे पहा, या गावच्या सीमेवर माझं एक घर आहे. एका गायक पिशाच्याने माझ्या त्या घराचा ताबा घेऊन ठेवला आहे. रोज रात्री ते गाण्याचा सराव करतं अन् आपल्या गाण्याचं प्रदर्शनही करतं ते! त्याचं संगीत अगदी अद्भुत, अप्रतिम असंच असतं. पण काही झालं तरी ते एक पिशाच्चं आहे, म्हणून रात्री कोणी तिकडे जायचं धाडस करीत नाही. त्या गाणाऱ्या पिशाच्चामुळे माझं खासं छान घर मात्र ओसाड पडलं आहे. या कामात मला तुम्हा लोकांची मदत हवी आहे."

त्या चार भावांत रामशर्मा फार साहसी होता, त्यामुळे तोच प्रथम त्या गायक पिशाच्याच्या घरी जायला तयार झाला. शिवशर्माने धाडसाबद्दल त्याची खूपच स्तुति केली, अन् रात्र होताच त्याने रामशर्माला पिशाच्याकडे जायचा रस्ता दाखवून दिला.

त्या घरात प्रवेश करताच रामशर्माला दिसले, की पिशाच्च एक शास्त्रीय राग गात बसलं आहे. रामशर्माने जोरात टाळ्या पिटत म्हटले—"वा, वा! तुझी गायकी खरोखर अद्भुतच म्हटली पाहिजे; साध्यासुध्या गवयाला हा राग आळापणं शक्यच नाही!"

"मला फारच आनन्द वाटतोय. आपणाला आवडणारा एकादा राग ऐकवा न मला. माझा आनन्द द्विगुणित होईल." पिशाच्च आनन्दाने म्हणालं.

रामशर्माने लगेच एक राग गाऊन दाखवला. पिशाच्याने त्याची प्रशंसा करत म्हटले—"महाराज, आपणाला न विचारताच मी आपल्या मनची गोष्ट ओळखली आहे. पण माझ्या गाण्याचा योग्य पुरस्कार मला कोणाच्या गाण्याच्या रूपाने मिळाला असं मला वाटेपर्यंत मी काही हे घर सोडणार नाही." इतके बोलून त्याने रामशर्माला एक उत्तम रत्न बक्षिस दिले.

एका मानवातीत अशा शक्तीकडून आपल्या गाण्याला इतकं सुन्दर बक्षिस मिळाल्याने रामशर्मा खूष झाला अन् त्याने ही वार्ता घरी येऊन शिवशर्माला सांगितली.



लांब सुस्कारा सोडत शिवशर्मा म्हणाला—"अरे, तुला आपल्या संगीताचा लाभ झाला खरा, पण माझं काम काही झालं नाहीच."

यावर दुसरा भाऊ कृष्णशर्मा म्हणाला—"गायक पिशाच्च आपल्या संगीताचं बक्षिस मिळवू इच्छित आहे काय? मी त्याला एक छान बक्षिस देऊन येईन." असे म्हणून त्या रात्री कृष्णशर्मा पिशाच्याच्या घरी गेला. गाणं ऐकून जोरात टाळ्या वाजवत तो पिशाच्चाची स्तुति करत म्हणाला—"मी संगीताचे महापंडित हरिशर्मा यांचा मुलगा, माझं नाव आहे कृष्णशर्मा. तुझ्या या सुन्दर गाण्याने संतुष्ट



होऊन मी तुला 'मानवातीत गायक शिरोमणि' ही पदवी बहाल करीत आहे."

पिशाच्च म्हणाले–"आपल्या गायनाचा पुरस्कार म्हणून हे रत्न घ्या, पण का कोण जाणे, माझ्या गायनाचे योग्य बक्षिस मिळाल्याचा संतोष काही मला मिळाल्यासारखं वाटत नाहीय! तेव्हा मी जोवर संतुष्ट होत नाही, तोवर हे घर काही सोडणार नाही.".

कृष्णशर्माने सर्व हकीकत शिवशर्माला सांगितली–"पुढील रात्री देवशर्मा पिशाच्चाकडे गेला. तो पोचला, तेव्हाच नेमकी त्या पिशाच्चाने एक राग आळवायला सुरुवात केली होती. देवशर्मा त्याला म्हणाला–"गाणं ऐकल्यावर तुझ्याशी चढाओढ करावी असं मला वाटू लागलंय." अन् लगेच त्याने आपलं गाणं सुरू केलं.

देवशर्माचं गाणं संपल्याबरोबर पिशाच्चाने त्याच्या गाण्याची खूप तारीफ केली अन् त्यालाही एक रत्न दिले.

रत्न घेऊन देवशर्मा त्याला म्हणाला–"हे रत्न विकून मला जे धन प्राप्त होईल तेच माझ्या उदरनिर्वाहाचं साधन असेल. संगीतविद्येतले सर्वोत्तम पंडित म्हणून गणल्या जाणाऱ्या हरिशर्माचा पुत्र असूनही संगीतात मी तुझ्याशी बरोबरी करू शकलो नाही. आता इथून पुढे मी कधीही कोणालाही माझं गाणं ऐकवणार नाही."

यावर ते पिशाच्च म्हणाले–"पंडित महाशय, आपलं बोलणं ऐकून आनन्द वाटतोय नक्कीच; पण माझं मन मात्र संतुष्ट नाही. माझं गायन ऐकल्यामुळे जर आपण संगीत-संन्यास घेणार असाल तर मला फार दुःख वाटेल. आपण असं करू नये अशी माझी कळकळीची विनंती आहे." इतके बोलून पिशाच्चाने त्याचा निरोप घेतला.

देवशर्माचे निवेदन ऐकून शिवशर्माने–"मला तर असं वाटतंय की त्या पिशाच्चाला माझ्या घरातून काढून लावायला तुम्ही तिघंही समर्थ नाहीं आहात. खरं तर तुम्ही इतके लांबवर आलाच आहात तर निदान प्रत्येकाला एकदा संधी देणं उचित होईल." असे म्हणून पुढील रात्री विष्णुशर्माला त्या पिशाच्चाच्या घरीं पाठवून दिले.

विष्णुशर्मा जेव्हा पिशाच्चाच्या घराशी पोचला, तोवर पिशाच्चाने आपले गायन आधीच सुरू केलेले होते. तो चुपचाप जाऊन पिशाच्चासमोर बसून गाणे ऐकू लागला. पिशाच्च बराच वेळ पर्यंत गात राहिले अन् विष्णुशर्माही तल्लीन होऊन ऐकत राहिला. गाणं संपल्यावर विष्णुशर्माला समोर पाहून पिशाच्चाने विचारले–"महाराज, आपण कोण आहात?"

"विद्वानाचा परिचय खरं म्हणजे त्याच्या विद्येनेच व्हावयास हवा." असे म्हणून विष्णुशर्माने एक राग आळवायला सुरुवात केली.

त्याचं गायन संपताच पिशाच्च विष्णुशर्माला म्हणाले–"महाराज, आज इतका काळ लोटल्यावर माझ्या गाण्याला योग्य असं बक्षिस मला प्राप्त झालं, मी आता हे घर सोडून निघून जात आहे." असे म्हणून पिशाच्च तेथून अदृश्य झाले.

ही गोष्ट सांगून वेताळ राजाला म्हणाला–"राजा, आपण संतुष्ट झाल्याचं सांगून पिशाच्च अगदी अचानकपणे अदृश्य झाले–ही गोष्ट आश्चर्यकारकच नव्हे का? स्वतःला संगीत-विद्वान म्हणवून घेत रोजच



कोणी ना कोणी त्याच्याकडे येऊन त्याचं गाणं मधेच थांबवत असे, त्यामुळे ते मनोमन चिडून जात असेल, त्यामुळेच घर न सोडण्याचा त्याचा निश्चय हळूहळू नाहीसा होत अखेर ते घर सोडून पळून गेलं असावं. असं मानणंही योग्य होणार नाही न, की संगीत-विद्येत सारखीच गति असणाऱ्या त्या चार भावांपैकी तीन जण पिशाच्चाला संतुष्ट करू शकले नाहीत, अन् चौथाच तेवढा ते काम करू शकला ?–या शंकेचं उत्तर माहीत असूनही दिलं नाहीस तर, तुझ्या मस्तकाचे फुटून तुकडे-तुकडे होऊन पडतील."

यावर विक्रमादित्य उत्तरला–" पिशाच्चाच्या एकूण वागणुकीबद्दल आश्चर्य वाटायचं काही कारणच नाही. खऱ्या संगीतज्ञाला योग्य असे विद्वान श्रोते मिळाले म्हणजेच आनन्द वाटतो. चार भावांपैकी पहिल्या तिघांनी पिशाच्चाच्या गाण्याची केवळ कोरडीच स्तुति केली, पण त्याचं संगीत पूर्णपणे ऐकण्याचा प्रयत्नही केला नाही. उत्तम संगीतकाराला असं कोणी मधेच थांबवू शकत नाही. होय ना? त्यामुळेच पिशाच्चाला त्यांच्या गायनाबद्दल असंतोष वाटला. केवळ चौथ्या भावाने–विष्णुशर्मानेच त्याचे गाणे मधे न थांबवता पूर्णपणे ऐकले. नंतर त्याचं गाणं ऐकल्यावर, तो किती महान् संगीतकार आहे हे पिशाच्चाला कळून चुकले. अन् अशा महान् विद्वान माणसाने आपलं गाणं पूर्णपणे ऐकलं आहे हे समाधान मिळाल्याने, त्या विद्वानाच्या मनातली इच्छा पूर्ण करण्यासाठी ते पिशाच्च तेथून निघून गेले! खरं तर पिशाच्चाला काढून लावण्यापेक्षा त्याचं गाणं ऐकून आनन्द लुटायचीच विष्णुशर्माची प्रबळ इच्छा होती, त्यामुळेच आता हरिशर्माचं हे कर्तव्य ठरतं, की आपल्या या चौथ्या मुलाला – विष्णुशर्मालाच – त्याने आपल्यासारखं महान् संगीत विद्वान बनवावं!"

अशाप्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ त्या प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्या झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# कार्य साधक

सौवीर नि मत्स्यदेश एकमेकां जवळची राज्यं होती. पिढ्यान् पिढ्या त्यांच्यात मैत्री चालत आली होती. पण एकदा एकाएकी मत्स्यदेशाच्या राजाने सौवीर विरुद्ध युद्धाची घोषणा केली. सौवीरच्या राजाला युद्धाचं कारण काही समजेना. त्याला फार दुःख झालं. कारण मत्स्यदेशाच्या तुलनेत सौवीर राज्य सर्वस्वी छोटं होतं. सौवीर देशाच्या राजाला माहीत होतं की मत्स्यदेशाशी युद्ध केलं तर आपला निश्चित पराभव होणार!

अशात मत्स्यदेशाचा राजदूत सौवीर राजाला भेटला आणि त्याने सांगितले– "महाराज, आमचे राजेसाहेब जाणतात की युद्धात सैनिक आणि संपत्तीचा अकारण नाश होणार! म्हणून त्यांनी मला आपला संदेश द्यायला सांगितलंय–जर आपण आमच्या राजाचे मांडलीक होणे मान्य केले, तर युद्धाचा प्रश्नच येत नाही."

सौवीर राजाने आपल्या मंत्र्याला बोलविले. प्रमुख मंत्र्यांनी सल्ला दिला– "महाराज, या बाबतीत फार भिण्याची आवश्यकता नाही. आपले दरबारी कवि सुजन शर्मा यांना दूत बनवून पाठवून द्यावे. दुसऱ्या बाजूच्या लोकांना वेळेनुसार योग्य असं समजाऊन सांगण्यात आणि त्यांना संतुष्ट करण्याच्या कलेत ते निष्णात आहेत. आपलं काम कसं साधावं हे त्यांना फार चांगलं माहीत आहे. जर त्यांचं दौत्य अयशस्वी ठरलं तर मग पुढं काय करायचं ते पाहता येईल."

राजाला हा सल्ला योग्य वाटला. त्याने सुजन शर्माला बोलवून सर्व परिस्थिति समजाऊन सांगितली आणि सौवीर देशाचा दूत म्हणून त्याला मत्स्य देशाच्या राजधानीकडे रवाना केलं.

मीना वेलिंग

सृजन शर्माने प्रथम आपले गुप्त हेर पाठविले आणि मत्स्य देशाच्या राजाबद्दल आवश्यक ती माहिती मिळवली.

मत्स्य राजा तसा स्वभावाने सज्जन होता, आणि विद्वान ही.

मत्स्य देशाच्या राजाचे आवडते तीन प्रमुख सल्लाकार होते. एक होता फार मोठा व्यापारी धनगुप्त. दुसरा त्याचा सेनापति माधव वर्मा. तिसरा सल्लाकार होता मंत्री सोमशेखर.

सृजन शर्माने आपल्या गुप्त हेरां करवी या तिघांचे स्वभाव जाणून घेतले. धनगुप्त फार लोभी होता. माधव वर्मा कठोर स्वभावाचा होता आणि सोमशेखर मूर्ख होता.

इतकं सर्व जाणून सृजन वर्मा मत्स्य देशात पोचला. रात्रीच्या वेळी धनगुप्ताच्या महालात जाऊन त्याला भेटला. आपल्या बरोबर आणलेली मूल्यवान रत्ने त्याला भेटीदाखल दिली आणि म्हणाला–"वणिक् श्रेष्ठ! आपणा सारख्या श्रीमंत माणसाच्या मनांत आलं, तर आपण कोणतं ही कार्य करू शकाल! आपण राजाला विनंती केली तर सौवीर राज्यावर हल्ला करण्याचा आपला बेत तो सोडून देऊ शकेल. आम्ही आपले हे उपकार कधी ही विसरणार नाही. आणि आपल्याला चांगलं बक्षिस ही देऊ."

भविष्य काळात मिळणाऱ्या बक्षिसाच्या लोभाने धनगुप्ताने सृजन शर्माची विनंती मान्य केली.



राजधानीच्या सीमे वर सैनिकांचे शिबिर होते. तिथे जाऊन सृजन शर्मा सेनापति माधव वर्माला एकांतात भेटला. सृजनला हे चांगलं माहित होतं की सेनापति धनगुप्ता प्रमाणे लोभी नाही, तो प्रलोभनात फसणारा नाही. म्हणून सृजन शर्माने माधव वर्माला पाहताच प्रशंसेच्या सुरात म्हटलं–"मी महावीर माधव वर्मांना नम्र प्रणाम करतो. एकाद्या सामान्य पक्षावर ब्रह्मास्त्राचा उपयोग करणे योग्य होईल का?"

माधव वर्माने विचारले–"मी नीट समजू शकेन असं स्पष्ट शद्बांत बोलाल?"

व्यथित अंत:करणाने अत्यन्त नम्रतापूर्वक सृजन शर्माने निवेदन केलें–"आपणासारख्या पराक्रमी सेनापतीला छोटचाशा सौवीर राज्याला पराभूत करणं सहज शक्य आहे. पण यात आपल्याला यश मिळालं असे कोणी म्हणणार नाही. ते आपलं अपयशच होय. तिकडे चेदि राजाचा अहंकार बेसुमार वाढत चालला आहे. त्याला पराजित केलं तर आपणास अपार यश मिळेल. इतकंच नाही तर खूप संपत्ति ही आपल्या हाती येईल."

अशा प्रकारे माधव वर्माची स्तुति करून त्याला आपलंस करून सृजन सोमशेखरला भेटायला गेला.

मंत्री सोमशेखर केवळ मूर्ख होता. सृजन शर्माला माहीत होतं की आपल्या





स्तुतीचा त्याच्यावर काही परिणाम होणार नाही. संध्याकाळच्या वेळी तो आपल्या महालाच्या समोरच्या उद्यानात बायको व मुलांसह हिंडत होता. सृजन तिथं पोचला आणि अभिवादन करून म्हणाला–"महामंत्री, या साऱ्या राज्यात आपली बरोबरी करणारा कोण बरं असेल? आपण स्वतः राजे नसलात तरी आपण काही सूचना केली तर राजा तिचा अव्हेर करू शकत नाही!"

बायको व मुलांच्या समक्ष सृजन शर्मा जे म्हणाला ते नाकबूल केलं तर आपला अपमान होईल अशा विचाराने सोमशेखरने सृजनचं म्हणणं मान्य केलं.

दुसऱ्या दिवशी सृजन शर्मा राजाच्या दरबारात आला आणि राजाला भेटला. आपला विशेष परिचय न देता सृजनने एक कविता वाचून दाखवली आणि राजाला संतुष्ट केले.

सृजनच्या कविते वर राजा खुश होऊन म्हणाला–"कविवर, आपली कविता आम्हाला खूप आवडली. आपणास काय पाहिजे ते मागा. आम्ही आनंदाने देऊ."

"महाराज, क्षमा करा. मी सौवीर देशाचा राजदूत आहे." असं सांगून युद्धामुळे होणाऱ्या दुष्परिणामांचे वर्णन केले आणि म्हणाला–"मी शांति-भिक्षा मागण्यासाठी आपल्या दरबारी आलो आहे!"

मत्स्य देशाच्या राजाने पंडित सृजन शर्मांची विनंती मान्य केली आणि त्याचा आदर-सत्कार करून त्याला स्वदेशी रवाना केले.

सृजन शर्मा आपल्या राजाकडे आला आणि सर्व वृत्त कथन केले. राजाने आदरपूर्वक सृजनला आलिंगन दिले आणि त्याचा अपूर्व सत्कार केला.

सौवीर राजाला समजलं की लोभी माणसाला धन देऊन, कठोर माणसाशी विनयपूर्वक भाषण करून, मूर्खाची स्तुति करून नि विद्वान माणसाला सत्य वचनाच्या साह्याने वश करता येते.





## ज्ञानाचा खजिना

भारतातील स्मारके

# पद्मनाभस्वामी मन्दिर

केरळची राजधानी त्रिवेन्द्रम म्हणजेच तिरुअनन्त-पुरम्. अनन्त हे भगवान विष्णूचे नाव. पृथ्वी धारण करणाऱ्या पौराणिक सर्पाचे नावही अनन्तच.

या शहरातील अनेक देवालयां पैकी सर्वात प्रसिद्ध देवालय हे भगवान विष्णुचे मंदिर 'पद्मनाभस्वामी मंदिर' म्हणून ओळखले जाते. येथे विष्णु-भगवान 'अनन्तशयनम्' या नावाने संबोधले गेले आहेत.

येथील मूर्ति अतिशय जुनी आहे; तेव्हा अर्थातच हे मंदिर अनेकदा नव्याने बांधले गेले आहे. आज जे मंदिर आपल्याला पहावयास मिळते ते त्रावणकोरचा राजा मार्तण्ड वर्मा याने जीर्णोद्धार केलेले मंदिर होय. ग्रनाइट-दगडावर सुन्दर कोरीव काम केलेल्या तीनशे-अडुसष्ट स्तंभांनी आतील भव्य मार्ग सुशोभित केलेले आहेत. भिंतींवर पौराणिक कथांवर आधारित चित्रे रंगवलेली आहेत. या मन्दिराच्या प्राकारातच अन्यत्र श्रीकृष्ण, क्षेत्रपाल, नरसिंह, शास्ता, गरुड व अन्य देवादिकांची मंदिरेही बांधली गेली आहेत.





'आरल ऑफ' वरील 'माउण्टन सर्किट' हा मोटर-सायकल शर्यतीचा जगातील सर्वात जास्त लांबीचा फेरा होय. एकूण २६४ वळणे व कोपरे असलेल्या या फेऱ्याची एकूण लांबी ३७.७३ मैल (६०.७२ कि. मी.) इतकी आहे.

सर्वात अधिक लांबीचा फेरा




अमेरिकेची मौरीन 'लिट्ल् मो' कोनोली ही 'ग्रॅण्ड स्लॅम' (विंबल्डन, यू. एस., फ्रे[...]च व ऑस्ट्रेलियन या गाव[...]तील सर्वात महत्त्वाच्या चॅम्पियनशिप्स) मिळ[...] चारही [...] पहिली महिला टेनिसपटु होय.



'एप्सम' ची डर्बी

जगातील सर्वात मोठी घोडदौडीची शर्यत बाराव्या अर्ल ऑफ डर्बीने १७८० मध्ये आयोजित केली होती. एकूण दीड मैल लांबीचा मार्ग असणारी ही शर्यत सरे येथील एप्सम डाऊन्स-वर खेळली गेली आणि लवकरच एप्समची डर्बी या नावाने ती ओळखली जाऊ लागली.



### टेलिव्हिजनवरील पहिल्या ऑलिम्पिक स्पर्धा

टेलिव्हिजनवर सर्वात प्रथम दाखवण्यात आलेल्या स्पर्धा १९३६ च्या बर्लिन ऑलिंपिक्स या होत. असे मानले जाते की, जर्मनीच्या या राजधानीत टी. व्ही. च्या २८ प्रेक्षागारात मिळून १५०,००० प्रेक्षकांनी या स्पर्धा पाहिल्या.



### आपल्या प्र[...]कारातली शेवटची

मोनॅको येथील १९६[...] च्या ग्रॅण्ड प्रिक्स मध्ये भाग घेणारी लान्स रेव्हेन[...]लोची स्करब ही पुढे इंजिन असणारी पारंपारिक प्रकारची अशी शेवटचीच मोटर-गाडी होय.

### सर्वात अधिक वेग

बिनायांत्रिकी क्रीडांमधे मानवी शरीराने सर्वात अधिक वेगाचा विक्रम केला तो आकाशातून सूर मारण्याच्या क्रीडेत. खूप उंचावरून आकाशातून सूर मारण्याच्या या क्रीडेत ताशी ६१४ मैल इतका वेग मानव गाठू शकला आहे. (ताशी ९८८ कि. मी.)



### पहिले 'पंख'

१९६८ च्या बेल्जिअम ग्रॅण्ड प्रिक्स स्पर्धेच्या मोटर-गाड्यासाठी प्रथमच 'पंखां'चा उपयोग केला. चाकांवरील दाब कमी करून रस्त्याची पकड व वेग वाढवण्यासाठी हा प्रयोग केला गेला.





### अमेरिकन शैली

घोडदौडीच्या शर्यतीत घोड्या[...]वर पुढे झुकून बसण्याची जॉकींची हल्लीची शैली ही १९ व्या शतकाच्या शेवटी युरोपमध्ये अमेरिकन जॉकींनी अस्तित्वा[...]त आणली.

### बर्फावरील हॉकी

१७ व्या शतकात हॉलंडमधे हॉकी-च्या प्रकारचा एक खेळ खेळला गेला. आधुनिक हॉकीच्या खेळाची सुरुवात कॅनडातील किंग्स्टन व मॉन्ट्रियल या शहरांत १८६० मध्ये झाली.



# तुम्हाला माहित आहे ?



घूमकेतूच्या ६०,००० घनमैल क्षेत्राच्या शेपटाचे वजन आपल्या एका श्वासाच्या हवेइतके ही नसते.



अटलांटिक समुद्रातले सर्व पाणी चहाच्या चमच्याने जितके चमचे भरेल, तितके परमाणु एक चमचाभर पाण्यात असतात.



दरवर्षी पृथ्वीवर एकूण ५०,००० पेक्षा काहीसे अधिक इतके भूकंप होत असतात. पण त्यातले बव्हंशी भूकंप अगदी कळू न येण्याइतक्याच शक्तीचे असतात.



पृथ्वीचा स्वतःभोवती फिरण्याचा वेग २९ कि. मी. प्रति मिनिट इतका असतो.




इंडोनेशिया हा १३,००० बेटांनी बनलेला देश आहे.



मानव हा एकच प्राणी आपल्या पाठीवर झोपू शकतो.

## नेहरूंची गोष्ट-९



सन १९२९ मध्ये झरिया येथे एक समारोह झाला, त्यात पं. जवाहरलाल नेहरू ट्रेड युनियन काँग्रेसचे अध्यक्ष निवडले गेले. अशा रीतीने त्यांना भारतीय मजुरांशी जवळचा संबंध स्थापित करण्याची संधि मिळाली.

यानंतर पं. नेहरू लाहोर येथे झालेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात अखिल भारतीय काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडले गेले. या वेळी त्यांचे वय फक्त चाळीस वर्षांचे होते. पं. मोतीलाल नेहरू यांच्या नंतर महात्मा गांधींनी अध्यक्ष-पदासाठी जवाहरलाल यांचे नाव सुचविले होते.





लाहोरच्या अधिवेशनातच सर्वांनी पहिल्यांदा पठाण नेता खान अब्दुल गफार यांना पाहिलं. सीमा प्रांतांतून अनेक युवकां बरोबर आलेल्या गफार खानांनी अधिवेशनात अतिशय उत्साहाने भाग घेतला व सर्वांना आपणाकडे आकर्षित केले.



२६ जानेवारी १९३० रोजी 'स्वतंत्रता-दिवस' साजरा करण्याचा ठराव कांग्रेसने पास केला. या दिवशी देशांतील सर्व प्रमुख नेत्यांनी जनतेला समजाऊन सांगितलं की देशाचं स्वातंत्र्य हेच आपलं प्रमुख उद्दिष्ट आहे. त्या वेळी ठिकठिकाणी झालेल्या समारंभात असंख्य लोकांनी अत्यंत उत्साहाने भाग घेतला.

याच वर्षी ब्रिटिश सरकारने मिठावर कर लादला. गांधींनी याचा विरोध करून जनतेला 'मिठाचा सत्याग्रह' करण्याचे आवाहन केले. अहमदाबाद जवळील साबरमती आश्रमा पासून गांधींनी सुप्रसिद्ध दांडी-यात्रेला प्रारंभ केला. या यात्रेमुळे देशात सर्वत्र एका अपूर्व उत्साहाचे उधाण आले.





लोकांनी मिठाच्या कायद्याचा भंग करून देशात अनेक ठिकाणी समुद्र-किनारी व अन्यत्र मीठ बनविले. पं. नेहरूंनी सुद्धा आपली पत्नी कमला हिच्या सह मिठाच्या सत्याग्रहात हिरिरीने भाग घेतला.

१४ एप्रिल १९३० रोजी पं. नेहरू रेल्वेच्या डब्यात शिरत होते, अन् त्याच वेळी सरकारने त्यांना कैद केले. यामुळे जनतेत फार असंतोष पसरला. सत्याग्रहाचे वारे ही देश भर वेगाने वाहू लागले.





आपण तुरुंगात असताना कांग्रेसच्या अध्यक्ष-पदाची जबाबदारी म. गांधींनी उचलावी असं नेहरूंना वाटत होतं. पण गांधीजी हे स्वीकारणार नाहीत अशा विचाराने त्यांनी आपल्या वडिलांना कांग्रेसचे अध्यक्ष बनविले. खरं म्हणजे त्या वेळी पं. मोतीलाल यांची प्रकृति बरी नव्हती. तरी पण आपल्या मुलाच्या इच्छेनुसार त्यांनी ही जबाबदारी कबूल केली.

याच काळात देशातील अनेक शहरातून परदेशी वस्तूंचा बहिष्कार आणि असहकाराची चळवळ एकदमच सुरू झाली. तब्येत चांगली नसली तरी उन्हा-तान्हाची पर्वा न करता श्रीमती कमला नेहरू यांनी सर्वत्र फोफावलेल्या सत्याग्रहाच्या चळवळीचे पुढारीपण केले.





अलाहाबाद मधील आपलं रहातं घर 'आनन्द-भवन' देशाला अर्पण करण्याचा निर्णय पं. मोतीलालजींनी घेतला. या घराला नवीन नाव दिलं गेलं 'स्वराज्य-भवन'! या घराचा अधिकांश भाग काँग्रेसच्या विविध कार्यक्रमाचे केन्द्र व्हावे, व शिल्लक भागात एक चिकित्सालय चालावे असा त्यांचा विचार होता.

यानंतर त्यांची प्रकृति अधिक ढासळली. ते मसूरीला जाण्याची तयारी करीत होते, एवढ्यात एक दिवशी सकाळी पोलिसांनी आनन्द-भवनात प्रवेश केला नि पिता-पुत्रांना कैद करून त्यांची नैनीच्या तुरुंगात रवानगी केली.





तुरुंगात गोल भिंती असलेल्या दोन खोल्यात पं. जवाहरलालजींना एकट्याला ठेवण्यात आले. तेथून थोडंसं आकाश दिसत असे. यदा-कदा त्या आकाशाकडे पाहून त्यांना स्वातंत्र्याचा संकेत नित्य मिळत राही.

(शेष पुढील अंकी)



# सल्ल्यांचा व्यापार

कित्येक शतकां पूर्वी एका गावात एक विचित्र दुकान होतं. लोक त्याला 'सल्ल्यांचं दुकान' म्हणत. धर्मपाल नावाचा एक सज्जन माणूस हे दुकान चालवीत असे. त्याने एकेका चिठ्ठी वर एकेक सल्ला लिहिलेला असे. ज्याला जितके सल्ले पाहिजे असतील, तेवढे सल्ले तो विकत देत असे. प्रत्येक सल्ल्याचं मूल्य शंभर रुपये असे. या चिठ्ठ्या खरेदी करणारे त्यातील सल्ल्यानुसार वागत आणि त्यांना खूप फायदा होई.

एक दिवशी एक शेटजी या दुकानावर आले. ते खूप श्रीमंत होते. त्यांनी तीनशे रुपये दिले नि तीन सल्ले विकत घेतले. ते तीन सल्ले असे होते—

"प्रवासाला निघताना आपण कुठे चाललो आहोत हे बायकोला सांगू नये!"

"रस्त्यात जर जेवण करायचं असेल तर रस्त्याच्या कडेला बसून जेऊं नये!"

"गडबडीत असताना कुठल्या ही बाबतीत कुणाशी पैज लावू नये!"

हे सल्ले खरेदी करून शेटजी आपल्या घरी गेले. या सर्व सल्ल्यांचा नीट अर्थ समजून घेण्याचे कुतूहल त्यांच्या मनात निर्माण झाले. आपल्या बायकोला न सांगता नऊ पिशव्यात नऊ हजार रुपये भरले. भाड्याची एक गाडी ठरवली आणि व्यापार करण्यासाठी शेटजींनी शहरचा रस्ता धरला.

थोडा प्रवास करून झाल्यावर जेवायची वेळ झाली. रस्त्यापासून काही अंतरावर त्यांना एक विहीर दिसली. तिथंच त्यांनी गाडी थांबवली, विहिरी जवळ बसून जेवण केलं नि पुढे प्रवास चालू केला. काही अंतर गेल्यावर शेटजींनी आपल्या



पिशव्या एकदा मोजून पाहिल्या, तर नऊ ऐवजी आठच पिशव्या आढळून आल्या. परत विहिरीपाशी येऊन शोध घेतला तेव्हा हरवलेली पिशवी सापडली. गवताच्या ढिगात तिथेच पिशवी पडलेली होती. पैसे देऊन खरेदी केलेल्या सल्ल्यांपैकी एकाने तर शेटजींचा फायदा झाला! शेटजींना फार आनंद झाला. जर रस्त्याच्या कडेला बसून जेवण केलं असतं तर रस्त्यावरून जाणाऱ्या कोणी तरी वाटसरूने पैशांची पिशवी उचलून घेतली असती.

सापडलेली पिशवी घेऊन शेटजी गाडीच्या दिशेने येत होते, इतक्यात त्यांचा पाय एका रानटी फळावर पडला. आणि आश्चर्याची गोष्ट अशी की शेटजींना अनेक दिवस सतावणारा एक फोड अचानक नाहीसा झाला, जशी काही कोणी जादू केली. शेटजींना वाटलं या फळात जरूर काही विशेष औषधी गुण आहे. म्हणून परतीच्या मार्गावर ते फळ घेऊन जाण्याच्या इराद्याने शेटजींनी विहिरीजवळ एका ठिकाणी ते पुरलं आणि त्यावर खुणेचा दगड ठेवला. मग शेटजी गाडीत बसून पुढे गेले.

शहरात त्यांनी चांगलाच व्यापार केला. पुष्कळ पैसा मिळवला अन् त्या गडबडीत पुरून ठेवलेल्या फळाचे त्यांना पूर्ण विस्मरण झाले. दुसऱ्याच एका वाटेने शेटजी घरी परत आले.

गावात पोचताच शेटजींना एक वार्ता समजली की गावातील एका लखपतीला विष-व्रणाची बाधा झाली आहे आणि त्याने अशी दवंडी पिटवली आहे की जो कोणी त्याला या व्याधीपासून मुक्त करील त्याला दहा हजार रुपयांचे इनाम दिले जाईल. अनेकांनी प्रयत्न करून पाहिला. पण कुणाला यश आले नाही. हे समजताच शेटजींना आपण पुरून ठेवलेले फळ आठवले. त्याच्या केवळ स्पर्शाने लखपतीचा विषाचा फोड नष्ट होऊ शकेल, तसेंच दहा हजार रुपयांचे बक्षिस ही मिळेल. या आनंदाच्या भरात शेटजींना आपल्या विकत घेतलेल्या सल्ल्यांचे विस्मरण झाले. त्यांनी आपल्या बायकोला त्या औषधी फळाचं महत्त्व सांगितलं, त्याचा उपयोग करून लखपतीकडून दहा हजार रुपयांचं बक्षिस कस मिळेल ते ही सांगितलं! आणि म्हणाले–"मी आताच्या आता लखपतीकडे जाऊन तो देणार असलेल्या बक्षिसाबाबत त्याच्याकडून लेखी लिहून आणतो, मग काय फळ उद्या सुद्धा आणता येईल."

शेटजींच्या बायकोने दुसऱ्याच क्षणी ही सर्व वार्ता आपल्या शेजारणीला सांगितली. शेजारणीने लगेच आपल्या नवऱ्याला ते सगळं सांगितलं. शेटजी जेव्हा लखपतीच्या घराकडे निघाले, तेव्हा वाटेत त्यांना शेजारी भेटला. बोलता बोलता एक गोष्ट स्पष्ट झाली की दोघे ही एकाच कामगिरी वर निघाले आहेत.

"तुला लखपतीचा फोड मुळिच घालवता येणार नाही!" शेटजींनी आव्हान दिलं.

"मी अगदी खात्रीने फोड नष्ट करून दाखवीन, लावणार पैज?" शेजारी म्हणाला. शेटजी आपल्या खरेदी केलेल्या सल्ल्यांतला प्रमुख सल्ला विसरून गेले. त्यांनी पैज लावली की शेजाऱ्याने लखपतीचा फोड जर घालवून दाखवला, तर तो त्यांच्या घरातील ज्या वस्तुला सर्वात अगोदर स्पर्श करील ती वस्तु त्याला दिली जाईल.

शेजारी त्याच दिवशी संध्याकाळी घरून निघाला आणि विहिरीजवळ जाऊन लपव-



लेलं फळ शोधून काढलं आणि त्याच्या साह्याने लखपतीला विष-व्रणाच्या व्याधीतून मुक्त केलं.

शेटजी घरांतून बाहेर ही पडले नव्हते, आणि एवढ्यात हे सगळं घडलं होतं. ठरलेल्या अटीप्रमाणे शेजाऱ्याने सर्वप्रथम त्यांच्या घरांतील तिजोरीला हात लावला तर काय बरे होईल?

अशा स्थितीत शेटजी धावत निघाले ते सल्ल्यांच्या दुकानी आले. धर्मपालच्या पायांवर डोकं ठेवलं आणि त्याला घडलेलं सर्व वृत्त सांगितलं!

धर्मपालने सगळं ऐकून घेतलं नि समजावलं–"तुम्ही आपली तिजोरी गच्चीवर नेऊन ठेवा. शेजारी तुमच्या घरी येण्यापूर्वीच गच्चीला एक शिडी लावून ठेवा. मी योग्य वेळी येतोच तुमच्या मदतीला!"

जेव्हा सर्व लोकांना ही बातमी समजली, तेव्हा पैंजेतील अटीनुसार शेजारी आपली वसुली कशी करतो आहे हे पाहण्यासाठी शेटजींच्या घराभोवती खूपच गर्दी जमली.

त्याच दिवशी संध्याकाळी शेजाऱ्याने आपल्या ओळखीच्या दहा-बारा लोकांसह शेटजींच्या घरात प्रवेश केला. त्याने चौकस नजरेने इकडे-तिकडे पाहिले, पण तिजोरी कोठे दिसेना. गच्ची नि शिडी त्याने पाहिली आणि अंदाज केला की तिजोरी गच्चीवर गेलेली आहे. सर्वप्रथम तिजोरीला स्पर्श करण्याच्या इराद्याने शेजारी शिडी वर चढू लागला आणि सर्वात अगोदर त्याचा स्पर्श अर्थात् शिडीला झाला.

धर्मपालने जोरात सांगितलं–"शेटजी, शेजाऱ्याने शिडीला स्पर्श केला आहे, आता ही शिडी तुमची नाही. पैंजेत तुम्ही हारलात!"

धर्मपालचं बोलणं ऐकून शेजाऱ्याने तक्रार करायला सुरुवात केली. पण तिथे जमलेल्या सर्व लोकांनी एका सुरात दुजोरा दिला–"धर्मपालचं म्हणणं सर्वस्वी न्याय्य आहे!"

धर्मपालाच्या चतुराईने शेटजी मोठ्या संकटातून बचावले.






उषाची नजर अनिरुद्धाच्या चित्रावर खिळून राहिली. तिची सर्व काया रोमांचित झाली. हे पाहून सखी चित्ररेखा मंदस्मित करीत म्हणाली–"तू स्वप्नात कुणाला पाहिलंस ते मला समजलं. तो कोठे ही कशा ही स्थितीत असू दे, मी त्याला तुझ्याकडे घेऊन येईल. मग पुढे, तुझी इच्छा असेल तसे तू कर."

उषा चित्ररेखेला म्हणाली–तुझं चित्रकलेतील कौशल्य आता पर्यंत मला माहीतच नव्हतं. तू हे चित्र इतकं सुरेख रेखाटलं आहेस की मी स्वप्नांत, त्याला पाहिल्यावर जे भाव माझ्या मनात निर्माण झाले होते, ते सारे आता ही उदित होत आहेत! हा पुरुष कोणात्या वंशाचा आहे? त्याचं नाव काय? त्याचा स्वभाव कसा आहे? सगळं सगळं मला नीट सांगशील?"

चित्ररेखेने सांगितलं–"सखी उषा, द्वारकाधीश श्रीकृष्णाबद्दल तू बरंच ऐकलं आहेस. असं म्हणतात कि शंकराच्या तिसऱ्या डोळ्यांतून निघालेल्या अग्निज्वाळांनी ज्या कामदेवाला भस्मीभूत करून टाकलं, त्यांनीच श्रीकृष्णाच्या प्रद्युम्न नावाच्या पुत्र-रूपाने जन्म घेतला. हा तरुण त्याच प्रद्युम्नाचा मुलगा. याचं नाव आहे अनिरुद्ध. त्याचा पराक्रम विश्व-प्रसिद्ध आहे. अनिरुद्धा सारखा युवक तुला पति म्हणून लाभला, तर साक्षात् आदिशेष ही तुझ्या भाग्याची प्रशंसा करायला असमर्थ ठरतील. आपल्या शोणपुराप्रमाणेंच द्वारका

२५. उषा व अनिरुद्ध यांचा विवाह



नगरींत ही वाटेल त्याला प्रवेश करता येत नाही. तरी पण तुझ्या संतोषासाठी मी वाटेल ते करून तेथे जाईन, आणि तुझ्या प्रियकराला निश्चित घेऊन येईन. तू काळजी करू नकोस."

"आपले कार्य सिद्ध करण्यासाठी योग्य तो उपाय शोधून काढण्यात तू कुशल आहेस आणि योग-विद्येत ही तुला गति आहे हे मला माहीत आहे. कामरूप व कामगमन शक्ति तुझ्याजवळ आहे. जे कार्य इतरांना करणे शक्य नाही, ते तुला शक्य आहे! अनिरुद्धाचे प्रत्यक्ष दर्शन होई पर्यंत मी कशी काय जिवंत राहीन कोणास ठाऊक? आता माझ्या प्राणांचे रक्षण तुझ्या हाती आहे. आता सात दिवस पर्यंत मी कशी-बशी दुःख सहन करीत आले. पण आता मात्र एक क्षण भर ही सहन करू शकणार नाही." या शद्वात उषेने आपली व्यथा प्रकट केली.

उषेला आलिंगन देऊन चित्ररेखा म्हणाली—"आता काही काळ तू आपल्या मैत्रिणीं बरोबर मनरंजन कर." असे उषेला समजावून चित्ररेखा निघाली. ती आकाशात उडाली आणि क्षणार्धात दिसेनाशी झाली. आपल्या मनोवेगाच्या साह्याने ती थोड्याच वेळात द्वारका नगरीत पोचली. ती विचार करूं लागली की आपल्या कार्यसिद्धीसाठी कशी सुरुवात करावी. एवढ्यात एका सरोवराच्या काठी तिला नारद दिसले. चित्ररेखेने जवळ जाऊन नारदांना नमस्कार केला. नारदांनी तिला आशीर्वाद दिला नि मंदस्मित करीत विचारलं—"बेटा, तू इकडं कशासाठी आलीस?"

पार्वती देवीने उषाला दिलेल्या वरदानाची कथा चित्ररेखेने नारदांना सांगितली. उषेने स्वप्नात ज्या अनिरुद्धाला पाहिलं, त्याला घेऊन जाऊन दोघांची भेट घडविण्याची आपली इच्छा तिने नारदांना सांगितली. नारदांनी चित्ररेखेला तामसी विद्या शिकवून अभय-दान दिले व निघून गेले.

चित्ररेखा अदृश्य स्वरूपांत श्रीकृष्ण व व प्रद्युम्नाचा महाल पार करून अनिरुद्धाच्या महालात पोचली. तेथे अनेक स्त्रियांच्या मधे तिने अनिरुद्धाला पाहिले. ते सुवर्ण-पात्रांतून मधु सेवन करीत होते. अनिरुद्धाचं मन-रंजन करण्यासाठी अनेक सुंदर स्त्रिया नृत्य करीत होत्या, काही जणी गात होत्या, आणि तरी ही अनिरुद्ध मात्र उदासवाणा दिसत होता! ते चित्ररेखेच्या लक्षात आल्यावाचून राहिलं नाही. तो हंसला तरी त्यात कृत्रिमता दिसत होती, काही बोलला तरी त्याच्या स्वरात दुःखाची छाप स्पष्ट दिसत होती. त्याच्या प्रत्येक हालचालीत उदासीनता भरलेली दिसत होती.

चित्ररेखेच्या मनात विचार आला—"सखी उषे सारखं याने ही एकादं स्वप्न तर पाहिलं नाही ना? याला आकर्षित करणारी सुंदरी उषे शिवाय दुसरी कोण असणार? पार्वती देवीच्या कृपे मुळे असंच काही तरी घडलं असलं पाहिजे!"

चित्ररेखेला अनिरुद्धाशी बोलावसं वाटत होतं. नारदाने शिकवलेल्या विद्येचा उपयोग करून तिने तेथे असलेल्या सर्व स्त्रियांना बेहोश करून टाकलं. मग ती अनिरुद्धाच्या जवळ आली आणि हात जोडून म्हणाली—"बली चक्रवर्तीचे चिरंजीव बाणासुराला पार्वती देवीच्या कृपेने एक मुलगी झालेली आहे. तिचं नाव आहे उषा. ती तिन्ही लोकात आपल्या सौंदर्यासाठी प्रसिद्ध आहे. तिच्या सौंदर्याचे वर्णन करणे साक्षात् ब्रह्मदेवाला ही शक्य नाही. अशा परिस्थितीत मी काय तिचं वर्णन करूं! सखी





उषेने एक दिवशी रात्री स्वप्नात आपणास पाहिले तेव्हां पासून आपणाशी विवाह करण्यासाठी ती फार व्याकुळ झाली आहे.

मी तिची मैत्रीण आहे. माझं नाव चित्ररेखा. जर आपण मान्य केलंत तर आपणास घेऊन जाण्यासाठी मी इथे आले आहे. तुम्हा उभयतांची निर्मिति एकमेकां-साठी झालेली आहे, यात मला तिळमात्र शंका नाही. ही सर्व त्या परमेश्वराची इच्छा आहे. पार्वती देवीने ही भविष्य-वाणी अगोदरच केलेली आहे. मी आपले चित्र रेखाटून उषेला दाखवले, आणि तिच्या मनात आपल्या प्राप्तीची इच्छा जागृत झाली. अन्यथा तिची काय अवस्था झाली असती कोण जाणे! इथे आपल्या भोवती अनेक सुंदर स्त्रिया आहेत, तेव्हां आपली गोष्ट वेगळी. आपणासाठी व्याकुळ झालेल्या उषेचे संरक्षण करणे आपल्या हाती आहे. मी हात जोडून आपणास प्रार्थना करते की आपण माझ्या बरोबर चलावे."

चित्ररेखेची विनंती ऐकून अनिरुद्ध म्हणाला–"मी काय सांगू नि कसं सांगू? तुझ्या मैत्रिणीने जसे एक स्वप्न पाहिले, तसेच मी पण इकडे पाहिले. त्या क्षणापासून मला दिवस आणि रात्रीचे भान राहिले नाही. जरा ही झोप लागत नाही. तू माझी भाग्य-देवता बनून आली आहेस! नाही तर मला काय करावे हे सुचत नव्हते. तू मला विनंती करण्याची मुळीच आवश्यकता नाही. तू मला उषेकडे घेऊन चल. मी हा एका पायावर तयार आहे."

चित्ररेखेचा आनन्द गगनात मावेना. तिने अनिरुद्धाचा हात आपल्या हातात घेतला आणि आकाशात उड्डाण केले. आपल्याप्रमाणे अनिरुद्धाला ही तिने अदृश्य बनविले. पाहता पाहता दोघे जण शोण-पुरात उषेच्या महालात पोचले.

उषा आणि अनिरुद्ध दोघांनी एकमेकांना प्रत्यक्ष पाहिलं. दोघे ही आनंद-सागरात डुंबू लागले.



"सखी उषे, हे घे तुझे प्रियतम! मी आपले वचन पूर्ण करू शकले याचा मला आनन्द आहे. तू यांचा हात आपल्या हाती घेऊन पाणिग्रहण कर. राज-परिवारात गांधर्व पद्धतीचा विवाह मान्य आहे. शिवाय पार्वती-देवीची असीम कृपा तुझ्यावर आहेच. या क्षणापासून तुम्ही उभयतः पति-पत्नि आहात!" असं म्हणून चित्र-रेखेने सखीला आलिंगन दिले. तिला नवी वस्त्रे नेसवली, दागिने आणि पुष्पमालांनी तिचा श्रृंगार केला. अनिरुद्धाने उषेचा हात आपल्या हाती घेऊन तिचे पाणिग्रहण केले.

उषा नि अनिरुद्ध यांनीं काही दिवस आनंदात घालविले. अंतःपुराच्या पहारे-कऱ्यांना या रहस्यमय मिलनाची वार्ता समजली. त्यांनीं ही बातमी बाणासुरापर्यंत पोंचवली.

बाणाच्या पराक्रमाच्या प्रसिद्धीची पर्वा न करता कोणी एका माणसाने त्याच्या महालात प्रवेश केला व नक्षत्रासारख्या त्याच्या मुली बरोबर विहार करीत आहे हे जाणून बाणाला अत्यन्त राग आला.

त्याने आपल्या पहारेकऱ्यांना हुकूम दिला–"जा, तावडतोब त्या माणसाला बन्दी बनवा, नाही तर तो पळून जाईल. माझा अपमान जो करील तो शिव असला तरी आपले प्राण वाचवू शकणार नाही."

लगेच हजारो राक्षसांनी हातात तलवार व भाले घेऊन उषेच्या अंतःपुरावर हल्ला





केला. अनिरुद्धाने महालाच्या वरच्या मजल्यावरून हे दृश्य पाहिले. चारी बाजूंनी राक्षसांचा आरडा-ओरडा चालू होता. अनिरुद्ध एकाद्या सिंहाप्रमाणे त्यांच्या बरोबर लढायला तयार झाला.

एवढ्यात उषा अनिरुद्धाजवळ येऊन डोळ्यात आसवे आणून म्हणाली–"माझ्या सारख्या मुलीने जे करू नये असे काम तर करून बसले! मी कुल-कलंकिनी झाले. तिन्ही लोकांवर राज्य करणारे माझे शत्रु बनले. अनमोल रत्नासारख्या राजकुमाराला मी संकटात टाकले. साक्षात जगदंबेनं दिलेलं वरदान ही व्यर्थ जाण्याची चिन्हे दिसत आहेत. आता मी काय करू? हे माझ्या भाग्य-देवतांनो, या संकटातून तुम्ही मला मुक्त करू शकणार नाही का?" अशा रीतीने परोपरीने उषा विलाप करू लागली.

अनिरुद्ध मंदस्मित करीत उषेला म्हणाला–"वेडे, माझं साहस नि पराक्रम यांची तुला कल्पना नाही. तुझ्या वडिलांच्या सैन्य-बलाबाबत काही बोलण्याची आवश्यकता नाही. स्वतः शंकर आपल्या प्रमद बाणां सह आले, तरी मी त्यांना पराजित करीन. मी शत्रुला आपल्या मुष्टि-प्रहारांनी रक्तबंबाळ करीन आणि या शोणपुर नगरीचं नाव सार्थक करीन. तू खिडकी जवळ उभी राहून फक्त पहात रहा. तू जरा सुद्धा भिऊ नकोस. समजलं?"

उषेला अभय देऊन अनिरुद्धाने अंतःपुराच्या दारा जवळील गदा हाती घेतली आणि राक्षस-सैनिकांवर तुटून पडला. नारद आकाशांत उभे राहून हा सर्व तमाशा पाहू लागले.

राक्षसांनी अनिरुद्धाविरुद्ध बाण, गदा नि अन्य विविध आयुधां सह युद्धाला सुरुवात केली. पण त्याने राक्षसांची मुळिच परवा केली नाही. सर्व राक्षसांवर आपल्या गदेचे प्रहार तो बेछूटपणे करीत राहिला. जे जवळ आले, त्यांच्यावर अनिरुद्धाने मुष्टि-प्रहार केला. राक्षसांपैकी काही जण मेले,

तर काही घायाळ झाले. बाकीचे पळून जाऊन बाणाच्या जवळ जाऊन उभे राहिले. रागाने लाल होऊन बाणाने त्यांना दटावले– "तुम्ही लोक प्राणांच्या मोहाने शत्रुला पाठ दाखवून असे पळून आलात? तुमचे शौर्य आणि पराक्रम पळून येण्यासाठी का आहे? कोणे एके काळी तुमच्या पराक्रमा वर अवलंबून मी तिन्ही लोक जिंकले, आता मात्र तुम्ही माझ्या तोंडाला काळं फासलत. चला, मी तुमच्या बरोबर रथ, हत्ती, घोडे आणि पायदल सैन्य पाठवतो. शत्रुचा संपूर्ण पराभव करुनच परत या."

बाणासुराने कालकेय नावाच्या राक्षसाला अनिरुद्धा विरुद्ध लढण्यासाठी पाठवलं. सर्व राक्षस सर्व दिशांनी अनिरुद्धाशी लढण्यासाठी आले. आपल्याशी लढण्यासाठी राक्षसांना येताना पाहून अनिरुद्धाने तलवार आणि ढाल हाती घेऊन राक्षसांचा संहार करायला सुरुवात केली. एकटा असून ही अनिरुद्ध हजारो राक्षसांसह लढत असताना तळपत्या विजेप्रमाणे भासला. नारदाला हे युद्ध अत्यन्त अद्‌भुत वाटले. लढणारे अनेक महारथी नारदाने पाहिलेले होते. पण अनिरुद्धासारखा शत्रुला भ्रमित करणारा योद्धा आज तागायत त्याने पाहिला नव्हता!

बाणासुराने पाठवलेल्या राक्षसांपैकी काही मेले. या धावपळीत काही इतरांच्या पायांखाली तुडवले गेले. काहींनी युद्धभूमी वरून काढता पाय घेतला. अनिरुद्धाने गर्जन करीत त्या सर्वांना पळवून लावले.

अनिरुद्धाशी झालेल्या युद्धात पराभूत होऊन परत आलेल्या आपल्या राक्षस-सैनिकांना पाहून आता बाणासुराच्या मनात नव्या शंका येऊ लागल्या. आपल्या बरोबर झालेल्या लढाईत हारलेले इन्द्र वगैरे देव आज ही आपले नाव ऐकताच थरथरा कापू लागतात! अशा स्थितीत ज्याचे नाव ही आपल्याला माहीत नाही असा हा तरूण आपल्या सैन्याला पराभूत करतो! आता बाणासुर स्वत: या तरुणा-विरुद्ध युद्ध करायला तयार झाला.





# वैद्याची कीर्ती

रामापुरमधे रंगदास नावाचा एक वैद्य रहात असे. काही दिवसांनी तो गाव सोडून शहरात जाऊन राहू लागला. शहरात त्याच्या वैद्यकींचा काही फारसा चांगला जम बसला नाही. त्याला तेथे बरीशी प्राप्ती होत नसे. त्यामुळे वैद्यकी सोडून शहरातच त्याने छोटासा व्यापार सुरू केला. व्यापारात मात्र त्याचे नशीब उजळले. थोड्याच दिवसात एक 'चांगला व्यापारी' म्हणून तो धंद्यात स्थिर झाला.

अशीच काही वर्षे निघून गेली.

एक दिवस काही कामासाठी रंगदास शेजारच्या गावाकडे निघाला. गावच्या सीमेवरच काही डाकूंनी त्याला लुटले. इतके की, त्याच्या अंगावरचे चांगले कपडेही त्यांनी उतरवून घेतले. त्याला अगदी तसेच सोडायचे नाही, म्हणून त्यांनी आपले काही मळके-सळके कपडेच फक्त त्याच्यासाठी तेथे ठेवले. नाइलाज म्हणून तेच घाणेरडे कपडे घालून रंगदास गावात गेला. गावात त्याच्या ओळखीचे कोणीच नव्हते. गावातले आपले काम उरकण्यासाठी त्याला काही पैसे हवे होते. पण त्या तसल्या पोशाखा-तल्या रंगदासला पाहून कोणी त्याला एक 'बडा व्यापारी' मानायलाही तयार नव्हते!

शेवटी तिथल्याच एका व्यापाऱ्याकडे जाऊन रंगदास म्हणाला–"महाराज, मी या गावात एका नव्या जातीचे तांदूळ खरेदी करण्यासाठी आलो आहे; पण रस्त्यात चोरांनी हल्ला करून माझ्याजवळचे सर्व धन व माझे कपडेही लुटून माझी अशी दुर्दशा करून टाकली. मी शहरातला एक प्रसिद्ध व्यापारी आहे. तांदूळ खरेदी साठी मला मदत करून माझ्याबरोबरच आपण शहरात चला. तेथे घरी गेल्यावर

वसंत धोपाडे

आपल्या मदतीचा मोबदला म्हणून मी आपणाला दुप्पट पैसे देईन."

यावर तो व्यापारी स्पष्टच म्हणाला की–"आजच्या काळात अशा अनोळखी माणसावर विश्वास ठेवून कोणीही उसनवार पैसे देणार नाही. तरीही शहरात माझे ओळखीचे काही व्यापारी आहेत. आपलं नाव काय?"

"माझं नाव रंगदास." रंगदास म्हणाला.

"रंगदास? या नावाच्या कुणा व्यापाऱ्याला मी नाही ओळखत! हे नावही नाही ऐकलं मी?" व्यापारी उपेक्षेनेच उत्तरला.

क्षण दोन क्षण विचार करत व्यापारी पुन्हा बोलू लागला–"रंगदास!...रंगदास! हं, ऐकलंय खरं हे नाव कुठे तरी."

"मी म्हटलंच ना, कि शहरात माझं नाव प्रसिद्ध आहे म्हणून?" उत्साहाने रंगदास म्हणाला.

व्यापारी चटकन् म्हणाला–"हं, हं! आठवलं मला! मी ज्या रंगदासबद्दल बोलतोय ते नाव मी शहरातल्या व्यापाऱ्याचं म्हणून ऐकलं नाहीय. पण रामापुरला गेलात तर कोणत्याही घरात ते नाव ऐकू येईल, अन् हा रंगदास तर वैद्य आहे!"

हे ऐकून रंगदास आश्चर्यानें म्हणाला–"महाराज, एके काळी मी वैद्यकी करत असे अन् रामापुरलाच रहात असे. काही दिवसांनी मी शहरात जाऊन स्थायिक झालो. वैद्यकी करून कुटुंबाचा उदरनिर्वाह चालवणं कठीण आहे, असं पाहून मी व्यापार सुरू केला आणि या पेशातच थोडं-बहुत धन आणि नावही कमावलं. आपण म्हणता ही घटना फार पूर्वीची आहे. मी तर विसरूनही गेलो होतो की मला वैद्यकीचंही थोडं फार ज्ञान आहे! मला तर आश्चर्यच वाटतं आहे! पण आपण किती दिवसांपूर्वी रामापुरला गेला होता?"

"माझ्या धाकट्या बहिणीचं नुकतंच लग्न झालं. तिचं सासर रामापुरला आहे. दोन आठवड्यांपूर्वीच मी तिला पोचवायला रामापुरला गेलो होतो. खरंच विश्वास ठेवा; आपलं नाव घेतलं जात नाही, असं एकही घर नसेल रामापुरात!" व्यापारी म्हणाला.

आता काय? रंगदासचे काम झाले, त्याची अडचण दूर झाली. रामापुरचा हा रंगदास कोण, हे बघायची व्यापाऱ्याची इच्छा होतीच! आपली ही इछा पूर्ण होत आहे असे पाहून त्याने मोठ्या खुशीने रंगदासला चांगले कपडे घालायला दिले, नंतर तो रंगदासबरोबर शहरात गेला आणि आपले पैसे घेऊन परत निघून आला.

रंगदासने आपल्या बायकोला सर्व हकिकत सांगून म्हटले–"रामापुर सोडून आपण बहुधा चूकच केली. तिथे आपली कीर्ती घरोघर पसरलेली आहे. तू मला ते गाव सोडायला लावलेस आणि शहरात आल्यावर एकदाही मला तिथे जाऊ दिले





नाहीस. आता मला एक चांगली बातमी मिळाली आहे; आता मात्र मी त्या गावी गेल्याशिवाय रहाणार नाही. आपण सर्वच-जण रामापुरला जाऊन काही दिवस तेथे राहून परत येऊ."

रंगदासची बायको यावर त्याला म्हणाली–"हां, मला माहीत आहे तिथे तुमची कशी कीर्ती आहे ती! माझं ऐका, आपण त्या गावी मुळीच नाही जायचं!"

"आतापर्यंत खूप ऐकत आलो मी तुझं! आता मात्र मी तुझं मुळीच ऐकणार नाही. रामापुरला आपलं खूप नाव आहे, तू आजपर्यंत मला सांगितलं का नाहीस? मला कीर्ती मिळालेली आवडत नाही तुला?" रागाने रंगदासने विचारले आपल्या बायकोला.

"असं नाही हो! खरं सांगू? रामापुरच्या लोकांना असं वाटतं की तुम्हाला रोगचिकित्सा करताच येत नाही. ते म्हणतात की तुम्ही दिलेलं औषध कालकूट विषासारखं कडू असतं. कोणी एकाद्यावर रागावलं की धमकी देई–'थांब, रंगदासला बोलवून तुला औषध द्यायला सांगतो! आया सुद्धा आपल्या मुलांना रागावताना म्हणत–'ए बघ, सारखा खोकतो आहेस, हिरडा तोंडात ठेव, नाहीतर रंगदासला बोलवीन हं तुला औषध द्यायला!' अशा प्रकारे सर्वच जण काही न काही प्रकाराने तुमची चेष्टा करत असत. मला ते पहावेनासं झालं; म्हणूनच शहरात जाण्यासाठी मी तुमच्या मागे लागले. पण केवळ तुम्हाला वाईट वाटेल म्हणून मी ही गोष्ट तुमच्यापासून गुप्त ठेवली. पण पहाना, आज इतकी वर्षे लोटूनही लोक तुमची टर उडवायचे थांबले नाहीत, लोकही कसे विचित्र असतात म्हणते मी!" व्याकुळ आवाजात बायकोनं रंगदासला खरी गोष्ट सांगून टाकली.

हे सर्व ऐकल्यावर मात्र रामापुरचेच काय, पण वेळेवर आपल्याला मदत करणाऱ्याच्या गावाचे नावही कधी रंगदासने तोंडावाटे उच्चारले नाही!





# गुप्त मृत्युपत्र

(मागील अंकावरून)

अशी काही वर्षे गेली. आता षान-षू चौदा वर्षांचा झाला. एक दिवशी त्याने आपल्या आईला विचारलं–"आई, मला रेशमी कपडे बनवून देशील?" आईने जवळ पैसे नसल्याची अडचण सांगितली. यावर षान-षू पुन्हा आईला म्हणाला–"माझे वडील तर राज-प्रतिनिधि होते ना? आम्ही दोघेच तर त्यांचे मुलगे! जर मोठ्या भावापाशी ऐवढे पैसे आहेत, तर मला नवे कपडे बनविण्यासाठी पैसे का नाहीत? जर तुझ्या जवळ नसले जर मी दादाला विचारू?" पण आईने त्याला असे न करण्याचा सल्ला दिला.

म्हणून षान-षू आपल्या आईच्या नकळत मोठ्या भावाकडे गेला आणि म्हणाला–"आपले वडील तर खूप श्रीमंत होते. माझ्या कपडयांकडे पाहून लोक हसतात. दादा, मला थोडं रेशमी कापड खरेदी करून देशील? मी नवे कपडे शिवून घेईन."

"तुला नवे कपडे पाहिजे असले तर जाऊन तुझ्या आईला का नाही मागत?" षान-चीने विचारलं.

"आपल्या इस्टेटीची व्यवस्था तूच पाहतोस न दादा? माझी आई नाही त्यात लक्ष घालत!" षान-षू म्हणाला.

"अरे बेट्या, तू कपडे मागायला आलास, की इस्टेटीतला आपला हिस्सा मागायला? ही इस्टेट माझी नि माझ्या मुलांची आहे. त्यात वाटा मागणारा तू कोण?" असे म्हणत षान-चीने आपल्या छोट्या भावाच्या पाठीवर एक थपाटा मारला. षान-षूची पाठ काळी-निळी झाली. तो रडत आईपाशी आला नि तिला सर्व हकिगत सांगितली.

चीनची एक लोककथा



"मी तर तुला सांगितलं होतं ना कि दादाकडे जाऊ नकोस? तू माझं म्हणणं ऐकलं नाहीस, त्याची शिक्षा तुला मिळाली." असे म्हणत आईने षान-षूच्या पाठीवर हात फिरविला. तिचे अश्रू षान-षूच्या डोक्यावर टपकले. नंतर तिने आपल्या दासीला षान-चीकडे पाठवले आणि क्षमा मागून सांगितलं–"छोटा षान-षू जे काही बडबडला त्याचे मनावर घेऊ नये. अजून तो लहान आहे."

तरी पण षान-चीचा राग शान्त झाला नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने आपल्या सर्व नातेवाईकांना बोलवलं आणि मेय नि षान-षूच्या समक्ष त्यांना सांगितलं–

"आपण सर्व वडीलधारी माणसं आहात, नीट ऐका. षान-षू आणि त्याची आई यांचं पालन-पोषण करण्याची माझी इच्छा नाही असं कृपा करून समजू नका. त्यांनी इथून जावं अशी पण माझी इच्छा नाही. काल षान-षू माझ्याकडे आला नि वडिलांच्या मालमत्ते बाबत माझ्याशी भांडला. इतका लहान असताना ही स्थिति आहे, आणखी मोठा झाल्यावर काय करील कोण जाणे? म्हणून वडिलांच्या मृत्युपत्रात नमूद केल्याप्रमाणे सर्वां समक्ष त्याचा हिस्सा त्याला देऊन टाकतो. आजपासून पूर्वेकडील घर नि २० सेंट जमीन त्याची. वडिलांनी आपल्या मृत्युपत्रात ज्या सूचना दिल्या आहेत, त्यांचे तंतोतंत पालन मी करीत आहे. आपण सर्व जण साक्षी आहात." असं म्हणून षान-चीने मृत्युपत्रांचे कागद सर्वांपुढे ठेवले.

काही लोकांना ही वाटणी जरी अन्यायाची वाटली तरी त्यांनी विरोध केला नाही. उलट ते म्हणाले–"जो समर्थ आहे, तो वडिलांच्या संपत्तीचा उपभोग करणारच! जो जिवापाड कष्ट उपसतो आहे, त्याला कशाची ही कमतरता असणार नाही. शून्यातून सुरुवात करून काही लोक लक्षपति होतात!"



यानंतर षान-षू आणि त्याची आई पूर्वेकडील घरात रहावयास आले. ते एक पडकं घर होतं. घरात सर्वत्र पाणी गळत होतं. एक-दोन खोल्या स्वच्छ करून त्यांत दोघे जण राहू लागले. जी जमीन त्यांच्या वाटयाला आली ती पडीक होती. जे धान्य पेरलं, सगळं नष्ट झालं!

असे काही दिवस गेले. मेयला समजलं की आपल्या गावात एक बुद्धिमान नि सत्प्रवृत्त न्यायाधीष नुकतेच आले आहेत.

मेयला वाटलं की हा न्यायाधीष तिच्यावर व तिच्या मुलावर झालेल्या अन्यायाच्या बाबतीत योग्य ते करील. तिने जाऊन आपल्या पतीने दिलेले चित्र त्याला दाखवून प्रार्थना केली–"महाराज, षान-चीने माझ्या नवऱ्याची सर्व संपत्ति बळकावली आहे. आमचा अर्धा भाग त्याने दिलेला नाही. आपण मला न्याय द्यावा. मृत्यु-शय्येवर असताना नवऱ्याने मला हे चित्र दिलं आणि सांगितलं की खऱ्या मृत्युपत्राचं रहस्य यात आहे. एकाद्या चतुर न्यायाधीषाला या रहस्याचा उलगडा होईल." त्यांनी मला असं सांगितलं होतं.

न्यायाधीषाने मेयलाघरी जायला सांगितलं आणि तो ते चित्र नीट पाहू लागला. पण त्यातील रहस्य काही त्याच्या लक्षात येईना. शेवटी त्याने कापडावर चिकटवलेलं



ते चित्र कापडापासून अलग केलं. चित्राच्या मागे लिहिलेलं होतं–"मी आता म्हातारा झालो आहे. माझा दुसरा मुलगा षान-षू अजून लहान आहे. थोरला षान-ची मोठा दुष्ट आहे. तो आपल्या धाकटया भावाला फसवील मी आपली सारी शेतं आणि दोन घरं षान-चीला देत आहे. पूर्वेकडील घर मात्र षान-षूला मिळायला हवं. हे घर पडकं असलं तरी याच्या पूर्वेकडील भिंतीखाली पाच कळशात वीस मण वजनाची चांदी भरून ठेवलेली आहे. तसेच पश्चिमेकडील भिंतीखाली पाच कळशात मिळून वीस पण चांदी आणि सहाव्या कळशीत चार मण सोनं आहे. जमिनी ऐवजी ही



सारी संपत्ती माझ्या धाकट्या मुलाला मिळावी." शेवटी वृद्धाने आपली सही करून तारीख घातली होती.

दुसऱ्या दिवशी न्यायाधीषाने षान-चीला विचारलं–"तुझ्या सावत्र आईने तुझ्या विरुद्ध तक्रार केलेली आहे. तक्रार अशी की तू आपल्या सावत्र भावाला इस्टेटीचा अर्धा हिस्सा बरोबर वाटून दिलेला नाही. हे खरं आहे की नाही?"

षान-चीने उत्तर दिले–"कृपा करून आपण माझं म्हणणं नीट ऐकून घ्यावं. माझ्या जवळ वडिलांनी केलेलं मृत्यु-पत्र आहे. त्यात त्यांनी लहान भावाला जे द्यायला सांगितलंय, ते सर्व मी त्याला देऊन टाकलंय. आपण ते मृत्युपत्र वाटल्यास पाहू शकता."

"ठीक आहे. उद्या मी स्वतः तुझ्या घरी येऊन ते मृत्युपत्र वाचीन आणि मग माझा निर्णय सांगेन!" न्यायाधीष म्हणाले.

नंतर न्यायाधीषांनी षान-चीची रवानगी केली आणि मेयला निरोप पाठविला की दुसऱ्या दिवशी सकाळी तिने मुलासह षान-चीच्या घरी यावे.

दुसऱ्या दिवशी सकाळी षान-चीने आपल्या घराचं अंगण छान सजवलं, न्यायाधीशांना बसण्यासाठी ठेवलेल्या खुर्चीवर व्याघ्र-चर्म घातलं. आपल्या सर्व नातेवाईकांना ही बोलवणं पाठवलं. सर्व लोक वेळे वर षान-चीच्या घरी उपस्थित झाले. पालखी दरवाज्या समोर येऊन उतरली. न्यायाधीष थोडे पुढे आले. जसं काही बरोबर कोणी आहे असं नाटक करीत त्यांनी नम्रपणे प्रणाम केला आणि जाण्याचा रस्ता दाखवीत म्हणाले–"या, आत या न!"

यानंतर त्यांनी असा अभिनय केला की जणू ते कोणाशी तरी बोलत आत प्रवेश करीत आहेत. नंतर त्या अदृश्य व्यक्तीला व्याघ्र-चर्म घातलेली खुर्ची दाखवून म्हणाले–"आपणासाठी ही खुर्ची आहे. बसा इथे!" आणि आपण स्वतः दुसऱ्या



खुर्चीवर बसले. बोलणं चालू ठेवण्याचा अभिनय करीत म्हणाले–"आपल्या बायकोने माझ्याकडे तक्रार केलेली आहे. या बाबतीत आपण काय सल्ला द्याल?....हं, असं काय! आपल्या थोरल्या मुलाचं वागणं अगदी चुकीचं आहे. आपल्या धाकट्या मुलाला काय देण्याची आपली इच्छा होती बरे? पूर्वेकडील घर? पण मग तो जगणार कसा?....हं....असं म्हणता होय! ठीक आहे ते सगळं आपल्या छोट्या मुलासाठी ठेवलंय? आपण सांगत आहात, तसंच मी करीन!"

तिथे उपस्थित असलेले लोक थोडे घाबरले. त्यांना न्यायाधीषाशी बोलायचं ही त्यांना भय वाटू लागलं. शेवटी न्यायाधीष उठून उभे राहिले. नम्रपणे म्हणाले–"ठीक आहे, आता आपण मला आज्ञा द्यावी." आता न्यायाधीष ताठपणे उभे राहिले आणि आश्चर्याने सर्वांकडे पाहिलं. षान-ची कडे वळून त्यांनी विचारलं–"तुझे वडील आता पर्यंत इथं माझ्याशी बोलत होते, तेव्हा तू कुठं गेला होतास? आमचं बोलणं तू ऐकलंस की नाही?"

"मी तर काहीच ऐकलं नाही." षान-ची उद्गारला.

न्यायाधीष म्हणाले–"असं समजतं की तुमची दोन घरं आहेत. पूर्वेकडे एक आणखी ही घर आहे. चला, आपण त्या घराकडे जाऊ या. तिथं तुम्हाला



आणखी काही सांगतो." षान-ची सर्वांना पूर्वेकडील घरी घेऊन गेला.

न्यायाधीषाने षान-चीला विचारलं–"हे घर तू धाकट्या भावाला दिलं म्हणातोस?"

शमळ लाजत षान-ची म्हणाला–"होय महाराज."

या घरांतल्या मध्य-भागांतील एका खोलीत बसून न्यायाधीषाने मृत्युपत्राची पाने उलटून-पालटून पाहिली नि आपला निर्णय सुनावला–"बस, सगळं काही स्पष्ट आहे! षान-षूला या घराशिवाय अधिक काही मिळणार नाही!"

मेयच्या दुःखाला पारावार राहिला नाही. तिला वाटलं होतं-हे न्यायाधीष षान-षूला न्याय मिळवून देतील!

आता न्यायाधीष म्हणाले–"मग षान ची, मी काय म्हणतो ते नीट ऐक. थोड्या वेळापूर्वी तुझे वडील मला इथे भेटले होते. त्यांनी मला सांगितलं की या घरात चाळीस मण चांदी आणि चार मण सोनं गाडलेलं आहे. आता हे सगळं षान-षूलाच मिळेल नाही?" न्यायाधीषाच्या म्हणण्यावर षान-चीचा विश्वास बसेना. तो म्हणाला–"किती ही मण सोनं-चांदी असू द्या, ती सगळी षान-षूची? माझा त्याच्यावर काय अधिकार?"

न्यायाधीष म्हणाले–"तू पुन्हा काही भांडण काढलंस तर मग मात्र मी गप्प बसणार नाही हं!" आणि न्यायाधीषाने पूर्वेकडील भिंत खोदून काढली. चांदीने भरलेल्या पाच कळशा सापडल्या, तसेच पश्चिमेच्या बाजूची भिंत खोदली, तिथं पाच कळशा चांदी आणि सहाव्या कळशीत सोनं सांपडलं!

न्यायाधीषाने सोनं-चांदीनी भरलेल्या त्या सर्व कळशा षान-षूच्या हवाली केल्या. आता षान-ची व्याकुळ होऊन विचार करू लागला, जर मी सर्व संपत्तीची समान वाटणी केली असती तर या सोनं-चांदीत ही मला अर्धा वाटा मिळाला असता! पण म्हणतात ना–

बैल गेला नि झोपा केला!





## गाढ झोपणारा प्राणी

फक्त रात्रीच उडणारा, ऑस्ट्रेलियातला फ्रागमाउथ नावाचा पक्षी, दिवसाच्या वेळात सारं जग विसरून अगदी गाढ झोपतो. झोपेत त्याला एका जागेवरून उचलून, दुसऱ्याच दूरच्या एखाद्या जागी घेऊन गेले तरी तो मुळीच जागा होत नाही. अगदी गाढ झोपून रहातो तो!

## राक्षसी अकाराच्या पालीचे मोठे अण्डे



आजपर्यंत राक्षसी आकाराच्या पालींची जी अंडी सापडली आहेत त्यापेक्षा कितीतरी पटींनी मोठे असे अंडे फ्रान्स-मधे सापडले आहे. असे मानले जाते की, ३.२ मीटर परीघ असलेले हे अण्डे, ८०,०००,००० वर्षांपूर्वी अस्तित्वात असणाऱ्या, २० फूट लांबीच्या राक्षसी पालीने घातलेले असावे. (राक्षसी पालीच्या (डायनोसोर) अंड्याजवळ कोंबडीचे अंडे)

## ज्वालामुखी



सर्वत्र जगात एकूण ४५५ ज्वालामुखी पर्वत आहेत. यांशिवाय ५० पर्वत समुद्राच्या उदरात आहेत. इतिहासात नोंदले गेलेले विस्फोटक असे जवळ-जवळ १६७-१७७ ज्वालामुखी पर्वत इंडोनेशियात आहेत.

## चान्दोबाच्या बातम्या



### जॉब चार्नाकच्या स्मरणार्थ

आज जगातील महानगरात कलकत्ता एक महानगर मणले जाते. पण ३०० वर्षांपूर्वी इथे काय होतं ? नजर पोचेल तेथ पर्यंत धान्याची शेतं, हिरवीगार मैदानं नि वाळूची टेकाडं यामध्ये मधून मधून काही खेडी वसलेली होती, या तीनशे वर्षांच्या काळात या प्रदेशाचा काया-कल्प झाला !

सन १६९० मध्ये जॉब चार्नाक नावाचा एक इंग्रज तरुण हुगळी नदीच्या किनाऱ्यावर पोचला. ईस्ट इंडिया कंपनी बाबत आपण सर्व जाणतोच. ब्रिटन मध्ये स्थापित झालेली ही एक व्यापारी संस्था. व्यापाराच्या नावाखाली आपल्या देशात प्रवेश करून ईस्ट इंडिया कंपनीने अनेक राजनैतिक कट, युद्धे आणि धमकावण्या यांचा उपयोग करून हळू हळू या देशातील अनेक राज्ये आपल्या ताब्यात घेतली. या कंपनीनेच जॉब चार्नाकला हुगळी नदीच्या किनारी पाठवलं होतं.

१४ ऑगस्ट १६९० रोजी जॉब चार्नाकने कलकत्ता शहराची मुहूर्तमेढ रोवली.

कलकत्ता नगरीच्या जन्माला तीनशे वर्षे पूर्ण झाली, म्हणून ता. २४ ऑगस्ट रोजी शहरातील प्रमुख व्यक्तींनी सेंट जॉर्ज चर्चच्या आवारातील जॉब चार्नाकच्या समाधि जवळ एक सभा आयोजित केली होती. शहराच्या वैभवाचं वर्णन करणाऱ्या प्रार्थना-गीतांनी सभेची सुरुवात झाली. यानंतर जॉब चार्नाकच्या समाधीच्या चारी बाजूंना वृक्षारोपण केले गेले. सभेत अनेक लोकांनी भाषणे दिली. वक्त्यांनी कलकत्यात जन्मलेल्या महान व्यक्तींचे गुण-गान केले, व कलकत्याला केन्द्र बनवून आपले



विविध कार्य करणाऱ्या राष्ट्रीय नेत्यांबाबत आपले विचार प्रकट केले.

## दीर्घायुष्याचे रहस्य

२३ ऑगस्ट रोजी ग्रेट ब्रिटन मधील एका गावात एका वृद्धाने आपला ११२ वा वाढदिवस मोठ्या थाटाने साजरा केला. वृत्तपत्रांनी त्याची प्रशंसा करताना लिहिलं की हाच जगातील सर्वाधिक आयुष्य लाभलेला वृद्ध होय. त्याच्या इतके अथवा अधिक वयाचे वृद्ध अगात अन्यत्र असू शकतील. पण त्यांच्याबद्दल अधिक माहिती आपल्याला उपलब्ध नाही.

वयाच्या साठीपर्यंत एका खाणीत काम करणाऱ्या ११२ वर्षे वयाच्या या वृद्ध माणसाचे नाव जॉन इव्हान्स.

"आपल्या या दीर्घायुष्याचं रहस्य काय?" असं काही शुभ-चिन्तकांनी जॉन इव्हान्सला विचारलं, त्याने तत्काळ उत्तर दिलं—"मी दारू पीत नाही नि धूम्रपान करीत नाही. मी कधी कुणावर रागावत नाही. अजून पर्यंत मी जुगाराचं नाव घेतलेलं नाही."

त्याच्या जवळपासचे मित्र सांगतात की त्यांनी कधी जॉन इव्हान्सला दारू पीताना वा धूम्रपान करताना पाहिलं नाही. तो कधी रागावलेला ही त्यांना दिसला नाही. या सर्वांचा अर्थ असा की तो जे काही बोलतो त्याप्रमाणे आचरण ही करतो. हेच त्याच्या दीर्घायुष्याचे रहस्य होय.

## आठ टन वजनाचा ग्रंथ

फ्रान्सच्या टूलाऊस नगरीतील एका प्रदर्शनात नुकताच एक ग्रंथ दाखवण्यात आला. तो चार मीटर लांब, तीन मीटर रुंद व आठ टन वजनाचा आहे.

एका स्थानिक प्रकाशन-संस्थेने आपल्या १५० व्या वार्षिकोत्सवा निमित्त तो प्रकाशित केला. व्यापार, उद्योग, वाणिज्य, प्रकाशन, कला इत्यादि विभिन्न क्षेत्रात ज्यांनी विशेष सुयश मिळविले, त्यांचे वर्णन या ग्रंथाच्या तीस पृष्ठात लिहिलेले आहे. या ग्रंथाच्या एक-एक पृष्ठाचे वजन २०० किलोग्राम आहे.





# घंटांवाले भूत

गिरिपुर गावात केशवदास नावाचा एक बांगडीवाला रहात असे. बांगड्या ठेवण्याकरता त्याच्याजवळ एक ढकलगाडी होती. सर्व बांगड्या गाडीवर छान मांडून, गाडी ढकलत गावच्या गल्ली-बोळातून बांगड्या विकत तो ओरडे—"बांगडीवाला आला ताई!" अन् त्याच वेळी गाडीला बांधलेली घंटाही तो वाजवी. घंटेचा तो आवाज मोठा मंजुळ वाटे.

एक दिवशी केशवचा व्यापार खूप छान झाला. शेवटी संध्याकाळ होताच तो घराकडे परत फिरला, रस्त्याच्या कडेला चिंचेचं एक भलं थोरलं झाड होतं. तिथं एक खोडकर भूत होतं. आज कुणाला छळायचं याच विचारात होतं ते! इतक्यात गाडीची घंटा वाजवत येणारा केशव त्याला दिसला.

भुताने आतापर्यंत घंटा कधी पाहिलीच नव्हती. गंमत वाटली त्याला!

पटकन् हवेत उडून भुताने केशवच्या हातची घंटा ओढून घेतली अन् नाहीसं झालं ते! भुताला पाहून केशवची भीतीने बोबडी वळून गेली! धावत्न तो तेथून पळत सुटला अन् गावच्या चावडीवर पोचला. तिथे बसलेल्या लोकांना त्याने धापा टाकतच सर्व हकिकत सांगितली.

पण त्यांच्यापैकी कुणाचाच त्या गोष्टी-वर विश्वास बसेना! एखादा खोडकर मुलगा अंधाराचा फायदा घेऊन याची घंटा घेऊन पळून गेला असेल अशा विचाराने ते सर्व त्याला हसले! खरी गोष्ट अशी, कि त्यांच्यापैकी कोणी भूत कसं ते कधी पाहिलंच नव्हतं!

यानंतर दुसऱ्या दिवसापासून ओळीने 'बुढ्ढी के बाल' विकणाऱ्या चरणदासच्या गाडीची घंटा, मुलांची शाळा चालवणाऱ्या परमानन्द गुरुजींच्या ओसरीवरची घंटा

सोनाली पंडित



,अन् अशाच अनेक घरांतल्या घंटा नाहीशा होत राहिल्या.

आता मात्र केशवदासच्या बोलण्यात काही तथ्यं होतं असं वाटू लागलं गाववाल्यांना! अन् एका आठवडा भरात ती गोष्ट खरीच होती हे ही सिद्ध झालं. गोष्ट अशी घडली की भुताने ज्या घंटा चोरल्या होत्या, त्या सर्व आपल्या गळघात अडकवून रात्रीचं ते भूत गावामधून हवेत तरंगत खोड्या करू लागलं! भुताला खूप गंमत वाटे! पण त्यामुळे गावातल्या लोकांची झोप उडाली! भूत मात्र रात्रभर स्वतःची करमणूक करून घेई, अन् दिवसा चिंचेच्या झाडावर बसून झोप काढी!

या भुताच्या उपद्रवापासून आपली कशी सुटका करून घ्यावी, हे काही गावकऱ्यांना उमगेना. अशातच एकदा वेंकटेश मान्त्रिकाने चावडीवर येऊन शेखी मिरवायला सुरवात केली–"पहा बाबांनो, मला संधी दिलीत, तर मी या भुताला पिटाळून लावीन." मग एका दिवशी संध्याकाळच्या वेळी तो काही लिंबं आणि कडू निंबाचा पाला घेऊन गावात आला. लिंबाची छकलं हवेत उडवून लिंबाच्या टहाळ्या हवेत गरगरा फिरवत, स्वतःशीच घुमत घुमत त्याने काही मन्त्र म्हणायला सुरुवात केली. त्याच्या त्या मन्त्रप्रभावाने भूत तिथे येऊन तर पोचलं; पण मान्त्रिकाच्या गळयातली छोटीशी चांदीची घंटा हिसकून ते पसार झालं!

ते पाहून वैतागाने वेंकटेश आपली छाती पिटून घेऊ लागला! लोक आणखीनच त्रासून गेले. वेंकटेशचा गुरु मणिरामही म्हणू लागला कि–"असलं खोडयाळ भूत मी सुद्धा आपल्या आयुष्यात कधी पाहिलं नव्हतं!" त्याच्या हेही लक्षात आलं की आपले मन्त्र केवळ माणसांचं नुकसान करणाऱ्या भुतांनाच लागू पडतात, पण असल्या खोडकर भुतापुढे काही ते कामाचे नाहीत! शेवटी तो ही मुकाट्याने आपल्या घरी निघून गेला.

अशातच एक दिवस शहरात शिकत असलेला वसन्त नावाचा एक तरूण या गावातल्या आपल्या एका नातेवाइकाकडे रहायला आला. केवळ धाडसीच नव्हे, तर चांगला बुद्धिमानही होता तो. आपलं डोकं लढवून त्या भुताला गावातून पळवून लावायचं ठरवलं त्याने.

एका रात्री हातात एक मोठीशी घंटा घेऊन वसंत गावच्या गल्ल्यातनं फेऱ्या मारू लागला. थोड्या वेळातच, त्याच्या अपेक्षेप्रमाणे भूत आपल्या जवळच्या घंटा वाजवीत त्याच्यासमोर हजर झालं. पण त्याला पाहून वसंत जराही न घाबरता त्याच्यासमोर अविचल उभाच राहिला. यावर भूत आपले मोठे मोठे डोळे गरगरा फिरवीत आपल्या तोंडातून आगीच्या ज्वाला काढू लागलं.

ते पाहून हसत हसतच वसन्त म्हणाला–"अरे, अजून जरा वेळ अशीच आग ओकत रहा न! कित्ती थंडी आहे इथं, छान फुकटचा शेक मिळतोय मला!"

वसन्तचं बोलणं ऐकून ज्वाळा फुंकायचं बन्द करीत भूत आश्चर्यचकित होऊन म्हणालं–"मला वाटलं होतं की, इतर लोकांसारखा तूही मला पाहून हातची घंटा फेकून देऊन पळून जाशील इथून! वा, वा! आपण तर खूश झालो बुवा तुझी हिम्मत पाहून. तुझी घंटा तर खूपच छान दिसतेय, मला ती देऊन टाकून निघून जा बरं इथून!"



वसन्त म्हणाला–"घंटा घेऊन काय करशील तू? तुला काही ही वाजवता यायची नाही बघ!"

"काय म्हणालास? वाजवता येणार नाही ही घंटा मला? या बघ कित्ती घंटा लटकतायत माझ्या गळयात. अशा जोरात वाजवून दाखवतो तुला त्या, कि कानाचे पडदे फाटून बहिराच होशील बघ तू!" असं म्हणून भुताने घंटा वाजवायला सुरुवात केली.

त्या आवाजालाही न भिता वसन्तने म्हटले–"मी तुला ही घंटा एकाच अटीवर देईन. अट अशी, कि तू जर ती वाजवू शकला नाहीस तर हे गाव सोडून निघून जायचं. कबूल?"

"अगदी कबूल! ही काय फार अवघड अट आहे काय!" असे म्हणून भुताने हात पुढे केला. वसंतने त्याच्या हातात घंटा दिल्याबरोबर त्याने ती हलवायला सुरुवात केली. पण घंटा काही वाजेना!

भुताने घंटेचा आतील भाग तपासून पहात म्हटले–"ही तर चक्क फसवणूक आहे. याच्या आत लोलकच नाहीये! वाजेलच कशी ती? तू तरी दाखव पाहू वाजवून! तरच अटीप्रमाणे मी गाव सोडून जाईन."

वसंतने घंटा आपल्या हातात घेऊन हलवून दाखवली, अन् काय आश्चर्य! छान आवाज आला त्यातनं!

ते पाहून घाबरून भूत म्हणालं–"तू तर मोठाच मान्त्रिक दिसतोस! जिकलास तू; वचनाप्रमाणे मी आता गाव सोडून जातो!" असं म्हणून भूत हवेत उडालं अन् गाव सोडून मोठया वेगाने ते निघून गेलं तेथून!

वसन्तला हसू आलं! नंतर हळूच त्याने आपल्या पोकळ शर्टाच्या आतून कोपराला बांधलेली एक छोटी घंटा सोडवून बाहेर काढली! वसंतने जेव्हा हात हलवला तेव्हा भुताने खरं तर याच घंटेचा आवाज ऐकला होता. पण त्याला कुठे वसन्तची युक्ति कळली?





# डाकू युवराज

[२]

[सुमेध राज्याची राजधानी शान्तिपुर हे एक समृद्ध शहर होतं. राजपरिवाराचा नातेवाईक सेनापती वीरसिंह याने राजकुटुम्बच खलास करण्याचं कारस्थान रचलं. युवराजाच्या वाढदिवशी हे काम उरकायचा घाट त्याने घातला. ही बातमी कळताच राजाने राणीला मुलासह गुप्त भुयारी मार्गाने बाहेर काढून लावले. पुढील हकिकत आता वाचा.—]

"दार उघडा दार!" कठोर आवाजात ओरडण्याचे शब्द ऐकू आले. राजा शान्तिदेव जरा वेळ गप्पच उभा राहिला. पुन्हा दरवाजा ठोठावण्याचा आवाज होऊन दरडावणीचा आणखी मोठा स्वर ऐकू आला. "दार उघडा!" खिडकीच्या गुप्त दारातून राजाने हळूच बाहेर पाहिले. राजाला अपरिचित असे दहा शिपाई त्याला दिसले. वीरसिंहने यांना बहुधा शेजारच्या राज्यातून आणले असावे. ते तर राक्षसांसारखे उसळया मारत होते!

पुन्हापुन्हा ओरडूनही दार न उघडल्याने आता शिपायांना धीर धरवेना, एक मोठीशी तुळई आणून तिच्या साह्याने दरवाजा तोडायचा बेत त्यांनी केला. तुळईच्या दणक्याने आता दरवाजा नक्कीच मोडेल हे राजाने ओळखले, अन् त्याने एक युक्ती करायचे ठरवले. दरवाज्यावर जोरदार



प्रहार करण्याच्या उद्देशाने तुळई उचलून शिपाई प्रथम दहा-बारा पाउले मागे सरकले अन् नंतर एकदम धावत पुढे येऊन त्यांनी तुळईचा जोरदार प्रहार दारावर केला. याच क्षणाची वाट पहात असणाऱ्या राजाने नेमक्या त्याच वेळी दरवाजा आतून उघडला. त्यामुळे त्या अवजड तुळईसह शिपाईही तोल जाऊन तोंडघशी पडले! तरवार उगारून त्याच क्षणी राजा त्यांच्यावर तुटून पडला, काय घडतंय हे कळायच्या आतच राजाने दोन शिपायांची मुंडकी धडावेगळी केली!

"अरे पळाला, पळाला!" बाकीच्या शिपायांनी एकच ओरडा केला.

"अरे पकडा त्याला. काहीही करून मारून टाका! नाहीतर तुमची सर्वांची डोकी उडवीन मी! खबरदार!" दुसरा एक जोरदार आवाज त्या कोलाहलातून उठला. वीरसिंहाचा हा आवाज राजाने बरोबर ओळखला.

इकडे राजवाड्या बाहेर जनता मोठ्या उत्साहाने दारूकाम पहात उभी होती. कृत्रिम गगनचुंबी झाडांच्या आकाराच्या रंगीबेरंगी दारूकामाचे गोळे कानठळ्या बसणाऱ्या आवाजात फुटत होते. राजवाड्याच्या आत चालू असलेल्या धुमश्चक्रीची कल्पना त्या बिचाऱ्या राजनिष्ठ प्रजेला मुळीच नव्हती!

राणीच्या महालाला तसे अनेक दरवाजे व खिडक्या होत्या, पण त्या साऱ्या बन्द केल्या गेल्या होत्या. राजा कोणत्याही दारातून बाहेर पडला तरी त्याला यमसदनाला पाठवण्यासाठी हातात नंग्या तलवारी घेतलेले सुसज्ज सैनिक तेथे हजर होतेच!

समोरच्याच जिन्याकडे राजा एकदम धावला. तेथील पहाऱ्यावरच्या शिपायाने आपली तलवार उगारली, पण पटकन आपले डोके वाकवून राजाने तो वार चुकवला अन् उडी मारून लाथेने त्या शिपायाला खाली पाडून तो भराभर पायऱ्या चढू लागला. जिन्याच्या वरच्या



टोकाचे दार बन्द होते. राजा त्याची कडी काढू लागला, इतक्यात दोन शिपाई धावत वर आले. पण एकाच प्रहाराने राजाने दोघांनाही खाली ढकलून दिले. प्राणान्तिक आवाज करत दोघेही जिन्यातून गडगडत खाली गेले. दार उघडून राजा आता छतावर जाऊन पोचला.

राजवाड्याबाहेर जी आतिषबाजी चाललेली होती, तिकडे पहात लोक टाळ्या वाजवत होते, आरडाओरडा करत होते. भोळी-भावडी ती जनता आपल्या युवराजाचा वाढदिवस मोठ्या आनन्दाने, उत्साहाने साजरा करीत होती. इकडे राजदम्पतीचा मृत्युशी चाललेला लढा त्यांना माहीतच नव्हता. राजावर अतोनात श्रद्धा असलेली ती जनता व प्रत्यक्ष त्यांचा राजा यांच्यात तसे पाहता आत्ता केवळ थोडेच अंतर होते. तरीही त्यांच्यापर्यंत पोचायचा मार्ग राजाला सुचत नव्हता.

कोणीतरी वर चढून येत असल्याची चाहूल लागली राजाला! त्याने दाराजवळ उभे राहून आव्हान दिले—"जर कोणी मला पकडायचा प्रयत्न केला, तर जिवन्त सोडणार नाही मी त्याला! खबरदार कोणी पुढे याल तर!"

"अरे मारून टाका त्याला! पेटाराभर सोनं बक्षिस देईन त्याला! जन्म भर कष्ट



केलेत तरी मिळणार नाही असं धन एका क्षणात मिळविण्याची संधि पुन्हा तुमच्या जीवनात येणार नाही. प्राण पणाला लावून आता या क्षणी याला मारून टाका आणि पेटारा भर सोनं मिळवा!" पायऱ्यांखाली उभे राहून कोणीतरी शिपायांना प्रोत्साहन देत होते. अरेरे! लोभीपणाने माणूस काय करील अन् काय नाही!

"सोनं! सोनं!" ओरडत मोठ्या उत्साहाने, चुरशीने तलवारी तळपवत दोन शिपाई जिन्यावरून पुढे घुसायचा प्रयत्न करू लागले.

"द्या! पेटाराभर सोनं द्या!" असे म्हणत राजा त्यांच्यावर प्रहार करू लागला!

हातातल्या तलवारी गळून पडून–"आई ग! मेलो, मेलो!" म्हणत ते दोघेही जिन्यावरून खाली गडगडले. पेटारा भर सोनं कमवायला गेले नि आपले प्राण गमावून बसले.

राजा आता स्वतः सुरक्षित स्थानी होता. जिन्या वरून आता कितीही शिपाई आले तरी तो त्यांना यमसदनास पाठवू शकत होता. परन्तु वीरसिंहाचे काही सैनिक दुसऱ्या बाजूने भिंतीला शिडी लावून वर चढायच्या उद्योगाला लागले. राजाला पहिल्यापासून ही भीती वाटतच होती. एकीकडे जिन्यावरून चढून येणाऱ्या सैनिकांना तोंड देत असताना मोठ्या सावधगिरीने त्याने दुसऱ्या बाजूकडेही लक्ष ठेवले होतेच! अचानक त्याला दिसले की एक सैनिक आपल्या हातातला लांबलचक भाला रोखून पुढे येत आहे! एकाच उडीत पुढे झेप घेऊन राजाने त्याला लाथ मारली, तो सैनिक किंचाळी फोडून खाली जमिनीवर पडला. राजाने खाली वाकून पाहिले, तेव्हा त्याला दिसले की आणखीही काही सैनिक शिडीवरून चढून येत आहेत. शिडीच खाली पाडावी म्हणून राजाने तिच्यावर जोरदार प्रहार केला.

परन्तु इतक्यात आणखी काही सैनिक जिन्याने वर आले व काही येतच होते. राजाने ओळखले की, अशा प्रकारे लटकण्यात काही हशील नाही; परिस्थिती अधिकाधिक बिकट होत चालली आहे.



विरसिंहाने कमीत कमी शंभर तरी सैनिक नक्कीच बरोबर आणले असणार! थोड्याच वेळात ते आपल्याला घेरतील; एकटेच आपण किती वेळ तोंड देऊ शकणार! राजा मृत्युला भीत होता असे नाही. अन् या स्थितीतही त्याच्या मनाला एक संतोष होता, कि आपण राणी व युवराज यांना भुयारातून बाहेर काढून सद्यःपरिस्थितीतून वाचवले आहे. अगोदरच माहीत असणाऱ्या मृत्युपेक्षा ही अज्ञात स्थिति खूपच बरी!

या वेळात शत्रुसैनिक राजाच्या जवळ आले. राजाच्या डोक्यावरच आकाशात यावेळी आतिषबाजीचा एक गोळा फुटला; आणि त्या उजेडात त्याला एका सैनिकामागे उभ्या वीरसिंहाचा चेहरा स्पष्ट दिसला. "विश्वासघातकी, पापी, हरामजादा! वाचव पाहू आपला प्राण!" असे म्हणत राजाने रागाने दात-ओठ खात कमरेला लटकावलेली सुरी काढून वीरसिंहावर फेकली. वीरसिंह वेळीच चपळाईने बाजूला सरकला, पण तरीही त्याचा डावा कान थोडासा कापला गेलाच. या प्रहाराने वीरसिंहाचा पारा अधिकच चढला. त्याचा राग अनावर झाला.

"मारा त्याला!" अत्यंतिक क्रोधाने वीरसिंह गरजला. शिपाई मोठ्या उत्साहाने राजाकडे वळले, परंतु इतक्यात राजा शिपायांनी महालाच्या भिंतीला लावलेल्या शिडीवरून उतरू लागला.





"अरे, ती शिडी खाली पाडा; पाडा लवकर!" वीरसिह् ओरडत सुटला. त्यावेळी दोन तीन सैनिक त्या शिडीवर चढत होते; तरीही छतावरच्या सैनिकांनी शिडी खाली पाडली. त्यावेळी राजा शिडीवरून अर्ध्यापेक्षाही अधिक खाली उतरला होता; त्यामुळे तो अगदी सहजपणे उडी मारून जमिनीवर पोचला आणि त्याने शिडी उचलून मागील बाजूच्या तटाला लावली.

"शिडी खाली ओढा रे लवकर!" छतावरून वीरसिह् हा प्रकार पाहून ओरडू लागला. पण त्याचे सर्व सैनिक यापूर्वीच छतावर पोचले होते. काहीही करून राजाला पकडून देऊन पेटाराभर सोनं मिळवण्यासाठी ते तेथे आले होते. शिडीवर चढणारे शेवटचे दोन सैनिक शिडी ढकलल्यामुळे खाली पडून चांगलेच जखमी झाले होते. ते बिचारे तसेच उठून लंगडत शिडी खाली ओढायला निघाले. पण तेवढ्यात राजा भितीवर पोचलाही होता. तरीही ते ती शिडी खाली खेचू लागले.

"मूर्खांनो! आता कशाला शिडी खाली पाडू पाहताय? तो तर वर भिंती वर पोंचला. जा त्याच्या मागे अन् सांगितलेलं काम करा. वर चढा अन् कसंही करून त्या राजाला मारून टाका. तुम्हांला पेटारा भर सोनं मिळवायचं आहे की नाही? पुन्हा सांगतो, अशी नामी संधि नंतर येणार नाही. ही हीच वेळ सोनेरी! चढा वर आणि त्याला मारून टाका. पेटारा भर सोन्याचे धनी व्हा!" वीरसिह् छतावरून गरजला.

तटाला लागूनच सुमती नदी वहात होती. तटाच्या भितीवर उभे राहून आता पुढे आपण काय करावे याबद्दल राजा विचार करू लागला. कानाच्या जखमेतून रक्त वहात असूनही त्याची पर्वा न करता वीरसिह् भराभरा खाली उतरला. राजा एकदा जिवन्तपणे सुटला तर आपले डोके उडवले जाईल हे तो पक्के जाणून

होता. "वर चला लवकर कोणीतरी, अन् काही करून त्या राजाला मारून टाका." असे म्हणून त्याने स्वत: राजावर भाल्याचा नेम धरला, बरोबर नेम धरून भाला फेकण्यात प्रवीण असल्या-बद्दल राजानेच एकदा वीरसिंहाचा मोठा सत्कार केला होता!

वीरसिंहाने राजाकडे भाला फेकला. चांदण्यामुळे चमकणाऱ्या आकाशात भाला सर्रकन पुढे गेला. पुढे जाऊन तो बरोबर लागला की नाही हे कोणाला दिसले नाही; पण राजा मात्र भिंतीवरून अचानक नाहीसा झाला होता!

वीरसिंहने झटकन शिडीवरून चढून तटावरून खाली डोकावून पाहिले, भाला लागल्यामुळे राजा नदीत पडला की त्याने आपण होऊन पाण्यात उडी मारली हे कळायला काही मार्ग नव्हता! कसे ओळखायचे की भाला लागून राजा मरून नदीत पडला की ऐन वेळी तो आपला प्राण वाचवून नदीत उडी मारून पळाला?

आपल्या चारी बाजूंना उभ्या असलेल्या सैनिकांना वीरसिंहने विचारले—"राजाला भाला लागल्याचे तुम्हांपैकी कोणाला स्पष्ट दिसले?"

पण सर्वच सैनिक उदास दिसत होते. पेटाराभर सोनं हातचं गेल्यामुळे ते बिचारे दु:खी झाले होते.

"महाराज, आपण फेकलेल्या भाल्याचा नेम चुकेलच कसा मुळी?" एकाने वीर-सिंहाची खुशामत करायचा प्रयत्न केला.

"गप बैस! माझा भाला लागून राजाला पडताना तू प्रत्यक्ष पाहिलंस का बोल! नाहीतर तोंड बंद कर आपलं. उगाच बकवास करू नकोस." रागाने वीरसिंह ओरडला.

त्याचं गरजणं ऐकून सर्व सैनिक एकदम चिडीचुप झाले! वेगाने वाहणाऱ्या नदीच्या पाण्याकडे वीरसिंह पहात राहिला. त्याला वाटलं की खळखळ वहाणारं हे पाणी आपल्याला पाहून खदाखदा हसत आहे!

(क्रमश:)



# शूरसेनची

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाकडे परत आला, झाडावरून प्रेत खाली उतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून त्याने स्मशानाचा रस्ता सुधारला. चालता चालता प्रेतातला वेताळ बोलू लागला—" राजा, या मध्यरात्रीच्या भयानक वेळी तू जितके कष्टाचे काम करीत आहेस, तितके करणे दुसऱ्या कोणालाही शक्य होणार. नाही. माझ्या मनात राहून राहून एक शंका येत आहे, कि ज्यांच्यासाठी तू हे काम करीत आहेस, ते लोक काम पुरे झाल्यावर तुझी बूज राखतील की नाही? या संदर्भात तुला शूरसेन राजाची गोष्ट जाणून घ्यायला हवी. तो एक महान पंडितही होता. मी तुला त्याची गोष्ट सांगतो ती ऐक. तुझे श्रमही विसरल्यासारखे वाटतील तोपर्यंत.

वेताळ गोष्ट सांगू लागला—

## वेताळाच्या गोष्टी



प्राचीन काळी गांधार देशावर राजा शूरसेन राज्य करीत असे. तो केवळ एक कुशल शासकच नव्हे, तर एक उच्च कोटीचा विद्वानही होता. सर्व कलांना तो खूप प्रोत्साहनही देत असे. चित्रकला व नृत्यकळा यावर त्याचे नितान्त प्रेम होते! त्याच्या दरबारात कवि व चित्रकार यांच्या बरोबर नर्तकही असत. परंतु या नर्तकांच्या कलेवर मात्र तो म्हणावा इतका खुष नसे.

एके दिवशी त्याचे काही शिपाई जीर्ण-शीर्ण वस्त्रे ल्यालेल्या, केस विस्कटलेल्या अशा दीन तरुणीला दरबारात घेऊन आले. तिला राजासमोर उभी करून शिपाई म्हणाले–"महाराज, ही तरुणी स्वर्णमुखी नदीच्या पात्रांतून वहात असलेली आम्हाला दिसली. तिला सुखरूप किनाऱ्यावर आणून आम्ही तिला तिच्या कुटुम्बीयांबद्दल विचारले. पण तिने आमच्या एकाही प्रश्नाचे उत्तर दिले नाही; फक्त रडतच राहिली आहे ही!"

क्षणभर विचार करून शूरसेन सेवकांना म्हणाला–"ठीक आहे, सध्या तुम्ही हिला महाराणीच्या हाती सोपवा."

त्या दिवशी संध्याकाळी शूरसेन महाराणी लीलावती हिला भेटायला गेला. त्याने विचारले–"देवी, आज सकाळी मी ज्या तरुणीला तुझ्याकडे पाठवले, ती आता कशी काय आहे? तिच्याकडून काही माहिती मिळू शकली तुला?"

"महाराज, तिचं नाव मल्लिका. ती चांगली कलाकार आहे. आजच तिने एक सुरेख चित्र रेखाटले आहे. मला खूप आवडले." असे म्हणून राणीने एक चित्र राजा पुढे ठेवले

शूरसेन आश्चर्याने उद्गारला–"ही चित्रकला तर केवळ अपूर्व, अद्भुत आहे! कोणी काढलं हे चित्र?"

राणी लीलावती उत्तरली–"या चित्रातली तरुणी हीच या चित्राची चित्रकार आहे."



"काय म्हणालीस देवी! मल्लिकाने स्वतःच हे चित्र काढले?" राजाने पुन्हा विचारले.

"हां, हां! तिने स्वतःच तर काढलं हे चित्र! अन् इतकंच नव्हे, तर ती एक चांगली नर्तकीही आहे म्हणे! मला असंही कळलं की तिची नृत्यपरीक्षा करून तिला दरबारात स्थान मिळावं अशी तिची इच्छा आहे. तिने सांगितले आहे की आपण इथे आलात की ती आपल्यासमोर नृत्यप्रदर्शन करणार आहे." लीलावतीने राजाला माहिती पुरवली.

"मग तर मला तिची नृत्यनिपुणता पाहिलीच पाहिजे!" राजा म्हणाला.

थोड्याच वेळात राणीची सखी नर्तकीच्या वेषात सजलेल्या मल्लिकेला घेऊन तेथे हजर झाली, सुन्दर सजलेल्या मल्लिकेला पाहून शूरसेन एकदम मुग्धच झाला.

लीलावतीने विचारले–"महाराज, हिला नृत्य सुरू करायची आज्ञा देऊ काय?"

राजाने होकारार्थी मान हलवली अन् तत्काल राजदम्पतीला प्रणाम करून मल्लिकेने आपले नृत्य सुरू केलं.

नृत्य संपताच टाळ्या वाजवत शूरसेन म्हणाला–"शाब्बास मल्लिका, तू मल्लिका नव्हेस, तर साक्षात् मयूर-कन्याच आहेस! माझी कलातृष्णा जाणून नटराज शंकरानेच



माझ्याकडे पाठवलेली कलाभिनेत्री असली पाहिजेस तू! तुझ्या आगमनामुळे माझ्या दरबारातल्या एका मोठ्या अभावाची पूर्ति झाली आज?"

मोठ्या प्रसन्नतेने राजदम्पतिबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त करून मल्लिका तेथून निघून गेली. नंतर राजा शूरसेनही तेथून निघून सरळ आपल्या गुप्त मसलतीच्या दालनात गेला व तेथूनच त्याने मन्त्री केशवभट्टला बोलावून आणण्याची आज्ञा दिली.

मन्त्री आल्याबरोबर राजाने त्याला मल्लिकेबद्दल सविस्तर निवेदन करून आपण तिला दरबारी नर्तकीची जागा दिल्याबद्दलही सांगितले.



ही सर्व हकिकत ऐकून केशवभट्ट दुःखाने म्हणाला–"महाराज, हे काय केलंत आपण! पूर्वचरित्राबद्दल पूर्ण माहिती नसताना एकाद्या सुंदर आणि चतुर स्त्रीला समाजात मानाचं असणारं पद देणं केव्हाही उचित नव्हे! अजूनही वेळ गेली नाही; आपण तिला केवळ दरबारात आश्रय द्या, पण उच्च पद द्यायला नकार द्या!"

"आता मी असं काही करू शकणार नाही. मी तर तिला दरबारी नर्तकीचं पद देण्याचं निश्चित करून बसलोय." शूरसेन म्हणाला.

केशवभट्ट राजाच्या या उत्तराने त्याच्या तोंडाकडे आश्चर्याने पहातच राहिला!

"मी हे कबूल करतो की मल्लिकेला राज-नर्तकीचं स्थान देऊ करताना मी जरा उतावीळपणाच केला; पण आता पुन्हा विचार केल्यावर मला असं वाटतंय की आता आपल्या वचनाचं पालन करणंच उचित होईल. आपल्या शंकेप्रमाणे ती एकाद्या देशाची गुप्तहेर असेलही कदाचित्! काही असलं तरी आपण तिच्या बाबतीत अगदी सावधगिरी बाळगू." राजा उत्तरला.

राजाचा हा विचारही केशवभट्टला आवडला नाही; पण आता मौन राहणंच त्याने औचित्याचे मानले.

यानन्तर मल्लिकेची गान्धार-देशाची राज-नर्तकी म्हणून नियुक्ती झाली. तिने काढलेल्या अनेक चित्रांनी राजवाडा सुशोभित केला गेला. सामान्य नागरिकांपासून ते मुख्य राजाधिकाऱ्यांपर्यंत सर्वंचजण मल्लिकेच्या सौंदर्य व नृत्यकुशलतेची तोंड भरभरून स्तुति करू लागले! अन् हळूहळू मल्लिकेच्या आश्रयाला येणारांची संख्या वाढू लागली.

परंतु राजा शूरसेन मल्लिकेच्या चित्रकला अन् नृत्यकलेचा सर्वात अधिक स्तुतिपाठक असूनही स्वतः आपल्या कर्तव्याच्या बाबतीत मात्र पूर्णपणे जागरूक होता. मल्लिकेवर नजर ठेवण्यासाठी त्याने काही गुप्त हेर नेमले.



पण शूरसेनची याबाबतीत मात्र 'आता पश्चात्ताप करून काय उपयोग!' अशी स्थिति होती. त्याला जेव्हा कळून चुकले की मल्लिका ही आपल्या गान्धार देशाच्या शेजारील कलिंग राजाची गुप्तहेर आहे, तेव्हा त्याने मल्लिकेला तिच्या जागेवरून पदच्युत केले. पण तोपर्यंत कलिंग सेनेने गान्धार देशावर हल्लाही चढवला होता! गान्धार देशाची युद्धाची तयारी झालेली नव्हती; त्यामुळे कलिंग-नरेश विकर्णने तो देश सहजपणे जिंकून घेतला.

राणी लीलावतीला तिच्या सख्या व काही सैनिक मिळून राजवाड्यातील गुप्त भुयारी मार्गाने बाहेर घेऊन गेले व त्यांनी तिला तिच्या पित्याकडे–चंपक देशच्या राजाकडे पोचवले.

आपल्या पराभूत सेनेतून बाजूला निघून राजा शूरसेन आपल्या सीमेवर असणाऱ्या भिल्ल राजाकडे मदत मागण्यासाठी निघाला. वाटेत रस्त्याच्या बाजूलाच त्याला एक ज्योतिषी दिसला. आपले भविष्य वर्तवून घेण्यासाठी अनेक लोक त्याच्या भोवती जमले होते. राजाही सहजगत्याच तेथे जाऊन पोचला अन् त्यानेही ज्योतिषापुढे आपला हात पसरला.

राजाचा हात पाहून ज्योतिषी म्हणाला–"अरे, या हातावर तर महाराजांची चिन्ह



आहेत! तू नक्कीच काही तरी चूक केली असली पाहिजेस अन् आता त्याबद्दल पस्तावत आहेस तू! पण हे दुर्भाग्य संपून लवकरच तुझं भाग्य उजळेल. आणि तुझं सर्व प्रकारे कल्याण होईल!"

या क्षणापर्यंत राजा शूरसेन एकाच विचाराने तळमळत होता की, आपण आपल्याच मूर्खपणाने राज्य घालवले आहे. पण आता ज्योतिषाचे बोलणे ऐकून त्याच्या मनात पुन्हा नव्याने उत्साह संचारला, त्याचा आत्मविश्वास जागृत झाला!

राजा आता तेथून निघणार इतक्यात एका शेतकऱ्याचा हात पहात ज्योतिषी बोलू लागला–"ओहो! तुझा हात तर



एकाद्या चक्रवर्ती राजावरही मात करील असा आहे. वा! काय नामी रेषा आहेत हातावर! तुला आपल्या गरिबीबद्दल दुःख वाटतंय ना? पण लवकरच इन्द्राला मिळणारी सुखं तुला भोगायला मिळणार आहेत!"

ज्योतिषाचे हे बोलणे ऐकून राजा स्वतःशीच हसला आणि भिल्ल राजाच्या प्रदेशाकडे चालू लागला.

यानन्तर थोडयाच दिवसांनी शूरसेनचा सासरा, चंपक देशाचा राजा, याने कलिंग-वर हल्ला केला आणि इकडे स्वतः शूरसेननेही भिल्ल राजाच्या मदतीने आपल्या देशात घुसून बसलेल्या विकर्णवर हल्ला चढवला—अशा प्रकारे ते दोन्ही देश शूरसेनच्या छत्राखाली आले.

पुन्हा राज्य मिळाल्यावर शूरसेनने मल्लिकेला बोलवून कठोर स्वरात विचारले—"मल्लिका, आता तुला कळलं ना, कि कलिंग राज्यही माझ्याच हाती आलं आहे?"

मल्लिकेने डोके हलवून होकार दिला. "मग आता आणखीही एक गोष्ट जाणून घे—तू राजा शूरसेनची दरबारी-नर्तकी आहेस! केवळ नर्तकी! समजलीस?" शूरसेनने तिला धक्काच दिला!

आपल्या अपराधाबद्दल आपल्याला कडक शासन मिळेल, असेच मल्लिकेला वाटत होते. पण आता मुक्तता झाल्याने आनन्दाने राजाला प्रणाम करून ती तेथून निघून गेली.

यानन्तर शूरसेनने त्या ज्योतिषाला बोलावून घेऊन आज्ञा दिली—"आजपासून तू कोणाला ज्योतिष सांगायचे नाहीस. मी आजपासून तुझी राजवाड्यावरचा एक एक शिपाई म्हणून नेमणूक करत आहे."

राजाने आता आपल्या राज्यात एक कायदाच करून टाकला की—आपल्या राज्यात कोणीही ज्योतिषी किंवा हस्त-सामुद्रिक म्हणवून धंदा करायचा नाही-केवळ शास्त्र म्हणून ज्योतिष किंवा हस्त-



रेषांचा अभ्यास करायला हरकत नाही! इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, शूरसेनची ही वागणूक अन्याय्य नव्हे का? आपल्याला फसवणाऱ्या नर्तकीला त्याने पुन्हा नर्तकी-पद देऊ केलं अन् स्वतःला नव्याने उत्साही बनवणाऱ्या ज्योतिषाला मात्र त्याच्या व्यवसायापासून वंचित केलं! या माझ्या शंकेचं बरोबर उत्तर जाणूनसुद्धा दिलं नाहीस तर तुझ्या मस्तकाची छकलं-छकलं होऊन पडतील."

यावर विक्रमादित्य उत्तरला—"शूरसेनचा व्यवहार मुळीच अन्याय्य नाही. ज्योतिषाने शेतकऱ्याचे जे भविष्य सांगितलं ते ऐकून राजा समजून चुकला कि ज्योतिषाला या विषयाचं शास्त्रशुद्ध ज्ञान अजिबात नाही. अशा लोकांनी सांगितलेल्या भविष्यामुळे जनतेची मानसिक हानि होऊ शकेल. अशा धोक्यापासून जनतेला वाचवण्यासाठीच अशा प्रकारे रस्त्याच्या बाजूला बसून भविष्य सांगायला त्याने बन्दी घातली. परंतु त्याबरोबरच ज्योतिषाच्या पोटावर पाय येऊ नये, म्हणून त्याला ताबडतोब आपल्या दरबारात नोकरीही दिली.

आता राहिला मल्लिकेचा विषय! वैयक्तिक रीत्या ती एक असामान्य अशी नर्तकी आहे, अन् राजा शूरसेन कलाप्रेमी आहे. ज्या राजाने मल्लिकेला गुप्तचर म्हणून नेमलं, तो तर स्वतःचं राज्यच घालवून बसला. याचा अर्थ असा की मल्लिका म्हणजे काही एका वीराच्या हातचं शस्त्र नव्हे. ती तर केवळ चमचम चमकू शकते, कोणाचं डोकं उडवू नाही शकत! त्यामुळेच शूरसेनने मल्लिकेच्या कलेला 'आपल्या देशाची स्वतःची संपत्ति' असं स्वरूप देऊन दूरदर्शीपणाच दाखवला आहे."

हे उत्तर देऊन राजा पुन्हा गप्प होताच प्रेतात बसलेला वेताळ राजाच्या खांद्यावरून निसटून पुन्हा प्रेतासकट अदृश्य होऊन झाडाच्या फान्दीवर जाऊन बसला.

(कल्पित)





# पोपटाचं मौनं

एका देशात एक राजा राज्य करीत होता. न्यायदानाच्या कामी तो अत्यन्त कुशल होता. एकदा तो एका आरोपी बाबत न्याय-निर्णय करीत होता. त्यावेळी माणसाची भाषा जाणणारा एक दैवी पोपट तिथे आला आणि राजाने आपला निर्णय जाहिर करताच तो म्हणाला–"शाबास!" आणि राजसभेतून तो निघून गेला.

त्याच राज्यात एक धोकेबाज माणूस रहात असे. अनेक लहान-मोठे अपराध करून तो आता थकला. त्याने असा विचार केला की दोन-चार मोठ्या चोऱ्या करून खूप धन मिळवावं आणि आपलं राहिलेलं आयुष्य सुखात घालवावं.

सर्वात अगोदर त्याने एका समुद्री व्यापाऱ्याकडे नोकरी करायला सुरुवात केली. आपण फार इमानदारीने काम करीत आहोत असा भाव आणून त्याने व्यापाऱ्याचा विश्वास संपादन केला. एक दिवशी तो व्यापाऱ्याला म्हणाला–"मालक, आपल्या बंदरात उद्या सुगंधी द्रव्यांनी भरलेलं एक जहाज येणार आहे. आपण थोडे पैसे दिलेत तर मी स्वस्तात काही माल खरेदी करीन. यात आपल्याला खूप फायदा मिळेल!"

"अरे, या व्यापारात काही फार फायदा होत नाही." असं म्हणून व्यापाऱ्याने हसत त्याला टाळलं.

पण धोकेबाजाने व्यापाऱ्याला पुन्हा विनंती केली आणि थोडा व्यापार करायला त्याला राजी केलं. आपल्या काही अभिनय-कुशल मित्रांना बेगडी व्यापारी बनवून त्याने अगोदरच बंदरात पाठवून दिले. जहाज बंदरात पोचताच ते परदेशी व्यापाऱ्यांना भेटले आणि त्यांना सांगितलं–"यंदा सुगंधी द्रव्याची मागणी फार कमी झालेली आहे!" सर्वात शेवटी धोकेबाज स्वत: तेथे गेला आणि फार स्वस्तात बराच माल खरेदी केला. तो विकून व्यापाऱ्याला दसपट फायदा झाला.

अशा रीतीने काही दिवस गेले. एकदा धोकेबाजाला बोलवून व्यापारी म्हणाला–"अरे, आज रात्री एक जहाज आपल्या बंदरात येत आहे. या जहाजात बरेच मोत्यांचे व्यापारी येणार आहेत. बघ, याही वेळेला तू जाऊन छान सौदा करशील?" असं म्हणून व्यापाऱ्याने एक मोठी रक्कम त्याच्या हवाली केली.

धोकेबाजाला पाहिजे होतं ते मिळालं. तो अशा संधीची वाटच पहात होता. पैसा हातात आल्या बरोबर धोकेबाजाने तेथून पळ काढला. या नंतर धोकेबाज एका दुसऱ्या गावात गेला. तिथे एका श्रीमंत कवीच्या आश्रयाला जाऊन राहिला. एक दिवशी बोलण्याच्या ओघात कवीबद्दल सहानुभूति प्रकट करीत तो म्हणाला–"आपण तर एक महान कवि आहात. पण आपल्या प्रतिभेला साजेल असं यश आपल्याला मात्र मिळालं नाही. राज-दरबारी आपणास भरपूर यश मिळेल असा एक उपाय माझ्या जवळ आहे."

"कोणता बरं तो?" उत्कण्ठेने कवीने विचारले.

धोकेबाजाने उत्तर दिलं–"आपण, जर थोडे पैसे खर्चायला मागे-पुढे पाहणार नसाल, तर आपला एक अभिनन्दन



वसंत झोपाडे

समारोह मोठ्या थाटात मी साजरा करीन आणि सर्वत्र आपली कीर्ति पसरेल."

कवीने त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून त्याला बरेच पैसे दिले. धोकेबाजाने काही भोळ्या लोकांकडून वर्गणी वसूल केली आणि सर्व पैसे घेऊन तो राजधानीत पोचला. पण दुर्दैव असं की या वेळी तो राजाच्या सेवकांच्या तावडीत सापडला.

राजाने न्याय करून धोकेबाजाला तुरुंगवासाची कठोर शिक्षा ठोठावली. यावर दरबारांतील सर्व लोकांनी टाळ्या वाजवून आनंद व्यक्त केला. पण दरबारात हजर असलेला पोपट मात्र मौन होऊन राहिला. राजाने दिलेला न्याय पोपटाला पसंत पडला नाही. हा न्याय एकांगी झाला असावा. सर्व गुन्हेगारांना शिक्षा व्हायला हवी.

हे लक्षात आल्यावर राजाने अमळ गंभीरपणे विचार केला आणि तक्रार करणाऱ्या दोघांना ही सौम्य शिक्षा सुनावली. त्या बरोबर "शाबास!" म्हणून पोपट उडून गेला.

व्यापारी व कवी एका सुरात म्हणाले– "महाराज, हा तर आमच्यावर अन्याय आहे! धोकेबाजाने आम्हाला धोका दिला नि आम्ही फसलो."

व्यापाऱ्याकडे पाहून राजा म्हणाला– "तुला माहीत होतं की सुगंधी द्रव्यां वर तुला जो फायदा मिळाला, तो योग्य नव्हता. तरी तू लोभाला बळी पडलास ही तुझी चूक नाही का?"

मग कवीकडे दृष्टि वळवून राजा म्हणाला– "आपल्या योग्यतेहून अधिक यश मिळविण्याचा तू प्रयत्न केलास ही तुझी चूक!"

दोघांनी ही शर्मिंदा होऊन माना खाली घातल्या. राजाने आपल्याला शिक्षा दिली तो योग्यच आहे. आपण लोभाला बळी पडलो म्हणून धोकेबाजाला आपणास धोका देण्याची संधि मिळाली. आता त्यांच्या लक्षात आलं की ज्यांच्यात कसली ही कमजोरी नसते, त्यांना धोकेबाज धोका देऊ शकणार नाही!





# ज्ञानाचा खजिना

## ती कोण?

एक यायावर साधू एका घरी अतिथि म्हणून पोचला. त्या घरातली मालकीण व तिची मुलगी साधुला पाहून फारच आनन्दित झाल्या. मोठ्या श्रद्धा व भक्तीने त्यांनी साधूचे स्वागत केले. दोघींच्या आदरातिथ्यावर प्रसन्न होऊन साधूने काही दिवस तेथेच वास्तव्य केले. या काळात मुलीने साधूची रात्रंदिवस सेवा केली व त्याच्या पायाशी बसून त्याच्या तोंडून श्रीकृष्णाच्या बाललीलांचे रसाळ वर्णन ही मोठ्या आवडीने व भक्तीने ऐकले. साधू जवळ श्रीकृष्णाची एक छोटीसी मूर्ति होती. या मूर्तिवर मुग्ध होऊन ही कन्या तिच्यासमोर नाचू व गाऊ लागली.

एका दिवशी भल्या सकाळीच उठून साधू ते घर सोडून निघून गेला. झोपेतून उठल्यावर ती साधू व त्याबरोबरच ती प्राणप्रिय मूर्ति आपल्या घरात नाही असे पाहून ती मुलगी दुःखाने व्याकुळ झाली! 'मूर्ति पाहिल्याशिवाय मी पाणीसुद्धा पिणार नाही' असा तिने हट्टच धरला. तिचे सान्त्वन कोण करू शकणार?

ती रात्र घालवण्यासाठी साधू वाटेत एका मंदिरात झोपला. स्वप्नात त्याला आपल्या जवळील मूर्तिसाठी रडणारी ती मुलगी दिसली. त्याला असे भासले की मूर्तीत वास करणाऱ्या देवाचीही त्या मुलीकडेच जायची इच्छा आहे. साधु तावडतोब त्या घरी परतला व त्याने ती मूर्ति मुलीला देऊन टाकली.

ही कोण, माहीत आहे तुम्हाला?

[पान ३६ पहा]

## तुम्हाला माहीत आहे?

१. सध्या ब्रिटिश राजपरिवाराच्या ताब्यात असणारे, प्राचीन भारतातले सुप्रसिद्ध रत्न कोणते?
२. मुघलांच्या आक्रमणापासून अनेक वर्षे अहमदनगरचे रक्षण करणारी स्त्री कोण?
३. स्वतन्त्र भारतात सर्वात शेवटी विलीन होणारा, परकीय अधिकाराखालील प्रान्त कोणता?
४. जगातील सर्वात छोटा उंदीर कोणता व कोठे आहे?
५. त्याचे वजन किती असते?
६. सर्वांत जास्त हानि करणारा भूकंप केव्हा व कोठे झाला होता?

[पान ३६ पहा]

## दण्डकारण




दण्डकारण्य आपल्या अनेक पौराणिक व ऐतिहासिक घटनांचे कार्यक्षेत्र व साक्षीदार म्हणून उभे आहे. प्राचीन काळापासून अनेक महामुनि व साधु यांनी येथे निवास केला. दंडकारण्यात राक्षसही रहात असत, असे म्हटले जाते. सीता, राम व लक्ष्मण यांनीही काही काळ येथे वास्तव्य केले होते.

दण्डकारण्याच्या एका बाजूने गोदावरी वहाते, तर दुसऱ्या बाजूने नर्मदा. मत्स्य-कुंड, इन्द्रावती, वंशधारा, नागावली, तमसा इ. नद्याही याच महारण्यातून वहातात. दण्डकारण्य हे आजच्या मध्य-प्रदेश, ओरिसा, महाराष्ट्र व आन्ध्र प्रदेश यांनी व्यापलेले आहे.

प्राचीन काळी दण्डक नावाचा एक राजा या अरण्यात संचार करीत असे. त्यावेळी त्याला अरज नावाची एक लावण्यवती ऋषिकन्या दिसली व त्याने तिला जबरदस्तीने आपणाबरोबर नेण्याचा प्रयत्न केला. परन्तु आपली सुटका करून घेऊन तिने या अपमानाची हकिकत आपला पिता शुक्र याला सांगितली. शुक्राने रागाने असा शाप दिला कि 'दण्डकाची राजधानी जळून भस्म होईल.' असे म्हणतात की, दुसऱ्याच क्षणी ते नगर जळून भस्म झाले! कालान्तराने तेथे एक जंगल उगवले. या प्रदेशावर दण्डकाने राज्य केले होते म्हणून त्याचे नाव 'दण्डकारण्य' असे पडले.

दण्डकारण्य आज वनसंपदेचे आगर बनलेले आहे. आपल्या देशाचे हवामान संतुलित ठेवण्यात दण्डकारण्याचा मोठाच वाटा आहे.

परन्तु जंगल तोडणाऱ्यांच्या अत्यधिक संख्येमुळे इथले जंगल नष्ट होत आहे. याचा परिणाम पर्जन्यमानावर ही झाल्या-शिवाय रहात नाही. पूर्व-घाट म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या या अरण्यातील पहाडांचीही त्यामुळे मोठी हानि होत आहे.

### टाइपराईटिंग चॅंपियन

हिमाचल प्रदेशातील सोलन जिल्ह्यातील चियान गावचे रहिवासी राजेन्द्रसिंह नामक दंतवैद्याचे वय ४५ वर्षे आहे. टाइपराइटिंग-कलेत ते तिसऱ्यांदा विश्व-चॅंपियन म्हणून निवडले गेले.

ड्रेस्टन मध्ये योजलेल्या अठराव्या विश्व-चॅंपियन स्पर्धेत त्यांनी भाग घेतला. आपल्या जन्मापूर्वी पाच वर्षे निर्मिलेल्या रेमिंग्टन टाइपरायटर वर दर मिनिटाला ४९९ अक्षरे टाइप करून राजेन्द्रसिंहाने सुवर्ण-पदक मिळविले.



## चन्दामामच्या बातम्या



### पांढऱ्या वाघाचा बच्चा

कलकत्यातील अलीपुरच्या प्राणी-संग्रहाल्यात नुकत्याच जन्मलेला पांढऱ्या वाघाचा बच्चा व त्याची आई 'हिमाद्रि जूनियर' यांना प्रेक्षकांनी पाहण्यासाठी दोन तास ठेवण्यात आले. अंगावर काळे पट्टे असलेल्या या सुंदर शावकाचा जन्म ३ मे रोजी झाला. जन्म झाल्या-वर तीन वेळा उन्हाचे सेवन करणारा हा बच्चा पिंजऱ्यात इकडे-तिकडे हिंडू लागला आहे. याला नित्य आपल्या आईच्या सहवासात ठेवण्यात आले आहे. आईला ही त्याला सोडून राहणे आवडत नाही.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. रॉबिन्सन क्रूसोचा नमुना म्हणून गाजलेला माणूस कोण?
२. इंग्रजी कादंबरीकार जॉर्ज इलियट याचे खरे नाव काय?
३. विशाल असे ग्रंथसंग्रहालय असणारे प्राचीन विश्वविद्यालय कोणते?
४. चन्द्रगुप्त मौर्यची कथा सांगणारे संस्कृत नाटक कोणते?
५. प्लेटोने रचलेल्या उत्कृष्ट ग्रंथाचे नाव काय?
६. प्लेटो कोणत्या काळात होऊन गेला?

## उत्तरावली

**तो कोण?**

भक्त कवयित्री मीराबाई

**तुम्हाला माहीत आहे?**

१. कोहिनूर हिरा
२. चांदबीबी
३. गोवा
४. इटलीत सापडणारा एट्रुस्कान उंदीर
५. एक औंसाचा दहावा हिस्सा
६. इ. स. ७४२ मध्ये. या भूकंपाने इजिप्त, पॅलेस्टाइन, सीरिया मधील जवळ जवळ ३०० शहरे उध्वस्त केली.

**साहित्य**

१. अलेक्झांडर सेलकर्क
२. मेरियन इव्हान्स
३. नालन्दा विश्वविद्यालय
४. विशाखदत्तरचित 'मुद्राराक्षस'
५. दि रिपब्लिक
६. इ. स. पू. ५ ते ४ या शताब्दीत



## नेहरूंची गोष्ट-१०

तुरुंगातून सुटका होताच पं. नेहरू आपल्या आजारी वडिलांना भेटण्यासाठी मसूरीला गेले. वडिलांची प्रकृति थोडी सुधारल्यावर दोघे ही अलाहाबादला परत आले. एक दिवशी संध्याकाळी नेहरूंनी शेतकऱ्यांच्या एका विराट जमावा पुढे भाषण दिले.

व्याख्यान संपल्यावर पं. नेहरू आपल्या पत्नी सह उद्विग्न अंतःकरणाने आपल्या वडिलांना भेटण्यासाठी घरी जायला निघाले. ते आपल्या घराच्या दरवाज्यापाशी पोचत होते, इतक्यात पोलिसांनी त्यांना कैद करून तुरुंगात डांबले.





कमला नेहरू एकटीच घरात गेली आणि अचानक घडलेली घटना आपल्या सासऱ्यांना सांगितली. ही बातमी ऐकून पं. मोतीलाल फार निराश झाले. शांतपणे त्यांनी एक निर्णय घेतला.



पं. मोतीलाल झटकन उठून बसले. मुठीने टेबलावर दोनदा प्रहार केला आणि म्हणाले–"असा बिछान्यावर पडून मी हा अन्याय व अत्याचार मुळीच सहन करणार नाही!" त्यांचे शरीर दुबळे झाले असले तरी मन मात्र सशक्त होते.

याच संदर्भात काँग्रेसच्या नेत्यांनी सर्वत्र सभा आयोजित केल्या. ब्रिटिश सरकारने पं. जवाहरलाल यांना कैद केल्याबद्दल विरोध दाखविण्यासाठी पं. मोतीलालजींनी जे भाषण तयार केले होते, ते या सभांतून जनते पुढे वाचून दाखविण्यात आले. असल्या सभा मोडून टाकण्यासाठी पोलिसांनी ठिक-ठिकाणी लाठी-मार केला.





या आंदोलनात सामिल झालेल्या लोकांना दहशत बसावी म्हणून सरकारने त्यांना केवळ कैद न करता त्यांच्यावर चाबकाचे फटकारे मारले. ही घटना केवळ अपमानास्पद असे नव्हे, तर शारीरिक दृष्ट्या ही अतिशय पीडादायक सिद्ध झाली.

चाबकाने मारण्याच्या धोरणाचा विरोध करण्यासाठी पं. जवाहरलाल यांनी तुरुंगात आपल्या सहकाऱ्यां सह चार दिवस अन्न-सत्याग्रह केला. या घटनेमुळे सरकारची जंगली वृत्ति जनतेला चांगली कळून चुकली.





पं. जवाहरलाल यांच्या पावलावर पाऊल ठेवून श्रीमती कमला नेहरू यांनी पण काँग्रेसच्या कार्यक्रमात हिरिरीने भाग घेतला आणि तुरुंगवा-साची शिक्षा भोगली. त्या तेव्हां म्हणाल्या होत्या–"आपल्या पतींनी दाखविलेल्या मार्गावर चालताना मला अत्यन्त आनन्द वाटतो. या लढाईत भारतीय जनता यशस्वी होईल असा मला विश्वास वाटतो."

या दरम्यान पं. मोतीलालजींची तब्येत फारच बिघडली. पं. जवाहरलाल नि श्रीमती कमला नेहरू यांची तुरुंगातून सुटका झाली. अन्य अनेक प्रमुख व्यक्तीं बरोबर नेहरू पति-पत्नी ही पं. मोतीलाल यांना पाहण्यासाठी आले. तेव्हां म. गांधी ही तेथे पोंचलेले होते.





गांधीजीं कडे पाहून पं. मोतीलाल म्हणाले–"महात्माजी, मी लवकरच आपणा सर्वांचा निरोप घेणार. आपल्या देशाचे स्वातंत्र्य काही मी पाहू शकणार नाही. आपण सर्व जण आपला देश गुलामगिरीतून मुक्त करणार. आपल्याला स्वातंत्र्य नक्की मिळणार हे मी जाणतो." यावर गांधींनी अत्यंत प्रेम भावानें त्यांना सांत्वना दिली.

पं. मोतीलाल यांची प्रकृति चांगली करण्यासाठी श्री. एम्. ए. अन्सारी, श्री. बिधनचन्द्र रॉय, श्री. जीवराज मेहता इ. प्रसिद्ध डॉक्टरांनी (हे सर्व जण त्या वेळचे प्रसिद्ध पुढारी होते.) सर्वतोपरि प्रयत्न केला, पण कुणाला ही यश मिळालं नाही. शेवटी ६ फेब्रुवारी १९३१ रोजी पं. मोतीलाल यांचे निधन झाले. मोतीलालजींच्या शेवटच्या क्षणी त्यांच्या जवळ पं. जवाहरलाल आणि त्यांची आई उपस्थित होती.





अलाहाबाद जवळ गंगा नदीच्या किनाऱ्यावर पं. मोतीलाल नेहरूंच्या पार्थिव शरीराचा दहन-संस्कार झाला. पं. जवाहरलालजींनी या बाबतीत लिहिलं होतं–"गंगेच्या तीरी संध्याकाळच्या वेळी लाखो भारतवासीयांचे आत्मीय बनलेले मोतीलाल यांच्या भौतिक शरीराला अग्निज्वाळांनी भस्म केले." (क्रमशः)



# मला न्याय पाहिजे !

कन्हैयालाल गावातला सर्वात श्रीमंत माणूस होता. एकदा गावातल्या एका बोळातून तो जात होता, तेव्हा रस्त्यावर चार मुलं विटी-दांडूचा खेळ खेळत होती. त्यांच्या पैकी एकाने असा दांडू मारला की विटी कन्हैयालालच्या डोक्यावर जाऊन आपटली. कन्हैयालालला त्या मुलाचा भयंकर राग आला. नि तो त्याला मारायला धावला. पण मुलगा चलाखीने पळून गेला.

बाकीच्या तीन मुलांना कन्हैयालालने विचारले–"तो मुलगा कोण होता?"

"दुरड्या विणणाऱ्या करमचन्दचा तो मुलगा!" एका मुलाने माहिती पुरवली.

कन्हैयालाल घरी गेला आणि त्याने करमचन्दला बोलवून घेतलं. करमचन्द आल्या बरोबर कन्हैयालालने हुकूम सोडला–"तुझ्या मुलाने मला विटीने मारले, आण त्याला इथे बोलावून!"

अमळ चिडून करमचन्द म्हणाला–"त्याने आपल्याला मारलं, याबाबत काय पुरावा आहे तुमच्या जवळ? तुम्हाला न्यायच पाहिजे असेल तर न्यायाधीशाकडे जाऊन तक्रार करा." असं म्हणून करमचन्द तेथून निघून गेला.

एका गरीब माणसाने श्रीमंताला असं सुनवावं हे कन्हैयालालला सहन झालं नाही. तो तावडतोब न्यायाधीशाकडे तक्रार करायला निघाला. रस्त्यात त्याला शांतिभूषण भेटला.

कन्हैयालालने शांतिभूषणला सर्व हकीगत सांगितली. शांतिभूषण हसून म्हणाला–"म्हण आहे, 'आपलाच राग आपला शत्रु असतो.' एका लहान मुलाने थोडी चूक केली, तर असे नाराज का होताय?"

कन्हैयालाल रागाने लाल होऊन म्हणाला–"छान, आपण हा सल्ला देताय

हो मला? तुमच्या सारखी चार-पाच माणसं गावात असली तर श्रीमंताची अब्रू नक्कीच चव्हाट्यावर येणार!"

"तर मग तुम्ही न्यायाधीशाकडेच जा. तेच तुम्हाला योग्य तो न्याय देतील!" शांतिभूषणने सांगितलं.

कन्हैयालालने न्यायाधीशाकडे जाऊन आपली तक्रार मांडली. न्यायाधीश हंसून म्हणाला—"तुम्ही उगाच राईचा पर्वत करीत आहात. छोट्या मुलावर काय एवढं रागवायचं? जे ऐकतील ते हंसतील!"

"मी तुमचा उपदेश ऐकायला आलेलो नाही. मी न्याय मिळविण्यासाठी आलो आहे, समजलं?" कन्हैयालाल रागाने म्हणाला.

न्यायाधिशाने सांगितलं—"असल्या गोष्टी माझ्यापर्यंत येऊ नयेत. आपल्या गावात शांतिभूषण आहेत, त्यांचा सल्ला घ्या या बाबतीत!"

"त्यांनी मला न्याय देण्याऐवजी उपदेश दिला! मला न्याय पाहिजे आहे" कन्हैयालालने आवर्जून सांगितलं.

न्यायाधीशाने सल्ला दिला—"असं होय? मी सांगितलं तर शांतिभूषण आपल्याला न्याय देतील. त्यांनी न्याय न दिला तर मग मी पाहीन." त्यांनी लगेच शांतिभूषणला बोलवून विचारले—"आपण कन्हैयालालला न्याय नाही का देऊ शकणार? आपण त्याला योग्य तो न्याय दिलात तर विचाऱ्याला खूप समाधान मिळेल!"



"का नाही? कन्हैयालाल तर माझे मित्र आहेत. त्यांचं हित कशात आहे हे मी जाणतो. एवढ्याशा गोष्टीसाठी त्यांनी हट्ट धरला तर त्यांचाच अपमान होईल निश्चित!" शांतिभूषणने उत्तर दिलं

"एका लहान मुलाविरुद्ध मी न्याय मागत आहे असं लोक म्हणाले तर त्यात कसला अपमान? मला तर न्याय पाहिजे, बस!" कन्हैयालालने आपल्या म्हणण्यावर जोर दिला.

शांतिभूषणने आपली योजना सांगितली—"तर मग पुन्हा विटी-दांडूचा खेळ खेळला जाऊ द्या. कन्हैयालालने बरोबर नेम धरून दुरून येणाऱ्या करमचन्दच्या मुलावर विटी मारावी. असंच करणं अधिक न्यायाचं होईल."

आता कन्हैयालालला खूप आनन्द झाला. त्याने विचारले—"हे सर्व ठीक आहे. पण मी दांडूने विटी मारली अन् तो पळून गेला तर...!"

"त्याने पळून जाऊ नये म्हणून दोन माणसं त्याला घट्ट पकडून ठेवतील. पण अट अशी की आपली विटी फक्त करमचन्दच्या मुलावरच पडली पाहिजे. दुसऱ्या कोणावर पडता कामा नये.' शांतिभूषणने अट सांगितली.

"अं हं! न हलता त्याने उभे रहावे हेच अधिक न्यायाचं होईल." कन्हैयालाल म्हणाला.

शांतिभूषणने शंका प्रदर्शित केली—"पण करमचन्दच्या मुलाने ही अट मान्य केली



तरच हा न्याय होऊं शकेल. लहान मुलगा आहे. भिऊन पळून गेला तर काय करता येईल?"

दुसऱ्या दिवशी विटी दांडूचा खेळ खेळायचं ठरलं. ही विचित्र शिक्षा पाहण्यासाठी गावातले सगळे लोक जमा झाले. विशेष गोष्ट म्हणजे अशी की करमचन्दच्या मुलाने ही अट मान्य केली. त्याला कोणी धरून ठेवण्याची आवश्यकता नाही, तो पळून न जाता तेथे व्यवस्थित उभा राहीला.

आता गलीवर विटी ठेऊन कन्हैयालालने दांडूने फटकारा मारला. पण त्याचा नेम चुकला. त्याला तीनदा संधि देण्यात आली. कन्हैयालाल करमचन्दाच्या मुलाला एकदा ही मारू शकला नाही.

शांतिभूषण हंसत म्हणाला–"आता शिक्षा पूर्ण झाली. संधि देऊन ही आपण मुलाला शिक्षा देऊ शकला नाहीत!"

शांतिभूषणचा निर्णय ऐकून जमलेली सर्व मंडळी खो-खो हंसू लागली. शांतिभूषणने करमचन्दाच्या मुलाला बोलवून विचारलं–"अरे, तू तर मोठचा हिंमतीन जरा ही हालचाल न करता उभा राहिलास, तुझ्या हिंमतीचं मोठं कौतुक वाटलं बघ मला! पण असा हिंमतवान मुलगा तू, त्या दिवशी कन्हैयालालने तुझा पाठलाग केला तेव्हा पळून का गेलास?"

यावर करमचन्दच्या मुलाने उत्तर दिले–"त्या दिवशी जर मी त्यांच्या तावडीत सापडलो असतो, तर मला चांगलाच मार खावा लागला असता! पण आजची गोष्ट वेगळी आहे. माझे वडील नि कन्हैयालाल लहानपणी विटी-दांडू खेळत असत. वडिलांनी सांगितलं की कन्हैयालाल कधी ही नेमका टोला मारू शकत नसत. म्हणून मी हिंमतीनं उभा राहिलो."

हे सगळं ऐकून जमलेले लोक जोरात हंसू लागले. शर्मिन्दा होऊन कन्हैयालालने आपली मान झुकवली. नंतर पुन्हा कधी कन्हैयालालने छोटचा गोष्टीसाठी न्यायाची मागणी केली नाही.






बाणासुराचा रथ एक हजार हात लांबीचा होता. त्याला एक हजार घोडे जुंपलेले होते. रथावर अस्वलाचे कातडे आंथरलेले होते. रथ एक लाल ध्वज आणि मयूर पताका यांनी सुशोभित होता. रथात गदा, धनुष्य-बाण, तलवारी इत्यादि शस्त्रास्त्रं भरलेली होती. कुंभाण्डला आपला सारथी बनवून बाणासुर अनिरुद्धाशी लढण्यासाठी निघाला. हे पाहून त्याचे सर्व सेनापति उत्साहित झाले आणि आपलं सैन्य बाणासुराच्या रथाच्या पुढे व मागे ठेवून चालू लागले.

आपल्यावर आक्रमण करण्यासाठी येत असलेला बाणासुर, त्याची विविध शस्त्रास्त्रे व प्रचंड सैन्य हे सर्व अनिरुद्धाने दुरूनच पाहिले. पण त्याने या लवाजम्याची जरा ही पर्वा केली नाही. तो सरळ बाणासुराच्या रथाच्या दिशेने निघाला.

एक साधारण माणूस काही विशेष आयुधे जवळ न बाळगता साहसपूर्वक आपणाशी लढण्यासाठी येताना पाहून बाणासुराला फारच आश्चर्य वाटलं! त्याने गरजून आपल्या राक्षस सैनिकांना आज्ञा दिली–"तुम्ही पहात काय बसलात बघ्यासारखे? त्याला पकडा आणि मारून टाका." आणि बाणासुराने अनिरुद्धावर बाणांचा वर्षाव करायला प्रारंभ केला.

अनिरुद्धाच्या हाती फक्त एक तलवार होती. तरी ही त्याने शत्रूच्या बाणांची पर्वा न करता त्याच्याशी लढायला आलेल्या

२६. बाणासुर व अनिरुद्ध यांचे युद्ध



राक्षसांना ढकलून दिलं आणि तो बाणासुराच्या रथाजवळ येऊन पोचला. अनिरुद्धाचं हे साहस पाहून सर्वांनाच मोठे आश्चर्य वाटले!

रथाजवळ येऊन अनिरुद्धाने रथाला जुंपलेल्या घोड्यांना ठार मारायला सुरुवात केली. रक्ताच्या नद्या वाहू लागल्या. एवढ्यात बाणासुराने अनिरुद्धा विरुद्ध अनेक शस्त्रास्त्रांचा उपयोग केला. आता राक्षसांना वाटलं की अनिरुद्ध मेला. पण तो मेला नव्हता, अधिक पुढे येऊ शकला नव्हता इतकंच!

एवढ्यात बाणासुराने अनिरुद्धावर महाशक्तीचा वापर केला. पण अनिरुद्धाने तिला आपल्या हातात घट्ट पकडून ठेवलं आणि आपली सर्व शक्ति पणाला लावून तिला बाणासुराच्या दिशेने परतवले. ती महाशक्ति बाणासुराच्या छातीत घुसून पाठीच्या बाजूने बाहेर पडली आणि पृथ्वीच्या पोटात अंतर्धान झाली. बाणासुर बेशुद्ध झाला. त्याने ध्वज-स्तम्भाला पकडलं नि खाली पडला.

सारथी कुंभाण्डने बाणाला शुद्धी वर आणलं नि समजाऊन सांगू लागला—"आपला शत्रु असामान्य पराक्रमी दिसतो आहे. सगळं जग त्याच्या वर तुटून पडलं तरी तो पर्वा करणार नाही असं वाटतं. त्याचा पराक्रम नि साहस पाहिलं ना आपण?"

"तू आता पहाच. गरुड जसा सापाला पकडतो, तसा मी या मूर्खाला बन्दी बनवतो!" असं म्हणून बाणासुर अदृश्य झाला आणि त्याने अनिरुद्धावर एक अद्भुत बाण सोडला. या बाणाच्या टोकावर कृष्णसर्प होता. त्याने अनिरुद्धाचे सर्व अवयव बांधून टाकून त्याला निश्चेष्ट बनवलं! आता तो कुंभाण्डला म्हणाला—"यौवनाच्या मदाने भारलेला हा दुष्ट युवक आता माझ्या तावडीत छान सांपडलाय? याचं डोकंच उडवून टाकू या. अन्यथा त्याने जो कलंक आमच्यावर लावलाय तो कसा नष्ट होईल?"





यावर कुंभाण्डने बाणाला समजावलं—"तुमचं म्हणणं ठीक आहे. पण त्यापूर्वी एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. या युवकाने गांधर्व पद्धतीने आपल्या उषेशी विवाह केलेला आहे. जर याला मृत्यु आला तर आपल्या उषेला किती दुःख होईल. तसेच आपल्याला हे ही कळलं पाहिजे की हा युवक आहे तरी कोण? कुठून आला? हा कोणी साधा माणूस तर खचित दिसत नाही. याचं सौंदर्य आणि आणि पराक्रम देवांना ही मागे टाकणारा आहे! आपणा सारख्या महा वीराशी हा अगदी निर्भयपणे लढला. आपल्या मुलीला याहून योग्य पति व याच्याहून तेजस्वी असा प्रतिद्वंद्वी आपणास मिळेल का? जरा विचार तर करून पहा."

कुंभाण्डच्या म्हणण्यात काही तथ्य आहे हे बाणासुराला आता पटलं. बाणाने त्याचे म्हणणे मान्य केले आणि काही योद्धयांना अनिरुद्धावर पहारा करण्यासाठी बसवून तो आपल्या महालात आला.

इकडे नारद अनिरुद्धाच्या जवळ आले आणि त्याला सान्त्वना दिली—"मी आता जाऊन श्रीकृष्णाला घेऊन येतो. ते आल्या-वर तुझ्यावरील सर्व संकटं दूर होतील." एवढं सांगून नारद तेथून निघून गेले.

अनिरुद्धाने डोके उचलून वर पाहिले. डोळ्यांत अश्रू आलेली उषा समोर खिडकीत दिसली. तो उषेला म्हणाला—"तुझ्या वडिलांनी समोरा-समोर तर युद्ध केले नाही, म्हणून मला मायाजालात अडकवून बंदी बनविले आहे. तरी पण काळजी करण्याचे काही कारण नाही. माझ्यावरील संकट दूर करायला श्रीकृष्ण समर्थ आहेत. त्यांनी आपल्या सुदर्शन-चक्राने अनेक राक्षसांचा संहार केलेला आहे. असं असताना माझा झालेला हा पराभव ते कसे सहन करतील? तू कसली ही चिंता करू नकोस. तुझ्या वडिलांचा शेवटचा दिवस जवळ आला आहे."



अनिरुद्धाने दुर्गा-स्तोत्राचा पाठ केला आणि देवी दुर्गेचे ध्यान केले. थोड्याच वेळात लोकेश्वरी दुर्गा प्रत्यक्ष अवतीर्ण झाली. तिच्या नेत्र-कटाक्षाने अनिरुद्ध बंधन-मुक्त झाला. तिने अनिरुद्धाला आश्वासन दिले–"लवकरच श्रीकृष्ण स्वतः येऊन बाणासुराशी युद्ध करतील. त्या युद्धात ते विजयी होऊन तुला आपल्या बरोबर घेऊन जातील. तुझे कल्याण होईल." इतके सांगून देवी दुर्गा अंतर्धान पावली.

मध्यंतरीच्या काळात इकडे द्वारकेत एकच गडबड उडाली. चित्ररेखा अनिरुद्धाला घेऊन गेल्यावर त्याच्या सर्व बायका शुद्धीवर आल्या. आणि आपला नवरा त्याना कोठे दिसेना. सर्व जणी आक्रोश करू लागल्या. अनिरुद्धाच्या महालात स्त्रियांचे आक्रंदन ऐकून सर्व यादव-प्रमुख आपल्या घरातून बाहेर आले. सभा-भवनात सर्वांना पाचारले गेले. ताबडतोब कृष्ण, बलराम इत्यादि सर्व मंडळी सभा-भवनात जमा झाली. अनिरुद्ध कोठे ही न दिसल्यामुळे सर्वांनाच अत्यन्त चिंता वाटू लागली. श्रीकृष्णाच्या डोळ्यांत ही अश्रू आले.

विकद्रु श्रीकृष्णाचे सान्त्वन करीत म्हणाला–"महाराज, आपल्या छत्र-छायेत यादव वंश नेहमीच सुरक्षित आहे. देवेन्द्र इन्द्र सुद्धा संरक्षणासाठी आपणाकडे धाव घेतो. असे असताना या क्षणी आपण जर व्याकुळ झालात तर आम्हाला किती दुःख होईल? आता आम्हाला धीर देण्याचं काम आपलं."

यावर श्रीकृष्णाने आपली मनो-व्यथा सांगितली–"मला एकाच गोष्टीची काळजी लागून राहिली आहे की जर अनिरुद्धाचा पत्ता लागला नाही, तर सर्व लोक मला काय म्हणतील? प्रद्युम्न जेव्हा छोटा बालक होता, तेव्हा एक राक्षस एकदा त्याला घेऊन गेला होता. प्रद्युम्नाने स्वतःच त्या राक्षसाचा वध केला नि तो सुरक्षितपणे परत आला. त्यामुळे माझी प्रतिष्ठा शाबुत राहिली. यावेळी ही असंच काही झालय असं दिसतं. माझ्या शत्रूंची ही काही तरी कारवाई दिसतीय! अनिरुद्ध नाहीसा होणं ही काही सामान्य घटना नाही. काही उपाय असला तर सांगा. म्हणजे मी जे शक्य असेल ते अवश्य करण्याचा प्रयत्न करीन."

यावर सात्यकीने सुचविले की अनिरुद्धाचा तपास करण्यासाठी सर्वत्र आपले लोक पाठविले पाहिजेत.

उग्रसेनाने सात्यकीच्या म्हणण्याला दुजोरा दिला. आणि रथावर आरूढ होऊन, घोड्यावर स्वार होऊन नि पायी अनेक सेवक अनिरुद्धाला शोधण्यासाठी पाठविण्यात आले.

अनादृष्टि नावाच्या एका सेनापतीने अमळ संकोचाने श्रीकृष्णाला निवेदन केले–"माझ्या मनात एक शंका येऊन राहिलीय! देवांनी अनेक वेळी आपली मदत घेतली आहे हे खरं. पण आपण जेव्हा पारिजात वृक्ष घेऊन आलात, तेव्हा इन्द्राशी झालेल्या युद्धात त्याचा पराभव झाला होता. तो अपमान त्याच्या मनात अजून सलत असणे शक्य आहे. तेव्हा देवेन्द्र इन्द्राने अनिरुद्धाचे अपहरण केले असावे अशी मला शंका वाटते."



हे ऐकून श्रीकृष्ण हसून म्हणाले–"देव कधी असलं काम करणार नाहीत. हे काम राक्षसांचच असलं पाहिजे. मी देवांच्या नेहमी उपयोगी पडत आलो, तेव्हा देव असं काम करणार नाहीत याबाबत मला खात्री आहे.

श्रीकृष्णाचं बोलणं ऐकून अक्रूर म्हणाला–"मला ही असंच वाटतंय. हे राक्षसांचच काम?"

"कोणत्या ही पुरुषाला अशा रीतीने अनिरुद्धाचे अपहरण करण्याची काय आवश्यकता? हे एखाद्या दुष्ट स्त्रीचे काम असले पाहिजे. राक्षस नि देव-लोकातील स्त्रियांना अनेक माया-विद्या माहीत असतात. केवळ संकल्पानेच त्यांचा प्रभाव होऊ शकतो. त्या कोणाला ही भय-भीत करू शकतात. हे सर्व जाणून आपल्याला



अनिरुद्धाचा शोध घेतला पाहिजे." श्रीकृष्णांनी आपला विचार सांगितला.

अशा रीतीने काही काळ गेला. अनिरुद्धाचा शोध घ्यायला गेलेले लोक अपयश पदरी घेऊन परत आले. कोठे ही अनिरुद्धाचा सुगावा लागला नाही.

दुसऱ्या दिवशी श्रीकृष्ण सभा-भवनात आले. उग्रसेन वगैरे प्रमुख यादव मंडळी उपस्थित होतीच. अशा वेळी नारद तेथे येऊन पोचले. सर्वांनी नारदाचा यथोचित सत्कार केला. नारदांनी सर्वांकडे निरखून पहात विचारले–" काय झालं? तुम्हा सर्वांना काही चिन्ता लागून राहिली आहे असं वाटतंय! कसल्या काळजीत आहात?"

श्रीकृष्णाने उत्तर दिलं–"काय सांगायचं? गेले काही दिवस अनिरुद्ध दिसत नाही. आम्ही सर्वांनी त्याचा खूप शोध केला, पण व्यर्थ! कशाचा काही उपयोग झाला नाही."

नारद म्हणाले–" तर मग आता ऐका. तशी मी अनेक युद्धे पाहिलेली आहेत. पण आपला अनिरुद्ध नि बाणासुर यांचे जे युद्ध मी पाहिले, ते केवळ अद्भुत व अपूर्व म्हटले पाहिजे – त्याचं असं झालं की बाणासुराची मुलगी उषा हिचं अनिरुद्धावर प्रेम बसलं. तिने आपली सखी चित्ररेखा हिला अनिरुद्धाकडे पाठवलं. तिने अनिरुद्धाला उषेकडे पोचवलं. ही वार्ता बाणासुराला कळताच तो अनिरुद्धाशी युद्ध करायला आला. अनिरुद्धाने त्याचा पराभव केला तर खरा, पण शेवटी त्याने माया-युद्ध करून सर्प-बाणांनी अनिरुद्धाला बंदी बनवून ठेवलंय. म्हणून आता आपण स्वत: जाऊन बाणासुराला चांगला धडा शिकवावा. बाणासुराची राजधानी शोणपुर इथून बरीच दूर आहे. म्हणून आपण गरुडावर स्वार होऊन चलावे. मी हीच बातमी आपणास देण्यासाठी आलो. आता मला आज्ञा द्यावी." असं म्हणून नारद तेथून निघून गेले.

यानंतर श्रीकृष्णाने गरुडाचे स्मरण केले. ताबडतोब गरुड त्यांच्या समोर येऊन

पोंचला. तत्काळ श्रीकृष्ण, बलराम व प्रद्युम्न गरुडावर आरूढ झाले. ते जेव्हा शोणपुर जवळ आले तेव्हां त्यांना समोर एक अद्‌भुत प्रकाश दिसला.

बलरामाने विचारले–"श्रीकृष्णा, हा प्रकाश कसला?"

"आपण आता बाणासुराच्या राजधानी जवळ पोचत आहोत. शिवजींनी या नगरीच्या संरक्षणासाठी अग्नीची नियुक्ति केलेली आहे. आता आपल्या समोर जो अग्नि आहे, त्याचं नाव अहवनी आहे. आता गरुड स्वतःच त्याचा प्रभाव पाहील.' श्रीकृष्णाने बलरामाला समजाऊन सांगितलं.

श्रीकृष्णाच्या तोंडून हे शब्द बाहेर पडण्याचाच अवकाश होता की गरुडाने आकाश-गंगेतील पाणी घेऊन त्या अग्नी वर टाकलं आणि तो विझवला. गरुडाच्या या कृत्याबद्दल श्रीकृष्णाने त्याची प्रशंसा केली.

गरुड थोडा पुढे निघाला, तेव्हा शिवाने नियुक्त केलेल्या अन्य अग्नींनी प्रचंड सिंहनाद केला. तो ऐकून बाणासुराने युद्धाची तयारी सुरू केली.

दरम्यान अंगीरस नावाच्या अग्नीने ज्योतिष्टोम व रथाविभांग नावाच्या अग्नींना आपल्या पाठीवर घेऊन अन्य अग्नींचे ही साह्य घेतले, आणि श्रीकृष्णाला युद्धासाठी ललकारलं.

श्रीकृष्णाने अंगीरसाला आवाहन केलं–"हे अंगीरस, मुनींनी समर्पित केलेल्या आहुति भक्षण करून धष्ट-पुष्ट झालेला तू गर्वाने माझ्याशी लढायला येतोस? दूर हो माझ्या समोरून."

यावर रागाने लाल-बुंद होऊन अंगीरस म्हणाला–"आता या अस्त्राने मी तुझे प्राण घेणार!" असं म्हणून अंगीरसाने श्रीकृष्णा-वर एक शूल फेकला. कृष्णाने आपल्या बाणाने तो मधेच नष्ट करून टाकला. दुसरा बाण अंगीरसाच्या छाती वर सोडला. अंगीरस रक्तबंबाळ होऊन रथातच बेशुद्ध होऊन पडला. हे पाहून बाकी सर्व अग्नी सैरा वैरा पळून गेले.





# पतीची निवड

शिवपुरी मध्ये रामनाथ नावाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. त्याला एकुलती एक मुलगी होती–लक्ष्मी. ती फार सुंदर होती. लक्ष्मी जेव्हां उपवर झाली तेव्हा रामनाथ तिच्यासाठी योग्य स्थळ पाहू लागला. अनेक तरुणांनी लक्ष्मी सह विवाह करण्याची तयारी दाखविली. पण रामनाथ आणि त्याच्या बायकोला आपल्या मुलीसाठी चांगलं श्रीमंत स्थळ पाहिजे होतं. श्रीमंतीत त्यांच्याशी बरोबरी करणारं स्थळ पाहिजे होतं. लक्ष्मीची इच्छा होती की आपला नवरा चांगला सुशिक्षित असावा. थोडा कमी सधन असला तरी चालेल.

शिवपुरीच्या शेजारी असलेल्या गंगा-पुरचा जमीनदार विक्रमसिंह याला ही एकच मुलगा होता. जमीनदार स्वतः रामनाथच्या घरी आला आणि लक्ष्मीला मागणी घातली. तसेच गावचे प्रमुख जवा-हिरे कनकदास यांनी ही आपल्या थोरल्या मुलाचा विवाह लक्ष्मीशी व्हावा अशी आपली इच्छा प्रकट केली. शिवपुरीतील एका मोठ्या शाळेत धर्मनन्द नावाचे प्रसिद्ध शिक्षक होते. त्यांना विद्याधर नावाचा एक मुलगा होता. तो चांगला सुशिक्षित तरुण होता. त्याने शेती व व्यापार यांवरील विविध प्रमुख ग्रंथांचे चांगले अध्ययन केले होते. त्याच्याशी विवाह करावा असे लक्ष्मीच्या मनात होते, पण तिच्या आई-वडिलांचा त्याला विरोध होता.

लक्ष्मीच्या आई-वडिलांनी तिला सम-जाऊन सांगितलं–"बेटा, केवळ एक गोष्ट सोडली तर बाकी सर्व बाबतीत विद्याधर आम्हाला पसंत आहे. पण तीच गोष्ट तर सर्वात प्रमुख आहे. त्याच्याजवळ संपत्ति नाही असंच म्हटलं पाहिजे."

संगीता बाळ



यावर लक्ष्मी म्हणाली–"तुम्ही जे म्हणता ते सर्व खरं ही असू शकेल. पण माझी एक इच्छा आपण पुरी कराल? जमीनदार, व्यापारी नि शिक्षक या तिघांच्या मुलांना एकदा आपल्या घरीं बोलवा. एकेकाला स्वतंत्रपणे मी सांगते ते प्रश्न विचारा. त्यांची उत्तरे ऐकून माझ्यासाठी योग्य वर कोणता हे तुम्हीच ठरवा." यानंतर त्या युवकांना विचारण्याचे प्रश्न ही लक्ष्मीने वडिलांना सांगितले.

आपल्या मुलीच्या इच्छेप्रमाणे रामनाथने तिन्ही तरुणांना आपल्या घरीं येण्याचे निमंत्रण दिले. सर्वात अगोदर जमीनदाराच्या मुलाला आपल्या खोलीत बोलवून बायको व मुलीच्या देखत त्याला प्रश्न विचारला–

"बेटा, आपल्या जमीनदारीतील सर्व कामे यशस्वीपणे तू करू शकतोस? की या सर्व कामात तुला कोणावर अवलंबून रहावे लागते?"

"सगळ्या कामांची माहिती मला कशाला असायला पाहिजे? सगळी कामं पाहण्यासाठी आमचे दिवाणजी आणि अनेक नोकर आहेतच की नाही?" जमीनदाराच्या मुलाने पटकन उत्तर दिले.

"धर्मनन्दांचा मुलगा विद्याधर तुला माहितच आहे. जर लक्ष्मीने तुझ्याशी लग्न केले तर त्याने जसे अनेक ग्रंथांचे अध्ययन करून ज्ञान मिळविले आहे, तसे तू करू शकशील?" रामनाथने पुढील प्रश्न विचारला.

"ते कसं बरं शक्य होईल?" जमीनदाराच्या मुलाने आश्चर्याने विचारले.

नंतर रामनाथने जव्हेरी कनकदासाच्या मुलाला बोलवून तेच प्रश्न विचारले. त्याने ही जमीनदाराच्या मुला सारखीच काहीशी उत्तरे दिली

शेवटी रामनाथने विद्याधरला बोलवलं आणि विचारलं–"जमीनदार विक्रमसिंह आणि जव्हेरी कनकदास यांना तू ओळखतोसच. माझ्या मुलीने जर तुझ्याशी लग्न केले तर त्यांच्यासारखी संपत्ति तू मिळवू शकशील?"

विद्याधर हंसून म्हणाला–"त्यात काय मोठंसं? त्यांच्या इतकी संपत्ति तर मी लवकरच मिळवू शकेन!"

"ते कसं शक्य होईल तुला?" आश्चर्याने रामनाथने विचारले.

विद्याधरने उत्तर दिले–"संपत्ति आणि मान-मरातब याबाबतीत आपण जमीनदार व जव्हेरी यांच्या बरोबर आहात ना? आपला होणारा जावई त्यांच्यासारखा श्रीमंत असावा हीच आपली इच्छा! लक्ष्मी आपली एकुलती एक मुलगी आहे. लक्ष्मीशी विवाह केल्यावर मी आपल्या सर्व संपत्तीचा वारस नाही का होणार? अशा रीतीने संपत्ति नि प्रतिष्ठेच्या बाबतीत मी जमीनदार आणि जव्हेरी यांच्या सारखा होऊन जाईन. हो की नाही?"

हे उत्तर ऐकून रामनाथला संतोष वाटला. त्याने मंदस्मित करीत आपल्या मुलीकडे पाहिले. नंतर विद्याधर निघून गेला. मग लक्ष्मी आपल्या आई-वडिलांना म्हणाली–"विद्याधरचं बोलणं तुमच्या लक्षात आलं ना? माझ्याशी लग्न केलं की विद्याधर जमीनदार नि जव्हेरी यांच्या मुलांपेक्षा कुठल्या ही बाबतीत कमी असणार नाही. शिवाय कधी ही नष्ट न होणारी विद्यारूपी संपत्ति त्याच्या जवळ असेलच! या विद्येमुळे तो आपली संपत्ति वाढवील. जमीनदार आणि जव्हेरी यांच्या मुलांपाशी विद्या-धन नाही. आता तुम्हीच विचार करा आणि मी कुणाशी लग्न करावं याबाबतचा तुमचा निर्णय मला सांगा."

"लक्ष्मी तुझा विचार योग्यच आहे. तू विद्याधरशीच लग्न कर. हाच आमचा निर्णय!" माता-पित्यांनी लक्ष्मीने पसंत केलेल्या मुलाशी विवाहास आपली संमति दिली.

एका शुभ मुहूर्तावर लक्ष्मी आणि विद्याधर यांचा विवाह थाटा-माटात साजरा झाला. आणि त्यांनी सुखात आपले आयुष्य घालविले.





# वडाची साक्ष

एका गावात नारायण गुप्त नावाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. एके दिवशी तो आपल्या काही कामासाठी बाहेर गावी जायला निघाला. रस्त्यात त्याने सोमनाथ नावाच्या एका माणसाला पाहिलं. नम्रतापूर्वक त्याने नारायण गुप्तला विचारलं– "महाराज, माझी झोपडी अगदी मोडकळीला आली आहे. पावसाळा सुरू होण्याच्या आत जर दुरुस्ती न केली, तर माझ्या कुटुंबाला एकाद्या झाडाखालीच रहायला लागेल. आपण मला दोनशे रुपये उसने द्याल? शेतातलं पीक घरी आलं की ते विकून तुमचं कर्ज फेडून टाकीन."

नारायण गुप्त स्वभावाने मोठा दयाळू होता. सोमनाथला नकार देणं त्याला योग्य वाटेना. त्याने लगेच आपल्या पिशवीतून दोनशे रुपये काढले आणि सोमनाथला देऊन टाकले.

नंतर सोमनाथने मात्र आपल्या दिलेल्या वचनाचे पालन केले नाही. एक पीक घरात येऊन गेलं, आणि दुसरं पीक आता यायला झालं होतं.

एक दिवशी नारायण गुप्तने सोमनाथला बोलावलं नि प्रेमपूर्वक विचारलं–"सोमनाथ, मी दिलेलं कर्ज तू अजून परत दिलं नाहीस. एक वर्ष तर संपून गेलं, आता दुसरं वर्ष ही पूर्ण व्हायला आलं!"

सोमनाथने आश्चर्याने विचारले–"कर्ज? आपण हे काय म्हणत आहात? मला तर काही समजत नाही! जरा स्पष्ट सांगाल?"

"तुला आपल्या झोपडीची दुरुस्ती करायची होती. गेल्या वर्षी उन्हाळ्यात रस्त्यातच तू माझ्याकडून दोनशे रुपये कर्जाऊ घेतले होतेस. आणि आता म्हणतोस तुला काहीच स्मरत नाही!" नारायण गुप्तने थोडं स्पष्टपणे सांगितलं.



"मी भले ही विसरून जाईन, पण तुमच्या जवळ तर लिहून घेतलेले कागदपत्र असतील ना? ते माझ्याकडे पाठवा, तुमचं काही देणं असेल तर मी देऊन टाकीन." सोमनाथ म्हणाला. त्याला पक्कं माहीत होतं की नारायण गुप्तने त्याच्याकडून कागद वगैरे लिहून घेतला नव्हता.

नारायण गुप्त म्हणाला–"तू मला काही कागदपत्र लिहून दिला नव्हतास. दहाबारा दिवसात परत येणाऱ्या पैशांसाठी कशाला काही लिहून घ्यायचं असा विचार करून मी ही तुझ्याकडून काही लिहून घेण्याच्या फंदात पडलो नाही."

"वा! आपण चांगले सज्जन आहात. मला भोळा खेडूत समजून आपण माझ्यावर अकारण कर्ज लादत आहात! मी कबूल करीन असं वाटलं?" सोमनाथने अमळ धमकीच्या सुरात विचारलं.

त्यांचा हा वाद-विवाद ऐकून तिथे काही लोक जमा झाले, सर्वांनी दोघांना विचारलं–"अरे, असं झालं तरी काय? तुम्ही भांडत का आहात?"

नारायण गुप्तने लोकांना सर्व हकीगत सांगितली. पण सोमनाथने लोकांना सांगितलं की हे सर्व खोटं आहे.

शेवटी गावकऱ्यांनी सल्ला दिला– "तुमच्या या भांडणाचा निकाल तर



सरपंचच लावतील. चला, आपण त्याच्याकडे जाऊ."

"चला, सरपंचाला खरी गोष्ट सांगायला मला कसली भीति आहे?" असे म्हणत सोमनाथ सर्वां बरोबर निघाला.

सरपंच मोठा हुषार माणूस होता. खरी गोष्ट हुडकून काढण्यात तो प्रवीण होता. नारायण गुप्त नि सोमनाथ या दोघांचं ही म्हणणं त्याने नीट ऐकून घेतले.

सोमनाथला त्याचं काय म्हणणं आहे असं विचारलं तेव्हा तो रागाने म्हणाला– "मी काय भिकारी थोडाच आहे? दोनशे रुपये कर्जाऊ घेण्याची मला गरजच काय? मी आपल्या शेतात पिकलेलं धान्य विकून

झोपडीची दुरुस्ती केली ही गोष्ट खरी आहे. जर नारायण गुप्तने मला कर्ज दिलं असतं तर काही कागद-पत्र लिहून न घेता दोन वर्षं कुणी गप्प बसलं असतं का?"

नारायण गुप्त म्हणाला—"सोमनाथ, त्यावेळी तिथे कोणी नव्हते. एका वडाच्या झाडाखाली मी तुला पैसे दिले होते."

"मग काय? आपण त्या वडाच्या झाडालाच साक्षीदार म्हणून बोलवू या. तुम्ही आता तिथं जाऊन त्या वडाला सांगा की मी त्याला साक्षीसाठी बोलवलंय!" सरपंचाने नारायण गुप्ताला सांगितले.

सरपंचाचं बोलणं ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटलं! सोमनाथला आता खूपच आनंद झाला. त्याला वाटलं-या सरपंचाचं डोकं फिरलं आहे. मी कर्ज घेतलं हे आता कसं सिद्ध होऊ शकेल?

थोडा वेळ शांत बसून मग सरपंचान सोमनाथला विचारले—"सोमनाथ, आता पर्यंत नारायण गुप्त त्या वडापर्यंत पोंचला असेल का रे?"

सोमदासने तत्काळ उत्तर दिलं—"एवढ्यात तो तिथं कसा पोचेल? ते वडाचं झाड इथून दीड कोस अंतरावर आहे. शिवाय नुकताच पाऊस पडला आहे, रस्त्यांत चिखल झाला असेल, आणि तिथं किती तरी वडाची झाडं आहेत. त्यातून त्या वडाला शोधून काढणं सोपं का आहे?"

यावर सरपंचाने सोमनाथकडे निरखून पहात त्याच्या पाठीवर एक रट्टा मारला नि ओरडून विचारलं—"अरे चोरा, म्हणजे तुला हे ही माहीत आहे की कोणत्या वडाखाली बसून नारायणने तुला पैसे दिले होते!"

सरपंचाने योजलेली युक्ति पाहून सर्वांना आश्चर्य वाटलं. आपण कर्ज घेतल्याचे सोमनाथने मान्य केले, आणि नारायण गुप्ताला त्याची रक्कम सव्याज परत केली. त्या दिवसापासून सोमनाथला गावात वावरताना लोकांच्या डोळयांना डोळा देण्याची लाज वाटू लागली.



# चातुर्य

गौरीगंजमधे गोविन्द नावाचा एक चतुर माणूस रहात असे. त्याचे चातुर्य ओळखून, एकदा गावातल्या लोकांनी गावात देऊळ बांधण्यासाठी वर्गणी गोळा करायची कामगिरी त्याच्यावर सोपवली.

त्या गावात रामसिह् व लक्ष्मणसिह् नावाचे दोन प्रसिद्ध व्यापारी होते. हे दोघे जुळे भाऊ असल्यामुळे राम कोण अन् लक्ष्मण कोण हे ओळखणे सर्वांनाच कठीण जाई.

गोविन्द वर्गणीसाठी प्रथम लक्ष्मणसिह्च्या घरी गेला. लक्ष्मण गोविन्दला म्हणाला—"महाराज, आपण प्रथम रामसिह्कडे जायला हवे होते. थोडासा मोठा आहे ना तो?"

"गुणांच्या बाबतीत लहान मोठ्यात काय फरक? दानशूरपणात आपल्याशी बरोबरी करणारा कोणी आहे या गावात?" गोविन्द नम्रता दाखवत म्हणाला.

मोठ्या आनन्दाने लक्ष्मणसिह्ने एकशे सोळा रुपये वर्गणी देऊन गोविन्दला रवाना केले.

दुसऱ्या दिवशी गोविन्द रामसिह्कडे गेला अन् म्हणाला—"वयाने आपण मोठे, मला प्रथम आपल्याकडे यायला हवे होते. पण चुकून मी प्रथम आपल्या धाकट्या भावाकडे गेलो. त्यांनी माझ्या हातावर एकशे सोळा रुपये देत विचारले—"पुरेत एवढे?" काहीही असो, मोठे ते मोठे अन् छोटे छोटेच! आपण आपल्या मोठेपणाला साजेशी वर्गणी द्या हं!"

"तुम्ही मोठे चतुर आहात असं ऐकलंय खरं मी, पण आपण समजलात तसा मी रामसिह् नव्हे, लक्ष्मणसिह् आहे, समजलं? माझा मोठा भाऊ अंघोळ करतो आहे, तो बाहेर आला की भरपूर स्तुति करा हं त्याची! बसा या खुर्चीवर." लक्ष्मणसिह् हसत हसत म्हणाला.

बिचाऱ्या गोविन्दला आज प्रथमच कळून चुकलं, की आपलं चातुर्य सर्वच ठिकाणी, सारखं उपयोगी नाही पडत!





# सोन्याचे पीक

जावा द्वीपात डोंगो नावाचा एक गरीब तरूण रहात असे. बिचारा अगदी अनाथ होता. एका विधवा बाईकडे घरकाम करून तिच्या शेतातही काम करत असे तो. शेताची जमीन चांगलीच सुपीक होती. तरीही ज्या वर्षी डोंगोने शेत नांगरून पेरणी वगैरे केली, त्या वर्षी आलेली सगळी कणसं केवळ भुस्सा भरलेली निघाली!

दुसऱ्या वर्षीही हाच प्रकार घडला. त्यामुळे गावातल्या लोकात कुजबूज सुरू झाली. लोक म्हणत होते—"शेताची मालकीण मोठी कंजूष आहे; गावच्या देवीला कधी नीटपणे नैवेद्यही अर्पण करीत नाही ती; म्हणूनच तिचं शेत पिकत नाही, दुसरं काय!" या गोष्टी हळूहळू विधवेच्याही कानी आल्या. ती फारच रागावली अन् तिने डोंगोलाच कामावरून काढून टाकले.

डोंगो बिचारा भुकेने कळवळत तसाच गाव सोडून निघून गेला. एका संध्याकाळी तो दुसऱ्या गावी पोचला. गावाबाहेरच असणाऱ्या एका घराच्या दरवाज्यावर त्याने थाप मारली. या घरातही एक विधवा स्त्री रहात असे. दीनतेने तो म्हणाला—"घासभर खायला द्या माई—भुकेने जीव चाललाय माझा!"

विधवेने डोंगोला हाताचा आधार देऊन घरात आणले. त्याला जेवण दिले, व ती म्हणाली—"तू तर चांगला तगडा गडी दिसतो आहेस रे बाळा! भीक मागून जगायची पाळी का आली तुझ्यावर?"

डोंगोने यावर तिला आपली सर्व कर्म-कहाणी सांगितली आणि म्हटले—"मी खूप मेहनत केली. दुसरा कोणी असता तर इतकी मेहनत केली नसती त्याने! पण कणसात बी निघालं नाही हा काय माझा दोष?"

"खरंच, यात तुझा काहीच अपराध नाही. हे बघ, माझ्याजवळही थोडीशी जमीन आहे. तुझी इच्छा असेल तर माझ्या शेतीचं काम कर, आनन्दाने रहा इथे. जे पीक निघेल, त्याचा पाचवा हिस्सा मी तुला देईन." विधवा डोंगोशी सहानुभूतीने बोलली.

"काही हरकत नाही. माझी सारी शक्ती पणाला लावून काम करीन मी!" डोंगोने काम करायचे कबूल केले.

दुसऱ्या दिवशी भल्या सकाळी हातात फावडं अन् कुदळ घेऊन डोंगो शेतावर पोचला. सारी जमीन खोदून त्याने सारखी केली; नांगरल्यावर दिसते तशीच दिसू लागली ती! योग्य वेळी त्याने बी पेरून रोपाई ही केली. छान वाढले पीक, अन् कणसंही लागली त्याला! हळूहळू कणसांचा रंग सोनेरी झाला.

परंतु काढणीची वेळ जवळ आलेली पाहून तो शेतावर पोचला, तर त्याच्या मनाचा थरकापच झाला. एकदोन कणसे हातावर चुरडून पाहिली तर नुसता चोथाच!

"मीच कर्मदरिद्री आहे बहुतेक! जे कोणी मला काम देतील त्यांचंच दुर्दैव माझ्यामुळे!" असा विचार मनात येऊन डोंगो हताश झाला. कोणच्या तोंडाने मालकिणीला ही बातमी सांगणार तो? तिच्यापुढे काही बोलायची हिम्मतच होईना त्याची! पिकाची कापणी होईल

जावामधील लोककथा



तेव्हा आपोआपच कळेल तिला! अशा विचाराने कापणीच्या दिवशी सकाळीच घर सोडून निघून जायचा निश्चय केला त्याने.

त्या दिवशी सकाळ होण्यापूर्वीच उठला तो, अन् चोरपावलांनी घराबाहेर पडला– 'आपण एवढी मेहनत करून वाढवलेल्या शेतावर एकदा शेवटची नजर फिरवावी' या विचारने शेतात पोचला तो! सहजच एक कणीस तोडून हातावर चोळले त्याने, अन् काय आश्चर्य! त्यातून सोन्याचे तांदुळाचे दाणे बाहेर पडले!

डोंगोचा प्रथम आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना! त्याने एका पाठोपाठ एक कितीतरी कणसे चोळून पाहिली, अन् आश्चर्य म्हणजे सगळ्यातूनच सोन्याचे दाणे बाहेर पडले! त्याने ते दाणे मालकिणीला दाखवले.

"अरे बेटा, झालं तरी काय? इतका कसला आनन्द झालाय तुला?" मालकिणीने त्याला पहाताच विचारले.

"माई, आपल्या शेतात सोन्याचं पीक आलं सोन्याचं! हे पहा सोनं!" असे मोठ्या उत्साहाने सांगत डोंगोने आपल्या हातातले सोन्याचे तांदूळ तिला दाखवले.

डोंगोचं म्हणणं खरंच होतं! शेताची कापणी करून जेव्हा मळणी झाली, तेव्हा तेथे सोन्याचा ढीग झाला!' मालकिणीने आपल्या वचनाप्रमाणे डोंगोला त्या सोन्यातला पाचवा हिस्सा मोठ्या प्रेमाने देऊन टाकला. नंतर गावाच्या सर्व लोकांना बोलावून तिने त्यांना छानशी मेजवानी दिली.

डोंगोला सोन्याचा जो हिस्सा मिळाला, त्यातून त्याने काही शेते खरीदली. त्यावेळी मालकिणीनेही जी शेते खरीदली त्या शेतांची देखरेखही तो स्वतःच्या शेतांबरोबर करू लागला. या शेतातून काम करणाऱ्या मजुरांना तो पिकाचा पाचवा हिस्सा बक्षिस देई. त्या दिवसापासून जावा देशात शेत-मजुरांना उत्पादनाचा पाचवा हिस्सा देण्याची एक प्रथाच सुरु झाली.






## सरडा



सर्व प्रकारच्या परिसरांना अनुसरून आपला रंग बदलणारा प्राणी म्हणजे सरडा होय असे मानले जाते. पण ही गोष्ट खरी नाही. ते फक्त काही विशिष्ट प्रकारच्या वातावरणातच वैंगणी किंवा हिरवा रंग धारण करू शकतात. त्याच्या कातड्याच्या कणांचा रंग बदलण्यामुळे हे शक्य होते.

## आजही जिवन्त असणारा अत्यन्त प्राचीन वृक्ष

सबंध जगात अत्यन्त प्राचीन असा वृक्ष कॅलिफोर्नियातील श्वेत पर्वतात अस्तित्वात आहेत. ब्रिसिल कॉनपॅन नावाने ओळखला जाणारा हा एक प्रकारचा सागाचा वृक्ष आहे. असे मानले जाते की याचे वय जवळ जवळ ४६००० वर्षांचे आहे.



